# भारतीय लोकसत्ता

ित लिच्छवींची लोकसभा नियमानें भरत जाईल, वारंवार भरत जाईल, जोंपर्यंत तिचे सभासद एकदिलानें राहून एकोप्यानें राज्यकारभार करतील, वृद्ध, अनुभवी व योग्य पुढाऱ्यांचा आदर करून त्यांच्या सल्ल्यानें वागत जातील आणि तुच्छ स्वार्थ व मानापमान यांच्या-करितां भांडत रहाणार नाहींत तोंपर्यंत लिच्छवी प्रजातंत्र शक्तिशाली राहील. ज्यावेळीं याच्या उलट परिस्थिति होईल त्यावेळीं त्याचा नाश होईल. ”

—भगवान् गौतम बुद्ध

— डॉ. पु. ग. सहस्रबुद्धे

# भारतीय लोकसत्ता

लेखक

डॉ. पु. ग. सहस्रबुद्धे

एम्. ए., पीएच्. डी.

मराठीचे प्राध्यापक, सर परशुरामभाऊ कॉलेज, पुणें.



मेसर्स जोशी आणि लोखंडे प्रकाशन

मूल्य आठ रुपये

# प्रस्तावना

२६ जानेवारी १९५० रोजीं या भारतभूमींत आपल्या सार्वभौम लोकसत्ताक शासनाची स्थापना करून आपण भारतीयांनीं एका नव्या युगांत पदार्पण केलें आहे. या युगाच्या सीमेपर्यंत येऊन पोंचण्यासाठीं गेलीं शंभर वर्षें आपण या दिशेनें अखंड प्रवास करीत होतों. नवें युग व्यक्तित्वाचें, बुद्धिप्रामाण्याचें, समतेचें, स्वातंत्र्याचें आहे. जुनें युग अंधनिष्ठेचें, शब्दप्रामाण्याचें, विषमतेचें, पारतंत्र्याचें होतें. त्या जुन्या युगांतून या नव्या युगाच्या सीमेपर्यंत येऊन पोंचण्यासाठीं आपण जो बौद्धिक, मानसिक व सांस्कृतिक प्रवास केला त्याचें वर्णन या ग्रंथांत केलें आहे.

अनियंत्रित राजसत्तेच्या युगांतून लोकसत्तेच्या युगांत येण्यासाठीं समाजाच्या धार्मिक, सामाजिक, राजकीय व आर्थिक जीवनांत आमूलाग्र परिवर्तन घडून यावें लागतें. या प्रत्येक क्षेत्रांतील जुनें तत्त्वज्ञान सोडून देऊन नव्या तत्त्वज्ञानाचा स्वीकार करावा लागतो. या सर्व क्षेत्रांतील तात्त्विक सिद्धान्त एकत्र केले कीं लोकसत्तेचें तत्त्वज्ञान निर्माण होतें. तें तत्त्वज्ञान कोणचें, तें गेल्या शंभर वर्षांत या भूमींत कोणीं कसें निर्माण केलें, त्यासाठीं त्यांना कोणचे कष्ट करावे लागले, कोणचे संग्राम करावे लागले व त्याचें फळ आपल्याला काय मिळालें, या सर्वांचा ऊहापोह या ग्रंथाच्या भिन्न भिन्न प्रकरणांतून केला आहे.

मानवत्वाची प्रतिष्ठा, व्यक्तित्व, बुद्धिप्रामाण्य, सामाजिक व आर्थिक समता इ. लोकशाहीच्या मूलभूत तत्त्वांचें या ग्रंथांत स्वतंत्रपणें विवेचन केलेलें नाहीं. हा लोकसत्तेवरचा स्वतंत्र प्रबंध नसून भारतीय लोकसत्तेच्या विकासाचें ऐतिहासिक पद्धतीनें केलेलें हें विवेचन आहे. वरील सर्व तत्त्वांचें विवेचन यांत आलें आहे. किंबहुना ग्रंथरचनेचें तें सूत्रच आहे. या तत्त्वांची प्रस्थापना येथें कशी होत गेली हेंच प्रामुख्यानें ग्रंथांत सांगावयाचें आहे; पण त्या मूलतत्त्वांचें विवेचन हें ग्रंथाचें रूप नसून त्यांच्या प्रस्थापनेसाठीं राजाराम मोहन रॉय यांच्यापासून पंडित जवाहरलाल नेहरूंपर्यंत या भूमींतील थोर पुरुषांनीं जे प्रयत्न गेल्या शंभर वर्षांत केले त्यांचा इतिहास व त्यांचें या

लोकसत्तेच्या तत्त्वांच्या दृष्टीनें परिशीलन, हें ग्रंथाचें रूप आहे; म्हणून तत्त्व-विवेचन यांत अनुषंगानें आलें आहे.

कोणचीहि नवी सत्ता प्रस्थापित करावयाची म्हणजे जुन्या सत्तांशीं संग्राम करावा लागतो. या न्यायानें लोकसत्तेला जुन्या चार सत्तांशीं झगडावें लागतें. धर्मसत्ता, जातिसत्ता, राजसत्ता व अर्थसत्ता या त्या सत्ता होत. यांतील प्रत्येक सत्तेचें वर्चस्व मानवाच्या प्रतिष्ठेला, व्यक्तित्वाला बाधक असतें. कारण त्या सत्ता मानवाला मानव म्हणून ओळखीत नाहींत. मानवाचें स्वत्व, त्याचा अहंकार, त्याची बुद्धि, प्रज्ञा, त्याची श्रद्धा, त्याच्या निष्ठा, त्याच्या सहज गुणांची संपदा हें सर्व मानवधन वरील सत्तांच्या दृष्टीनें गौण आहे. आणि लोकसत्तेला तर त्याचेंच सर्वांत जास्त महत्त्व वाटतें. म्हणून त्याच्या प्रस्थापनेचे प्रयत्न करावयाचे म्हणजे वरील सत्तांशीं संघर्ष होणें अटळ होतें. गेल्या शंभर वर्षांत या भूमींतल्या पूर्वसूरींनीं हा महासंग्राम कसा केला तें या ग्रंथांत निवेदन केलें आहे.

भारतांतील लोकसत्तेचा इतिहास म्हणजे गेल्या शंभर-सवाशें वर्षांचा इतिहास होय. त्यापूर्वी येथें हजारों वर्षें अगदीं अनियंत्रित अशी राजसत्ता होती. पण गेल्या तीसचाळीस वर्षांत आपल्या प्राचीन इतिहासाचें जें संशोधन झालें त्यांतून, येथें प्राचीन काळीं गणराज्याच्या रूपानें लोकसत्ता प्रस्थापित झाली होती, असें एक मत प्रस्थापित झालें आहे. त्याचा परामर्ष घेण्यासाठीं व विषयाच्या पूर्ततेसाठीं भारतांतील प्राचीन लोकसत्तेचें विवरण पहिल्या प्रकरणांत केलें आहे. यांत दुसराहि एक हेतु साधला आहे. भारतांत प्राचीन काळीं लोकसत्ता होती कीं नव्हती या वादग्रस्त विषयाचा प्रपंच या प्रकरणांत केला असल्यामुळें लोकायत्त शासनाचीं प्रधान लक्षणें कोणचीं यांचें साहजिकच विवेचन त्यांत येऊन गेलें; आणि त्यामुळें निराळ्या विषय-प्रवेशाची गरज राहिली नाहीं. दुसऱ्या प्रकरणापासून गेल्या शतकांत जो सांस्कृतिक प्रवास आपण केला म्हणून वर सांगितलें आहे, त्याच्या वर्णनास प्रारंभ झाला आहे. मानवत्वाची प्रतिष्ठा, समतेचा महामंत्र व भौतिक अधिष्ठान या तीन प्रकरणांत धर्मसत्ता व जातिसत्ता यांशीं राम मोहन रॉय न्या. रानडे, महात्मा फुले, आगरकर या धुरीणांनीं कसा लढा केला व

कोणचीं नवीं तत्त्वें प्रसृत केलीं त्याचें निवेदन आहे. आपण जो ब्रिटिश साम्राज्यशाहीशीं लढा केला, तो लोकशक्तीच्या सामर्थ्यानें केला. भारतीय जनतेंतून एवढ्या बलाढ्य साम्राज्यशाहीशीं मरणमारणाचा संग्राम करण्याची प्रतिकारशक्ति लोकमान्य टिळक, महात्मा गांधी व नेताजी सुभाषचंद्र यांनीं कशी निर्माण केली तो इतिहास पुढील दोन प्रकरणांत सांगितला आहे. नंतर गांधीवादांतील जीं अर्थव्यवस्थेचीं तत्त्वें त्यांचें विवरण केलें आहे व त्यांतच पंडित जवाहरलाल यांचें समाजवादी अर्थशास्त्र व महात्माजींचें ग्रामप्रधान अर्थशास्त्र यांची तुलनात्मक चर्चा केली आहे. आठव्या प्रकरणांत मार्क्सप्रणीत तत्त्वज्ञान येथें कोणी कसें आणलें, समाजवाद व साम्यवाद यांचा येथें प्रसार कितपत झाला तें सांगून भारतीय लोकसत्तेच्या दृष्टीनें यांचें मूल्यमापन केलें आहे. ग्रंथाचा एक भाग येथें संपला. तेथून पुढें स्वातंत्र्यप्राप्तिनंतरच्या गेल्या सहासात वर्षांच्या काळांतील आपल्या नव्या लोकसत्तेच्या प्रगतीचा इतिहास दिला आहे. भारताचें लोकसत्ताक शासन संपन्न, समर्थ व खरेखुरें सार्वभौम होण्यासाठीं आपल्या जीवनाची सर्वांगीण पुनर्घटना होणें कसें अवश्य आहे, ती पुनर्घटना कोणत्या तत्त्वांवर झाली पाहिजे, त्यासाठीं येथें राष्ट्रसभेनें व इतर समाजधुरीणांनीं कोणते प्रयत्न चालविले आहेत आणि ते कितपत यशस्वी होत आहेत त्याचें विवेचन या उत्तरभागांत आहे.

प्रस्तुत ग्रंथाचें स्वरूप हें असें आहे.

गेल्या शंभर दीडशें वर्षांत जगाच्या जीवनांत एक फार मोठा बदल घडून येत आहे. या जीवनांतील प्रत्येक क्षेत्र, अधिकाधिक तंत्राधीन व शास्त्राधीन होत आहे. पूर्वी उपजत अंगीं असलेले चातुर्यसाहसादि गुण व प्रत्यक्षांत आलेला अनुभव यांच्या जोरावर मनुष्य सेनापतिपदापर्यंत सुद्धां चढूं शकत असे. लष्करी विद्येच्या शाळेंत त्या शास्त्राचे तात्त्विक व व्यावहारिक पाठ घेण्याची त्यासाठीं कोणालाच जरूर पडत नसे. आतां या पाठांवांचून माणूस सामान्य शिपाईसुद्धा होऊं शकणार नाहीं. लष्करी जीवन इतकें तंत्राधीन झालें आहे. आर्थिक व्यवहारांत हेंच आढळून येईल. देशाचे आर्थिक व्यवहार इतके कमालीचे गुंतागुंतीचे झाले आहेत कीं सामान्य

मनुष्याला सांगून सुद्धां त्यांचें आकलन होणार नाहीं. शेतकऱ्याचें जीवनहि यापुढें भोळेभावडेपणानें चालवितां येणार नाहीं. शास्त्रीय शेतीचा त्याला अभ्यास केलाच पाहिजे व जगाच्या शेतीच्या बाजाराकडे सावधपणें लक्ष ठेवलेंच पाहिजे. सामाजिक प्रपंचाच्या एकेक अंगोपांगांतील जीवन असें शास्त्राधीन असतांना त्या सर्व अंगोपांगांवर अवलंबून असणारें अखिल राष्ट्राचें लोकायत्त जीवन हें किती शास्त्राधीन असेल याचा भारतीय नागरिकांनीं विचार करावा. म्हणजे जगांतील लोकशाहीच्या इतिहासाचें व मूलतत्त्वांचें आपण किती कसोशीनें अध्ययन केलें पाहिजे याची त्यांना कल्पना येईल. धरण बांधण्यासाठीं एका दगडावर दुसरा दगड रचावयाचा असला तर, निदान वीस वर्षें तरी अध्ययन करावें लागतें. मग पसतीस कोटी जिवंत मानवांची रचना करून एक समर्थ समाज निर्माण करण्यासाठीं किती अध्ययन अवश्य आहे हें भारतीय तरुणांनीं स्वतःच्या मनाशींच विचार करून ठरवावें.

या लोकशाहीच्या अध्ययनास साह्य व्हावें या हेतूनेंच हा ग्रंथ लिहिला आहे. यांतील कोणचीं मतें कितीकांना पटतील हा प्रश्न त्या मानानें गौण आहे. लोकशाही ही काय कल्पना आहे, तिचा व्याप केवढा मोठा आहे, तिचीं मूलभूत तत्त्वें कोणचीं, कोणच्या परिस्थितींत तीं विकसित होतात, कोणच्या परिस्थितींत ती मरगळतात, या महत्त्वाच्या प्रश्नांचें सम्यक् दर्शन घडून भारताची लोकसत्ता यशस्वी करण्यासाठीं कोणच्या अभ्यासाची व प्रयत्नाची आवश्यकता आहे, याचें जनतेला आकलन झालें कीं ग्रंथलेखनाचा हेतु सफल झाला असें मी समजेन.

१९४५ सालापासून ‘ वसंत ’ मासिकांत लोकसत्ता या विषयाचें विवेचन मी करीत आहें. जगांतील बहुतेक सर्व लोकसत्तांचा इतिहास व विवरण त्या लेखांत येऊन गेलें आहे. त्यांतील भारतीय लोकसत्तेविषयींचीं प्रकरणें निराळीं काढून हा ग्रंथ तयार केलेला आहे. मूळच्या लेखनांत कांहीं प्रकरणांची भर घातली आहे. कांहीं प्रकरणांची रचना बदलली आहे. कांहीं प्रकरणांत लेखनानंतर हातीं आलेली माहिती समाविष्ट केली आहे. असे अवश्य ते फेरफार करून तें सर्व लेखन आतां ग्रंथरूपानें वाचकांच्या हातीं मी देत

आहे. राहिलेल्या लेखनालाहि असेंच ग्रंथरूप देऊन सवडीप्रमाणें ते ग्रंथ प्रसिद्ध करण्याचा विचार आहे. 'पाश्चात्य लोकसत्ता' या ग्रंथांत ग्रीस, रोम, ब्रिटन व अमेरिका येथील लोकसत्तांचें विवेचन येईल. रशिया आणि चीन व झेकोस्लोहाकिया, पोलंड, रुमानिया, मांचूरिया, मंगोलिया इ. त्यांच्या साम्राज्यांतील अंकित देश येथील शासनांच्या स्वरूपाचें विवेचन 'मार्क्सवादी लोकसत्ता' या ग्रंथांत येईल. आणि त्यानंतर इटली, जर्मनी, जपान, फ्रान्स इ. देश, तसेंच मेक्सिको, ब्राझील, अर्जेंटिना, वेनेजुवेला, इ. लॅटिन अमेरिकेंतील देश; इजिप्त, इराण, सिरिया, इंडोनेशिया इ. आशियाई देश येथील लोकायत्त शासनांच्या प्रयत्नांचे, त्यांना आलेल्या अपयशाचें, व त्यांना जडलेल्या विकृतींचें विवेचन हें सर्व चवथ्या ग्रंथांत समाविष्ट करण्याचा विचार आहे. मार्च १९४५ पासून मार्च १९५१ पर्यंत 'वसंत' मध्यें हें लेखन चालू होतें. इतक्या दीर्घकालपर्यंत अशा स्वरूपाचें लेखन आपल्या मासिकांत प्रसिद्ध केलें आणि आतां तें ग्रंथरूपानें प्रसिद्ध करण्याची परवानगी दिली याबद्दल 'वसंत' मासिकाचे संपादक श्री. दत्तप्रसन्न काटदरे यांचा मी आभारी आहें.

या ग्रंथांत विषयाचें विवरण करतांना अनेक ठिकाणची माहिती जमा करून दिली आहे. वर्तमानपत्रें, मासिकें, मराठी, संस्कृत, इंग्रजी ग्रंथ यांतून अवतरणें दिलीं आहेत. सन दिले आहेत. आंकडे दिले आहेत. आधारासाठीं अनेक पंडितांचीं मतें दिलीं आहेत. थोरपुरुषांचीं वचनें दिलीं आहेत. हें सर्व देतांना त्यांत चूक होऊं नये म्हणून शक्य तेवढी दक्षता मीं घेतली आहे. तरी नजरचुकीनें, अनवधानानें, गैरसमजानें क्वचित् कोठें चूक झाली असल्यास वाचकांनीं ती माझ्या नजरेस आणावी अशी त्यांना नम्र विनंति आहे.

या ग्रंथाचें लेखन करीत असतांना मला अनेकांचें साह्य झालें आहे. कॉंग्रेस, समाजवादी, कम्युनिस्ट या राजकीय पक्षांविषयीं लिहीत असतांना त्या त्या पक्षाच्या अभिमानी लोकांशीं मी मुद्दाम चर्चा करीत असें. एकांतिक मतें, रूढ पूर्वग्रह व गैरसमज हे नाहींसे होण्यास त्यांचा फार उपयोग झाला. आचार्य भागवत, प्रा. श्री. म. माटे, श्री. दा. न. शिखरे,

श्री. ना. ग. गोरे, श्री. एस्. एम्. जोशी, प्रा. कोगेकर, प्रि. कोल्हटकर, श्री. बेडेकर यांचा मी या साह्याबद्दल ऋणी आहें. माझे अत्यंत निकटचे मित्र श्री गं. म. साठे, बी. ए., बी. टी. हे ग्रंथाच्या मूळ योजनेपासूनच माझ्या सांगाती आहेत. प्रत्येक प्रकरणाच्या रचनेच्या बाबतींत त्यांच्याशीं विचारविनियम करून मगच त्याची आखणी मी निश्चित करीत असें. त्यांचे या बाबतींत झालेलें साह्य बिनमोल असें आहे. केसरी मराठा ग्रंथालयाचे ग्रंथपाल श्री. दि. वि. काळे, इंटर नॅशनल बुकसर्व्हिसचे श्री. दीक्षीत यांनीं आपल्या ग्रंथालयाचा अगदीं मोकळेपणानें मला उपयोग करून दिला व कधीं कधीं अवश्य तीं नवीं पुस्तकेंहि घेऊन दिलीं म्हणून माझें काम पुष्कळच सुकर झालें. त्यांचा यासाठीं मी अतिशय आभारी आहें. शेवटीं या ग्रंथाचे प्रकाशक श्री. अण्णासाहेब लोखंडे व श्री. नानासाहेब जोशी यांचे आभार मानावे तेवढे थोडेच आहेत. हल्लींच्या दिवसांत असल्या ग्रंथाचें प्रकाशन त्यांनीं अंगावर घेतलें आणि पृष्ठसंख्येवर कसलेंहि बंधन घातलें नाहीं. त्यांच्या या धाडसावांचून हा ग्रंथ प्रसिद्धीस येणें अशक्य होतें. त्यांनीं हा ग्रंथ तर प्रसिद्ध केलाच आहे पण शिवाय वर निर्देशिलेल्या इतर ग्रंथाचीहि जोखीम शिरावर घेऊन मला कायमचें ऋणी करून ठेविलें आहे.

ग्रंथाविषयीं शेवटीं वाचकांना एक विनंति करावयाची आहे. त्याच्या आरंभीच्या प्रकरणापासून शेवटच्या प्रकरणापर्यंत प्रत्येक ठिकाणचा विषय अत्यंत वादग्रस्त आहे. आणि हे वाद केवळ पांडित्याच्या क्षेत्रांतले नसून नित्याच्या जीवनांतले आहेत. वैयक्तिक अभिमान, पक्षाचा अभिमान, जातीचा अभिमान व शेवटी धर्माचा अभिमान असे उत्तरोत्तर उग्र, उग्रतर, उग्रतम होत जाणारे अभिमान या वादांच्या मागें उभे आहेत. त्यांचा संपर्क न लागूं देतां, त्यांचा संबंधहि न येऊं देतां लिहावयाचें म्हटलें तर लेखणी खालींच ठेविली पाहिजे. भारतीय जीवन हा लेखनाचा विषय. आणि वर निर्देशिलेलीं वादप्रकरणें हा तर त्याचा मुख्य गाभा. त्यांचा अंतर्भाव होत नाहीं असें आपल्या जीवनाचें एकहि अंग नाहीं. तेव्हां त्यांचा उल्लेख केल्यावांचून एक अक्षरहि लिहिणें शक्य नाहीं. अशा स्थितींत

पक्ष न घेतां, अभिनिवेश न येऊं देतां, शक्य तेवढ्या अलिप्तपणानें आणि वस्तुस्थिति, आधार, प्रमाण यांच्या बंधनांच्या बाहेर एक पाऊलहि न जाऊं देतां विवेचन करणें हा एकच मार्ग उरतो. हा मार्ग अनुसरण्याची मी पूर्ण कसोशी केली आहे. या मर्यादांचा अतिक्रम जाणूनबुजून मीं कोठेंहि होऊं दिलेला नाहीं. असें असूनहि कोणाचे कोठले अभिमान यांत डिवचले गेले असतील तर त्यांची मी येथेंच क्षमायाचना करतों. मी आपल्याकडून येवढेंच सांगूं इच्छितों कीं पक्ष, पंथ, जाति, धर्म यांचा इतिहास व शास्त्र यांच्याच केवळ दृष्टीनें अभ्यास जर शक्य असेल तर तो येथें प्रामाणिकपणें केलेला आहे. म्हणून वाचकांनींहि तशाच दृष्टीनें ग्रंथ पहावा अशी त्यांना प्रार्थना आहे.

गेलीं तीनचार वर्षें पुणें, मुंबई, नाशिक, जळगांव, मिरज, वाई, नगर इ. महाराष्ट्रांतल्या निरनिराळ्या केन्द्रस्थानीं या ग्रंथांत सांगितलेले विचार व्याख्यानरूपानें मीं श्रोत्यांच्या पुढें मांडलेले आहेत. त्या वेळीं असें आढळलें कीं तरुण, प्रौढ, वृद्ध सर्वच नागरिकांना आणि त्यांतहि तरुण विद्यार्थ्यांना या विषयाची अतिशय जिज्ञासा आहे. विद्यार्थ्यांनीं तर पराकाष्ठेच्या आस्थेनें हे गहन गंभीर विषय ऐकले आहेत. त्या सर्व तरुण व प्रौढ नागरिकांना माझी विनंति अशी कीं, त्याच आस्थेनें त्यांनीं या ग्रंथाचेंहि अध्ययन करावें आणि भारतीय लोकसत्ता यशस्वी करणें ही आपली प्रत्येकाची जबाबदारी आहे या विचाराची चित्तांत जोपासना करावी. तसें त्यांनीं केलें तर अल्पकालांतच अवश्य ती लोकशक्ति भारतांत निर्माण होईल व मग आपल्या पुढच्या सर्व समस्या सहज सुटूं लागतील.

वर्षप्रतिपदा
१८७६

# अनुक्रमणिका

भारताच्या

जागृत

लोकशक्तीस

# भारतीय लोकसत्ता

## प्रकरण १ लें

## प्राचीन भारतांतील लोकसत्ता

भरतभूमीच्या प्राचीन इतिहासांतील इ. स. पू. ८०० ते इ. स. ६०० हा काळ अत्यंत वैभवाचा होता, याविषयीं पाश्चात्य-पौर्वात्य कोणाहि पंडितांमध्यें दुमत नाहीं. सर्व प्रकारच्या विद्या, कला, शास्त्रें यांचा या भूमींत जो विकास झाला तो याच काळांत. या भूमीला चिरंतन ऋणी करून ठेवणारे महान् तत्त्ववेत्ते, थोर सम्राट्, धर्मप्रवक्ते, साहित्यसम्राट् हेहि बहुतेक सर्व याच काळांत होऊन गेले आणि आतां नव्या संशोधनाअन्वयें असें दिसतें कीं, भारतामध्यें लोकसत्तांचा उदय होऊन त्यांचा उत्कर्ष झाला तोहि याच काळांत. इतिहासांतलें हें सत्य प्रकाशांत आणून या संशोधकांनीं लोकशाहीच्या एका फार मोठ्या सिद्धान्ताला पुष्टीच दिली आहे. एखाद्या समाजाला कोणच्याहि क्षेत्रांत जें वैभव प्राप्त होतें, तें त्या क्षेत्रांत माणसांना चिंतन, मनन करण्यास आणि त्यांतून निघणारीं तत्त्वें व विचार यांचा लोकांत प्रसार करण्यास जें स्वातंत्र्य मिळालेलें असतें त्यामुळें होतें आणि अशा स्वातंत्र्यावांचून संस्कृतीच्या कोणच्याहि अंगाची जोपासना होत नाहीं, हा तो सिद्धान्त होय. भारताच्या प्राचीन इतिहासांतला जो परमोच्च वैभवाचा काळ तोच लोकसत्ताकांच्याहि उत्कर्षाचा काळ होता हें या दृष्टीनें अत्यंत सुसंगत असेंच दिसतें. इतिहासांतल्या घटनांमध्यें यामुळें एक उत्तम सुसंवाद निर्माण होतो आणि यासाठींच या अभ्यासाचें महत्त्व फार आहे.

डॉ. जयस्वाल व डॉ. आळतेकर यांच्या मतें साधारणतः इ. स. पू. ६०० ते इ. स. ४०० हा भारतांतील प्राचीन लोकराज्यांचा किंवा प्रजातंत्रांचा काळ होय. पंजाब, उत्तर प्रदेश, बिहार या उत्तर हिंदुस्थानांतील प्रांतांत या काळांत न्यासा, कठ, मालव, क्षुद्रक, कंबोज, त्रिगर्त, कौलिय,

लिच्छवि विदेह इ. अनेक लोकराज्यें किंवा गणराज्यें होऊन गेलीं. व इ. सनाच्या चवथ्या शतकांत गुप्त साम्राज्याच्या काळांत हीं सर्व गणराज्यें नष्ट झालीं. असें असलें तरी जवळजवळ एक हजार वर्षांचा दीर्घ अवधी या राज्यांच्या उदयाला व विकासाला मिळाला होता. त्यांच्या सर्व अंगोपांगांच्या वाढीला हा अवधि अगदीं पुरेसा आहे. या गणराज्यांचा अभ्यास करून लोकशाहीविषयीं कांहीं निष्कर्ष काढावयासहि ह्या भारतांतील प्राचीन काळच्या प्रयोगानें अगदीं परिपूर्ण साधनसामुग्री दिली आहे. म्हणून आतां या लोकसत्ताकांचें सविस्तर विवेचन करावयाचें आहे.

## प्राचीन लोकसत्तांचें स्वरूप

इ.स.पू.६०० ते इ.स. ४०० हा लोकसत्तांचा काळ म्हणून वर सांगितलें; पण या काळांत या लोकसत्ता एकाएकीं उदयास आल्या नाहींत. त्याच्या आधींच्या काळांतहि या प्रकारच्या शासनाचीं कांहीं पूर्वचिन्हें दृष्टोत्पत्तीस येत होतीं. तशा प्रकारची पूर्वतयारी चालू होती. वेद-काळामध्यें सामान्यतः भारतांत सर्वत्र राजसत्ताच प्रचलित होती. या काळांतहि कांहीं वैराज्यें म्हणजे गणराज्यें होतीं असा उल्लेख कोठें सांपडतो; पण तो अपवादात्मक होय. एकंदरींत पहातां वेदकाळ हा नृपतंत्राचा म्हणजे राजसत्तेचा काळ होता; पण असें असलें तरी त्या काळांत राजा हा सर्वस्वी अनियंत्रित होता असें मात्र नव्हे.'समिति'या नांवानें लोकसभेच्या स्वरूपाची एक सभा त्यावेळीं अस्तित्वांत आली होती आणि राजसत्तेवर तिचें पुष्कळच नियंत्रण होतें. कुलाच्या मुख्याला त्या काळीं कुलपति म्हणत. अनेक कुलांच्या समुदायास 'विश्' अशी संज्ञा होती आणि त्यांच्या मुख्यास 'विश्पति' म्हणत. समितीत प्रायः कुलपति व विश्पति हे सभासद असत. हे सभासद त्याकाळीं प्रबळ व सत्तासंपन्न असल्यामुळें त्यांच्या समितीचें राजसत्तेवरचें नियंत्रण चांगलेंच प्रभावी होत असें. समिति राजाला अनुकूल नसणें ही राजावरची सर्वांत मोठी आपत्ति होय, तो शापच होय, असें अथर्व वेदांत म्हटलें आहे.

समितीप्रमाणेंच सभा नांवाची दुसरी लोकायत्तसंस्था त्या काळीं होती. डॉ. आळतेकरांच्या मतें सभा ही खेड्यांतली संस्था आणि समिति ही सर्व राज्याची नियामकसंस्था होय. डॉ. जयस्वालांच्या मतें सभा हें समितीचें

कार्यकारी मंडळ असावें. कांहीं असलें तरी त्या काळीं राज्यकारभाराचें व एकंदर जनतेच्या सामाजिक संसाराचें नियंत्रण करणाऱ्या लोकायत्तसंस्था उदयास आल्या होत्या, एवढें यावरून निर्विवाद सिद्ध होतें. या समितींत व सभेंत राज्यकारभारांतील सर्व व्यवहारावर चर्चा होत असे. जमाबंदी, न्याय, विद्या, धर्म इ. अनेक विषयांवर सभासद चर्चा करीत व त्या त्या व्यवहाराच्या नियंत्रणाविषयीं आपलें मत सांगत. ग्रामव्यवहार व एकंदर केन्द्र-व्यवहार या दोन्ही ठिकाणीं या मताचा प्रभाव फार असे. तें सहजासहजीं डावलणें राजसत्तेला शक्य नव्हतें.

राजसत्ता ही ईश्वरप्रणीत आहे आणि राजा हा ईश्वरी अवतार होय हें तत्त्व वेदकाळीं कोणाच्या स्वप्नांतहि नव्हतें. त्याचा मागमूसहि वेदकालीन वाङ्मयांत सांपडत नाहीं. राजाला ती ईश्वरी पदवी पुराणांनीं व स्मृतींनीं दिली आणि इसवी सनाच्या पहिल्या चारपांच शतकांत ती उत्तरोत्तर दृढ होत गेली; तरी याहि काळाविषयीं एक गोष्ट लक्षांत ठेविली पाहिजे ती ही कीं, राजाला विष्णूचा अवतार म्हणून गौरविणारे स्मृतिकारहि त्याची सत्ता सर्वस्वी अनियंत्रित असते असें कधींच म्हणत नाहींत. वर्णाश्रमधर्माचे नियम हे शाश्वत, त्रिकालाबाधित आहेत आणि त्याअन्वयें प्रजेचें परिपालन व शासन करणें हाच राजाचा धर्म होय, असें स्मृतिकार सांगतात. राजाला आपल्या लहरीप्रमाणें वाटेल तसे कायदे करण्याचा अधिकार एकहि स्मृतिकार देत नाहीं. 'राजा प्रकृतिरंजनात्' हें महातत्त्व सर्वांनीं शिरसावंद्य मानलेलें आहे. राजानें आपलें कर्तव्य केलें नाहीं तर त्याला पदच्युत करण्याचा अधिकार प्रजेला आहे असें मत अनेक स्मृतींनीं सांगितलें आहे. जो राजा कर घेतो पण प्रजेचें संरक्षण करीत नाहीं त्याला प्रजेनें ठार करावें असें महाभारतांत स्पष्टपणें उपदेशिलें आहे. प्रत्यक्षांत ही गोष्ट फार अवघड असतें हें खरें, पण त्या काळचें राजसत्तेविषयींचें एकंदर तत्त्वज्ञान काय होतें हें त्यावरून समजून येतें. राजाला पदच्युत करण्याचा अधिकार प्रजेला देऊन त्या वेळच्या समाजधुरीणांनीं अप्रत्यक्षरीत्या कां होईना, प्रजेचें सार्वभौमत्व मान्य केलेलें आहे. वेदकाळांत तर हे विचार पुष्कळच प्रभावी होते. लोकसत्तांचा उदय होतो तो अशाच विचारांतून होतो. प्रजातंत्राचीं पूर्व चिन्हें तीं हींच होत.

वेदकाळांत सर्वत्र याच स्वरूपाची राजसत्ता चालू होती आणि इ. स. पूर्व ७ व्या शतकाच्या सुमारास याच शासनांत भारतांतील कांहीं प्रांतांत परिवर्तन झालें आणि त्यांतून अनेक ठिकाणीं, विशेषतः वायव्य व ईशान्य हिंदुस्थानांतील अनेक प्रदेशांत, प्रजातंत्रें अथवा गणराज्यें निर्माण झालीं. जलालाबादच्या न्यासा नगरामध्यें, सियालकोटच्या कठराज्यांत, बियास नदीच्या पूर्वेकडील प्रदेशांत आणि सिंधूच्या कांठच्या मालव, क्षुद्रक इ. जमातींमध्यें प्रजातंत्र-राज्यें अस्तित्वांत होतीं असें ग्रीक इतिहासकारांनीं नमूद केलें आहे. पंजाबांत कंबोज, वृक, दामणि, दंडकि, त्रिगर्त इ. गणराज्यें नांदत होतीं. उत्तर प्रदेश व बिहार प्रांतांत भग्ग, कोलिय, शाक्य, लिच्छवि, विदेह इ. प्रजासत्ताक-राज्यें असल्याचा पुरावा अलीकडे उपलब्ध झाला आहे. सौराष्ट्रांतील अंधकवृष्णींच्या संघाचें शासन प्रजासत्ताक पद्धतीचें असून भगवान् श्रीकृष्ण हा त्याचा अध्यक्ष होता. आपल्या कल्पनेप्रमाणें श्रीकृष्ण हा सम्राट नसून तो लोकनियुक्त अध्यक्ष होता आणि लोकांच्या टीका त्याला ऐकून घ्याव्या लागत, असें त्याच्याच उद्‌गारावरून पंडितांनीं दाखवून दिलें आहे. महाभारतांतील सभापर्वांत किरात, दरद, औदुंबर, पारद, बाल्हिक, शिबि, यौधेय, त्रिगर्त, केकय, अंबष्ट, पौण्ड्र, अंग, वंग, इ. अनेक संघराज्यांचा निर्देश केलेला सांपडतो. याशिवाय आर्जुनायन, माद्रक, आभीर, प्रार्जुन, सनकानीक, काक, अरिष्ठ, सौभूति अशा अनेक गणराज्यांचा उल्लेख इतर अनेक ग्रंथांतून सांपडतो. पाणिनीची अष्टाध्यायी चाणक्याचें अर्थशास्त्र, बौद्धांचा अवदानाशतक हा ग्रंथ, मेग्यास्थिनीसचें व इतर ग्रीक ग्रंथकारांचें लिखाण, हें या बाबतीतलें मुख्य आधारभूत वाङ्मय होय. याच्या आधारानें इ. स. पूर्व ६०० ते इ. स. ४०० या काळांत उत्तर हिंदुस्थानांत शेंकडों गणराज्यें नांदत असल्याचें पंडितांनीं आतां निर्विवादपणें सिद्ध केलें आहे.

## प्रातिनिधिक पद्धतीचा अभाव

भारतांतील या गणराज्यांत प्रतिनिधि निवडण्याची पद्धति उदयास आलेली नव्हती. या सर्व लोकसत्ता साक्षात् किंवा प्रत्यक्षस्वरूपाच्या होत्या. हजार, दहा हजार किंवा एक लाख लोकांना एक प्रतिनिधि असावा आणि

अशा प्रतिनिधींच्या सभेनें राज्य करावें अशी सध्यांची पद्धत आहे. तशी त्याकाळीं नव्हती. त्याकाळीं त्या गणराज्यांचें आकारमान फार लहान होतें. कित्येकांची मर्यादा एका नगरीपुरती असे आणि जास्तींत जास्त विस्तार म्हणजे चारपांच जिल्ह्यांच्या एवढा असे. याहून मोठें गणराज्य त्याकाळीं कोठेंच अस्तित्वांत नव्हतें; सभासदत्वाच्या योग्यतेचे जे कोणचे अवश्य गुण ठरलेले असत, त्या गुणांनीं युक्त असे सर्वच लोक सभेचे सभासद होत आणि राज्य करीत. यामुळें हीं प्रजातंत्रें आकारानें लहान असलीं, तरी अनेक ठिकाणीं लोकसभेच्या सभासदांची संख्या पुष्कळच मोठी असे. सध्यां भारताची लोकसंख्या छत्तीस कोटीच्या आसपास आहे; तरी आपल्या केन्द्रीय लोकसभेंत सहाशेपर्यंतच सभासद आहेत. पण प्राचीन काळीं बहुतेक सर्व प्रौढ नागरिक सभासद होऊं शकत असल्यामुळें लिच्छवी या लोकराज्याची लोकसंख्या १ लक्ष ६८ हजार असूनहि त्याच्या विधि-मंडळांत ७७०७ सभासद होते. या सर्वांना अभिषेक होई व त्यांना ‘ राजा ’ ही पदवी मिळे. यौधेयांच्या प्रजासत्ताकराज्यांत असेच पुष्कळ म्हणजे ५००० सभासद असत. प्राचीन ग्रीक नगरराज्यांत आपणांस हाच प्रकार आढळतो. येथेंहि अप्रत्यक्ष म्हणजे प्रातिनिधिक पद्धति उदयास आलेली नव्हती. इतकेंच नाहीं तर ग्रीक लोक ती पद्धत आक्षेपार्ह आहे, असेंच मानीत असत. त्यांच्या मतें निवडून दिलेल्या प्रतिनिधींची सत्ता ही खरी लोकसत्ताच नव्हती; त्यामुळें तेथील लोकसभेंत राज्यांतील सर्व प्रौढ पुरुष सभासद म्हणून बसत. अथेन्सच्या लोकसभेचे ४२००० सभासद होते; याचप्रमाणें स्पार्टा, सिराक्यूज इ. लोकसत्ताकांच्या सभांच्या सभासदांची संख्या मोठी असे. अर्थात इतके सर्व सभासद दरवेळीं उपस्थित असत असें नाहीं. ग्रीक लोकसभांत सामान्यतः हजार दीड हजार उपस्थिति असे. तसेच आपल्या वर निर्देश केलेल्या लिच्छवि व यौधेय या गणराज्यांत ५०० ते ७०० पर्यंतच सभासद सामान्यतः हजर रहात असावेत. असो. त्या काळीं प्रातिनिधिक पद्धत नव्हती आणि प्रत्यक्ष पद्धतीनें लोकशाहीचा कारभार चालत असे, येवढाच महत्त्वाचा भाग आहे.

शासनाचा प्रत्यक्ष कारभार चालविण्यासाठीं या लोकसभा अध्यक्ष उपाध्यक्ष, सेनापति, मंत्री यांची निवड करीत. अध्यक्ष-उपाध्यक्षांना अनेक

ठिकाणीं राजा व उपराजा अशा संज्ञा होत्या; पण यांना स्वतःचें मंत्रिमंडळ निवडण्याचा अधिकार नव्हता. लोकसभाच मंत्र्यांची निवड करीत असे. मल्लनामक प्रजातंत्रांत चार मंत्री असत. लिच्छवींत ही संख्या नऊपर्यंत गेली होती आणि लिच्छवी व विदेह यांचें संघराज्य झालें तेव्हां लोकसभेनें ही संख्या अठरापर्यंत नेली होती. सेनापतींची निवड होई ती रोमप्रमाणें मर्यादित कालापर्यंतच होई. हे सेनापति सत्ता बळकावून बसण्याची भीति असल्यामुळें या पद्धतीचा अवलंब केलेला असावा. एकंदरींत असें दिसतें कीं, या प्राचीन लोकसभा बहुतेक सत्ता आपल्या हातीं राखून ठेवीत आणि कारणपरत्वें त्या त्या वेळीं अधिकाऱ्यांची निवड करीत. क्षुद्रक या प्रजातंत्रानें शिकंदराबरोबर तह करण्यासाठीं १५० सभासदांची निवड केली होती. शाक्य प्रजातंत्रावर कोशल नरेशानें स्वारी केली,तेव्हां त्यांच्यावर शरणागतीची पाळी आली. त्यावेळी हा अंतिम निर्णय घेण्याचे अधिकार लोकसभेनें आपल्याकडेच घेतले होते. एक विशेष अधिवेशन घेऊन तिनें हा ठराव संमत केला. राज्यांतील सर्व कारभारावर सर्व काळीं अखिल लोकसभेची हुकमत चालावी, तिच्याच तंत्रानें सर्व लहानमोठया घटना घडाव्या, असें हें धोरण होतें. अर्थात या राज्यांचें स्वरूप फार लहान असल्यामुळेंच हें शक्य होत असे. राज्याचा विस्तार होऊं लागतांच हें धोरण अव्यवहार्य म्हणून सोडून द्यावें लागतें; पण प्राचीन काळीं असा विस्तार केव्हांच झाला नाहीं. म्हणून अशा प्रत्यक्ष पद्धतीनेंच सर्वत्र कारभार चालत असे.

प्राचीन प्रजातंत्रांतील या लोकसभांचें कामकाज पुष्कळसें सध्यांच्याच पद्धतीनें चालत असे.सभासद सभेपुढें ठराव मांडीत. मग त्यांवर उलटसुलट, अनुकूल-प्रतिकूल भाषणें होत. आणि शेवटीं बहुमतानें निर्णय होई. मतदान करण्यासाठीं सभासदांजवळ भिन्न रंगांच्या शलाका दिल्या जात. आणि शलाकाग्राहकाकडे त्या जमा झाल्यावर त्या मोजून भूयसी पद्धतीनें म्हणजे बहुमतानें निर्णय करीत. पुष्कळवेळां हें मतदान गुप्तपद्धतीनेंहि होत असे. मात्र सर्वत्र ही पद्धत रूढ होती असें नाहीं. कित्येक ठिकाणीं उघडपणेंहि मतदान होई. मतदान होण्यापूर्वी प्रत्येक ठरावाचें त्रिवार वाचन होत असें. या लोकसभेची कार्यवाही ( प्रोसीडिंग्ज ) लिहिण्याकरितां अधिकृत लेखक असत आणि एकदां निकालांत निघालेली बाब कांहीं कालापर्यंत पुन्हां

विचारांत घेतां येत नसे. सारांश इतर बाबतींत प्राचीन प्रजातंत्रांचें स्वरूप सध्यांच्या लोकसत्तापेक्षां निराळें असलें तरी सभेच्या कामकाजाचें स्वरूप व त्याचे नियम बरेचसे सध्यांच्या सारखेच असत असें दिसतें.

## सामर्थ्य व समृद्धि

महाभारत, कौटिलीय अर्थशास्त्र इ. प्राचीन ग्रंथांत लोकसत्ताक शासनाचा उपहास केलेला आढळतो. या पद्धतींत सर्वच स्वतःला शहाणे-बरोबरीचे समजत असल्यामुळें कोणी कोणाच्या आज्ञा पाळीत नाहीं व त्यामुळें शेवटीं कलह, दुही, फूट या रोगांनीं समाज दुबळा होऊन जातो, असा या ग्रंथांतील टीकेचा भावार्थ आहे. प्रजातंत्राचे हे मूलभूत दोष आहेत हें सर्वमान्यच आहे आणि आपलीं प्राचीन प्रजातंत्रें पुढील काळांत विलयास गेलीं त्याचें, कांहीं पंडितांच्या मतें, हेंच कारण आहे. या प्रजातंत्रांना समाज संघटित ठेवतां आला नाहीं. त्यामुळेंच त्यांचा नाश झाला; पण असें असलें तरी ज्या हजार एक वर्षांच्या काळांत या प्रजातंत्रांचा उदय व उत्कर्ष झाला, त्या काळांत आपापल्या परीनें का होईना तीं चांगलींच बलाढ्य व सामर्थ्यशाली होतीं, हेंहि या पंडितांनीं प्रांजळपणें नमूद करून ठेविलें आहे. क्षुद्रक-मालव या लोकायत्त संघाच्या सामर्थ्याचें ग्रीक ग्रंथकारांनींच वर्णन केलें आहे. या संघाजवळ एक लाख जय्यत सैन्य होतें आणि अशा बलाढ्य सेनेस तोंड देण्यास शिकंदराचे शिपाई तयार होईनात म्हणून त्याला शेवटीं त्यांच्याशीं तह करावा लागला. अग्रश्रेणी व अंबष्ठ या दोन प्रजासत्ताक राज्यांचें लढाऊ सामर्थ्य असेंच मोठें होतें. अग्रश्रेणीजवळ चाळीस हजार पायदळ व तीन हजार घोडदळ आणि अंबष्ठाजवळ ६० हजार पायदळ, ६ हजार घोडदळ व पांचशें रथ अशा सेना होत्या. अशा तऱ्हेचें लष्करी बळ उभविण्याची सिद्धता असल्यामुळें हीं राज्यें धनधान्य-संपत्तीनेंहि समृद्ध अशीं होतीं. म्हणजे या दृष्टीनेंहि, राजसत्तेच्या तुलनेनें विचार करतां, हीं प्रजातंत्रें अपयशी झालीं असें म्हणतां येणार नाहीं. भारतांत प्राचीन काळीं अगदीं लहानलहान ज्या राजसत्ता होत्या, त्यांची शौर्य व संपन्नता या बाबतींत या प्रजातंत्रांहून जास्त चांगली स्थिति होती असें मुळींच म्हणतां येणार नाहीं. फरक येवढाच दिसतो कीं, राजसत्तेला पुढें फार मोठ्या प्रमाणावर

आपला विकास व विस्तार करता आला तसा प्रजासत्तेला प्रत्यक्ष पद्धतीमुळें आला नाहीं. थोर व समर्थ राजांनीं आपल्या राज्याचें साम्राज्य केलें आणि त्यांतील अशोक, चंद्रगुप्त, समुद्रगुप्त यासारख्या सम्राटांनीं आपल्या राज्याच्या मर्यादा अखिल भारतापर्यंत नेऊन भिडविल्या. प्रजातंत्रांना हें कधींहि साधलें नाहीं, त्यांचा व्याप अत्यंत अल्प असाच राहिला. एकदोन जिल्ह्यापलीकडे त्यांच्या सत्तेचा व्याप कधीं वाढू शकला नाहीं आणि त्यामुळेंच पुढील काळांत साम्राज्यांच्या विशाल सत्तेपुढें त्यांना टिकाव धरतां आला नाहीं; तरी अल्प प्रमाणावर का होईना पण भारतांत मागल्या काळीं लोकसत्ताक राज्यें सामर्थ्य व समृद्धि निर्माण करण्यांत यशस्वी झालीं होतीं, ही गोष्ट अतिशय भूषणावह आहे, हें आपण विसरतां कामा नये.

## ग्रामीण स्वराज्य

प्राचीन काळच्या लोकायत्त शासनाचा एक उल्लेखनीय विशेष म्हणजे येथील ग्रामपंचायती हा होय. लोकशासन त्या काळीं फक्त नगरांतूनच दिसून येत होतें असें नव्हे तर खेड्यापर्यंत ही स्वयंशासनाची कल्पना पसरली होती आणि दृढमूल झाली होती. मागल्याकाळीं स्थानिक स्वराज्यसंस्था लोकसत्ताक राज्यांत तर होत्याच पण जेथें एकतंत्री राजशासन चालू होतें, अशा प्रदेशांतहि खेड्यांचा कारभार स्वायत्तपद्धतीनेंच चालत असे. वर उल्लेखिलेलीं सर्व प्रजासत्ताक राज्यें उत्तर हिंदुस्थानांत होतीं. दक्षिण हिंदुस्थानांत लिच्छवी, वृष्णि, यौधेय यांच्याप्रमाणें एकहि प्रजातंत्र असल्याचा पुरावा मिळत नाहीं; पण असें असलें तरी दक्षिण हिंदुस्थानांत त्याकाळीं सुद्धां ग्रामपंचायती स्वायत्तपणें कारभार करीत असल्याचे अनेक पुरावे उपलब्ध झाले आहेत. गंगपल्लव, चालुक्य यांच्या राजवटींतील अनेक शिलालेख सांपडले आहेत. त्यांत या ग्रामसंस्थांच्या कारभाराचा अनेक वेळां निर्देश व वर्णनहि आढळतें. प्रा. द. के. केळकर यांनीं उत्तरमल्लूर व उक्कल येथील शिलालेख उतरून दिले आहेत. त्यांवरून त्या वेळीं ग्रामसंस्थांच्या सभा कशा भरत, उद्यानें, तलाव, मंदिरें यांची व्यवस्था सर्वानुमतें कशी चाले याविषयीं स्पष्ट कल्पना येते आणि या ग्रामसंस्थांच्या स्वायत्ततेबद्दल शंका रहात नाहीं.

पुढें पुढें केन्द्रीय लोकसभांचा लोप झाला; तरी या स्थानिकस्वराज्याला बाध आला नाहीं. येथें मोठमोठीं राज्यें व साम्राज्यें स्थापन झालीं तरी ग्रामपंचायतींचें महत्त्व कमी झालें नाहीं. सत्तेच्या विकेन्द्रीकरणाचें तत्त्व त्या सम्राटांनाहि मान्य होतें आणि त्याप्रमाणें त्यांनीं जिल्हे, नगरें व ग्रामें यांना स्वायत्तता दिलेली होती. डॉ आळतेकर म्हणतात कीं, ' गुप्तसाम्राज्यांत तर स्थानिक संस्थांचे अधिकार इतके विस्तृत होते कीं, सरकारला स्वत:ची पडिक जमीन जरी विकावयाची असली तरी या स्थानिक संस्थांची परवानगी घ्यावी लागे. ' इ. सनाच्या पहिल्या सहस्रकांत या संस्थांचे अधिकार खूपच विस्तृत झाले होते. या संस्था केन्द्र-सरकारचे कर वसूल करीत. गांवांतील विहिरी, शाळा, धर्मशाळा, रुग्णालयें यांची व्यवस्था त्यांच्याच ताब्यांत असे. न्यायदानाचा अधिकारहि त्यांना होता. अत्यंत घोर अपराध वगळतां बाकी सर्व तंटयाबखेड्यांचा निवाडा ग्रामपंचायतीच करीत. गांवचा हा सर्व कारभार चालविण्यासाठीं एकंदर भूमिकरापैकीं शेंकडां १५ ते ३० पर्यंत कर या स्थानिक संस्थांना मिळत असे.

## अंतर्गत स्वायत्तता

या स्थानिक संस्थांप्रमाणेंच भिन्नभिन्न जीवनक्षेत्रांतील अंतर्गत कारभारहि त्या काळीं बराचसा स्वायत्ततेनें चालत असे. धर्म, विद्यादान व व्यापार या क्षेत्रांत बहुतेक सर्व कारभार स्वयंशासनानेंच त्या काळीं पार पडे. बौद्ध-जातकांवरून हें स्पष्ट दिसतें कीं, बौद्धांचे धर्मसंघ संपूर्णपणें स्वतंत्र असून त्या संघांची घटना थेट राजकीय घटनाप्रमाणेंच लोकायत्त होती. स्वतः गौतमबुद्ध हा शाक्य प्रजासत्ताकांत जन्मास आला असून त्याचा पिता शुद्धोदन हा त्या प्रजासत्ताकाचा अध्यक्ष होता. बुद्धानें आपले धर्मसंघ आपल्या राजकीय संघाचा आदर्श पुढें ठेवून घडविलें होतें. बौद्ध-वाङ्मयांतील ' विनय पिटक ' या ग्रंथांत या संघांच्या स्वायत्त कारभाराची तपशीलवार माहिती दिलेली आहे. आजच्या पंडितांनीं त्या काळच्या प्रजासत्ताकांच्या कारभाराची जी माहिती दिलेली आहे, ती बव्हंशी धर्म-संघांच्या कारभारावरून अनुमित करूनच दिली आहे. कारण दुर्दैवानें प्रजासत्ताकांच्या सभांच्या कामकाजाची माहिती आज फारशी उपलब्ध

नाहीं. या धर्मसंघांच्या सभा वरचेवर भरतात, ते आपलीं कार्यें मतैक्यानें व सहकार्यानें करतात. संघांच्या नियमांचें सभासद अत्यंत दक्षतेनें पालन करतात, हे संघबंधु कधीं मोहवश होत नाहींत, अशा तऱ्हेचें वर्णन बुद्धाजवळ त्याच्या एका शिष्यानें केलेलें आहे. आणि तें ऐकून, 'असें आहे, तोंपर्यंत या संघांचा कधींहि विनाश होणार नाहीं, सारखा उत्कर्षच होत जाईल' असे बुद्धानें उद्गार काढले, असें बौद्धवाङ्मयांत नमूद केलेलें आहे. या धर्मसंघाप्रमाणेंच अंतर्गत स्वायत्तता असलेले व्यापाऱ्यांचे संघ असत. त्यांना श्रेणी, पूग, निगम, गण, संघ अशा संज्ञा दिलेल्या आढळतात. उत्तरकालीन वाङ्मयांत राजकीय गणराज्यांची स्मृति नष्ट झालेली दिसते. तरी या व्यापारी संघांचे उल्लेख मात्र संस्कृत वाङ्मयांत कायम सांपडतात. त्यांची स्मृति कधीं लुप्त झाली नाहीं. हे व्यापारी संघ चांगले बलिष्ठ व सुसंघटित होते. ते प्रतिष्ठित पेढ्यांचा देवघेवीचा व्यवहार करीत आणि आत्मरक्षणासाठीं त्यांच्याजवळ चांगली सुसज्ज सेनाहि असे. अशा रीतीनें धनशक्ति व लष्करीशक्ति या दोन्ही एकवटल्यामुळें हे व्यापारी संघ पुष्कळ वेळां सम्राटांनाहि जुमानीत नसत. व्यापारी संघाप्रमाणेंच विद्येच्या क्षेत्रांतहि त्याकाळीं भरपूर स्वायत्तता असे. तक्षशिला, नालंदा हीं विद्यापीठें संपूर्णपणें स्वयंशासित अशीं होतीं. यांना सरकारचा आश्रय असला तरी त्यासाठीं सरकारचे निर्बंध त्यांना पाळावे लागत नसत. नालंदा विद्यापीठ हिंदु असलेल्या गुप्तसम्राटांच्या आश्रयानें चालत होतें, तरी तेथें बौद्ध तत्त्वज्ञान व धर्म यांचेंच शिक्षण प्रामुख्यानें होत असें. यावरून असें दिसतें कीं, विद्यादानाच्या कार्यास राजे जरी मुक्तहस्तानें दान देत असत, तरी विद्यापीठांवर अमक्याच प्रकारचें शिक्षण दिलें पाहिजे, असे निर्बंध लादीत नसत. अंतर्गत स्वायत्तता ती हीच होय.

## विनाशाचीं कारणें

हिंदुस्थानांतील प्राचीन प्रजासत्ताक राज्यांची ही परंपरा हजार एक वर्षे अबाधित अशी चालून पुढें हळूं हळूं ऱ्हास पावूं लागली आणि इ. सनाच्या पांचव्या शतकांत ती पूर्णपणें नामशेष झाली. नामशेष झाली हें म्हणणें सुद्धां बरोबर नाहीं. कारण पुढील वाङ्मयांत व लोकस्मृतींत तिचे नामहि शेष

राहिलें नाहीं. इतका तिचा पूर्ण अस्त झाला. मौर्य, शुंग, या साम्राज्यांतच प्रजासत्ताकांना उतरती कळा लागली होती. गुप्त साम्राज्यांत तो विनिपात पुरा झाला आणि सर्वत्र राजसत्ता रूढ झाली. ती इतकी कीं, डॉ. जयस्वाल यांनीं आपला ग्रंथ प्रसिद्ध करीपर्यंत (इ. स. १९२४) हिंदुस्थानांत प्राचीन काळीं लोकशाही अस्तित्वांत होती, असें कोणाच्या स्वप्नांतहि आलें नव्हतें आणि आजहि प्रा. वेणीप्रसादासारख्यांना तें मान्य नाहीं. भारतांतल्या अशा आणखी किती उज्ज्वल परंपरा कालवश झाल्या आहेत, तें जाणण्यास तो कालच समर्थ आहे.

प्राचीन प्रजासत्ताक राज्यांचा विनाश व लोप होण्याचें मुख्य कारण म्हणजे प्रातिनिधिक सत्तेच्या तत्त्वाचा अभाव हें होय. या राज्यांत मताधिकार कुलानुसार प्राप्त होत असे. सर्व उच्च कुळें समान दर्जाचीं मानीत. आणि प्रत्येक कुलाचा प्रमुख हा सभेचा सभासद असे; त्यामुळें त्या काळीं विशाल-प्रदेशाचा अंतर्भाव एका प्रजासत्ताकांत होणें अशक्यच होतें. चारपांच जिल्ह्याएवढें जरी राज्य झालें तरी सभासदांची संख्या हजारांनीं मोजावी लागणार. आज ज्याप्रमाणें लाख संख्येला किंवा दहालाख संख्येला एक प्रतिनिधि अशी पद्धत आहे त्याप्रमाणें त्यावेळीं हजाराला किंवा दहा हजा-रांना एक प्रतिनिधि अशी व्यवस्था असती तरी प्रजासत्ताकांची क्षेत्रमर्यादा वाढविणें शक्य झालें असतें. पण अथेन्स, स्पार्टा या ग्रीक प्रजातंत्राप्रमाणेंच येथेंहि प्रतिनिधिपद्धत उदयास आली नव्हती; त्यामुळें या राज्यांचा जीव नेहमीं लहानच राहिला आणि त्या प्रमाणांतच त्यांच्या सामर्थ्याच्या वाढीला मर्यादा पडल्या. राष्ट्रकूट, चालुक्य यांच्याएवढींसुद्धां विस्तीर्ण राज्यें वाढविणें प्रजातंत्रांना शक्य नव्हतें, कारण मग सभासदांची संख्या लाखावर गेली असती व सावळा गोंधळ माजला असता. असें असल्यामुळें मौर्य, शुंग, गुप्त यांच्या-सारखीं साम्राज्यें स्थापणें हें तर त्यांना स्वप्नांतहि शक्य नव्हतें. अशा रीतीनें प्रजातंत्राच्या विकासाला अवसर नसल्यामुळें हीं राज्यें नेहमीं लहानच राहिलीं; त्यामुळें त्यांच्या लष्करी सामर्थ्याच्या मर्यादाहि ठरून गेल्या आणि मग भरतखंडांत मोठमोठीं साम्राज्यें स्थापन होऊं लागतांच त्यांच्यापुढें त्यांचें बळ चालेनासें होऊन त्यांचा ऱ्हास होऊं लागला आणि गुप्तसाम्राज्यांत त्यांचा मागमूसहि राहिला नाहीं.

अल्पक्षेत्रमर्यादेप्रमाणेंच आपसांतील कलह, भेद, फुटीरपणा हें या प्रजातंत्रांच्या विनाशाचें दुसरें कारण होय. या प्रजासत्ताकांच्या मर्यादा लहान होत्या, तरी त्यांच्यांत भेदप्रवृत्ती नसत्या तर त्यांचा इतका समूळ नाश झाला नसता; पण ही गोष्ट फार अवघड आहे. हे संघ त्या काळांत इतक्या दीर्घकालपर्यंत म्हणजे हजारबाराशें वर्षेपर्यंत टिकूं शकले, हेंच आश्चर्य आहे. सर्वांचीच आयुर्मर्यादा इतकी होती असें नव्हे; पण इतक्या कालावधी-पर्यंत भिन्नभिन्न ठिकाणीं का होईना लोकायत्त शासनाचें तत्त्व पुनःपुन्हां उदयास येऊन टिकून राहूं शकलें, हींहि उपेक्षणीय गोष्ट नाहीं. कारण राजसत्तेंत ऐक्य व संघटना टिकविणें जसें सुलभ असतें तसें लोकसत्तेंत नसतें. स्वातंत्र्य व संघटना यांचा समन्वय घालणें हें कर्म महाकठिण आहे. ग्रीस, रोम येथील प्रजासत्ताकें या भेदनामक रोगानेंच मृत्यू पावलीं. सध्यां मेक्सिको, ब्राझील, चिली येथील लोकसत्ता याच रोगानें जर्जर झाल्या आहेत. फ्रान्स हा त्यामुळेंच कायमचा पंगु झाला आहे आणि इटली, जर्मनी, पोलंड येथें लोकसत्ता क्षणभरहि तगूं शकत नाहीं, याचें कारणहि तेंच होय. दण्डसत्तेवांचून, अनियंत्रित सत्तेवांचून संघटना टिकावणें हें जगांतल्या बहुतेक लोकांना जमत नाहीं. ब्रिटन, अमेरिका हे देश सोडले तर अजून कोणाला जमलेलें नाहीं. 'भेदमूलो विनाशो हि गणानामुपलक्षये' 'लोकराज्यांचें मरण त्यांच्यांतील यादवींत आहे'—असा महाभारतकारांनीं सिद्धान्तच सांगितला आहे. 'या आपसांतील कलहामुळें मी वैतागून गेलों आहे' असें श्रीकृष्णानें देवर्षि नारदांना सांगून अंधकवृष्णींचें राज्य कसें सांभाळावें, याविषयीं त्यांचा सल्ला विचारला, ही महाभारतांत ( शांति ८१ ) दिलेली हकीकत फार उद्बोधक आहे. 'विवेक, संयम, परमतसहिष्णुता, वाक्चातुर्य हे गुण यासाठीं अवश्य असून त्यांचा उपयोग करून तूं या अंधकवृष्णींच्या संघाचा संभाळ कर; भेदामुळेंच संघाचा विनाश होत असतो, तूं या संघाचा प्रमुख असल्यामुळें त्याचा उत्कर्ष तुझ्यावर अवलंबून आहे; तेव्हां औदार्य, सहिष्णुता हीं दाखवून तूं त्यांचा विनाश टाळला पाहिजेस,' असा नारदांनीं श्रीकृष्णाला सल्ला दिला आहे. सभासदांचें मतैक्य हेंच गणराज्याचें खरें बळ, हें गौतम-बुद्धाच्या मागें दिलेल्या उद्गारांतहि अभिप्रेत आहे, असें दिसून येईल.

हळूंहळूं हें बळ प्राचीन प्रजातंत्रांतून नाहींसें होऊं लागलें व मग त्यांचा विनाश ओढवला.

'राजा हा विष्णूचा अवतार आहे' हें तत्त्व हळूंहळूं प्रभावी होऊन प्रजातंत्राच्या विनाशास तेंहि कारणीभूत झालें. अर्थात् स्वतंत्रपणें कोणचेंहि एक कारण येवढया मोठया परंपरेच्या नाशास समर्थ होत नाहीं. हीं सर्वच कारणें हळूंहळूं विनाश घडवून आणतात. तीं कांहींशीं परस्परावलंबीहि असतात आणि कालांतरानें त्यांचा परिपाक होतो. 'राजा विष्णूचा अवतार आहे' हें तत्त्व लोकप्रिय होण्यास संघराज्यांतील यादवी, कलह व तज्जन्य दौर्बल्य हींच कारणीभूत होतात. अराजकाला लोक कंटाळतात. त्यांना शांतता हवी असते. ती एखाद्या राजानें प्रस्थापित केली म्हणजे त्यांना तो परमेश्वराचा अवतार वाटूं लागतो. प्राचीन काळांत भारतांतहि हाच प्रकार घडला आणि दीर्घ काल चाललेल्या एका थोर परंपरेचा सर्वस्वी लोप झाला. इसवी सनाच्या पांचव्या शतकांत प्रजासत्ताक राज्यें भारताच्या भूमीवरून अजिबात नाहींशीं झालीं.

प्राचीन काळीं भारतामध्यें ज्या लोकसत्ता होत्या, त्यांचें स्वरूपवर्णन येथवर केलें. डॉ. जयस्वाल, डॉ आळतेकर व प्रा. द. के. केळकर यांच्या लेखनाच्या आधारेंच हें वर्णन केलेलें आहे. त्यावरून त्या वेळच्या गणराज्यांची स्थूलमानानें कल्पना येईल. हें वर्णन झाल्यावर आतां आपल्याला जरा चिकित्सेंत शिरावयाचें आहे. लोकसत्ता ही बाह्यरूपाच्या दृष्टीनें भारतांत प्राचीन काळीं अवतरली होती, यांत वरील वर्णन वाचल्यावर मुळींच संदेह रहात नाहीं; पण एवढयावरून लोकशाहीचा उदय भारतांत प्रथम झाला असें आपणांस म्हणतां येईल काय असा प्रश्न आहे. पाश्चात्य पंडितांचा व आतांपर्यंत पौर्वात्य पंडितांचाहि असा सिद्धान्त होता कीं, लोकशाहीचा उदय प्रथम ग्रीसमधील अथेन्स या नगरींत झाला व त्याची कांहींशीं परिणति रोममध्यें झाली आणि अर्वाचीन काळांत तिचा खरा विकास ब्रिटनमध्यें झाला. हा सिद्धान्त मांडतांना पाश्चात्यांनीं कांहीं अतिरेकी विधानें केलीं आहेत. तीं आतां क्षणभरहि टिकावयाचीं नाहींत हें खरें; पण एवढयावरून त्यांच्या मूळ सिद्धान्ताला बाध येईल असें कांहीं या संशोधनांतून सिद्ध झालें आहे काय, या प्रश्नाचा विचार करावयाचा आहे.

आणि त्यासाठींच या प्राचीन भारतीय गणराज्यांच्या अंतःस्वरूपाची बारकाईनें पहाणी करणें अवश्य आहे.

## प्रधान दोष–जन्मनिष्ठ विषमता

समता हा लोकशाहीचा मूलाधार होय. ही समता समाजांत कितपत प्रस्थापित झाली आहे, हें पाहूनच लोकसत्तेविषयीं निर्णय देतां येईल. मागल्या काळांत अखिल समाजांत समभाव नांदत असेल, अशी अपेक्षा करणें योग्य नाहीं. जगांत कोठेंहि तसा समभाव नव्हता; पण अगदीं अल्पसंख्य सत्ताधारी अशा समाजांत तरी, त्या लहानशा परिघांत तरी, समभाव होता काय हें पाहिलें पाहिजे. अखिल समाजाची लोकशाही–जाति, धर्म, धन यांचा विचार न करतां समाजांतल्या प्रत्येक व्यक्तीला सर्व प्रकारचे हक्क व संधि अगदीं समप्रमाणांत देणारी लोकशाही—पंचवीस वर्षांपूर्वी जगांत कोठेंहि नव्हती. आणि आजहि तिचें कांहींसें त्याप्रकारचें स्वरूप ब्रिटन व अमेरिका या देशांतच फक्त पहावयास सांपडतें. मागल्या काळीं अथेन्समध्यें व रोममध्यें लोकसत्ता होती; पण तेथेंहि नागरिकत्वाचे हक्क अगदीं अल्पसंख्य लोकांना होते. अथेन्समध्यें चारपांच लाख प्रजाजनांपैकीं फक्त ४२००० लोकांनाच मतदानाचा हक्क होता. राहिलेल्यापैकीं बहुसंख्य लोक गुलाम होते. आणि तदितर लोक गुलाम नसले तरी या ना त्या कारणानें त्यांना नागरिकत्व मिळालेलें नव्हतें. लोकशाहीच्या मूल तत्त्वांच्या दृष्टीनें पाहिलें तर ही विषमता अत्यंत अन्याय्य अशीच म्हटली पाहिजे. भारतीय गणराज्यांत अशाच तऱ्हेची विषमता केवळ असती, तर ग्रीक गणराज्यांत व त्यांत कांहींच फरक नाहीं असें म्हणावें लागलें असतें. पण भारतीय गणराज्यांत एक फार मोठें वैगुण्य होतें. तें केवळ गणराज्यांतच होतें असें नव्हे तर सर्व भारतांतील सर्व प्रजाजनामध्यें होतें. तें म्हणजे चातुर्वर्ण्य व जातिभेद ! ही जन्मनिष्ठ उच्चनीचता जोपर्यंत जारी आहे तोंपर्यंत त्या समाजांत लोकसत्ता आहे, या म्हणण्याला फार थोडा अर्थ आहे. भारतांत प्राचीन काळीं त्रैवर्णिकांतील जातिभेद आजच्या इतके कडक नव्हते; पण शूद्र व अस्पृश्य यांच्यावरील बंधनें अतिशय जाचक अशींच होतीं आणि एकंदर वर्णाश्रमव्यवस्थेचें संरक्षण करणें हें कोणच्याहि सत्तेचें आद्यकर्तव्य समजलें

जात असे. डॉ. आळतेकर म्हणतात कीं, चातुर्वर्ण्यपद्धतीवर त्या वेळीं हिंदु समाजाचा विश्वास होता. त्या वेळीं कर्मफल–विपाकाच्या सिद्धान्तावर लोकांची श्रद्धा होती. पूर्वजन्मांतील पातकांमुळेंच मनुष्यास शूद्र चांडाळादि जातींत जन्म येतो व त्या पातकांचें क्षालन करण्यासाठीं त्या जन्मांत प्राप्त होणारीं दुःखें त्यानें सोसलींच पाहिजेत, असें लोकांना वाटत असे; शूद्र चांडालादिकांचीहि या तत्त्वावर श्रद्धा होती. तेव्हां शूद्रचांडालांवरचे अन्याय्य निर्बंध काढून टाकण्याचें एखाद्या राजानें ठरविलें असतें तर लोकक्षोभाच्या वणव्यांत त्याची सत्ता भस्मसात् झाली असती. हें सर्व खरें असलें तरी तें फार तर वस्तुस्थितीचें वर्णन आहे किंवा विषमता कां होती याचें स्पष्टीकरण आहे, असें म्हणतां येईल. पण अशा समाजांत लोकशाही अवतरली होती असें म्हणणें कठिण आहे. कोणचीहि जुनी समाजव्यवस्था बदलतांना लोकक्षोभ हा होणारच. त्यांतूनच नवीं तत्त्वें उदयास येतात व तीं लोकांना पटलीं म्हणजे नवी समाजव्यवस्था दृढमूल होते. तेव्हां लोकक्षोभ झाला असता, असें म्हणून आपणांस त्या प्राचीन व्यवस्थेचें समर्थन करतां येणार नाहीं. प्राचीन व मध्ययुगीन युरोपांतहि अशीच विषमता होती असें डा. आळतेकरांनीं म्हटलें आहे. पण अशा त्या विषम व्यवस्थेवर तेथील तत्त्ववेत्त्यांनीं प्रखर हल्ले केले आणि ती नाहींशी करून समता निर्माण केली तेव्हांच तेथें लोकशाही प्रस्थापित झाली. भारतांत असे प्रयत्न झाल्याचें, अशा तऱ्हेचे विचार सांगितले गेल्याचेंहि कोठें आढळत नाहीं. मुख्य वैगुण्य आहे तें हें आहे.

## अथेन्सशीं तुलना

ग्रीक लोकसत्तेचे सोलन, पोरिस्ट्राटस्, क्लेइस्थेनिस हे जे नेते त्यांनीं पहिली जी गोष्ट केली ती ही कीं, अथेन्समधील जन्मनिष्ठ उच्चनीचता त्यांनीं नष्ट केली व जन्मानें श्रेष्ठ ठरलेल्या खानदानी वर्गाच्या हातची सत्ता काढून घेऊन ती इतरांना वाटून दिली. खानदानी वर्गाच्या हातून प्रथम ही सत्ता धनिक व्यापारी वर्गाच्या हातीं गेली. तरीसुद्धां लोकशाहीच्या दृष्टीनें ही मोठीच प्रगति आहे. कारण धन मिळविणें हें माणसाच्या हातचें आहे, स्वाधीनचें आहे. वरिष्ठ जातींत जन्म मिळविणें हें नाहीं. ' जन्मसिद्ध

श्रेष्ठता नष्ट करून रोमनें सत्तेचें केन्द्र धनिकांना खुलें केलें व यामुळें शासन संस्थेंत लोकसत्तेची पाहिली पाचर बसली,' असें मॅक् आयव्हर या पंडितानें म्हटलें आहे तें याच अर्थानें. ( मॉडर्न स्टेट पृ. ९१ ). सोलन वगैरे ग्रीक नेत्यांनीं आपल्या देशांत हेंच घडविलें. त्यांनीं धनाच्या प्रमाणांवर लोकांचे चार वर्ग पाडले. प्रारंभीं यांतील पहिल्या वर्गाच्या हातीं सत्ता आली; पण वरचेवर नवे कायदे करून सोलननें अगदीं कनिष्ठ अशा चवथ्या वर्गाच्याहि हातीं सत्ता देण्याचा उपक्रम केला. पुढें पुढें त्या वर्गांतले न्यायाधीशहि नेमले जाऊं लागले.

जातीय विषमता अशा रीतीनें नष्ट करून तिच्या जागीं आलेली आर्थिक विषमताहि पुढें ग्रीकांनीं नष्ट करीत आणली होती. त्यांनीं सरकारच्या ताब्यांतील जमिनी निर्धन लोकांना वांटून दिल्या. कर्जापायी गुलाम झालेल्या लोकांचीं कर्जे कायद्यानें रद्द केलीं. गहाण जमिनी मोकळ्या करून त्या लोकांना वांटून दिल्या, कनिष्ठ वर्गांवर कराचें ओझें सर्वांत कमी व वरच्या वर्गांवर कर जास्त अशी योजना अमलांत आणली. आणि अशा रीतीनें सुखसाधनें व संधि यांची योग्य वांटणी करून लोकसत्तेचा पाया घातला. विल्डय़ूरांट म्हणतो कीं ग्रीसवर पर्शियाचें आक्रमण आलें त्या वेळीं तेथें 'कसेल त्याची जमीन' व 'लोकनियंत्रित शासन' या गोष्टी सिद्ध होऊन गेल्या होत्या. ( लाइफ ऑफ ग्रीस. पृ. १२६ ). जातीय व आर्थिक या दोन्ही विषमता अशा तऱ्हेनें नाहींशा झाल्यामुळें सर्वांना सारखा कायदा लागू करणें ही गोष्ट ग्रीसमध्यें सुलभ झाली होती. सोलन याचीं शासनें गरीब-श्रीमंत सर्वांना म्हणजे सर्व नागरिकांना सारखींच लागू होतीं. आता तेथें नागरिक व गुलाम असा भेद होता आणि त्यांना कायदाहि भिन्न होता; पण गुलामाला नागरीक होण्याची शक्यता होती. कर्ज निवारणें, धन्याची मर्जी प्रसन्न करून घेणें किंवा इतर कांहीं कर्तृत्व प्रगट करणें या मार्गांनीं गुलाम आपली गुलामगिरी नष्ट करूं शकत होता. हें हिंदुस्थानांत चातुर्वर्ण्यांमुळें कधींहि शक्य नव्हतें. चांडाल हा ब्राह्मणक्षत्रियांची बरोबरी करणें हें येथें कालत्रयीं शक्य नव्हतें. ब्राह्मण व शूद्र यांना कायदे निराळे होते आणि शूद्राला आपली जात बदलणें व ब्राह्मणाची किंवा क्षत्रियाची प्रतिष्ठा मिळविणें येथें अशक्य होतें. म्हणूनच लोकसत्तेला आधारभूत अशी

जी समता ती भारतीय गणराज्यांत केव्हांहि नव्हती असें म्हणावें लागतें. तशी ती नव्हती हें डॉ. आळतेकरांनाहि मान्य आहे; पण आपल्या आजच्या मापानें त्या गणराज्याचें मापन करूं नये, असें ते म्हणतात. ( नवभारत फे. १९४९ ) हें म्हणणें सयुक्तिकच आहे. पण तसें मान्य करूनहि त्या गणराज्यांचें मूल्यमापन करतांना त्यांच्या केवळ बाह्यरूपावरून तीं राज्यें प्रजासत्ताक होतीं असें म्हणणें योग्य होणार नाहीं. लोकशाहीच्या मूलभूत सिद्धान्तांचा कस त्यांना लावलाच पाहिजे. तो लावून पाहतां हें जन्मनिष्ठ विषमतेचें वैगुण्य त्यांत दिसून येतें हें आपण मान्य केलें पाहिजे.

गौतम बुद्धानें जातिभेद संपूर्ण नष्ट केले होते आणि शंकराचार्यांनीं पुन्हां ते प्रस्थापित केले, असा एक प्रवाद आहे. बुद्धानें जातिभेदाविरुद्ध उपदेश केला होता हें खरें आहे. जाति या जन्मावरून न ठरवितां गुणकर्मावरून ठरवाव्या असें त्याचें मत होतें. सुत्तनिपात व मज्झिमनिकाय या बौद्धग्रंथांत याविषयीं कांहीं कथा व गौतमाचीं कांहीं वचनें सांपडतात. प्रत्यक्ष श्रमणांच्या संघांत जातिभेदाला थारा नव्हता. चांडाळ, भंगी यांनाहि संघांत प्रवेश असल्याचे उल्लेख सांपडतात; पण याला जातिभेद नष्ट करण्याच्या दृष्टीनें फारच थोडा अर्थ आहे. या सर्वांचा विचार करून, "बुद्ध व त्याचे शिष्य यांना जातिभेद नष्ट करण्याच्या कामीं मुळींच यश आलें नाहीं, तें कृत्य त्यांच्या आवाक्याबाहेरचें होतें," असा निर्णय प्रा. धर्मानंद कोसांबी यांनीं आपल्या बुद्धचरित्रांत दिला आहे. ( भगवान् बुद्ध —उत्तरार्ध पृ. ८८ ). शिवाय आणखी एक गोष्ट ध्यानांत ठेवली पाहिजे कीं, धर्मसंघांत सर्वांना सारखें लेखणें निराळें आणि मिश्रविवाह मान्य करून जातिभेद मोडणें निराळें. दिव्य अवदानांतील एक श्लोक प्रा. कोसांबी यांनीं दिला आहे. त्यांत 'मुलाच्या व मुलीच्या लग्नांत जातीचा विचार करणें योग्य आहे, धार्मिक बाबतींत जातीचा विचार करण्याचें कारण नाहीं' असें म्हटलें आहे. (आवाह काले च विवाहकाले, जातेः परीक्षा न तु धर्मकाले । उक्त ग्रंथ पृ. ९०) यावरून बौद्धधर्माला जातिभेद मोडण्यांत कितपत यश आलें तें कळून येईल.

## कायदे करण्याचा अधिकार नाहीं

प्राचीन गणराज्यांतील लोकसत्तेच्या दृष्टीनें दुसरी मोठी उणीव म्हणजे अशी कीं, त्या राज्यांतील लोकसभांना कायदे करण्याचा अधिकार मुळींच नव्हता. डॉ. आळतेकर यांनीं आपल्या 'स्टेट ॲन्ड गव्हरमेंट इन् एन्शंट इंडिया' या ग्रंथांत याविषयीं स्वच्छ निर्णय दिला आहे. ते म्हणतात कीं 'पूर्वकाळीं कायदे करण्याचा अधिकार हा राजा, समिति किंवा सभा यांपैकीं कोणालाच नव्हता. धार्मिक क्षेत्रांतील सर्व दण्डनें हीं परमेश्वरप्रणीत असतात अशी लोकांची श्रद्धा होती आणि ऐहिक दण्डनें हीं रूढिप्रणीत असत. श्रुतिस्मृति हे ग्रंथ या बाबतींत प्रमाण मानले जात. आणि राजांना व धर्माधिकाऱ्यांना त्याप्रमाणें न्याय द्यावा लागत असे;' पण आपल्या काळच्या समाजाचीं शासनें आपण ठरविण्याचा अधिकार हें तर लोकशाहीचें मुख्य लक्षण मानलें जातें आणि याच बाबतींत जर सभा व समिति यांचे हात जखडलेले असले, स्मृतिग्रंथ व रूढि यांच्यापुढें त्यांना दरवेळीं शरणागति पतकरावी लागत असली, प्रजेच्या सुखासाठीं, अभिवृद्धीसाठीं नवीं शासनें करण्याचा त्यांना अधिकार नसला, तर त्यांच्या सत्तेला लोकसत्ता म्हणणें कितपत सार्थ होईल याचा विचारच केला पाहिजे.

अथेन्स व रोम येथील लोकसत्तांचा इतिहास पहातां कायदे करण्याचें पूर्ण स्वातंत्र्य त्यांना कसें होतें याची स्पष्ट कल्पना येते. सोलन, पेरिस्ट्राटस यांनीं मूळ घटनांत बदल केले. जमिनीचें वांटप कसें असावें, अशासारख्या अगदीं मूलगामी प्रश्नांवर या लोकसत्ता नवे नवे कायदे करीत असत. भिन्न वर्गातील लोकांचे सभेंत बसण्याचे अधिकार, न्यायदानाचे अधिकार, वरिष्ठ वर्गाची चवकशी करण्याचा अधिकार यांविषयीं नित्य नवे कायदे होत असत. धर्म, समाजकारण, अर्थव्यवस्था या प्रत्येक क्षेत्रांतहि नवे कायदे ग्रीस मध्यें होत आणि इतकें असूनहि सोलनसारख्या आद्य थोर पुरुषानेंहि आपलीं शासनें ईशप्रणीत आहेत, असें म्हटलें नाहीं. वेद, मनु, हामुराबी, मीनास, महंमद इ० नेत्यांनीं आपल्या शासनांना तसें अधिष्ठान प्राप्त करून दिलेलें आहे. हीं शासनें आपण रचलीं पण तीं परमेश्वरी प्रेरणेनें आपणांस स्फुरलीं, म्हणून तीं परमेश्वरप्रणीतच आहेत, असा या सर्व नेत्यांचा आणि

जगांतील इतर अधिकारी पुरुषांचा आग्रह असे. लोकशाहीला हा आग्रह अत्यंत मारक असतो. कारण त्यामुळें समाजाला स्वातंत्र्य असें कसलेंच रहात नाहीं आणि लोकनियंत्रण या शब्दाला अर्थ उरत नाहीं. हिंदुस्थानांत पूर्व काळीं नेहमींच ही स्थिति होती आणि डॉ. आळतेकरांच्या विवेचनावरून गणराज्येंहि याला अपवाद नव्हतीं असें दिसतें. डॉ. जयस्वाल यांनीं हीं गणराज्यें आपले स्वतंत्र कायदे करीत असत, असें म्हटलें आहे; पण हा सर्व विषय त्यांनीं चारपांच ओळींतच आटपला आहे. कायदे कोणचे केले त्याचीं उदाहरणें त्यांनीं दिलीं नाहींत. ते कायदे रूढी व स्मृति यांना सोडून कितपत होते, हेंहि त्यांनीं सांगितलेलें नाहीं. त्यामुळें त्यावरून कांहींच सिद्ध होऊं शकत नाहीं. असो. यावरून आपलें शासन आपण करण्याचा अधिकार या गणराज्यांत नव्हता, असें दिसून येत असल्यामुळें त्या राज्यांचें लोकायत्तत्व अधिकच क्षीणस्वरूप होतें.

## व्यक्तिस्वातंत्र्याचें तत्त्वज्ञान नाहीं

लोकसत्ताक राज्यपद्धतीच्या आद्य-प्रवर्तनाचा मान अथेन्स व रोम यांच्याकडून काढून घेऊन तो भारताला देण्याच्या कामीं आणखी एक फार मोठा प्रत्यवाय आहे. राजकीय क्षेत्रांत व्यक्तिस्वातंत्र्य व व्यक्तिस्वातंत्र्याचें तत्त्वज्ञान यांचा भारतांत असलेला संपूर्ण अभाव हा तो प्रत्यवाय होय. मतदान, निवडणुकी, पंचायती ही सर्व जड-यंत्रणा आहे. ती म्हणजे लोकशाही नव्हे. व्यक्तित्व हा लोकशाहीचा आत्मा होय. त्याचा विकास या प्राचीन गणराज्यांत कितपत झाला होता हें पाहूनच येथील लोकसत्तेविषयीं निर्णय दिला पाहिजे. या दृष्टीनें पाहतां असें दिसतें कीं, व्यक्तित्वाचें व व्यक्तिस्वातंत्र्याचें तत्त्वज्ञान भारतांत अवतीर्ण झालें नव्हतें. व्यक्तीचा गुणविकास, तिचें सुख, तिची मानसिक व बौद्धिक उन्नति हें समाजाचें अंतिम ध्येय आहे, आणि व्यक्ति ही समाजासाठीं नसून सर्व समाजरचना, धर्मव्यवस्था, अर्थव्यवस्था 'व्यक्ति हेंच अंतिम' अशा तत्त्वावर झाली पाहिजे, हा लोकशाहीचा मूळ सिद्धांत आहे. समता, बंधुता, स्वातंत्र्य हीं या मूळ तत्त्वाला पोषक असलेलींच तत्त्वें आहेत. समाजांतील सर्व सत्ता ही परमेश्वरी वरदानानें किंवा अन्य श्रेष्ठ व्यक्तीच्या इच्छेनें प्रस्थापित होत नसून, त्या सत्तेचें 'लोक' हें अंतिम

अधिष्ठान आहे, हाहि सिद्धांत त्या मूळ सिद्धांताच्या पोषणासाठींच सांगितलेला असतो. लोकशाहीचा हा जो मूळ सिद्धांत व त्याला पोषक अशीं जीं मूलभूत आदितत्त्वें त्यांचा मागमूसहि भारतांत सापडत नाहीं. वेद, ब्राह्मणें, उपनिषदें, महाभारत, रामायण, सुत्तनिपात, मज्झिमनिकाय, अभिधम्मपिटक इत्यादि ग्रंथ पाहिले तर भारतांतील प्राचीन वाङ्मय सागरासारखें विशाल आहे असें म्हणावें लागेल. पण एवढ्या या प्रचंड महोदधींत व्यक्तिस्वातंत्र्याच्या तत्त्वज्ञानाचीं चार वाक्येंहि सापडत नाहींत. आणि राजकीय क्षेत्रांतल्या व्यक्तिस्वातंत्र्याचा तर या वाङ्मयांत कोठें वासहि येत नाहीं. डॉ. आळतेकर, डॉ. जयस्वाल व प्रा. द. के. केळकर यांनीं आपल्या ग्रंथांत प्राचीन गणराज्यांचीं जीं वर्णनें दिलीं आहेत त्यांत एतद्विषयक एक वाक्यहि अवतरून दिलेलें नाहीं. डॉ. जयस्वाल यांनीं नागरिकांना अनिर्बंध व्यक्तिस्वातंत्र्य होतें असें एकदोन ठिकाणीं सांगितलें आहे. पण जुन्या ग्रंथांतलीं वचनें वा उदाहरणें त्यासाठीं दिलेलीं नाहींत. महाभारतांतले दोन अध्याय त्यांनीं सर्वच्या सर्व उतरून दिले आहेत. त्यांत गणराज्याचें स्वरूपच वर्णिलेलें आहे. पण त्यांत या मूलतत्त्वांचा उल्लेखहि नाहीं. गणराज्यें कशामुळें नष्ट होतात, त्यांच्या नेत्यांनीं कोणचीं धोरणें संभाळणें अवश्य आहे इ. अनेक प्रकारचा उपदेश त्यांत आहे. लोकसत्तेच्या दृष्टीनें तो बहुमोल आहे. पण तें व्यक्तित्वाचें तत्त्वज्ञान नव्हे. चाणक्यानें अनेक ठिकाणीं लोकसत्ताक पद्धतीचा निषेध केला आहे. पण त्यांत निषेधासाठींहि त्यानें अशा तऱ्हेच्या विचारांचा व व्यक्तिस्वातंत्र्याच्या तत्त्वज्ञानाचा निर्देश केलेला नाहीं. श्रीकृष्ण हा आपल्या कल्पनेप्रमाणें अनियंत्रित सर्वसत्ताधारी असा राजा नसून अंधकवृष्णि संघाचा अध्यक्ष होता असें या पंडितांनीं महाभारतांतील कांहीं अवतरणें देऊन सिद्ध करण्याचा प्रयत्न केला आहे. पण श्रीकृष्णाची गीता किंवा त्याचीं महाभारतांतील इतर अनेक भाषणें पाहिलीं तर त्याचा एकहि उद्गार वा एकहि वचन असें सापडत नाहीं कीं ज्यावरून लोकायत्त शासनाच्या मूळ कल्पना त्याच्या मनांत असतील असें वाटावें. उलट ग्रीक व रोमन वाङ्मयांत या तऱ्हेचें तत्त्वज्ञान ठायीं ठायीं सांपडतें. खिस्तपूर्व ४३१ सालीं अथेन्सचा नेता पेरिक्लीज यानें जें भाषण केलें त्याच्या एका लहानशा परिच्छेदांत लोकशाहीच्या मूल तत्त्वांचा जो निर्देश येतो तो

भारतांतील अखिल ग्रंथसंभारांत सांपडत नाहीं. ' आपल्या नगरीचें राज्य बहुसंख्यांसाठीं आहे, अल्पसंख्यांसाठीं नाहीं, म्हणून आपल्या शासनास लोकशाही म्हणतां येतें. वैयक्तिक जीवनांत येथें प्रत्येक व्यक्ति सम असून सार्वजनिक जीवनांत ती आपल्या गुणांप्रमाणें उंच किंवा हीन ठरते. स्वातंत्र्य हें आपल्या व्यवहारांचें मूलतत्त्व आहे. आणि आपल्या शेजाऱ्याला आपल्या इच्छेप्रमाणें वर्तन ठेवण्याचा पूर्ण हक्क असून त्याचें वर्तन आपणांस अप्रिय असलें तरी त्याच्यावर आपण संतापत नाहीं. या कारणास्तव आपला समाज लोकायत्त आहे असें आपण म्हणतों ' असे उद्गार पेरिक्लीजच्या भाषणांत आढळतात. सॉक्रेटिसला अथीनी लोकसभेनें देहान्त शासन दिलें. त्या वेळीं त्यानें जें भाषण केलें त्यांतहि मनुष्याच्या विवेकस्वातंत्र्याचा त्यानें पुरस्कार केला आहे. यावरून असें दिसतें कीं अथेन्समध्यें व्यक्तिस्वातंत्र्याचें तत्त्वज्ञान उदयास येऊन तेथील थोर पुरुष त्याचा प्रत्यक्ष आचारहि करीत होते. आणि हेंच तेथें लोकसत्ता उदयास अल्याचें खरें लक्षण समजलें जातें. राज्यशासनाविरुद्ध आज जसे व्यक्तीला मूलभूत हक्क असतात आणि ते घटनेंत नमूद केलेले असतात तसे ग्रीकांच्या लोकसत्ताकांत नव्हते. पण प्रत्यक्ष व्यवहारांत त्यांचा उदय झाला होता व व्यवहारांत आजच्या लोकायत्त शासनांत व ग्रीकांच्या शासनांत फारसा फरक नव्हता असें आपलें मत हेन्री सिज्विक या पंडितानें नमूद करून ठेवलें आहे. ( दि डेव्हलपमेंट ऑफ युरोपियन पॉलिटी. दुसरी आवृत्ति पृ. १७१ ) राजकीय क्षेत्रांतील व्यक्तिस्वातंत्र्याचे हक्क व त्याहिपेक्षां व्यक्तिस्वातंत्र्याचें तत्त्वज्ञान हीं लोकशाहीचीं खरीं लक्षणें होत. भारतामध्यें प्राचीन काळीं राजकीय क्षेत्रांत व्यक्तिस्वातंत्र्याचें तत्त्वज्ञान उदित झालें असल्याचें त्या वेळच्या कोणत्याहि ग्रंथावरून दिसत नाहीं आणि असें असल्यामुळें येथें लोकशाहीचा उदय प्रथम झाला असें म्हणणें सयुक्तिक वाटत नाहीं.

## संग्राम नाहीं

पण याहिपेक्षां जास्त मोठा आक्षेप अजून पुढेंच आहे. प्राचीन गणराज्यें खरींखुरीं लोकायत्त होतीं या विधानावरचा तो आक्षेप माझ्यामतें अगदीं निर्णायक आहे. तो आक्षेप असा कीं, या सर्व गणराज्यांच्या

इतिहासांत आणि एकंदर भारताच्या इतिहासांतच लोकसत्तेसाठीं, व्यक्तिस्वातंत्र्यासाठीं, आर्थिक किंवा सामाजिक समतेसाठीं, व मानवांच्या मूलभूत हक्कासाठीं कधींहि, कोठेंहि संग्राम झालेला नाहीं. या गणराज्यांत मूठभर क्षत्रियांच्या हातींच बहुधा सत्ता असे आणि हा सत्ताधारीवर्ग अत्यंत श्रीमान् होता. श्रीमंतीवांचून त्या काळच्या लोकसभेंत प्रवेश मिळणेंच शक्य नव्हतें, असें डॉ. आळतेकर म्हणतात. कांहीं पंडितांच्या मतें इतर जातींनाहि त्या सभेंत प्रवेश होता; पण कांहीं असलें तरी सत्ता अत्यंत अल्पसंख्यांच्या हातीं असून शूद्र व चांडाळ यांची स्थिति अत्यंत हीन प्रकारची होती याविषयीं वाद नाहीं. येथें कोटयवधि अस्पृश्य होते, कोटयवधि शूद्र होते आणि तितक्याच संख्येनें शेतकरी पण होते. यांना व विशेषत: शूद्र चांडाळांना सत्ता, धन व इतर सुखें यांचा अंशहि कधीं प्राप्त होत नसे. असें असूनहि त्यांनीं किंवा त्यांच्यावतीनें इतरांनीं भारतांत कधींहि वरिष्ठ सत्ताधारीवर्गाशीं संग्राम केला नाहीं. आणि आपल्या मनुष्यत्वाच्या प्रस्थापनेसाठीं जोंपर्यंत बहुजनसमाज किंवा पीडित जनता लढा करीत नाहीं, तोंपर्यंत त्या भूमींत लोकशाहीचा उदय झाला होता, या म्हणण्याला कांहींच अर्थ नाहीं. व्यक्तिस्वातंत्र्य, समता, बंधुता यांचें तत्त्वज्ञान ग्रंथांत कितीहि सांगितलेलें असलें तरी लोक जोंपर्यंत त्या तत्त्वांच्या व्यवहारासाठीं लढा करण्यास, आत्मबलिदान करण्यास सिद्ध नसतात तोंपर्यंत तें तत्त्वज्ञान उदयास येऊन न येऊन सारखेंच ! सुखासुखी कोणच्याहि देशांत आजपर्यंत त्या तत्त्वांचा अंमल सत्ताधारी वर्गानें समाजांत होऊं दिलेला नाहीं. जेथें जेथें लोकशाही प्रस्थापित झाली तेथें तेथें जनतेला लढा करूनच या तत्त्वांची जपणूक करावी लागलेली आहे. भारतांत तें तत्त्वज्ञानहि नव्हतें आणि त्यासाठीं लढा करणें हें तर कोणाच्या स्वप्नांतहि आलें नव्हतें. उलट ग्रीस व रोम येथील लोकसत्तांचे इतिहास म्हणजे अशाप्रकारच्या लढयांचेच इतिहास, असें म्हटलें तरी देखील चालेल. इ. स. पूर्व ४९४ सालीं, म्हणजे रोमन प्रजासत्ताक स्थापन होऊन पुरतीं पंधरा वर्षें झालीं नव्हतीं तोंच, पॅट्रिशियन्स् व प्लीबियनस् यांचा पहिला लढा झाला आणि वरिष्ठांना राज्यकारभारांत कांहीं हक्क देऊन, बहुजनांना संतुष्ट करावें लागलें. यानंतर ४८६ सालीं व ४६१ सालीं असे

वरचेवर लढे होत गेले; त्यामुळें बहुजनांना ट्रिब्यून हे सर्वांत मोठे अधिकारी आपल्यांतून नेमण्याचा हक्क प्राप्त झाला. इ. स. पू. ४४५ मध्यें तर वरिष्ठजन व बहुजन यांच्यांतील मिश्रविवाहाला कायद्यानें मान्यता देण्यांत येऊन जन्मसिद्ध उच्चनीचता समूळ नष्ट करण्यांत आली. इ. स. पू. ३६७ सालीं कॉन्सलच्या जागेवर नेमलें जाण्याचा महत्त्वाचा हक्कहि प्लीबियन लोकांना मिळाला. या तऱ्हेचा हा संघर्ष रोमन लोकसत्ताकाच्या अंतापर्यंत चालू होता, आणि सत्तेचा वांटा, जमिनीचा वांटा व धनाचा वांटा हीं त्यांचीं मुख्य कारणें होतीं. अथेन्समध्येंहि सोलन पासून रोमन आक्रमणापर्यंत म्हणजे खिस्तपूर्व ७ व्या शतकापासून तिसऱ्या शतकापर्यंत खानदानी सत्ता व सामान्य जन यांच्यांत सत्ता संपादनासाठीं अखंड संग्राम चालू होता. त्यामुळेंच तेथें 'कसेल त्याची जमीन व लोकाधीन सरकार' या सिद्ध गोष्टी होऊन गेल्या होत्या. सत्तासंपादनासाठीं व प्रस्थापित शासनावर नियंत्रण ठेवण्यासाठीं अखंड संग्राम करणें हा लोकशाही जीवनांतील पहिला घटक होय; यामुळेंच लोकशाही या शब्दाला अर्थ निर्माण होतो. भारतांत लोकांनीं, नागरिकांनीं अशी जागरूकता ठेवून सत्ताधिष्ठित वर्ग मदमत्त होतांच त्याच्याशीं संग्राम करून त्याला वेसण घातल्याचें एकहि उदाहरण नाहीं. येथील जनता अशी जागरूक नसेच. राजसत्तेविषयीं ती सर्वस्वी उदासीन असे, असें इतिहास सांगतो आणि दुर्दैव असें कीं ही गोष्ट भूषणावह होती, हेंच भारताच्या ग्रामव्यवस्थेचें वैभव होतें, असें अलीकडे मानलें जातें. तें कसेंहि असो. ग्रीस-रोममधील जनता जमिनीसाठीं, सुखसाधनांसाठीं, संधिसमानतेसाठीं, अधिकारासाठीं, व राजकीय हक्कासाठीं ज्याप्रमाणें सारखी संग्राम करावयास सज्ज होती तशी भारतीय जनता कधींहि नव्हती. येथें अशा तऱ्हेचा संग्राम करावा ही जाणीव, ही प्रबुद्धता कोणच्याहि वर्गांत कधींहि निर्माण झालेली नव्हती. ब्राह्मण व क्षत्रिय हे सत्ताधारी वर्गांतले खरे; पण त्या वर्गांतहि अनेक लोक दरिद्री व दीन होते. सत्ताधारी अधिकाऱ्यांकडून त्यांचाहि अनेक वेळां छळ झालेला आहे. तरी अशा तऱ्हेच्या राजकीय हक्कासाठीं संग्राम करण्याची बुद्धि त्यांच्याहि ठायीं कधीं उदित झाली नाहीं. चातुर्वर्ण्याचा, जातिव्यवस्थेंतील उच्चनीचतेचा व इतर विषमतेचा अन्याय ब्राह्मण क्षत्रियांपैकींहि अनेकांना जाणवत असल्याचीं

इतिहासांत उदाहरणें सांपडतात. अनेक ब्राह्मणांनीं व क्षत्रियांनीं हिंदुधर्माची कक्षा सोडून देऊन इतर धर्मपंथ काढले व त्यांना ब्राह्मणक्षत्रियांतून अनुयायीहि मिळाले, हें त्याचेंच द्योतक आहे. पण असें होतें तरी या वरिष्ठ वर्गांतल्या कोणत्याहि व्यक्तीनें वा गटानें राजसत्ता किंवा धर्मसत्ता यांच्या-विरुद्ध तत्त्वज्ञान सांगून लढा पुकारल्याचें इतिहास सांगत नाहीं. आणि ही राजकीय प्रबुद्धता व तज्जन्य लढा हें जोपर्यंत दिसत नाहीं, तोंपर्यंत केवळ बाह्यरूपावरून एखाद्या शासनाला लोकायत्त शासन म्हणणें व त्या राज्य-पद्धतीला प्रजासत्ताक म्हणणें याला मुळींच अर्थ नाहीं.

## ग्रामपंचायतींचें निरीक्षण

हिंदुस्थानांतील ग्रामपंचायतींचें असेंच आहे. या ग्रामपंचायती म्हणजे स्थानिक स्वराज्येंच होत, हीं लोकसत्तेचीं बीजें होत, असा या ग्रामसंस्थांचा गौरव करण्यांत येतो. भारतांतील गणराज्यें हीं इ. स. पू. ६०० ते इ. स. ४०० या हजार वर्षांच्या काळांतच उत्कर्ष पावलीं; पण लोकायत्त ग्राम-संस्था या वेदकाळापासून पेशवाई अखेरपर्यंत जशाच्या तशा टिकून होत्या असें इतिहासवेत्ते सांगतात. अशा तऱ्हेच्या ग्रामसंस्था निर्माण होणें व एवढ्या दीर्घ कालपर्यंत टिकून रहाणें यांत जो कांहीं थोडा गौरवाचा भाग आहे तो अमान्य करावा असा माझा मुळींच हेतु नाहीं. अगदी एकतंत्री सत्तेपेक्षां अशा तऱ्हेचा समाईक कारभार हा केव्हांहि जास्त चांगला असतो यांत वाद नाहीं. गांवची करवसुली, गांवचें न्यायदान, गांवांतील मंदिरें, तलाव, जंगलें यांची व्यवस्था आणि गांवचा एकंदर योगक्षेम केन्द्र सत्तेनें नेमलेल्या एखाद्या अधिकाऱ्यानें पहाण्यापेक्षां गांवच्या लोकांनींच एकत्र येऊन, सभा भरवून, स्वतःच्या जबाबदारीनें पहाणें हें केव्हांहि जास्त श्रेयस्कर होय; पण याला लोकसत्ता म्हणणें, भारताच्या लोकशाहीचीं हीं मूळरूपें आहेत असा अभिमान वहाणें आणि भारतीय मनोवृत्तींत लोकशाहीचीं बीजें दिसत नाहींत या पाश्चात्यांच्या आक्षेपाला, आमच्या ग्रामपंचायती हें उत्तर आहे, असें विधान करणें म्हणजे लोकसत्ता या थोर कल्पनेची विटंबना करण्यासारखें आहे. कारण लोकसत्ता ही मानवाच्या पृथगात्मतेतून, त्याच्या वैयक्तिक अहंकाराच्या प्रबल अशा स्फुरणांतून,

म्हणजेच त्याच्या व्यक्तिमत्वांतून, निर्माण झालेली शासनपद्धति आहे. अहंकाराच्या या प्रबल स्फुरणांतून फार मोठें सामर्थ्य निर्माण होत असतें. (ॲटम्) एक अणु हा पदार्थांतील इतर अणूपासून पृथक् केल्याबरोबर त्याच्यांतून जसें अपार सामर्थ्य निर्माण झाल्याचें आपण पाहिलें व पहातों त्याचप्रमाणें एकंदर जनसमूहांतून आपण एक पृथक् व्यक्ति आहोंत अशा स्वतंत्र अहंकाराची जाणीव व्यक्तीला होतांच तिच्या ठायीं अपार सामर्थ्य निर्माण झाल्याचें आपल्या प्रत्ययास आलें पाहिजे. अशी व्यक्ति मग कसल्याहि प्रकारचा अन्याय, जुलूम, कसलीहि सुलतानी, अरेरावी सहन करणार नाहीं. या अन्यायाच्या, सुलतानीच्या प्रतीकारार्थ ती नेहमीं सिद्ध राहील आणि त्या लढ्यांत जरूर तर आत्मबलिदान करील. कारण व्यक्तिमत्वसंपन्न मनुष्याला तशा स्थितींत जगणें अशक्य असतें. ही जी त्याची वृत्ति हेंच त्याचें व समाजाचें सामर्थ्य होय. अशा तऱ्हेचें व्यक्तित्वाचें सामर्थ्य भारतांतील ग्रामीण जनतेंत या ग्रामपंचायतींच्या हजारों वर्षांच्या संस्कारानें निर्माण झालें होतें काय असा प्रश्न आहे. आणि त्याचें उत्तर ' मुळींच झालें नव्हतें. ' असें आहे. हजारों वर्षें या ग्रामीण जनतेनें अत्यंत जाचक अशीं बंधनें खालीं मान घालून सहन केलीं आहेत. ब्राह्मण-क्षत्रियांचें वर्चस्व तर तिनें सहन केलेंच; पण हिंदुस्थानांत जातींचीं स्वतःचीं बंधनें कांहीं थोडीं नसत. आणि जातींच्या प्रमुखांनीं, त्या जातींच्या पंचायतींनीं घातलेलीं बंधनें वरिष्ठ वर्गांनीं लादलेल्या बंधनापेक्षांहि जास्त जाचक असत; पण त्यांच्याविरुद्ध कधींहि कोणी बंड केलें नाहीं. या ग्रामसंस्थेंत अस्पृश्य, चांडाल यांनाहि प्रवेश असे असें सांगतात. असेलहि; पण त्यामुळें आपण एक इतरांच्या सारखेच, ब्राह्मण क्षत्रियांच्या तोडीचेच नागरिक आहों असें स्फुरण त्यांच्या ठायीं झालें काय ? कधींहि झालें नाहीं. धर्माच्या क्षेत्रांत गुरुवचनप्रामाण्य, गुरुची अगदीं गुलामगिरीसारखी भक्ति व सेवा हें हिंदुसमाजाचें लक्षण आहे. हें या ग्रामीण जनतेनें कधीं दूर केलें काय ? युरोपमध्यें ग्रीक विद्येचें पुनरुज्जीवन होतांच लोकांनीं पहिला हल्ला पोपवर केला आणि या शब्दप्रामाण्याच्या बंधनांतून त्यांचा मनः-पिंड मुक्त झाला, तेव्हांच त्यांच्या ठायीं लोकसत्ता पेलण्याचें सामर्थ्य आलें. जातिबंधनें व धर्मबंधनें यांच्याप्रमाणेंच राजसत्तेचीं बंधनें होतीं. त्यांच्या

विरुद्ध भारतांत कधींहि कोणी संग्राम केला नाहीं, हें इतिहासच सांगतो आहे. इ. स. एक हजारपासून येथें अत्यंत भयानक असें मुसलमानांचें आक्रमण सुरू झालें. सर्व दक्षिण हिंदुस्थान पंचरावीस वर्षांत मुसलमानांनीं पायतळीं घातला. संपत्ति लुटून नेली. स्त्रिया भ्रष्ट केल्या. मंदिरें पाडून टाकलीं. मूर्ति फोडून टाकल्या. या वेळीं राजसत्ता चुरमुऱ्याच्या पोत्यासारख्या कोलमडल्या. पण या ग्रामपंचायतींचें तरी काय झालें ? त्या जिवंत राहिल्या; पण या आक्रमणाला त्यांनीं पायबंद घातला काय ? ज्या गुरूचा, देवाचा, धर्माचा, मंदिराचा अभिमान भारतीय जनतेला होता, त्यांच्यावर सतत तीनचारशें वर्षें अखिल हिंदुस्थानांत सारखा जुलूम चालू होता. त्यांचा विध्वंस चालू होता. खेडींच्या खेडीं इस्लामीयांनीं बाटविलीं, तेथील स्त्रिया पळवून नेल्या, जमिनी हिरावून घेतल्या. त्या वेळीं या अन्यायाचा प्रतिकार करण्याचें सामर्थ्य एकदां तरी या ग्रामपंचायतींनीं प्रकट केलें काय ? पुढें ख्रिस्ती लोक आले. त्यांनीं बकऱ्यामेंढरासारखें लोकांना कापून काढलें, बाटविलें; तरी ग्रामपंचायती जिवंतच होत्या ! आणि त्या लोकायत्त होत्या ! आणि तीं आमचीं प्रजासत्ताक राज्यें होतीं ! बंगालमध्यें कंपनी-सरकारच्या जुलमामुळें लक्षावधी लोक अन्नान्न करून मरत. खेडींच्या खेडीं उध्वस्त होत. त्यांचीं स्मशानें होत. या ग्रामसंस्था त्या काळांतहि टिकून राहिल्या होत्या !

भारतांतील ग्रामपंचायतींचें स्वरूप हें असें आहे. त्यांचा कांहीं वारेमाप गौरव करण्यानें नव्या पिढीची भलतीच दिशाभूल होईल हें आपण ध्यानांत ठेवलें पाहिजे. लोकशाहीचा खरा अर्थ अशा गौरवानें त्यांना कळणार नाहीं. लोकशाही हें एक सामर्थ्य आहे, चैतन्य आहे, ही जाणीव त्यांना होणार नाहीं. व्यक्तिमत्त्व—सर्व सामर्थ्यांनें संपन्न, क्रान्तिवृत्तीनें सळसळणारें, अन्यायाच्या प्रतीकारार्थ उसळून उठणारें,—असें व्यक्तिमत्व हा लोकशाहीचा आत्मा आहे; हा भावार्थ त्याच्या चित्तांत रुजणार नाहीं. यासाठीं आपण सावध राहिलें पाहिजे आणि प्राचीन भारतांतील लोकसत्तेचा गौरव करतांना पूर्वजांच्या अभिमानानें अंध होतां कामा नये. लोक एकत्र आले, त्यांनीं कांहीं सभा घेतल्या आणि तलाव, विहिरी, मंदिरें, जंगलें यांचा कारभार समाईकीनें पाहिला म्हणजे तेवढ्यानें ती लोकसत्ता होत नाहीं. आम्ही लोक म्हणजे सार्वभौम सत्तेचे स्वामी आहों. राजसत्ता, धर्मसत्ता, वरिष्ठसत्ता व धनिक-

सत्ता या सर्व आमच्या हातीं असल्या पाहिजेत आणि त्या न येतील तर प्राणपणानें आम्ही त्यासाठीं लढा करूं ही वृत्ति म्हणजे लोकसत्ता होय. लोकशाही म्हणजे केवळ एक विशिष्ट शासनपद्धति नसून ती एक मनोवृत्ति आहे, असें प्रेसिडेंट विल्सन यांनीं जें म्हटलें आहे त्याचा हा अर्थ आहे. ही वृत्ति भारताच्या ग्रामपंचायतींतून कधींहि निर्माण झाली नाहीं. आणि त्यामुळें केवळ जडयंत्रणा सिद्ध झाली, तरी तेवढ्यावरून या ग्रामपंचायतींना लोकशाही ही थोर पदवी प्राप्त होणार नाहीं.

सध्यां खेडीं आणि खेडूत यांविषयीं कांहीं भोळी श्रद्धा बाळगण्याची चाल पडत आहे. चिकित्सक वृत्ति कोठेंहि कमी झाली कीं, तें घातकच ठरतें. या बाबतींत तसेंच होण्याचा संभव आहे. म्हणून मॅक् आयव्हर यानें ग्रीक लोकसत्तेचें विवेचन करतांना खेडें व शहर यांच्या भिन्न संस्कृतींचें मोठें उद्‌बोधक विवेचन केलें आहे, तें सारार्थानें येथें देतों. तो म्हणतो, 'खेड्यांतील जीवन जास्त पराधीन असतें. निसर्ग हा अनियंत्रित आहे. याची नित्य जाणीव तेथें होत असते. हिवाळा, पावसाळा, उन्हाळा या ऋतुमानाची सत्ता खेडुतांवर फार असते. निसर्गाच्या या अनियंत्रित सत्तेमुळें खेड्यांतील लोक जास्त दैववादी व क्रान्तिविमुख असतात. शहरांचें तसें नाहीं. निसर्गाचे आपण दास आहोंत, ही जाणीव शहरांत क्वचितच होते. त्यामुळें व विद्येच्या प्रसारामुळें राजसत्तेची भीति शहरवासीयांत पुष्कळच कमी झालेली असते. त्यामुळें तो जास्त बुद्धिवादी, जास्त चिकित्सक असा झालेला असतो. या कारणानें नगर हें लोकसत्तांचें उगमस्थान होतें. ग्राम तसें होऊं शकत नाहीं. ग्रामीण जीवनांतील लोकशाही ही राजकारणापासून अलिप्त व असंघटित अशी असते. नागरी लोकसत्ता ही नित्यसत्ताकांक्षी, चिकित्सक व लढाऊवृत्तीची अशी असते. खेड्यांतील लोक हे ' प्रजा ' असतात, तर शहरांतील लोक ' नागरिक ' असतात. आणि या शब्दांतील विवक्षा अगदीं ध्रुवभिन्न अशा आहेत.' सध्यां ग्रामीण जनतेला जें सर्वत्र महत्त्व देण्यांत येतें त्याला विरोध दर्शवावा असा हे उद्गार अवतरून देण्यांत मुळींच हेतु नाहीं; तर तेथें लोकसत्तेच्या कल्पना रुजविण्यासाठीं कोणचे प्रयत्न केले पाहिजेत, खेडुतांचा मनःपिंडच बदलणें कसें अवश्य आहे, हें ध्यानांत यावें आणि प्राचीन काळच्या ग्रामपंचायतींची लोकसत्ता

आपण कशी पारखून घेतली पाहिजे, याची कल्पना यावी म्हणून मॅक आयव्हरचें हें विवेचन येथें उद्धृत केलें आहे. असो. ( मॅक आयव्हर, मॉडर्न स्टेट. पृ. ७२ ते ७४ )

प्राचीन भारतांतील गणराज्यांच्या अंतरंगाची येथवर चिकित्सा केली. आणि ग्रीस व रोम येथें लोकसत्तेचा उदय झाला असें ज्या अर्थानें म्हणतां येतें त्या अर्थानें भारताविषयीं म्हणतां येत नाहीं, असा निष्कर्ष आपण काढला. पण असें असलें तरी भारतांतील या गणराज्यांचें विद्वानांनीं गायिलेलें वैभव अगदीं अनाठायीं होतें असेंहि, दुसऱ्या टोंकाला जाऊन एकांतिक विधान मला करावयाचें नाहीं. लोकशाही हा इतका उज्ज्वल व उदात्त धर्म आहे कीं,'स्वल्पमप्यस्यधर्मस्य त्रायते महतो भयात्'। हें वचन त्याविषयीं अगदीं सार्थ आहे. म्हणूनच त्या दृष्टीनें अगदीं अल्प जरी मार्गक्रमण झालें असलें तरी तें अभिनंदनीयच आहे. कोणच्याहि समाजाला त्याचा अभिमान वाटावा,असाच तो विक्रम आहे. तेव्हां तसा योग्य तो अभिमान भारताला या गणराज्यांच्याविषयीं वाटणें अवश्यच आहे; आणि हा अभिमान मागल्याकाळीं येथें जगांतली एक महनीय कल्पना उदयास येऊन गेली होती असें समाधान मानण्यापुरताच नसून त्या महनीय कल्पनेच्या उदयाचें फलहि भारतास मिळालें होतें, असेंहि इतिहासावरून दिसून येईल.

## व्यक्तित्व आणि कर्तृत्व

व्यक्तीचें मन, बुद्धि, भावना, श्रद्धा व एकंदर कर्तृत्व यांच्या विकासाला पूर्ण अवसर ज्या समाजव्यवस्थेंत मिळतो, ती समाजव्यवस्था खरीखुरी लोकायत्त होय. या दृष्टीनें पहातां हिंदुस्थानांत प्राचीन काळीं तत्त्वज्ञान व धर्म या क्षेत्रांत आणि विद्या व कला यांच्या क्षेत्रांत लोकांना विचार, उच्चार व आचार यांचें जवळजवळ अनिर्बंध स्वातंत्र्य मिळत असल्यामुळें तेवढयापुरती येथली व्यवस्था लोकायत्त होती असें म्हणण्यास हरकत नाहीं. असें स्वातंत्र्य असल्यामुळेंच या भूमींत सांख्य, वेदान्त, न्याय, मीमांसा इत्यादि पंथांनीं अतुल असें विचारवैभव निर्माण केलें. हें स्वातंत्र्य असल्यामुळेंच येथें हिंदुधर्म, बौद्धधर्म, जैनधर्म इत्यादि विविध धर्म व अनेक पंथ उदय पावून शेजारीं राहून पुष्कळ अंशीं अविरोधानें आपला विकास करून घेऊं

शकले. खिस्तीधर्मानें इ. सनाच्या पहिल्या हजारबाराशें वर्षांत मानवी जीवनाच्या सर्व अंगोपांगांवर अत्यंत कडक नियंत्रण ठेवलें होतें. शब्द प्रामाण्याची पराकाष्ठा करून धर्म, तत्त्वज्ञान, नीति, विज्ञान, कला या प्रत्येक क्षेत्रांत मानवी बुद्धि पंगु करून टाकली होती. कोपरानिकस, केप्लर, गॅलिलिओ या शुद्ध विज्ञानवेत्त्यांच्या शिरावरहि धर्मसत्तेनें शस्त्र धरलें होतें. तशा तऱ्हेची मानवी बुद्धीची गळचेपी प्राचीन काळांत भारतांतील गणराज्यांत तर नव्हतीच; पण एकतंत्री अशा राजसत्तेंतहि नव्हती. आणि म्हणूनच तत्त्वज्ञानाप्रमाणेंच विज्ञानाच्या क्षेत्रांतहि या भूमींत नागार्जुन, आर्यभट्ट, वराहमिहिर यासारखे थोर शास्त्रवेत्ते निर्माण होऊं शकले. सध्यांच्या काळांत हिटलरचा वंशवाद व स्टॅलिनचा मार्क्सवाद यांनींहि मानवी जीवनावर खिस्तीधर्माप्रमाणेंच सर्वंकष असें नियंत्रण घातलें आहे. तसा प्रकार तत्त्वज्ञान, विज्ञान, कला, साहित्य या क्षेत्रांत भरतखंडांत कधींहि झाला नाहीं. त्यामुळें प्राचीनकाळीं भारतांत संस्कृतीचीं हीं अंगें अत्यंत विकसित झालेलीं दृष्टीस पडतात. वर सांगितल्याप्रमाणें धर्मविद्याकलांचा हा विकास प्रजातंत्राप्रमाणेंच नृपतंत्रांच्या काळींहि झालेला असला तरी प्रजातंत्रानें, 'या क्षेत्रांना राजसत्तेनें स्पर्श करावयाचा नाहीं,' हें जें स्तुत्य धोरण घालून दिलें त्याचाच परिपाक सर्वत्र झाला असावा असें दिसतें. त्यामुळें भारतांतील या वैभवाचें श्रेय कांहीं अंशीं तरी त्या शासनपद्धतीला द्यावें असें वाटतें. इतिहाससंशोधन करतांना प्रजातंत्रें इ. स. पूर्व सहाव्या शतकांत उदयास आलीं असें पंडित म्हणतात, पण विवेचन करतांना मागल्या काळांत जाऊन श्रीकृष्णाच्या काळींहि प्रजातंत्रें अस्तित्वांत होतीं, असें सांगतात. स्वतः श्रीकृष्ण हा अंधकवृष्णींच्या संघाचा अध्यक्ष होता, असें या पंडितांनीं म्हटलें आहे. म्हणजे प्रजातंत्राचा उदय पुष्कळच पूर्वींच्या काळीं झाला असला पाहिजे असें दिसतें. त्यांत राजकीय व सामाजिक क्षेत्रांत जरी त्याची परिणति झाली नाहीं, तरी वर सांगितल्याप्रमाणें धर्म, तत्त्वज्ञान, विज्ञान व कला या क्षेत्रांत नागरिकांना स्वातंत्र्य मिळून भारताच्या संस्कृतीची त्या क्षेत्रांत अलौकिक अशी परिणति घडवून आणण्यास त्यांना अवसर मिळाला हेंहि कांहीं थोडें नाहीं.

## विषम समाजरचना

पण हीं क्षेत्रें सोडून आपण सामाजिक, राजकीय व आर्थिक क्षेत्रांकडे वळलों म्हणजे समता, स्वातंत्र्य, व्यक्तित्वविकासाची संधि यांचा हळूहळू संकोच होत असलेला दृष्टीस पडतो. म्हणजे या क्षेत्रांत लोकशाहीला ओहोटी लागलेली दिसते. शूद्र आणि चांडाल आणि वैश्यापैकीं बहुसंख्य शेतकरी यांना जेथें उन्नतीची कधींहि आशा नव्हती, कर्मविपाकाच्या सिद्धान्तावर ज्यांची श्रद्धा असल्यामुळें आपण याच स्थितींत रहाण्यास योग्य आहों अशी ज्यांची स्वतःचीच दुबळी समजूत झालेली होती आणि हीनगंडामुळें जे संघर्ष करण्यास कधींहि उद्युक्त झाले नाहींत, त्यांच्या समाजांत लोकशाही होती असें कदापि म्हणतां येणार नाहीं. या क्षेत्रांत समतेचे विचार मधून मधून उद्भवत होते; नाहीं असें नाहीं. 'दैवायत्तं कुले जन्म, मदायत्तं तु पौरुषम् ।' अशासारखे विचार महाभारतांत सांपडतात. शूद्र गुणी असेल तर तो राजपदावर येण्यासहि हरकत नाहीं, असेंहि सांगितलेलें आढळतें. जाति या गुणकर्मानुसार ठराव्या, ब्राह्मण हा कर्मानें शुचिर्भूत असेल तरच त्याला श्रेष्ठ पदवी द्यावी, एरवीं त्याची योग्यता दासाइतकीच मानावी, असे समतेचे विचार महाभारतांत व उपनिषद्वाङ्मयांत मधूनमधून सांपडतात. बौद्धानीं आपल्या धर्मसंघापुरती का होईना पण जातिभेदाची मर्यादा ओलांडण्याचा प्रयत्न कांहीं काळ करून दाखविला होता; पण एकंदरींत पहातां भारतीय समाजव्यवस्थेंत समता व स्वातंत्र्य या तत्त्वांचा अवलंब केलेला आढळत नाहीं. ती व्यवस्था बव्हंशीं विषमच होती. आणि विषमतेचें तत्त्वज्ञान रूढ करून ती निर्मिलेली होती. डॉ. आळतेकर म्हणतात, त्याप्रमाणें याचा दोष राजव्यवस्थेकडे किंवा शासनसंस्थेकडे येत नसेल; पण ज्या शासनसंस्थेनें ही व्यवस्था चालू दिली व तिचें रक्षण केलें तिला लोकायत्त शासन म्हणतां येणार नाहीं. आळतेकर म्हणतात कीं, त्याकाळीं राजसंस्था ही समाजाची एक कार्यकारी संस्था होती. परंपरा, रूढी, श्रुतिस्मृति याअन्वयें लोकांमध्यें जी समाजरचना मान्य असेल ती तशी टिकवून धरणें एवढेंच तिचें काम होतें. स्थित्यंतर घडवून आणणें हें तिचें काम नव्हतें. असें असेल, तर तें लोकशाहीच्या कल्पनेला जास्तच मारक आहे. कारण त्या समाजव्यवस्थेला

लोकांचाच सर्वस्वी पाठिंबा होता, त्यांनांच ती मान्य होती असा याचा अर्थ होतो; आणि ज्या लोकांनीं जाणूनबुजून असली विषम व्यवस्था मान्य केली व तीच टिकविण्याचा आग्रह धरला व तसें करण्यास शासनसंस्थेला भाग पाडले, त्यांच्या लोकशाहीवरील निष्ठेविषयीं काय बोलावें ! पण दोष कोणाकडे जातो हा प्रश्न गौण आहे. प्राचीनकाळीं सामाजिक क्षेत्रांत लोकशाही नव्हती यांत वाद नाहीं. राजकारणाविषयीं वर सांगितलेंच आहे. समता, जागरूकता, राजकीय प्रबुद्धता, राजसत्तेवर नियंत्रण घालण्याची सिद्धता व या सर्वांचें समर्थन करणारें तत्त्वज्ञान, हें आपल्या प्राचीन इतिहासांत मुळींच दिसत नाहीं. आर्थिक क्षेत्रांतील समता व हक्क यांची तर येथें कल्पनासुद्धां नव्हती आणि राजकीय व आर्थिक क्षेत्रांतील लोकसत्ता हाच लोकशाहीच्या मंदिराचा पाया असल्यामुळें भारतांत प्राचीन काळीं लोकशाहीचा खरा उदय झाला होता, हें म्हणणें सयुक्तिक वाटत नाहीं.

## परंपरेचा लोप

या बाबतींत सर्वांत दुर्दैवाची गोष्ट अशी कीं, भारतांत लोकायत्त शासनाचे जे कोणचे घटक सिद्ध झाले होते त्यांची परंपरा पुढें मुळींच चालू राहिली नाहीं. वर सांगितल्याप्रमाणें राजकीय लोकसत्तेची जडयंत्रणा येथें निर्माण झाली होती आणि धर्माच्या व तत्त्वज्ञानाच्या क्षेत्रांत तर अनिर्बंध व्यक्तिस्वातंत्र्य लोकांनीं प्रत्यक्ष अनुभवलें होतें. असें असूनहि पुढील काळांत, प्रत्यक्षांत किंवा वाङ्मयांत याचा मागोवा सुद्धां घेतां येऊं नये ही घटना सर्वांत दुःखद आणि अर्थपूर्ण अशी आहे. इ. स. पूर्व ६०० पासून इ. स. ४०० एवढ्या दीर्घकाळपर्यंत या देशांत गणराज्यें चालू होतीं असें पंडितांचें मत आहे. एवढ्या काळांत धर्मसूत्रें, धर्मशास्त्रें, स्मृति, तत्त्वज्ञान, पुराणें, काव्यें, नाटकें या प्रकारचें बहुविध वाङ्मय प्रचंड प्रमाणांत येथें निर्माण झालें; पण त्यांपैकीं एकाहि ग्रंथांत कांहीं त्रोटक उल्लेखापलीकडे या शासनपद्धतीचें वर्णन सांपडूं नये याचा विस्मय वाटतो. राजसत्तेचें महत्त्व व तिची आवश्यकता यांचें विवेचन यांतील प्रत्येक ग्रंथाच्या पानापानावर आढळेल; त्याचप्रमाणें चातुर्वर्ण्य, यज्ञयाग, वेदान्त यांची महती या साहित्यांत मुक्तकंठानें गायिली आहे. त्यांच्यावर स्वतंत्र ग्रंथ झाले आहेत. त्या

ग्रंथांवर भाष्यें लिहिलीं गेलीं आहेत; पण यांत चुकूनसुद्धां हजार वर्षेंपर्यंत या देशांत चालू असलेल्या एका महनीय शासनपद्धतीचें वर्णन वा विवेचन सांपडत नाहीं, हें अत्यंत आश्चर्यजनक आणि तितकेंच दुःखदायक आहे. परंपरा न टिकण्याचें हें प्रधान कारण म्हणून सांगतां येईल; पण साहित्यिकांनीं या गणराज्यावर असा संघटित बहिष्कार कां घालावा, हें कोडें उलगडणें अशक्य आहे. प्रतिपक्षाचें तत्त्वज्ञान म्हणून खंडनासाठीं तरी त्यांनीं त्याचें परिशीलन करणें अवश्य होतें. वेदान्ती लोकांनीं इतर पंथीयांची अशी दखल घेतलेली आहे; पण तसासुद्धां मान या गणराज्यांना तत्त्ववेत्त्यांनीं दिलेला नाहीं. महाभारतांत त्यांचा नाश कां होतो, याचें थोडें विवेचन आहे आणि चाणक्याच्या अर्थशास्त्रांत त्यांची कांहीं चेष्टा आहे; इतकेंच काय तें. शंकराचार्य, कुमारिल भट्ट, रामानुजाचार्य यांनीं व यांच्या शिष्यांनीं विरुद्ध पक्षाच्या खंडनासाठीं जसे विवेचनात्मक शेकडों ग्रंथ लिहिले, तसे राजसत्तेच्या पुरस्कर्त्यांनीं लोकसत्तेच्या खंडनार्थ मूलगामी विवरण करणारे ग्रंथ लिहिले नाहींत. त्यांनीं आपल्या ग्रंथांत राजसत्तेची महती गायिली आहे व मधूनमधून अराजकाचा निषेध केला आहे. गणराज्यांचा ते निर्देशहि करीत नाहींत. माझ्या मतें याचें प्रमुख कारण म्हणजे प्रजासत्ताकाच्या पुरस्कर्त्यांनीं आपलें व्यक्तिस्वातंत्र्याचें, समतेचें, राजसत्तेच्या नियंत्रणाचें तत्त्वज्ञान लिहिलें नाहीं, हेंच होय. तें त्यांनीं लिहिलें असतें, प्रसृत केलें असतें तर गणराज्याच्या परंपरा येथें टिकल्या असत्या आणि कांहीं आपत्ती येऊन गणराज्यांवर जरी विनाशाचा प्रसंग ओढवला असता तरी, युरोपमध्यें ज्याप्रमाणें ग्रीक व रोमन ग्रंथकारांच्या तत्त्वज्ञानांतून तेराव्या-चवदाव्या शतकांत अथीनी व रोमन लोकसत्तांचें सर्वत्र पुनरुज्जीवन झालें, तसें येथें झालें असतें; पण तत्त्वज्ञानाच्या अभावीं जडयंत्रणा परंपरासातत्य टिकविण्यास असमर्थ ठरली आणि त्यामुळें या भूमीची अपरिमित अशी हानी झाली.

इ. स. १००० नंतर या भूमींत तमोयुग सुरू होऊन सर्वत्र अंधारच पसरला. या सुमारास मुसलमानांचीं आक्रमणें सुरू झालीं आणि याच सुमारास सर्व हिंदुस्थानभर संत-वाङ्मयानें निवृत्तिवाद प्रसृत करून दिला. त्यामुळें ऐहिक जीवनाविषयीं सर्वत्र उदासीनता, अलिप्तता व निराशा

निर्माण होऊन त्या लाटेंत भारतीयांचें सांस्कृतिक क्षेत्रांतलें सर्वच कर्तृत्व लुप्त झालें. तत्त्वज्ञान, काव्य, नाटक, स्मृति, धर्मशास्त्र, वैद्यक, ज्योतिष, रसायन, इतिहास, अर्थशास्त्र, राजकारण यापैकीं कोणच्याहि क्षेत्रांत या सातआठशें वर्षांत एकहि मौलिक संशोधनात्मक किंवा प्रतिभाप्रेरित असा ग्रंथ झाला नाहीं. प्रजासत्ताक क्षेत्रांतलेंच नव्हे तर सर्वच क्षेत्रांतलें भारतीयांचें कर्तृत्व या युगांत लुप्त झालें होतें. इंग्रजी आक्रमण येथें आलें, त्या वेळीं असा हा गलितगात्र, कर्तृत्वशून्य भारती राष्ट्रपुरुष त्याच्यापुढें उभा होता. त्यामुळें या संग्रामांत तो पराभूत झाला त्यांत नवल नाहीं. या पराभवामुळें आलेली स्तिमितता कांहीं काळानें दूर होतांच इतर क्षेत्रांत त्यानें आपल्या जुन्या परंपरेच्या स्मृति जागृत करून आपल्या नागरिकांच्या अंगीं चैतन्याचा संचार घडविला. पण लोकसत्तेच्या परंपरा पूर्वी निर्माणच झाल्या नसल्यामुळें त्या क्षेत्रांत त्याला श्रीगणेशापासून सर्व विद्या पाश्चात्यांकडून घ्यावी लागली. आज भारतांत लोकसत्तेचे जे आचार, विचार, कल्पना, तत्त्वें, यंत्रणा इ० घटक दृष्टीस पडतात, ते सर्व आपण पाश्चात्यांकडून घेतले आहेत. त्यांत पूर्व-परंपरेचा अंश यत्किंचितहि नाहीं.

अर्थात् आज यामुळें दुःख करीत बसण्याचें कारण आहे असें नाहीं. संस्कृतीची ही देवाणघेवाण जगांत अपरिहार्य अशीच आहे. ब्रिटिशांकडून घेतलेलें तत्त्वज्ञान आपण आत्मसात् केलें, आपल्या समाजाच्या रक्तांत तें भिनविलें, सतत संस्कार करून भारतीयांचा मनःपिंडच बदलून टाकला तर पुढेंमागें लोकसत्तेचें तत्त्वज्ञान आपण पाश्चात्यांकडून घेतलें आहे याची आठवणहि आपल्याला रहाणार नाहीं. गेल्या शतकांत राममोहनरॉय, दादाभाई, रानडे, महात्मा फुले, टिळक, आगरकर या विभूतींनीं या दिशेनें अत्यंत निष्ठेनें प्रयत्न केले आणि त्यांतून भविष्यकालाविषयीं बरीच आशाहि निर्माण झाली आहे. त्यांच्या त्या प्रयत्नांचा इतिहासच आतां आपणांस पहावयाचा आहे.

---

## प्रकरण दुसरें

# मानवत्वाची प्रतिष्ठा

### अद्‌भुत घटना

गेल्या प्रकरणांत सांगितल्याप्रमाणें या भरतभूमींत सध्यां जी लोकसत्ता प्रस्थापित होत आहे, ती प्राचीन परंपरेंतून उद्‌भवलेली नाहीं. प्राचीन काळीं येथें जीं लोकराज्यें निर्माण झालीं होतीं तीं पुढें नष्ट झालीं आणि त्यांची स्मृतीहि नाहींशी झाली, त्यामुळें अर्वाचीन काळांत भारतांतील नेत्यांना सगळी नवी सृष्टी उभारावी लागली. ती सृष्टी उभारतांना त्यांनीं ब्रिटिश लोकसत्तेचा आदर्श डोळ्यांपुढें ठेवला होता. त्यांनीं आपल्या सर्व प्रेरणा तेथून घेतल्या होत्या. सुदैव असें कीं, हें अत्यंत बिकट कार्य करण्यास या भूमीला राममोहन रॉय, दादाभाई, रानडे, टिळक, विवेकानंद, लजपतराय, महात्माजी, सुभाषचंद्र, पंडित जवाहरलाल यांच्यासारखे अद्वितीय कर्ते पुरुष लाभले. पाश्चात्य जीवनांतील लोकसत्तेचें अमृत तत्त्व घेऊन तें आत्मसात् करून या देशांतील जनतेच्या मनावर आज शंभर-दीडशें वर्षें त्यांनीं सारखें त्याचें सिंचन चालविलें आहे आणि त्यामुळेंच गेलीं पांचसहा वर्षें या भरतभूमींत एक चमत्कार घडून येत आहे. एक अगदीं असामान्य, अलौकिक, किंबहुना जवळजवळ अगदीं अद्‌भुत अशी घटना येथें घडून आली आहे व येत आहे. स्वातंत्र्यप्रस्थापना ही ती घटना नव्हे. ती आपल्या दृष्टीनें असामान्य व अलौकिक अशी असली तरी जगाच्या दृष्टीनें व एकंदर इतिहासाच्या दृष्टीनें अनन्यसाधारण अशी ती घटना नाहीं; पण त्या स्वातंत्र्य-प्रस्थापनेनंतर येथें लोकसत्ता प्रस्थापित झाली आहे आणि ही घटना मात्र त्रिखंडाच्या आतांपर्यंतच्या इतिहासांत अगदीं निस्तुळ अशी आहे.

गेल्या नऊशें वर्षांत ही भरतभूमि अगदीं स्वतंत्र अशी केव्हांच नव्हती. राजस्थानांतील रजपूत, विजयनगरचे कर्नाटकी व महाराष्ट्रांतले मराठे यांनीं अधूनमधून स्वातंत्र्याच्या चितूकळेचें दर्शन येथील जनतेला घडविलें; पण

एकतर तें अल्पकालिक होतें व दुसरें म्हणजे अखिल भारतीय जनतेला असें हें दर्शन केव्हांच घडलें नाहीं. त्या त्या प्रांतापुरतेंच तें मर्यादित होतें. या नऊशें वर्षांच्या काळांत येथें ज्या राजसत्ता होत्या त्यांना स्वसंरक्षणाखेरीज दुसरें फारसें कांहीं साध्य झालें नव्हतें. लढाया करणें, करवसुली करणें व बंदोबस्त ठेवणें यापेक्षां जास्त कांहीं करण्यास त्यांना अवसरच नव्हता आणि तशी त्यांची दृष्टीहि नव्हती. स्वकीय सत्तांची ही स्थिति. मग परकीय सत्तांचें काय सांगावयाचें आहे ! त्यांतील बहुतेक जुलमी, अविवेकी, अज्ञ, हेकट व मदांध अशाच होत्या. ब्रिटिशांच्या पूर्वींच्या आक्रमकांना राज्य चालविण्यापलीकडे समाजसंवर्धन म्हणून सत्ताधाऱ्यांचा कांहीं उद्योग असतो, याची जाणीवहि नव्हती आणि अशा आक्रमकांच्या वर्चस्वाखालींच हा देश सातआठशें वर्षें पिचत पडला होता. इतक्या दीर्घकाळपर्यंत पारतंत्र्यांत कुजत पडलेल्या या भूमीनें स्वातंत्र्य प्राप्तीनंतर एकदम लोकसत्ता प्रस्थापिली आणि गेलीं पांचसहा वर्षें, अगदीं प्राथमिक निकषानें पहातां, ती यशस्वी करून दाखविली, जगांत तिला थोडी प्रतिष्ठाहि प्राप्त करून दिली, या यशाला जगाच्या इतिहासांत तोड नाहीं.

## अपूर्वत्व कशांत आहे ?

कसलीहि पूर्व परंपरा नसतांना आपल्या लोकांनीं स्वातंत्र्य प्राप्त झाल्यानंतरच्या लगतच्या पांचसहा वर्षांत लोकसत्ता प्रस्थापित करून ती टिकवून दाखविली, या यशांत जसें या लोकसत्तेचें असाधारणत्व आहे तसेंच दुसऱ्याहि एका दृष्टीनें तिचें असाधारणत्व प्रतीत होईल. पाकिस्तान वगळलें तरी हिंदुस्थानची लोकसंख्या ३५–३६ कोटींच्या आसपास आहे. एवढी प्रचंड जनता लोकायत्त शासनाच्या अधीन झाल्याचें जगांतलें हें पहिलेंच उदाहरण आहे. ब्रिटनची आजची लोकसंख्या ५॥–६ कोटी आहे आणि सर्वांत मोठें लोकायत्त राष्ट्र जें अमेरिका त्याची लोकसंख्या १३-१४ कोटी आहे. रशियांत लोकसत्ता आहे असें कांहीं लोकांचें मत आहे. तें क्षणभर खरें मानलें तरी भरतभूमीचें असामान्यत्व भंगत नाहीं. कारण रशियाची लोकसंख्या वीस कोटींपर्यंत आहे. चीनमध्यें लोकसत्ता प्रस्थापित झाली असती, तर ती मात्र भरतभूमीच्या तुळेला उभी राहिली असती; पण

दुर्दैवानें तेथें रशियाप्रमाणेंच दण्डसत्ता, अगदीं शुद्ध मार्क्सवादी दंडसत्ता प्रस्थापित झाली आहे. त्यामुळें ३५-३६ कोटी जनतेचें आपल्या भूमींत प्रस्थापित झालेलें स्वयंशासन जगाच्या इतिहासांत पहिलेंच आहे.

भारतीय जनतेची स्वातंत्र्यप्राप्तीच्या पूर्वींची स्थिति आणि तिच्या लोकसंख्येचा अफाट व्याप एवढ्या दोनच गोष्टी ध्यानांत घेऊन आपल्या लोकसत्तेकडे पाहिलें, तरी तिची अपूर्वता ध्यांनात येईल. मग येथले धर्मभेद, पंथभेद, प्रांतभेद, जातिभेद, भाषाभेद यांचा विचार केला; येथले संस्थानिक, येथले जमीनदार व येथले भांडवलदार हे जमेस धरले; येथले अज्ञान, दारिद्र्य; येथली शास्त्रविमुखता, येथली रूढिप्रियता लक्षांत आणली; आणि या देशाचा १६ लक्ष चौरस मैलाचा अफाट विस्तार ध्यानांत घेतला म्हणजे एवढ्या विरोधी व विघातक शक्ति विद्यमान असूनहि त्यांच्यावर मात करून यशस्वी होणाऱ्या आपल्या लोकशासनाची अपूर्वता कांहीं निराळी आहे, ही खरोखरी कांहीं अद्भुत घटना घडली आहे व घडत आहे, या विधानाच्या सत्यतेची वाचकांना काहीं अंशीं तरी प्रतीति येईल.

## तुलनेनें पहा

हें सर्व तुलनेनें लिहिलेलें आहे. सध्यां भारतांत कमालीचें दारिद्र्य आहे; बेकारी वाढत आहे; गुन्हेगारी प्रवृत्ति वाढत आहे; प्रत्येक प्रांतांतील काँग्रेसपक्षांत दुही माजली आहे; सरकारच्या प्रत्येक खात्यांत हृदयविदारक गोंधळ माजला आहे; नीति या भूमींतून नाहींशीच झाल्यासारखी भासत आहे. असें सर्वत्र दिसत असतांना भारताची लोकशाही यशस्वी झाली असें कोणत्या तोंडानें म्हणावें असा आपल्याला प्रश्न पडतो. तो प्रश्न खराच आहे. त्याविषयीं कांहीं निराळें मत असल्यामुळें आपल्या लोकशाहीचा हा गौरव केला असें नाहीं; पण मेक्सिको, ब्राझील, चिली, पेरू येथें अर्वाचीन काळांत स्थापन झालेल्या लोकसत्ता; फ्रान्ससारखी जुनी लोकसत्ता; पोलंड, झेकोस्लोव्हाकिया या देशांत दोन युद्धांच्या मध्यंतरांत स्थापन होऊन विलय पावलेल्या लोकसत्ता; रशिया, चीन येथें तेथील लोकांच्या व विशेषतः नेत्यांच्या मतें उदयास आलेल्या नव्या लोकसत्ता या सर्वांच्या तुलनेनें पाहिलें तर कसलीहि पूर्व परंपरा नसतांना, अनंत भेदांनीं

समाज जर्जर झालेला असतांना, लोकशाहीच्या जडयंत्रणेचे सर्व नियम पाळून, सरकारच्या मागें बहुमत टिकवून धरून, तें सरकार स्थिर व दृढ असें टिकवून धरण्यांत आपल्याला जें यश आलें आहे तें खरोखरच अतुल असें आहे, हा विचार लोकांच्या गळीं उतरेल अशी आशा वाटते.

अर्थात् झाली ही गोष्ट अपूर्व असली तरी ही अपूर्वाई अशीच टिकून राहील अशी शाश्वती देणें कठीण आहे. आपल्यापुढें दुर्लंघ्य असे अनेक पर्वत उभे आहेत. कामगार, किसान व अस्पृश्य यांचे प्रश्न सोडविल्यावांचून आपल्या शासनाच्या यशाचें मोजमाप करणें सयुक्तिक ठरणार नाहीं. येथील बहुसंख्य जनता दारिद्र्यांत आहे, अज्ञानांत आहे, अंध आहे. ती सुखी, सज्ञान व विवेकी झाल्यावांचून भरतभूमीच्या लोकसत्तेला सामर्थ्य प्राप्त होणार नाहीं. याशिवाय काश्मीरचा प्रश्न, पाकिस्तानच्या संभाव्य आक्रमणाचा प्रश्न, जातीयतेचा प्रश्न, भाषावार प्रांतरचनेचा प्रश्न, निर्वासितांचा प्रश्न असे अनेक बिकट प्रश्न आपल्यापुढें उभे आहेत. या समस्यांचीं उत्तरें दिल्यावांचून आपली लोकसत्ता दृढ व बलशाली होणें शक्य नाहीं. या सर्व समस्या सोडवावयाच्या तर आपल्याला भारतीय लोकसत्तेचा फार सूक्ष्म अभ्यास केला पाहिजे; तरच जगांतील इतर राष्ट्रांना जें निधान प्राप्त झालें नाहीं आणि आपल्या सुदैवानें जें आपल्याला प्राप्त झालें आहे, त्या निधानाचें आपल्याला रक्षण करतां येईल.

या निधानाचें रक्षण करावयाचें, त्याची जपणूक करावयाची तर तें निधान आपल्या हातीं आलें कसें याचा इतिहास पहाणें अवश्य आहे. लोकशाहीचा जो रोपा आपल्या हातीं आला आहे तो आम्रवृक्षाचा आहे हें खरें, पण त्याची एका महावृक्षांत परिणति घडवून आणण्यास फार कष्ट करणें अवश्य आहे आणि म्हणूनच या रोप्यासाठीं पूर्व काळीं पूर्वसूरींनीं कोणते कष्ट घेतले तें आपणांस समजलें पाहिजे. तें समजलें तरच कोणत्या जीवनद्रव्यामुळें हा रोपा आतांपर्यंत पोसत आला, कोणत्या सत्त्वामुळें त्यानें आपली अलौकिक जाति टिकवून धरली हें आपणांस कळेल, आणि तींच जीवनद्रव्यें त्याला अखंड पुरवीत राहून त्याची यापुढेंहि जोपासना कशी करावी याविषयींचें धोरण आखतां येईल. जगांत जें घडलें नाहीं, तें तेथें पांचसहा वर्षांत घडत आहे असें, इतर देशांचा निर्वाळा देऊन

जें वर सांगितलें तें जर सत्य असेल तर तें घडविण्याचें श्रेय गेल्या शंभर-दीडशें वर्षांत अर्वाचीन भारताचा इतिहास ज्या महाभागांनीं घडविला त्यांनाच आहे हें निर्विवाद आहे. म्हणूनच राजा राममोहनरॉय यांच्यापासून पंडित जवाहरलाल यांच्या पर्यंतच्या सर्व पुरुषांनीं या लोकसत्तेच्या जोपासनेसाठीं कोणते परिश्रम केले, कोणतीं तत्त्वें सांगितलीं, कोणतीं व्रतें आचरलीं व कोणत्या निष्ठा येथें दृढमूल केल्या हें समजून घेणें फार अगत्याचें आहे. हें आपणांस समजलें तर भावी काळांत आपल्याला आपल्या लोकसत्तेचा विकास करून भरतराष्ट्र हें एक प्रबल व दुर्जय असें लोकसत्ताक राष्ट्र बनविण्यांत यश येईल.

मागें सांगितल्याप्रमाणें सध्यांच्या आपल्या लोकशाहीच्या प्रेरणा पाश्चात्त्यां-कडून आलेल्या आहेत. आपण लोकशाहीचे पाठ युरोपीयांकडून व विशेषतः ब्रिटिशांकडून घेतले आहेत. गेल्या शंभर वर्षांत आपल्याकडचे हजारों लोक युरोप-अमेरिकेचा प्रवास करून आले, हजारों लोकांनीं त्यांच्या राजकीय व इतर संस्थांचा ग्रंथांतून अभ्यास केला, लक्षावधि लोकांवर शाळा-कॉलेजांतील शिक्षणामुळें त्या विचारांचे संस्कार झाले आणि ब्रिटिशांनीं गेल्या पन्नास वर्षांत येथें ज्या अर्ध्यामुर्ध्या लोकायत्त संस्था स्थापन केल्या, त्यामुळें अखिल समाजाच्या डोक्यांवरून केव्हांना केव्हां तरी या विचारांच्या लाटा जाऊन तो बहुजन समाजहि या नव्या विचारांच्या रसायनांत थोडाफार भिजून निघाला आहे. अशा रीतीनें सध्यांच्या आपल्या लोकशाहीच्या प्रेरणांच्या बाबतींत आपण सर्वस्वीं पाश्चात्त्यांचे ऋणी आहों. म्हणून आपल्या लोकसत्तेचा अभ्यास करतांना आपण पश्चिमेंत विकसित झालेल्या लोकसत्तेचीं तत्त्वें कोणचीं व त्यांना भारतांत आणतांना आपल्या नेत्यांनीं त्यांच्यावर कोणचे संस्कार केले, त्यांना कोणचें रूप दिलें व तीं आत्मसात् करून या देशांत तीं कशीं प्रसृत केलीं तें पाहिलें पाहिजे. यासाठीं गेल्या शतकांत पश्चिमेकडून या भूमींत आलेल्या लोकशाहीच्या भिन्नभिन्न प्रेरणांच्या विवेचनास आतां आरंभ करतों.

## सामुदायिक जीवन

लोकसत्ता हें सामुदायिक जीवन आहे. सार्वजनिक जीवन आहे. सर्व समाजाचें हिताहित एक आहे, तें हिताहित त्या समाजांतील व्यक्तींच्या

परस्परांतील संबंधावर अवलंबून आहे आणि म्हणून ते संबंध चांगले राखून सर्वांच्या सहकार्यानें समाजाच्या उन्नतीचीं कार्यें केलीं पाहिजेत ही जाणीव ठेवून ज्या जनसमूहांतील घटक कार्यप्रवृत्त होतात, त्या समूहांत सामुदायिक जीवन निर्माण झालें आहे असें म्हणतां येईल. अशा समाजांतील प्रमुख व्यक्ति समाजाच्या उन्नतिअवनतीचें नेहमीं चिंतन करीत असतात, समाजांतील घडामोडींचें निरीक्षण करीत असतात व समाजाच्या भवितव्याविषयीं सदैव जागरूक राहून त्याला वेळोवेळीं कार्यप्रवृत्त करीत असतात. समाज असा कार्यप्रवृत्त झाला म्हणजे तो सामाजिक जीवन जगत आहे असें आपण म्हणतों. राजसत्तेमध्यें व्यक्तींच्या सहकार्याची अशी अपेक्षाच नसते. राजा व त्याचे अधिकारी आपल्या दृष्टिकोनांतून समाजाची व खरें म्हणजे आपल्या राज्याची काळजी वहातात व कांहीं कारणानें प्रजेच्या साह्याची आवश्यकता आहे असें दिसलें तर आज्ञापत्रें काढून सक्तीनें वा मोलानें, युद्धकाळीं ब्रिटिश सरकार जशी भारतीयांची सेवा घेत असे, त्याप्रमाणें, प्रजेची सेवा घेत असतात. अशी सेवा करण्यापलीकडे समाजांतील व्यक्ति सामाजिक किंवा सार्वजनिक असें कोणचेंच कृत्य करीत नाहींत आणि तसें करावयाचें नसल्यामुळें त्यांच्यांत सहकार्याची भावनाहि फारशी निर्माण झालेली नसते. समाजाच्या परिस्थितीचें वा भवितव्याचें चिंतन हें तर त्यांच्या कधीं गांवींहि नसतें. त्यामुळें अशा समाजांत जीवन हें कुटीर व वैयक्तिक स्वरूपाचें असतें. सार्वजनिक जीवनाचा तेथें अभाव असतो आणि हें सार्वजनिक जीवन निर्माण झाल्यावांचून लोकशाहीच्या प्रवृत्ति निर्माण होणें शक्य नसतें.

## त्याचें लक्षण

अशा सार्वजनिक जीवनाचें मुख्य प्रतीक, दृश्य स्वरूपांत गोचर होणारें पहिलें प्रतीक म्हणजे त्या समाजांतील भिन्नभिन्न संस्था हें होय. अर्वाचीन समाजाचें जीवन हें संस्थांचें जीवन आहे. त्यांचा इतिहास म्हणजे त्यांतील प्रमुख संस्थांचा इतिहास होय व त्याची संस्कृति ही त्यांतील संस्थांची संस्कृति होय. आपलें शरीर हें रक्ताच्या किंवा मांसाच्या कणाकणांनीं घडलेलें नाहीं. त्या रक्तमांसाच्या प्रथम पेशी होतात आणि त्या पेशी हेच शरीराचे आद्य घटक असतात. त्याचप्रमाणें समाजांतील भिन्नभिन्न संस्था याच

खरोखर समाजशरीराच्या मुख्य घटक असतात. त्यांतील फुटीर व्यक्ति या नव्हेत. आपलें शरीर हें उत्तम सहकार्याचें एक अत्युत्कृष्ट उदाहरण आहे. समस्त जीवनाच्या उन्नतिअवनतीची जबाबदारी त्यांतील प्रत्येक घटकावर आहे आणि एका घटकाचें सुखदुःख तेंच प्रत्येक घटकाचें सुखदुःख आहे असा सक्त दण्डक असल्याचें दुसरें इतकें चांगलें उदाहरण सांपडणें फार कठीण आहे. अशा या शरीराचे आद्य घटक फुटीर असे मांसकण हे नसून त्या मांसाच्या किंवा जीवनरसाच्या बनलेल्या पेशी हे होत. पेशी विघटित झाल्या तर रक्तमांसाचे कण विद्यमान असूनहि शरीरव्यापार चालणार नाहींत. शरीरांत हें जें पेशींचें स्थान आहे तेंच समाजांत संस्थांचें आहे. या संस्था मुळांतच नसल्या किंवा असून विघटित झाल्या तर, संस्थांचे कण म्हणजे ज्या व्यक्ति त्या जरी अस्तित्वांत असल्या तरी समाजाचें जीवन हें चालूं शकणार नाहीं; तें स्थगित होईल, कुंठित होईल व अंतीं विनाश पावेल.

## संस्थांचा जन्म

गेल्या शतकांतील लोकशाहीच्या सिद्धतेचें पहिलें लक्षण म्हणजे सार्वजनिक जीवन निर्माण करणाऱ्या अशा संस्थांचा जन्म हें होय. २६ ऑगस्ट १८५२ रोजीं मुंबईला 'बॉम्बे असोसिएशन' नांवाची संस्था स्थापन झाली. पितामह दादाभाई, जगन्नाथ शंकरशेट, डॉ. भाऊ दाजी या मंडळींनीं ही संस्था स्थापून हिंदुस्थानच्या अर्वाचीन राजकारणाचा पाया घातला. याच सुमारास बंगालमध्यें प्रसन्नकुमार ठाकूर, राजेंद्रलाल मित्र, हरिश्चंद्र मुकर्जी इ. कार्यकर्त्यांनीं अशीच 'ब्रिटिश इंडिया असोसिएशन' नांवाची संस्था स्थापन केली होती आणि मद्रासमध्येंहि 'मद्रास नेटिव्ह असोसिएशन' ही संस्था याच वेळीं उदयास आली होती.

लोकशाही हें जें सामुदायिक जीवन आहे त्याला धार्मिक, आर्थिक, सामाजिक, शैक्षणिक अशीं विविध अंगें अत्यंत अवश्य असलीं तरी प्रधानतः तें राजकीय जीवन आहे आणि म्हणूनच वर प्रथम राजकारणी संस्थांचा उल्लेख केला आहे. १८५० च्या आधीं सार्वजनिक जीवनाचें लक्षण म्हणजे ज्या संस्था त्या आपल्या भूमींत अस्तित्वांत आल्या होत्या; पण त्या

धार्मिक, सामाजिक वा शैक्षणिक क्षेत्रांतल्या होत्या. त्यांना महत्त्व नाहीं असें नाहीं. त्यांचा विचार आपणांस करावयाचा आहेच. पण राजकारण हा लोकसत्तेचा गाभा असल्यामुळें त्याचें प्रवर्तन करणाऱ्या संस्थाचें महत्त्व जास्त आहे. आणि म्हणूनच त्यांचा निर्देश प्रथम केला आहे.

ब्रिटिशांची सत्ता येथें प्रस्थापित होण्यापूर्वी हजार वर्षांच्या काळांत अशा प्रकारच्या संस्था आपल्या देशांत केव्हांच निर्माण झाल्या नव्हत्या आणि त्याचें मुख्य कारण म्हणजे या अर्वाचीन संस्था स्थापन करणाऱ्या कार्यकर्त्यांच्या मनापुढें जें ध्येय होतें त्या ध्येयानें या देशांत मागल्या काळांत कोणतेच लोक प्रेरित झालेले नव्हते. समाजाच्या उत्कर्षापकर्षाचें चिंतन करावें, त्याच्या भवितव्याची चिंता वहावी, घडलेल्या व घडणाऱ्या इतिहासाचे अनुभव जमेस धरून त्यांवरून कांहीं निष्कर्ष काढावे आणि त्याअन्वयें समाजाची नवी घडी बसवावी हा जो समाजांतील तत्त्ववेत्त्यांचा प्रधान उद्योग तो या भरतभूमींत प्रायः लुप्तच झाला होता.आपल्या भूमीवर शेकडों वर्षें आक्रमणें कां होत आहेत, तीं मारून काढण्याचें पूर्वीसारखें सामर्थ्य आपल्या अंगीं कां नाहीं, आपली समाजरचनाच कांहीं बिघडली आहे काय, चातुर्वर्ण्य, जातिभेद, जन्मनिष्ठ उच्चनीचता यांचा याच्याशीं कांहीं संबंध आहे काय, ही भूमि सुवर्णभूमि असूनहि येथें कायमची अन्नान्नदशा कां असावी, परकीय व्यापारी येथें येऊन येथून अमाप धन घेऊन जातात याचा अर्थ काय, हे कोण आहेत, कोठून येतात, यांचे व्यापार व कारभार सुयंत्रपणें चालविणारी यांच्यामागें कोणची शक्ति आहे, ती शक्ति त्यांच्या समाजरचनेचेंच विशिष्ट फल आहे काय, आपण आपला धर्म सर्वश्रेष्ठ समजतों तें बरोबर आहे काय, त्यांतील संन्यासप्रवृत्ति, आचारकांड व शब्दप्रामाण्य यांनीं आपला घात तर केला नाहींना, तसें असेल तर आपल्या धर्मांत कोणच्या सुधारणा करणें अवश्य आहे, आपल्या समाजांत स्त्रीचें जें स्थान आहे तें आपल्या समाजाच्या कल्याणाला बाधक नाहीं काय, बालविवाह, असंमत वैधव्य इ. रूढी स्त्रीच्या जीवनाच्या परिणतीच्या आड येत नाहींत काय, आपण जी विद्या आपल्या समाजांत आहे असें म्हणतों तिची खरोखरी काय किंमत आहे, विद्या या नांवाला तरी ती पात्र आहे काय, त्याहून पाश्चात्य विद्या कांहीं निराळ्या प्रकारची आहे काय, त्यांच्या

बंदुका, त्यांचीं जहाजें, त्यांचे छापखाने हीं त्या निराळ्या विद्येचीं तर फलें नव्हेत ना, हे व या तऱ्हेचे हजारों प्रश्न, जे त्या काळच्या समाजनेत्यांच्या व इतरहि अनेक घटकांच्या चित्तांत प्रादुर्भूत व्हावयास हवे होते, ते येथें कधीं झालेच नाहींत. शिवछत्रपती व समर्थ रामदासस्वामी या दोन विभूति सोडल्या तर समाजजीवनाचें अनुभवप्रमाणानें चिंतन करणारी व्यक्ति या हजार वर्षांच्या इतिहासांत दिसतच नाहीं आणि जेथें समाजाच्या चालू प्रपंचाचें व भवितव्याचें चिंतनच नाहीं तेथें त्या भवितव्याला वळण लावणाऱ्या संस्था निर्माण होण्याचा संभव कोठला ?

## चिंतनाचा अभाव

मागल्या काळांत या भूमींत कोणी चिंतनच करीत नव्हतें, येथें तत्त्वमंथनच होत नव्हतें, याचा अर्थ असा कीं इतिहास, अनुभव, अवलोकन, तर्क यांच्या साह्यानें कोणी चिंतन करीत नव्हतें. या दृष्टीनें कोणी तत्त्वमंथन करीत नव्हतें. नाहींतर भोंवताली घडणाऱ्या बऱ्यावाईट घटना पाहून प्रत्येक व्यक्तीच्या मनांत कांहीं तरी विचारचक्रें सुरू होतातच व आपल्या मगदुराप्रमाणें ती त्यांवरून कांहीं निष्कर्षहि काढीत असते. या तऱ्हेचें चिंतन व मनन ब्रिटिश पूर्वकाळांत येथें चालू होतें. येथें भिन्नभिन्न जातींच्या पंचायती व कधीं कधीं ब्रह्मवृंदांच्या सभाहि भरत असत. पण त्या पंचायती व त्या सभा जे निर्णय देत ते ठरीव चाकोरीच्या बाहेर कधीं जात नसत. कांहीं आचारधर्मनियमांचा भंग झाला म्हणून समाज रसातळाला चालला आहे असा त्यांचा कायमचा निष्कर्ष असे. इतरहि विचारवेत्त्यांची ठरीवच विचारसरणी असे. 'सांप्रत विचार करतां हें युग विपरीत. तेव्हां दिवसेंदिवस धर्म क्षयास जाणार' असा सिद्धान्त पूर्वीच्यांनीं गृहीतच धरला होता. 'पुढें होणार भविष्य बलवंत. यास्तव नानासाहेबांस अशी बुद्धि झाली' अशा तऱ्हेची दैवाधीन विचारसरणी अवलंबूनच मागले लेखक घटनांची मीमांसा करीत असत. जें वाईट घडेल तें कलियुगामुळें, आणि चांगलें होईल तें स्वामींच्या पुण्यप्रतापामुळें, हीच इतिहासमीमांसा त्यांना माहीत होती. तत्त्वमंथन किंवा चिंतन हे शब्द वापरतांना आपल्याला जो अर्थ अभिप्रेत असतो तो हा नव्हे. ब्रिटिशसत्ता येथें प्रस्थापित होऊन पाश्चात्यविद्येचा थोडाफार प्रसार झाल्याबरोबर पहिल्या

पांचपन्नास वर्षांत येथल्या समाजधुरीणांच्या चित्तांत विचारांचें जे तुफान माजलें, पुराणकालीं झालेल्या समुद्रमंथनापेक्षां सुद्धां जास्त प्रबल असें जें तत्त्वमंथन येथें सुरू झालें, नव्या विचारांच्या तीव्र उष्णतेमुळें येथल्या समाजाचीं कवचें उकलून ज्वालामुखीसारखे येथें जे स्फोट होऊं लागले, समाज, धर्म, नीति, अध्यात्म या क्षेत्रांत युगानुयुगें अविचलित मानलेले पहाडासारखे सिद्धांत एकदम गडगडल्यामुळें येथें जे प्रलयकंप अनुभवास येऊं लागले ते विचारांत घेतले म्हणजे मागल्या काळीं तत्त्वमंथन, मनन, समाजाच्या भवितव्याविषयींची चिंता ही शून्यप्रायच होती हें कोणालाहि मान्य होईल. १८२५ ते १८८५ या पहिल्या काळखंडांत राजा राममोहन रॉय, ईश्वरचन्द्र विद्यासागर, सुरेंद्रनाथ बॅनर्जी, दादाभाई नौरोजी, दादोबा पांडुरंग, ज्योतिराव फुले, लोकहितवादी, रानडे, आगरकर, टिळक, पंडित अयोध्यानाथ, स्वामी दयानंद, लाला हंसराज, लाला लजपतराय, आनंदाचार्लू, सुब्रह्मण्य अय्यर इ० अनेक नेत्यांना, कार्यकर्त्यांना व विचारवेत्त्यांना गेल्या हजार वर्षांत जे प्रश्न येथल्या लोकांना प्रतीत झाले नाहींत म्हणून वर सांगितले तेच नेमके प्रतीत झाले. आणि त्यामुळें आपल्या समाजाचें अत्यंत अवनत रूप पाहून त्यांच्या पायाखालची धरणी हादरून गेली. पूर्वीच्या काळीं वर निर्देशिलेले कांहीं अपवाद वगळतां या तऱ्हेनें पायाखालची धरणी हादरत नसे.

आणि याचें प्रधान कारण म्हणजे सामुदायिक जीवनाची कल्पनाच त्या समाजांतून नष्ट झाली होती हें होय. येथें माणसें फुटीर अशा गटांनीं भिन्नभिन्न कोंडाळ्यांतून आपापलें कोंझें जीवन जगत होतीं. ब्राह्मणाला अंत्यजाच्या बऱ्यावाईटाची चिंता तर नव्हतीच, पण अखिल ब्राह्मणसमाजाच्या उत्कर्षाची चिंता तो वहात होता असेंही नव्हतें. आणि हीच गोष्ट इतर जातींची होती. लग्नकार्य, बहिष्कार, ग्रामण्य येवढ्यापुरतेंच जातीय जीवन येथें होतें. इंग्रज येथें आला तर तो कोण आहे हें जाणावें, त्याची विद्या हस्तगत करावी अशी चिंता ब्राह्मणांना कधींच लागली नव्हती आणि त्याचें युद्धशास्त्र अवगत करून घ्यावें असें क्षत्रियांना कधीं वाटलें नव्हतें. म्हणजे अखिल समाजाची चिंता येथें नव्हती येवढेंच नव्हे तर जातींचें जें मर्यादित सामुदायिक जीवन त्याचीहि चिंता, कांहीं ठराविक

विषयांपलीकडे, कोणी करीत नसत. येथें सर्वत्र व्यक्ति रहात होत्या. येथें समाज होता हें म्हणणें सत्याला फार सोडून होईल.

पाश्चात्य संस्कृतीच्या व विशेषतः ब्रिटिश विद्येच्या प्रसारामुळें या भरतभूमींत जें मन्वंतर झालें त्याचें पहिलें लक्षण हें कीं या भूमींत फार काळ लुप्त झालेलें सामुदायिक किंवा सार्वजनिक जीवन पुन्हां अवतीर्ण झालें. आणि त्याचें प्रत्यक्ष कारण हेंच कीं, येथें विचारी लोकांनीं समाजाच्या भवितव्याचें चिंतन व तत्त्वमंथन करण्यास प्रारंभ केला आणि त्यामुळें गेलें शतक संपण्याचें आंतच या देशाच्या जवळजवळ प्रत्येक प्रांतांत धर्मकारण, समाजकारण, राजकारण, वाङ्मय, शिक्षण, इतिहास, विज्ञान इ. क्षेत्रांत कार्य करून आपल्या समाजाला आपापल्या दृष्टीनें वळण लावण्याच्या हेतूनें शेकडों संस्था निर्माण झाल्या व त्यांनीं भरतखंडाचें रूप अगदीं अल्पावकाशांत आपादमस्तक पालटून टाकलें.

१८८५ सालीं कॉंग्रेसची स्थापना झाली व दोनच वर्षांनीं सामाजिक परिषदहि निर्माण झाली. सुमारें ८।१० वर्षांत म्हणजे १८९५ पर्यंत या दोन्ही संस्थांचें आसन स्थिर होऊन त्यांच्या रूपरेषाहि थोड्याफार निश्चित झाल्या आणि त्यामुळें या भूमींत अखिल भरतखंडाचें सामुदायिक जीवन निर्माण झालें. अखिल भरतभूचें धार्मिक, सामाजिक, राजकीय, आर्थिक—सर्व तऱ्हेचे प्रश्न एकच आहेत. सर्व प्रांतांतील लोकांचीं सुखदुःखें, आशा-आकांक्षा, रागद्वेष एकच आहेत, व सर्व भारतीयांना सारख्याच आपत्तींशीं झुंजावयाचें आहे अशी अखिल भारतीय भावना, अखिल भारताच्या ऐक्याची व त्याबरोबरच पृथगात्मतेची भावना त्या सुमारास निर्माण झाली. पण हा जो अखिल भारतीय सार्वजनिक जीवनाचा महासिंधु निर्माण झाला तो कांहीं एकदम निर्माण झाला नाहीं. त्यापूर्वी सुमारें ६०।७० वर्षें लहान-लहान गांवांतून त्या जीवनाचे बिंदु तयार होत होते. मोठमोठ्या शहरांतून त्यांचे जलौघ वाहूं लागले होते आणि भिन्नभिन्न प्रांतातून सामुदायिक जीवनाच्या सरिताहि त्या महासिंधूच्या रोखानें मार्ग क्रमूं लागल्या होत्या. या सर्वांचाच १८८५ ते ९५ या काळांत संगम होऊन भारतीय सामुदायिक जीवनाचा महासागर निर्माण झाला आणि पुढील पन्नास वर्षांत त्याला उधान येऊन त्यांतूनच शेवटीं लोकसत्तेचा अमृतकलश भारतीयांच्या हातीं

आला. तो सर्व इतिहास आपणांस पुढें पहावयाचा आहे. आतां प्रथम भिन्नभिन्न प्रांतांत नानाविध संस्थांनीं हें सामुदायिक जीवन निर्माण कसें केलें आणि त्या वेळीं त्यांच्यापुढें प्रधान उद्दिष्ट कोणचें होतें याचा विचार करूं.

या जीवनाच्या प्रधान प्रेरणा पाश्चात्त्यांकडून आल्या याचें प्रत्यक्ष गमक हेंच कीं, ज्या प्रांतांत पाश्चात्यविद्येचा प्रसार प्रथम झाला तेथें या नवजीवनास प्रथम प्रारंभ झाला. अर्वाचीन भारताच्या बहुतेक सर्व जीवनाच्या क्षेत्रांतील आदिशक्तींचा उदय बंगालमध्यें झालेला आहे. राजा राममोहन रॉय यांनीं धर्मसुधारणेसाठीं ब्राह्मसमाजाची स्थापना केली ( १८२८ ) आणि त्यांतूनच पुढें देवसमाज, नवविधान इ० संस्था निघाल्या. प्रसन्नकुमार ठाकूर यांनीं स्थापन केलेल्या कलकत्त्याच्या ब्रिटिश इंडिया असोसिएशनचा ( १८५१ ) उल्लेख वर आलाच आहे. अशा रीतीनें एकदां प्रारंभ झाल्यानंतर सर्व प्रांतांत पुढील पन्नाससाठ वर्षांत शेकडों संस्था भराभर उदयास आल्या. दादोबा पांडुरंग यांनीं १८४३ सालीं स्थापन केलेली मानवधर्मसभा, १८५० सालीं स्थापिलेली परमहंससभा, त्यांचेच बंधु डॉ. आत्माराम पांडुरंग यांनीं स्थापिलेला प्रार्थनासमाज ( १८६७ ); महात्मा जोतिराव फुले यांचा सत्यशोधकसमाज ( १८७३ );स्वामी दयानंद सरस्वती यांनीं मुंबईस स्थापन केलेला, पण पंजाबांत दृढमूल झालेला आर्यसमाज ( १८७५ ); संयुक्त प्रांतांतील भार्गवसभा, पंजाबांतील आगरवाल व जाट यांच्या सभा, रजपुतान्यांतील माळीसभा, जैतपूरची महाजनसभा, बल्लारीचा सन्मार्गसमाज, गाझीपूर, मीरत, अजमीर येथील सभा, सिंधमधील सिंध असोसिएशन, अयोध्या प्रांतांतील कायस्थ सभा—या सर्व सभा सामाजिक व धार्मिक सुधारणा करण्याचा हेतूनें प्रस्थापित झाल्या होत्या. वर उल्लेखिलेली कलकत्त्याची ब्रिटिश इंडिया असोसिएशन, मुंबईची बॉंबे असोसिएशन, मद्रासची मद्रास नेटिव्ह असोसिएशन, कलकत्त्यास १८७६ सालीं निघालेली इंडियन असोसिएशन, पुण्याची सार्वजनिक सभा ( १८७२ ) व मद्रासची महाजनसभा या राजकीय संस्था होत्या. ज्ञानप्रसारकसभा, स्टूडंट्स लिटररी अँड सायंटिफिक सोसायटी, हिंदू युनियन क्लब इ० संस्था ज्ञानोपासनेच्या उद्देशानें निघाल्या होत्या.

## वृत्तपत्रें–दुसरें लक्षण

संस्थांप्रमाणेंच वर्तमानपत्रें व एकंदर नियतकालिकें हीं पण सार्वजनिक जीवनाचीं प्रतीकेंच आहेत. राष्ट्रपुरुषाच्या शरीरांत विचारांचें अभिसरण कायम चालू ठेवण्याचें काम ही वृत्तपत्रेंच करीत असतात. अर्वाचीन काळांत वृत्तपत्रावांचून सामुदायिक जीवन क्षणभरहि चालूं राहाणार नाहीं. अशा या वृत्तपत्रांचा उदय व वाढ वर निर्देशिलेल्या काळांतच झालेली आहे. राजा राममोहन रॉय यांच्या संस्थेचें 'बंगाली हेरल्ड' हें मुखपत्र होतें. १८४०च्या सुमारास कलकत्त्यास 'प्रभाकर' नांवाचें एक पत्र ईश्वरचंद्र गुप्त यांनीं काढलें होतें. उमेशचंद्र बॅनर्जी यांनीं १८६२ सालीं बंगाली' हें पत्र सुरू केलें. हेंच पत्र पुढें १८७८ सालीं सुरेन्द्रनाथ बॅनर्जी यांनीं घेतलें व त्याच्या साह्यानें बंगाल हलवून सोडला. बाबू शशिकुमार घोष यांच्या 'अमृतबझार पत्रिकें' चा जन्म १८६८ सालीं झाला होता. महाराष्ट्रांत बाळशास्त्री जांभेकर व भाऊ महाजन यांनीं १८३२ सालीं 'दर्पण' नांवाचें पाक्षिक काढलें आणि पुढें १८४० सालीं भाऊ महाजन यांनीं 'प्रभाकर' नावाचें साप्ताहिक एकट्यांनींच चालू केलें. पुढें १८४९ सालीं 'ज्ञानप्रकाश' १८६२ सालीं 'इंदुप्रकाश' १८६४ सालीं मंडलिकांचें 'नेटिव्ह ओपिनियन' १८७७ सालीं कृष्णराव भालेकरांचें 'दीनबंधु' हीं पत्रें निघालीं आणि १८८१ या सालीं 'केसरी' व 'मराठा' या पत्रांचा जन्म झाला. १८७९ सालीं सुब्रह्मण्य अय्यर यांनीं मद्रासला 'हिंदु' हें पत्र चालू केलें. डॉ. पट्टाभींच्या मतें मद्रासप्रांतांत सार्वजनिक जीवन या पत्रामुळेंच निर्माण झालें. १८८२ सालीं अय्यर यांनींच 'स्वदेश मित्रम्' हें दैनिक चालूं केलें. प्रयागचे पंडित अयोध्यानाथ यांच्या नेतृत्वानें १८७९ सालीं 'इंडियन हेरल्ड' हें पत्र निघालें होतें आणि 'हिंदुस्थान' हें पत्र हातीं घेऊन १८८७ सालीं मालवीयजींनीं आपलें कार्य चालूं केलें होतें. स्वामी दयानंदांपासून स्फूर्ति पावलेले लालाहंसराज यांनीं 'री-जनरेटर ऑफ आर्यावर्त' या पत्राच्या साह्यानें १८८१ सालींच जागृतीच्या कार्यास प्रारंभ केला होता.

हा सर्व इतिहास हिंदु समाजांतील जागृतीचा आहे. पण अगदीं याच मार्गानें मुसलमान, पारशी हेहि समाज जागृत झाले होते व असेच कार्यप्रवृत्तहि झाले होते. सर सय्यद अहंमद यांनीं पाश्चात्य ज्ञानाच्या प्रसारासाठीं १८६३ सालीं ‘ सायंटिफिक् सोसायटी ’ स्थापन केली आणि १८७१ सालीं ‘ सोशल रिफॉर्मर ’ हें पत्र मुसलमान-समाजाच्या सुधारणेच्या हेतूनें चालू केलें. १८७७ सालीं त्यांनीं आपल्या प्रसिद्ध ‘ अलीगड विद्यापीठाची’ स्थापना केली. १८५१ सालीं ‘राहनुमाई मझदेस्तन’ ही पारशी समाजाची धर्मसुधारक सभा स्थापिली गेली. दादाभाई नौरोजी, वाच्छा, नौरोजी फर्दूनजी ही मंडळी या सभेच्या प्रवर्तकांत अग्रेसर होती; ‘ रास्त गोफ्तार ’ हें पत्रहि तिनें चालू केलें.

## मानवत्वाची प्रतिष्ठा

मागें सांगितलेंच आहे कीं, गेल्या शतकाच्या पूर्वार्धातच या देशांत पाश्चात्य संस्कृतीच्या आगमामुळें पूर्वकाळच्या समुद्रमंथनापेक्षांहि जास्त वेगानें तात्त्विक विचारांचें मंथन सुरू झालें होतें आणि त्या पौराणिक मंथनांतून जशीं महार्हरत्नें निघालीं तशींच या अर्वाचीन वैचारिक मंथनांतूनहि अनेक तत्त्वरूप रत्नें निघालीं. या रत्नांतील अत्यंत श्रेष्ठ व लोकसत्तेच्या दिव्य तत्त्वाची प्रभा सर्वत्र विकिरित करणारें रत्न म्हणजे ‘ मानवत्वाच्या प्रतिष्ठेची प्रतीति ’ हें होय.

समाजांतील प्रत्येक व्यक्तीच्या जीवनाला स्वतंत्र महत्त्व आहे, केवळ समाजाचा एक घटक या दृष्टीनें तिच्याकडे पहावयाचें नसून एक स्वत:सिद्ध व स्वयंपूर्ण मानव या दृष्टीनेंच तिच्याकडे पाहिलें पाहिजे, समाजरचनेचीं तत्त्वें दुसऱ्या कोणत्या तरी पारलौकिक दृष्टीनें ठरवून मग त्यांत जेथें कोठें चौकटींत वा सापटींत मानव बसेल तेथे त्याला बसवावयाचा असें धोरण न अवलंबिता मानवाचें सुख, त्याचा गुणविकास, त्याच्या व्यक्तित्वाचा उत्कर्ष हेंच मूलभूत ध्येय ठेवून त्याला अनुसरूनच समाजरचनेची तत्त्वें ठरविलीं पाहिजेत हा जो विचार तो म्हणजे लोकशाहीचा आदिसिद्धांतच आहे. पण मानवाच्या जीविताला एक विशेष प्रतिष्ठा आहे, ही जाणीव झाल्यावांचून या सिद्धांताला कोणी मान देणार

नाहीं. म्हणूनच 'मानवत्वाच्या प्रतिष्ठेची प्रतीति' हें सर्वांत श्रेष्ठ असें तत्त्वरत्न होय असें वर म्हटलें आहे. अमेरिकेचे अध्यक्ष ट्रूमन यांनीं अमेरिकेंतील उच्च शिक्षणाची पुनर्घटना करण्यासाठीं १९४८ सालीं एक समिति नेमली होती. तिचें इतिवृत्त नुकतेंच प्रसिद्ध झालें आहे. त्यांत 'व्यक्तिजीवनाचें स्वयंसिद्ध महत्त्व व मानवी जीवनाची प्रतिष्ठा यांवरील दृढ श्रद्धा हेंच लोकसत्तेचें मूल महातत्त्व होय, आणि उच्च शिक्षणांत त्याचा प्रामुख्यानें अंतर्भाव झाला पाहिजे' असें आग्रहानें सांगितलें आहे. (संडे न्यूज १२ । १२ । ४८) नेमक्या याच तत्त्वाचा उपदेश न्या. रानडे यांनीं आपल्या सामाजिक परिषदांतील भाषणांतून केला आहे.

मानवाच्या मानवत्वाची ही जी स्वयंसिद्ध प्रतिष्ठा तिच्यावर समाजनेते श्रद्धा ठेवतात कीं न ठेवतात, ती त्यांना मान्य आहे कीं नाहीं, यावरच त्या त्या समाजांतील बंधनें, नियंत्रणें, नियमनें हीं सर्वस्वीं अवलंबून असतात. आणि या दृष्टीनें विचार करून १८५० च्या पूर्वीच्या अनेक शतकांत आपल्या देशांत जीं समाजबंधनें रूढ होतीं त्यांचें परीक्षण केलें तर असें दिसून येतें कीं त्या बंधनांच्या प्रणेत्यांना मानवी जीवनाची प्रतिष्ठा मान्य तर नव्हतीच पण ती त्यांना ज्ञातहि नव्हती. त्या काळीं भारतीय समाजांतील सर्व श्रेष्ठ व कनिष्ठ जातींमध्यें व्यक्तींच्या सर्व क्षेत्रांतील व्यवहारावर जीं अनंत बंधनें होतीं त्यांचा नुसता विचार सुद्धां आज आपल्याला दुःसह वाटतो. स्नानाविषयीं नियम, भोजनाविषयीं नियम, शौचाविषयीं नियम, मुखशुद्धिविषयीं नियम, निजण्यासंबंधींचे निर्बंध, उठण्यासंबंधींचे निर्बंध, कपड्यासंबंधींचे निर्बंध, जन्माच्या आधींचीं बंधनें, मरणानंतरचीं बंधनें, तिथि, वार, नक्षत्र, महिना यांविषयींचीं नियंत्रणें, विवाहविषयक आज्ञा, जातिभेद-विषयक आज्ञा, परस्परव्यवहाराविषयीं आज्ञा, प्रवास, परदेशगमन, भक्ष्याभक्ष्य, पेयापेय, स्पर्श यांचे विधिनिषेध—हे सर्व निर्बंध आणि त्यांच्या अल्पशा भंगाबद्दलचीं तीं शेकडों प्रायश्चित्तें हीं मानवी प्रतिष्ठेला इतकीं उपमर्दकारक आहेत, मानवाच्या व्यक्तित्वाचा त्यामुळें इतका अवमान होतो, आणि त्या बंधनांच्या प्रणेत्यांची मानवाबद्दलची तुच्छताबुद्धि त्यांमुळें इतकी स्पष्ट होते कीं, असल्या समाजांत लोकशाही तर लांबच राहिली, पण कोणत्याहि प्रकारचें

श्रेष्ठ मानवी कर्तृत्व निर्माण होणें कालत्रयीं शक्य नाहीं असा एखाद्यानें तर्क बांधला तर इतिहास सर्वतोपरी त्याचा पाठपुरावाच करील.

## तर्कशून्य बंधनें

मानवी समाजाचे व्यवहार सुरळित चालावयाचे तर त्यासाठीं बंधनें असणें अवश्य आहे, पण त्या बंधनांना कांहीं तर्काचा, उपयुक्ततेचा, सद्‌हेतूचा पाठिंबा असला पाहिजे. तो पाठिंबा जेव्हां नसतो आणि धर्मसिंधु, निर्णयसिंधु या ग्रंथांतल्याप्रमाणें हीं बंधनें जेव्हां हेतुशून्य, अर्थशून्य, तर्कशून्य व केवळ धर्माज्ञेवर तगणारीं अशीं असतात त्या वेळीं तीं मानवी प्रतिष्ठेला अत्यंत घातक अशीं ठरतात. या बंधनांनीं मानवाचें मानवत्वच संपुष्टांत येतें. एखाद्या सुतावर पाय पडला, एखादा पाण्याचा थेंब अंगावर पडला, कोणाची सावली अंगावर पडली किंवा कसल्या तरी धान्याचा कण पोटांत गेला, किंवा नुसता कोणाचा शब्द कानावर आला तरी तेवढ्यामुळें मानव पतित ठरावा, अमंगळ ठरावा आणि त्याबद्दल त्याला प्रायश्चित्त घेणें भाग पडावें अशा प्रकारच्या धर्माज्ञा प्रचलित करणाऱ्यांच्या मनांत मानवी जीवनाच्या मूलभूत महत्त्वाची किती दखल असेल तें सहज कळून येईल. मानव म्हणजे त्याची बुद्धि, त्याचें मन, त्याचा आत्मा, त्याच्या निष्ठा, त्याची श्रद्धा, त्याची विचारसरणी, त्याच्या आशा आकांक्षा हा सर्व जगतांतल्या तत्त्ववेत्यांना मान्य असलेला सिद्धान्त वरील प्रकारच्या धर्मपंडितांनीं पायदळीं तुडविला आहे. लोकसत्तेच्या कल्पना त्यांना माहीत नसतील, पण देहबुद्धि ही खोटी आहे, मानव म्हणजे मानवाचा देह नसून मानव म्हणजे अंतरांतील आत्मा होय, हा वेदान्तसिद्धान्त तर त्यांना माहीत होता ना? पण तो धर्मग्रंथांत होता. प्रत्यक्षांत त्यांच्या मतें मानव म्हणजे त्याचा देह, त्याचें जड शरीर! कारण त्याला केवळ एका सुताचा स्पर्श झाला कीं, तो मानव पतित होतो आणि केवळ त्या शरीरावर कांहीं संस्कार केले कीं तो शुद्ध होतो. मानवाच्या प्रतिष्ठेचा उपमर्द तो हाच. ही विचारसरणी मानवाला देहप्रधान मानते, पशुवत् लेखते. ती मन, बुद्धि, श्रद्धा, आत्मा या मानवत्वाच्या उच्च घटकांची दखलच घेत नाहीं. मनुष्य म्हणजे मनुष्याचा आत्मा, देह नव्हे.

देह म्हणजे मी अशी भावना ठेवल्यामुळें मनुष्य मोक्षाला अपात्र ठरतो; अशा प्रकारचें आध्यात्मिक तत्त्वज्ञान एका तोंडानें सांगणाऱ्या या धर्मवेत्त्यांनीं दुसऱ्या तोंडानें मानवाला जो धर्म सांगितला तो फक्त त्याचा जड देहच विचारांत घेऊन सांगावा आणि नुसत्या स्पर्शानें किंवा सांवलीनें त्याला पतित मानण्यास प्रवृत्त व्हावें यापरता जास्त अधःपात तो काय ! आणि जेथें धर्मवेत्तेच असे हीन, पतित व प्रज्ञाहत होते तेथें मानवाची प्रतिष्ठा कशी सुरक्षित राहणार !

न्या. रानडे यांच्या सर्व सुधारणेचें 'मानवी प्रतिष्ठेचें पुनरुज्जीवन' हें आदिसूत्र होतें. 'आपल्या अधःपाताचें मूल कारण म्हणजे आपणांवरचीं सर्व बंधनें हीं विवेकबंधनें नसून तीं बाह्य व जड अशीं बंधनें आहेत, हें होय. यामुळें आपलीं मनें बाल्यावस्थेंतच राहिलीं. स्वयंशासन, आत्मसंयम यांमुळें येणारी मानवी प्रतिष्ठा आपल्याला आलीच नाहीं' असे उद्‌गार त्यांनीं कलकत्याच्या दहाव्या सामाजिक परिषदेंत भाषण करतांना काढले आहेत. ( मिसलेनियस रायटिंग्ज् पृ. १९२–९३ ) आणि श्रेष्ठ मानवी प्रतिष्ठेची जाणीव हाच या अधःपातावर उपाय आहे, असा संदेश सांगितला आहे. वरील ग्रंथांत त्यांचीं जीं सामाजिक परिषदांत झालेलीं दहाबारा भाषणें दिलीं आहेत, त्यांत तीनचार ठिकाणीं या तत्त्वाचा त्यांनीं उल्लेख केला आहे. यावरून त्यांना त्याचें किती महत्त्व वाटत होतें तें कळून येईल.

## मानवत्वाचा अवमान

ब्रिटिशांच्या पूर्वीच्या हजार वर्षांच्या काळांत येथें समाजरचनेचीं जीं तत्त्वें मान्य व रूढ झालीं होतीं, त्यांतील जवळजवळ प्रत्येक तत्त्व मानवी प्रतिष्ठेला घातक असेंच होतें. कलियुगाची कल्पना, जन्मनिष्ठ उच्चनीचता, दैववादाचें किंवा नियतिवादाचें तत्त्व, संसाराविषयींची व विशेषतः स्त्रियांविषयींची उपेक्षाबुद्धि, तर्काची अवहेलना, शब्दप्रामाण्य, यांतील प्रत्येक तत्त्व मानवाच्या स्वत्वाची पायमल्ली करणारें आहे आणि याच्या जोडीला या सर्वांच्या आधारानें उभारलेलें तें कर्मकांड, तो अत्यंत अमंगळ असा आचारप्रधान धर्म !

असल्या अधम व हीन धर्मांचे जे अनुयायी त्यांच्यांत लोकसत्ता तर राहोच, पण मानवी कर्तृत्वाचा निदर्शक असा कोणचाच गुण निर्माण होणें शक्य नव्हतें आणि पाश्चात्य विद्येनें ज्यांना नवी दृष्टि प्राप्त झाली होती, अशा सर्व धर्मवेत्त्यांना हीच भयावह गोष्ट प्रथम जाणवली. राममोहन, केशवचन्द्रसेन, ईश्वरचन्द्र विद्यासागर, पंडित सीतानाथ, दादोबा पांडुरंग, ज्योतिबा फुले, लोकहितवादी, सर सय्यद अहमद, रानडे, भांडारकर, स्वामी दयानंद, लाला हंसराज, आगरकर, विवेकानंद इ० गेल्या शतकांतील सर्व प्रमुख समाजनेते हे प्रामुख्यानें धर्मसुधारक होते त्याचें कारण हें आहे. प्रत्येकानें पहिला घण त्या कर्मकांडप्रधान जडधर्मावर घातलेला आहे. त्यांच्या धर्मसुधारणेचें लक्षण एकच होतें. मानवाला देहप्रधान गणून आर्धोच्या जडधि अशा धर्मपंडितांनीं सांगितलेला हीन व अपवित्र असा आचारधर्म नष्ट करून त्या जागीं त्याच्या मनाची, बुद्धीची, आत्म्याची प्रतिष्ठा वाढविणारा तात्त्विक धर्म प्रस्थापित करणें हेंच तें लक्षण होय. धर्म हे मनाचें संस्कार आहेत देहाचे नव्हेत. धर्म म्हणजे मनोजय, धर्म म्हणजे आत्मसंयमन, धर्म म्हणजे भूतदया, धर्म म्हणजे श्रद्धा, भक्ति, प्रेम हा महनीय विचार त्यांना सांगावयाचा होता; आणि वेद, उपनिषदें, गीता, आवेस्ता,कुराण या आपल्या आदि धर्मग्रंथांच्या आधारानें त्यांनीं तो सांगितला. मधल्या काळांत माजलेला आचारधर्म हा मूळवृक्षावर माजलेल्या बांडगुळाप्रमाणें होय, हेंच मत राममोहन, स्वामी दयानंद, विवेकानंद, खरशेडजी रुस्तुमजी कामा, सर सय्यद अहमद या गेल्या शतकांतील प्रमुख धर्मसुधारकांनीं सांगितलें आणि धर्म ही मुख्यतः मानसिक उन्नति आहे आणि तिच्यासाठीं विवेक, बुद्धि, तर्क यांचाहि उपयोग श्रद्धा, भक्ति यांचे बरोबर झाला पाहिजे, हा विचार आपापल्या सधर्मीयांच्या मनावर बिंबविण्याचा त्यांनीं प्रयत्न केला.

आणि यांतच कळून वा नकळून त्यांनीं लोकायत्त शासनाच्या सिद्धतेला बहुमोल साह्य केलें आहे. ब्रिटन, अमेरिका, फ्रान्स येथील लोकसत्ताकांचा इतिहास आपण पाहिला तर मानवाच्या मनाभोंवतीं असलेल्या अनेक जाचक अशा शृंखला तुटून पडल्यावांचून तें मन लोकायत्त शासनाची अवघड जबाबदारी पेलण्यास समर्थ होऊं शकत नाहीं, हा विचार त्या इतिहासांत

अनेक वेळां आपणांस दिसून येईल. त्या अनेक शृंखलापैकीं जड आचार-धर्माची शृंखला अत्यंत जाचक असते. विज्ञानाच्या साह्यानें ती शृंखला त्या त्या देशांतील पंडितांनीं तोडून काढली, तेव्हांच त्यांचें पाऊल पुढें पडलें. आपल्या भरतभूमींत येथल्या पूर्वसूरींनीं नेमकी याच स्वरूपाची धर्मक्रान्ति घडवून आणली आणि त्यायोगें मानवाच्या मानवत्वाची प्रतिष्ठा वाढवून भारतीय लोकसत्तेचा पाया घातला.

---

## प्रकरण तिसरें

# समतेचा महामंत्र

लोकसत्ता हें अत्यंत क्रान्तिकारक असें तत्त्व आहे. त्याच्या आगमना-बरोबर समाजाच्या सर्व रचनेंत आमूलाग्र परिवर्तन घडून येत असतें. धर्म, नीति, शिक्षण, समाजव्यवस्था, अर्थव्यवस्था या क्षेत्रांतील कोणचीहि संस्था लोकायत्त युगांत जुन्या रूपांत टिकूं शकणार नाहीं, आणि तशी ती टिकून राहिली तर लोकसत्ता यशस्वी होणार नाहीं. जुन्या काळच्या या संस्थांनीं त्या काळच्या मानवी मनावर शेकडों वर्षें संस्कार करून त्या मनाची एक विशिष्ट घडण बनविलेली असंत, आणि ती घडण लोकसत्तेस सर्वस्वीं प्रतिकूल असते. 'लोकशाही हा केवळ शासनसंस्थेचा प्रकार नसून लोकशाही म्हणजे प्राधान्यानें एक मनोवृत्ति, एक विशिष्ट विचारप्रणाली आहे.' हें विड्रोविल्सन यांचें वचन मागें एकदां उद्‌धृत केलें आहे. ही जी त्यांनीं सांगितलेली मनोवृत्ति ती जुन्या पीठिकांतून निर्माण होणें शक्य नसतें. जुन्या पीठिकांचे संस्कार घेऊन त्याच धोरणानें कार्यप्रवृत्त झालेली माणसें लोकशाही कधींच यशस्वी करूं शकणार नाहींत. लोकशाही यशस्वी होण्यास माणसांची नवीनच पिढी निर्माण होणें अवश्य असतें. नव्या संस्था व नवीन समाजरचना यांना नव्याच माणसांची आवश्यकता असते. हा नवा माणूस गेल्या शतकांत कसा निर्माण झाला व गेल्या शतकांतील विचारवेत्त्यांनीं त्याच्या स्वागताची तयारी कशी केली तें आपण पहात आहों. तें पहातांना पहिली

गोष्ट आपल्या ध्यानांत आली ती अशी कीं, त्या समाजधुरीणांनीं प्रथमतः त्या मानवाला स्वतःच्या मानवत्वाच्या प्रतिष्ठेची प्रतीति आणून दिली. त्याचें स्वत्व, त्याच्या मनुष्यत्वाचा अहंकार हा प्रथम त्यांनीं जागृत केला आणि अशा रीतीनें या भूमींत त्यांनीं नवयुग निर्माण केलें.

मानवाची प्रतिष्ठा जागृत करण्यासाठीं त्या कार्यकर्त्यांनीं या प्रतिष्ठेचा पहिला शत्रु जो अंध आचारधर्म त्यावर प्रथम हल्ला चढविला, हें मागें सांगितलेंच आहे. पण एवढें करून ते स्वस्थ बसले नाहींत. या आचारधर्माइतकीच आपल्या समाजरचनेच्या बुडाशीं असलेली जन्मनिष्ठ उच्चनीचता हीहि लोकसत्तेला विघातक आहे, हें ध्यानीं घेऊन याहि रोगाचें निर्मूलन करण्याचे त्यांनीं शक्य ते प्रयत्न सुरू केले व समतेच्या महामंत्राच्या जपयज्ञाला प्रारंभ केला.

## विषमतेवर आघात

या बाबतींत पहिला कांहींसा संघटित प्रयत्न महाराष्ट्रांत मराठी भाषेचे पाणिनि दादोबा पांडुरंग यांनीं केला. जातिभेदानें आपल्या समाजाचा नाश झाला आहे हा विचार त्यांनीं सुरतेस 'मानवधर्मसभा' स्थापन केली त्याच वेळीं त्यांच्या मनाशीं निश्चित झाला होता. या सभेचे जे सात सिद्धांत आहेत त्यांत 'मनुष्यमात्राची जाति एक आहे' व 'मनुष्यामध्यें उत्तम कोण व अधम कोण हें गुणावरून ठरवावें' असे दोन आहेत. पण याप्रमाणें केवळ सिद्धांत सांगून दादोबांचें समाधान झालें नाहीं. हा विचार कृतींत आणण्यासाठीं त्यांनीं १८५० च्या सुमारास 'परमहंस सभा' या नांवाची संस्था स्थापन केली. १८४६ मध्यें शाळा-शिक्षक तयार करण्याचा जो नॉर्मल क्लास निघाला त्याचे डायरेक्टर म्हणून त्यांची नेमणूक झाली होती. त्या शिक्षकांना ते जातिभेदाची अनिष्टता पटवून देऊन तो नष्ट करून टाकण्याची आवश्यकता किती आहे तें समजावून देत असत आणि याच विचारानें प्रेरित होऊन त्यांनीं ही 'परमहंस सभा' स्थापन केली होती. या सभेंत सर्व जातींच्या व धर्मांच्या लोकांना प्रवेश असे. प्रथम सभासद होतांना नव्या गृहस्थाला 'मी जातिभेद मानणार नाहीं.' अशी प्रतिज्ञा करावी लागे. नंतर त्यास किरिस्तावानें केलेल्या

पावाचा एक तुकडा खावयास देत. अशा रीतीनें सभासद झालेल्या लोकांचें वर्षांतून बऱ्याच वेळां सहभोजनहि होत असें. पण हें सर्व गुप्तपणें चाले. समाजांत व्याख्यानरूपानें वा लेखरूपानें या संस्थेचा मतप्रचार चालत नसे. दादोबांचे नॉर्मल क्लासमधील शिष्य आपापल्या गांवीं जाऊन शिक्षक म्हणून काम करूं लागल्यावर आपल्या परमहंस मताचा प्रचार करीत. पण यापेक्षां जास्त व्यापक रूप या प्रयत्नाला आलें नाहीं. (दादोबा पांडुरंग चरित्र. प्रियोळकर, पृ. २४९–२८२.)

भारतीय समाजांतील जन्मनिष्ठ विषमता नष्ट करून समतेच्या पायावर त्याची पुनर्घटना केली पाहिजे, हा विचार इतर अनेक क्रान्तिकारक विचाराप्रमाणेंच राजा राममोहन रॉय यांनीं सांगितला आहे. मात्र या क्षेत्रांत त्यांनीं जोराची चळवळ केली नाहीं. ती पुढें केशवचंद्र सेन यांच्या प्रयत्नानें सुरू झाली. त्यांनीं ब्राह्मसमाजामार्फत अनेक भिन्नजातीय विवाह घडवून आणले आणि त्यांना मान्यता देण्यासाठीं १८७२ सालीं सरकारकडून तसा कायदाहि करवून घेतला. याच सुमारास पंडित सीतानाथ यांनींहि जातिभेदनाशाची चळवळ जोरांत सुरू केली होती. आधुनिक राष्ट्रनिर्मितीच्या आड येणाऱ्या ज्या अनेक रूढि हिंदुधर्मांत आहेत, त्यांत जातिभेद ही प्रमुख आहे असें त्यांचें निश्चित मत होतें. जातिबंधनांमुळें व्यक्तीला स्वातंत्र्य मिळत नाहीं, म्हणून आपल्या समाजरचनेंत आमूलाग्र क्रान्ति झाली पाहिजे असें ते सांगत. त्यांच्या मतें मूर्तिपूजा, बलिदान व चातुर्वर्ण्य हा हिंदुधर्माचा पाया होय. तेव्हां एकतर तो पाया उखडून काढला पाहिजे किंवा ब्राह्मांनीं त्यांतून बाहेर तरी पडलें पाहिजे असें प्रतिपादन ते करीत. (नवयुगधर्म—फडके पृ. ६६२–६७)

गेल्या शतकांतील बहुतेक सर्वच समाजसुधारकांनीं जातिभेदावर व विषमतेवर हल्ला केला असला तरी त्यांत लोकहितवादी यांनीं केलेल्या हल्ल्याला आपल्या दृष्टीनें विशेष महत्त्व आहे. इतर सुधारकांनीं कोणीं मानवतेच्या दृष्टीनें, कोणीं भूतदयेच्या दृष्टीनें तर कोणीं राष्ट्रनिर्मितीच्या दृष्टीनें जातिभेदाचा विचार केला आहे. आणि त्या विचारसरणींना महत्त्व आहे यांतहि शंका नाहीं. पण लोकहितवादींचा विशेष निर्देश करण्याचें कारण असें कीं त्यांनीं लोकशाहीचें तत्त्व प्रतिपादून त्यासाठीं म्हणून जातिभेदाचें

निर्मूलन व समतेची प्रस्थापना यांचें महत्त्व वर्णिलें आहे. ' राज्यसुधारणा ' या आपल्या पत्रांत त्यांनीं असा विचार मांडला आहे कीं, येथील लोकांनीं विलायतेंतील राणीसाहेबांस अर्ज करून कळवावें कीं, ' सध्यांच्या राज्यपद्धतीपासून आमचा फायदा नाहीं. याकरितां हिंदुस्थानचे देशांत पार्लमेंट ठेवावें. दर एक शहरांतून व जिल्ह्यांतून दोनदोन असामी घेऊन त्या सर्वांस कौन्सिलांत बसवावें. हे जे लोक आणावयाचे ते सर्व जातींतील सारखे असावे. या लोकांत भट, गृहस्थ, शास्त्री, परभू, कुळंबी, मुसलमान इंग्रज इ० जे शहाणे असतील ते नेमावे. म्हणजे लोकांचा फार फायदा होईल. आणि राज्याची सुधारणा होऊन राजाचे अमलांत सुख काय व लोकसत्ताक राज्यांत सुख काय तें सहज दृष्टोत्पत्तीस येईल. '

जन्मनिष्ठ उच्चनीचतेवर त्या काळांत लोकहितवादींनीं जेवढा भडीमार केला, तितका दुसऱ्या कोणी क्वचितच केला असेल; त्यांतहि त्यांनीं एकंदर ब्राह्मण जातीवर जें हत्यार धरलें त्यामुळें त्या समाजाची दृष्टि अंतर्मुख होऊन त्याला आत्मनिरीक्षणाचें जें बाळकडू मिळालें, तें अगदीं आजपर्यंत आपला प्रभाव दाखवीत आहे. गेल्या शंभर वर्षांत इतर जातींनीं ब्राह्मणांना ज्या शिव्या दिल्या त्यापेक्षां कितीतरी पटीनें जास्त शिव्या ब्राह्मणांनीं स्वतःच्या स्वतःलाच दिल्या आहेत. समाजांत जागृति कायम रहाण्यास अशा तऱ्हेचें कठोर आत्मपरीक्षण अवश्य असतें. व त्याचें सर्व श्रेय लोकहितवादींना आहे असें वाटतें. ' जे ब्राह्मण ज्ञानशून्य आहेत. ते कैकाड्यासारखेच असून कैकाडी हे सुधारले तर ब्राह्मणासारखेच मानावे–' असें ते प्रतिपादितात. अर्थ न समजतां वेदांचें अध्ययन करणारे जे ब्राह्मण ते त्यांना केवळ जनावरें वाटतात. ' ब्राह्मणांनीं आपल्या मूर्ख समजुती सोडून देऊन लोकांस सारखे मानून विद्या शिकण्याचा हक्क सर्वांना आहे, हें त्यांनीं कबूल करावें ' असा उपदेश त्यांनीं केला आहे. ' चार ब्राह्मण लावून अभिषेक करावा त्यापेक्षां चार मजूर लावून रस्ता नीट करावा हें चांगलें, कारण ती लोकहिताची मजुरी आहे. यास्तव स्नानसंध्या करण्यांत पुण्य नाहीं. ' असलीं सनातनी लोकांना आजहि न पेलणारीं मतें त्यांनीं सांगितलीं आहेत. ' भटांत व अतिशूद्रांत मला इतकेंच अंतर दिसतें कीं, एक बोलता राघू व एक न बोलता राघू; परंतु ज्ञान एकच.' जर या देशांत

पार्लमेंट झालें आणि त्यांत सर्व जातीचे लोक पाठविले तर त्यामध्यें महारापेक्षां भट अधिक शहाणपणानें आपल्या देशाचे हिताविषयीं बोलतील काय ? अशा तऱ्हेची जहरी टीका करून ज्याच्या त्याच्या गुणकर्मावरून वर्ण ठरवावा असा उपदेश लोकहितवादींनीं केला आहे. ( शतपत्रें पृ. ५५, ६४, १२९, २१३ )

लोकहितवादींच्या नंतर समतेचें तत्त्व तितक्याच आग्रहानें सांगणारे गृहस्थ म्हणजे विष्णुबुवा ब्रह्मचारी हे होत. १८५९–६० च्या सुमारास लिहिलेल्या आपल्या ' वेदोक्तधर्मप्रकाश ' या ग्रंथांत त्यांनीं आपलीं हीं मतें निःसंदिग्ध शब्दांत मांडलीं आहेत. विष्णुबुवा हे लोकशाहीचे पुरस्कर्ते आहेतच. पण लोकशाहीच्याहि पलीकडे जाऊन त्यांनीं शुद्ध कम्यूनिझमचाहि पुरस्कार केला आहे आणि समतेच्या तत्त्वाची पराकोटी गांठली आहे. ' प्रजा हें एक कुटुंब आहे. असें मानून सर्वांनीं कष्ट करावे, व त्या कष्टांनीं निर्माण झालेलें धन राज्याच्या कोठारांत भरून ठेवावें व सर्व गांवकऱ्यांस पोटास लागेल तसें द्यावें ' अशी व्यवस्था (राजनीति) त्यांनीं सांगितली आहे. ' जातिभेद ही राजनीति बिघडल्याचीच निशाणी आहे. ' ' जातिभेद, मूर्तिपूजा, व अनेकप्रकारचीं धर्माचीं ढोंगें यांचा नाश, ' सर्व प्रजा एक कुटुंब ' या खऱ्या राजनीतीवांचून होणार नाहीं;' असें अस्सल मार्क्सवादी मत विष्णुबुवांनीं सांगितलें आहे. ही राजनीति स्वीकारली तर चोऱ्यामाऱ्या थांबतील एवढेंच नव्हे तर युद्धेंहि थांबतील, हाहि विचार त्यांनीं सांगितला आहे. आणि शेवटीं अशी व्यवस्था केल्यास कायद्याची व शासनसंस्थेची गरजच रहाणार नाहीं असें प्रतिपादन त्यांनीं केलें आहे. ( सुखदायक राज्य प्रकरणी–निबंध )

वेदोक्तधर्माच्या नवव्या प्रकरणांत चातुर्वर्ण्य, जातिभेद यांविषयीं त्यांनीं आपलीं मतें सांगितलीं आहेत. त्यांचें असें मत आहे कीं, मुलामुलींना पांचव्या वर्षापासून शिक्षण द्यावें. अकराव्या वर्षापर्यंत विद्या झाल्यावर त्यांच्या गुणावरून त्यांचा वर्ण ठरवावा व त्याअन्वयें पुढें समवर्णीयांचीं लग्नें लावून द्यावीं व त्यांचा व्यवसायहि त्यावरूनच निश्चित करावा. गुणकर्माचा असा विचार न करतां केवळ ब्राह्मणाच्या किंवा क्षत्रियाच्या पोटीं जन्म झाला म्हणून तरुणतरुणींना एकवर्णीय मानून त्यांचा विवाह

त्या त्या जातींत करणें हा विष्णुबुवांच्या मतें वर्णसंकर होय. ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र यांच्या पोटीं जन्मलेल्या अपत्यांना केवळ जन्मावरून ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र मानलें, तर दुष्टाला गुरु मानल्यानें किंवा भित्र्यास शूर मानल्यानें जे तोटे होतात ते होतील असें त्यांनीं सांगितलें आहे.

## बहुजनसमाजाची मनःक्रांति.

विषमता नष्ट करून समतेची प्रस्थापना करण्याचे गेल्या शतकांत जे प्रयत्न झाले त्यापैकीं तीनचार प्रयत्नांची हकीकत वर सांगितली आहे. यापेक्षांहि जास्त महत्त्वाचा प्रयत्न म्हणजे महात्मा ज्योतिराव फुले यांचा होय. वरील प्रयत्न हे उच्चवर्णीय म्हणविणाऱ्या व पांढरपेशा वर्गातल्या लोकांनीं केलेले आहेत; पण बहुसंख्य असा जो बहुजनसमाज त्याच्यांतल्याच एका थोर समाजसेवकानें केलेल्या प्रयत्नाचें महत्त्व केव्हांहि जास्तच असणार. विषमव्यवस्थेंत जो समाज दलित असतो त्याचा आत्मप्रत्यय शेंकडों वर्षांच्या संस्कारानें नाहींसा झालेला असतो. आपण खरोखरच हीन आहों, आपल्याला मिळाली तीच पायरी योग्य आहे अशी त्याच्या मनाची भावना झालेली असते. कळत वा नकळत त्यानें विषमतेला मान्यता दिलेली असते व त्यामुळें वरिष्ठ वर्गाला त्याचा छळ करण्यास मोकाट रान सांपडतें. अशा वेळीं त्यांच्यांतलाच एक कार्यकर्ता—त्यांच्या जातीचा व विशेषतः स्वतःला त्यांचा म्हणवून घेण्यांत अभिमान बाळगणारा असा कार्यकर्ता—निर्माण होतांच त्या समाजाच्या मनाचें मालिन्य नष्ट होतें. आणि आपल्या श्रेष्ठत्वाची प्रतीति त्याच्या मनांत निर्माण होऊन विषमतेच्या अन्यायाविरुद्ध प्रतिकार करण्यास तो सिद्ध होतो. ज्योतिराव फुले यांच्या उद्योगाचें या दृष्टीनें विशेष महत्त्व आहे. स्वजनांचाच नव्हे तर पित्याचाहि विरोध सोसून या पुरुषानें शंभर वर्षांपूर्वीच्या काळीं अस्पृश्यांची शाळा चालविली आणि त्यांच्यासाठीं स्वतःच्या घरापुढचा पाण्याचा हौद खुला केला. पण ज्योतिरावांचें खरें सामाजिक कार्य म्हणजे 'सत्यशोधक समाजाची' स्थापना हें होय. हिंदूंच्या विषमतेवर उभारलेल्या वर्णव्यवस्थेविरुद्ध व जातिभेदाविरुद्ध असंतोष निर्माण करून त्याविरुद्ध खेड्यापाड्यांतील सर्व खालच्या वर्गापर्यंत बंडाची वृत्ति पसरून देण्याचें मोठें कार्य या समाजानें केलें आहे.

जन्मनिष्ठ उच्चनीचता नष्ट करण्याचे गेल्या शतकांत या भूमींत जे प्रयत्न झाले त्यांचा इतिहास आपण पहात आहों. या इतिहासांत स्वामी दयानंदांनीं प्रस्थापिलेल्या आर्यसमाजानें पंजाबांत जें कार्य केलें त्याला फार महत्वाचें स्थान आहे. वेदाचा अधिकार अखिल हिंदुमात्रास आहे, हें उच्च तत्त्व प्रसृत करून या समाजानें त्याअन्वयें मागासलेल्या व अस्पृष्ट जातींनाहि समाजांत सामील करून घेऊन त्यांना यज्ञोपवीताचा अधिकार दिला व त्यांचें द्विजत्व मान्य केलें; आणि शिक्षणाचा प्रसार सर्व जातींत करून त्यांच्यांत रोटी व बेटीव्यवहार सुरु करण्याचें धोरण आंखलें. हा समाज वर्ण मानतो पण समाजाच्या मतें वर्ण हा जन्मावरून ठरत नसून धंदा व वेदज्ञान यावरून ठरतो. आर्यसमाजाची स्थापना मुंबईस झाली; पण त्याचा खरा प्रसार पंजाबांत झाला. आजमितीला समाजाचे तीन लक्ष सभासद आहेत आणि त्यानें प्रस्थापिलेल्या शिक्षणसंस्थांची संख्या तर सहज शंभरापर्यंत जाईल. समतेचा मंत्र जपून जातीय विषमता नष्ट करण्याच्या बाबतींत या समाजानें केवढें कार्य केलें आहे, तें यावरून ध्यानीं येईल. ( लाला हंसराजचरित्र—श्रीराम शर्मा )

## समता आणि कर्तृत्व

समतेचें महत्त्व समाजरचनेंत किती आहे याचें मागें विवरण केलेंच आहे. कोणच्याहि प्रकारची विषमता ही समाजाला घातकच ठरते; पण त्यांतल्या त्यांत जातिभेदामुळें आलेली विषमता ही समाजाचें सर्व कर्तृत्वच नष्ट करून टाकते. अशा समाजांत हीन जातीच्या लोकांना पराक्रम करण्यास स्फूर्ति येणें शक्य नसतें. आपण जे परिश्रम करणार, जो त्याग करणार, जी हानि सोसणार, तिचें पुरेपूर फल आपणांस मिळेल ही खात्री असेल तरच माणूस श्रम करण्यास उद्युक्त होतो. मी रणांत पराक्रम केला तर सेनापतीचें पद मला मिळूं शकेल, विद्यावंत झालों तर धर्मपीठावर मी आरोहण करूं शकेन, व कार्यक्षमता प्रगट केली तर राजा किंवा अध्यक्षहि होऊं शकेन—सारांश माझ्या गुणाप्रमाणें मला समाजांत स्थान निश्चित मिळेल ही भावना कर्तृत्वाची खरी प्रेरक असते. ब्रिटिशापूर्वीच्या भारतीय समाजांत, साधारणतः इ. स. १००० पासून पुढल्या सातशें-

आठशें वर्षांत ही भावना निर्माण होणें शक्य नव्हतें; कारण जातिभेदांच्या बंधनांना या कालांत फार कडक रूप प्राप्त झालें होतें. मराठेशाहींत भागवतधर्मीय संतांच्या तत्त्वोपदेशामुळें समतेची भावना कांहींशी रूढावत चालली होती. संतांना मुख्यतः पारमार्थिक क्षेत्रांतलीच समता अभिप्रेत असली तरी तिचा कांहींसा प्रसार ऐहिक व्यवहारांतहि होत होता आणि त्यामुळें महाराष्ट्रांत तरी पुष्कळच सुपरिणाम झालेला दिसून आला होता. संतांनीं परमार्थांत लोकसत्ताच प्रस्थापिली होती असें अनेक पंडितांनीं म्हटलें आहे; त्याला बराच अर्थ आहे. महाराष्ट्रांत तरी तो निश्चित आहे. कारण त्या पारमार्थिक लोकशाहीची वृत्ति हळूं हळूं ऐहिक व्यवहारांत पसरून महाराष्ट्रांत चातुर्वर्ण्याचे बंध एकदम ढिले झाले आणि धनगराचें राजपद, शूद्राचें धर्मगुरुत्व व ब्राह्मणाचें सेनाध्यक्षत्व जनतेनें एकदम मान्य केलें. लोकशाहीमुळें समाजाच्या कर्तृत्वाला एकदम उमाळे येऊन सर्वत्र त्याला बहर येतो असें म्हणतात तें किती सार्थ आहे तें येथें दिसतें. इतर संत व रामदास यांच्या कार्याचें विवेचन करतांना रामदासानें महाराष्ट्रांत चातुर्वर्ण्याची पुन्हां प्रस्थापना केली, असें राजवाडे यांनीं म्हटलें आहे आणि त्या विवेचनावरून राजवाड्यांना जन्मनिष्ठ चातुर्वर्ण्यच अभिप्रेत होतें, असें दिसतें. तसें असेल तर राजवाड्यांचें मत अगदीं भ्रामक व निराधार असें आहे. रामदासानें काय केलें हा भाग वेगळा. महाराष्ट्रांत चातुर्वर्ण्य पुष्कळसें नाहींसेंच होत होतें आणि त्यामुळेंच महाराष्ट्राला भारतीय इतिहासांत अतुल असा पराक्रम करतां आला. पण हें सर्व जरी खरें असलें तरी जी समता आज आपण अपेक्षितों तिच्या मानानें महाराष्ट्रांतली ती समता कांहींच नव्हती. ज्या जातींनीं स्मृति ऐकल्या, तर त्यांच्या कानांत तापलेल्या शिशाचा रस ओतावा असें मनूनें सांगितलें आहे त्या जातीचाच एक थोर पुरुष-डॉ. आंबेडकर-आज या आर्यावर्तांत त्याच मनूच्या पदवीला जाऊन पोंचला आहे. लोकशाहीला जी समता अवश्य आहे ती ही होय. जातीय विषमतेचें मुख्य शल्य हें कीं त्या व्यवस्थेंत हीन गणलेल्या जातींना उत्कर्षाची संधि मिळत नाहीं आणि मग त्यांचें कर्तृत्व कुजत पडतें. ही दुरवस्था नष्ट होऊन सर्वांना उत्कर्षाची समसंधि मिळूं लागली कीं जातीय विषमतेचा विषार बव्हंशीं नष्ट झाला असें म्हणण्यास हरकत

नाहीं. सर्व जाति रक्तानें एक झाल्यावांचून हा विचार कायमचा नष्ट होणार नाहीं हें खरें आणि भरतभूमींत तेंच होणें अवश्य आहे. ज्या वर्णसंकराची भीति भारतीयांना पावलोपावलीं वाटते तो येथें घडून येणें हेंच समाजाला हितावह आहे. युद्ध झालें तर वर्णसंकर होईल ही भीति श्रीकृष्णानें गीतेंत प्रगट केली आहे. पण त्यावेळचे त्याच्या भोवतालचे कर्ते पुरुष पाहिले तर ते सर्व वर्णसंकरजन्यच होते असें दिसेल. व्यास, विदुर, धृतराष्ट्र, पांडु, पांडव, कौरव—सर्वांचा इतिहास हेंच दाखवितो. व्यावसायिक वर्णसंकर द्रोण, कृप, आणि स्वतः श्रीकृष्ण यांनीं केलाच होता. तेव्हां वर्णसंकर अत्यंत हितावह होय यांत शंकाच नाहीं आणि तोच येथें घडला पाहिजे. पण शंभर वर्षांच्या अल्प काळांत आपण समसंधीची पायरी गांठली आहे ही प्रगति कांहीं थोडी नाहीं. तिच्यामुळें भिन्नभिन्न जातींत सांस्कृतिक समता निर्माण होऊन पुढेंमागें सर्व जाति रक्ततः एक होऊन जातील अशी आशा धरून तसा नेटानें प्रयत्न करणें हें आतां आपलें काम आहे.

मानवी जीवनाची प्रतिष्ठा म्हणजे काय हें वाचकांनीं एकदां नीट समजावून घेतलें आणि ती कल्पना मनाशीं दृढपणें आकळून ठेवली तर त्यांना लोकसत्तेविषयींचे अनेक सिद्धान्त अगदीं सुलभ होऊन जातील. लोकशाहीचा सारा ग्रंथ या एका सूत्रानें सहज लावतां येईल, इतकें या तत्त्वाचें महत्त्व आहे. वर ज्या विषम समाजव्यवस्थेचें वर्णन केलें आहे, ती प्रत्यक्ष व्यवहाराच्या दृष्टीनें तर घातक आहेच पण मानवी प्रतिष्ठेच्या दृष्टीनें ती जास्तच घातक आहे. कारण जड कर्मकांडाप्रमाणेंच या विषमतेमुळें मानवाच्या उच्च गुणांचा उपमर्द होतो. ही व्यवस्था फक्त त्याचा देहच ध्यानांत घेते. हृदयाचे, मनाचे, बुद्धीचे गुण हे तिला गौण वाटतात. 'दैवायत्तं कुले जन्म, मदायत्तं तु पौरुषम् ।' असे आत्मिक हुंकाराचे दिव्य बोल या समाजव्यवस्थेमुळें गुदमरून टाकले जातात आणि त्यामुळें समाजांतील कांहीं विशिष्ट जाति सोडून दिल्या कीं बाकीच्यांच्या जीवनाला प्रतिष्ठाच रहात नाहीं. प्राचीन गणराज्यांत जातिभेद होते म्हणूनच तेथें खरी लोकसत्ता होती असें म्हणणें सयुक्तिक नाहीं असें ज पहिल्या प्रकरणांत सांगितलें तें याच कारणासाठीं.

## स्त्री-पुरुष समता

आचारधर्म व विषमसमाजरचना यांचे हीन गणलेल्या जातींवर जसे अत्यंत अनिष्ट परिणाम होतात तसेच स्त्रीजीवनावरहि त्यांचे अनिष्ट व घातक परिणाम होतात. या जातींप्रमाणेंच स्त्रियांनाहि अशा समाजांत जवळजवळ शून्य प्रतिष्ठा असते आणि त्यामुळें त्यांचें जिणें म्हणजे जिवंत नरकवासच होऊन बसलेला असतो. जुन्या धर्मानें व रुढींनीं स्त्रियांवर जीं अनंत बंधनें लादलीं आहेत, त्यावरून स्त्री ही एक मानवी व्यक्ति आहे हा विचारच त्यांना मान्य नव्हता असें स्पष्टपणें दिसतें. मग तिच्या स्वतंत्र व्यक्तित्वाची जुनीं धर्मशास्त्रें व रूढी परवा करीत नसतील यांत काय नवल आहे !

पती मृत होतांच स्त्रीनें सती गेलें पाहिजे, असें सांगणारा धर्म व ती जात नसल्यास तिला सक्तीनें सती घालविणारी रूढि यांना स्त्रीच्या जीविता-बद्दल किती महत्त्व वाटत असेल हें काय सांगावयास पाहिजे ! धर्माची आज्ञा शिरसावंद्य मानून भरतभूमींतल्या अनेक सुकन्यांनीं आपल्या प्राणाची आहुती दिलेली आहे. त्या त्यांच्या दिव्य त्यागाबद्दल त्यांना शतशः अभिवादन केलें पाहिजे यांत वादच नाहीं; पण तरीसुद्धां त्या त्यांच्या आत्म-त्यागाच्या पाठीशीं धर्मानें जें तत्त्व उभें केलें आहे त्याचा सुज्ञ माणसानें निषेधच केला पाहिजे. स्त्रीचें आपल्या पतीवर कितीहि अलौकिक प्रेम असलें तरी पतीच्या मागें तिला आपल्या संसाराची जबाबदारी असते व सामाजिक कर्तव्येंहि असतात. तेव्हां स्त्री अगदीं पूर्ण राजीखुशीनें व केवळ पतिप्रेमानें जरी सती जात असली तरी आचार्य जावडेकर म्हणतात त्याप्रमाणें, तिची ही कर्तव्यबुद्धि तामसच म्हटली पाहिजे. कारण या विचारसरणींत स्त्रीला स्वतंत्र व्यक्तित्व नाहीं असें गृहीत धरलेलें आहे. स्त्रीस्वातंत्र्याच्या श्रेष्ठ ध्येयाच्या दृष्टीनें 'सती' हा कोणत्याहि स्वरूपांत अधर्मच ठरतो, असें अगदीं निर्भयपणें आचार्यांनीं जें मत मांडलें आहे त्याबद्दल त्यांचें अभिनंदन करावें तेवढें थोडेंच आहे. (आधुनिक भारत पृ. ८२)

पडद्याची चाल, बालविवाह, विधवाविवाहाची बंदी, स्त्रियांच्या शिक्षणाला विरोध या सर्व नियमनांच्या मागें स्त्री–जीविताविषयींचा तो एकच दृष्टिकोन

आहे. त्यांच्या पुरस्कर्त्यांच्या मतें स्त्रीच्या जीविताला स्वतंत्र अर्थच नाहीं. स्त्री ही पुरुषाची एक पडछाया आहे. संसार–मग तो राष्ट्रीय असो वा व्यक्तिगत असो–तो मूळ पुरुषांचा आहे आणि स्त्री हें एक त्याचें साधन आहे हीच कल्पना या बंधनांच्या बुडाशीं गृहीत धरलेली आहे. संरक्षणासाठीं स्त्रीवर बंधनें घालणें हें केव्हांहि योग्य ठरेल, पण जेथें तो प्रश्न नाहीं तेथेंहि हीं बंधनें जारी असतात आणि त्यामुळें कर्मकांडाप्रमाणेंच, हीं बंधनें स्त्रीचा जड पार्थिव देह ध्यानीं घेऊनच सांगितलेलीं असतात यांत शंका रहात नाहीं. स्त्रीचें मन शुद्ध कीं अशुद्ध हा त्या वेळीं प्रश्नच नव्हता. तिच्या देहावर दुसऱ्यांची दृष्टि पडली कीं ती भ्रष्ट होते असा विचार मनांत असल्यावांचून तिला पडद्यांत ठेवावें असें कोणाच्याच मनांत येणार नाहीं. मानवी प्रतिष्ठेचा उपमर्द तो हाच होय आणि हें जाणूनच गेल्या शतकांतील समाजधुरीणांनीं जातीय–विषमतेविरुद्ध जशी मोहीम सुरू केली त्याचप्रमाणें स्त्रीपुरुषविषमतेविरुद्धहि तितक्याच निकरानें मोहीम सुरू केली.

हिमालयाच्या उदरांतून निघालेल्या जलवाहिन्यांनीं ज्याप्रमाणें भारतवर्षाचें पोषण होतें, त्याचप्रमाणें राजा राममोहन राय यांच्या हिमनगाप्रमाणेंच विशाल असलेल्या मनांतून उगम पावणाऱ्या वैचारिक जलवाहिन्यांनीं आधुनिक भारतवर्षाचें पोषण होत आहे याविषयीं कोणी वाद करील असें वाटत नाहीं. कर्मकांड, मूर्तिपूजा, जातिभेद, सती, जुनी शाब्दिक विद्या, तज्जन्य शब्दप्रामाण्य अशा ज्या अनेक घातक रूढी हिंदुसमाजानें शिरोधार्य मानल्या होत्या, त्यांतील एकहि त्या महापुरुषाच्या क्रान्तिप्रवण दृष्टींतून सुटली नव्हती. स्त्रीस्वातंत्र्याचा प्रश्न तर त्यांना अत्यंत जिव्हाळ्याचा वाटत असे. सतीची चाल नष्ट करण्यासाठीं त्यांनीं लॉर्ड बेंटिक यांजकडे जो अर्ज केला होता त्यांत, शास्त्राच्या दृष्टीनें किंवा सारासार विचारानें, कसेंहि पाहिलें तरी सती हे सर्व खूनच आहेत, असें मत दिलें होतें. भटाभिक्षुकांच्या सक्तीमुळें चितेवर दीनपणें बळी जाणाऱ्या अबलांकडे पाहून त्यांच्या जिवाचा केवढा तळतळाट झाला असेल त्याची यावरून कल्पना येईल. राममोहन यांनीं स्त्रीला दास्यांत ठेवणाऱ्या सर्व रूढींच्या विरुद्ध चळवळ सुरू केली होती पण त्यांत त्यांना फारसें यश आलें नाहीं. सतीची चाल कायद्यानें बंद झाल्याचें पाहाण्याचें भाग्य मात्र त्यांना लाभलें होतें.

स्त्रीदास्यविमोचनाच्या क्षेत्रांत पंडित ईश्वरचंद्र विद्यासागर यांनीं जे प्रयत्न केले, त्यांना फार महत्त्व आहे. आपल्या हयातींत त्यांनीं मुलींच्या शिक्षणासाठीं एकंदर चाळीस शाळा काढल्या आणि सर्व बंगालभर स्त्रीशिक्षणाच्या चळवळीचा पुरस्कार केला; त्याचप्रमाणें विधवाविवाहाची चळवळ करून सन १८५६ सालीं विधवाविवाहाचा कायदा सरकारकडून करून घेतला. बहुपत्नीकत्वाच्या दुष्ट चालीविरुद्धहि त्यांनीं फार परिश्रम केले, पण त्यांत त्यांना फारसें यश आलें नाहीं. त्यांच्या मागून ब्राह्मसमाजाचे पुढारी केशव चन्द्रसेन यांनींहि समाजांत स्त्रीस्वातंत्र्याचें सर्वांगीण प्रयत्न करून बराच पल्ला गांठला.

बंगाल मागोमाग महाराष्ट्रांत आणि त्यानंतर पंजाब व मद्रास प्रांतांत स्त्रीस्वातंत्र्याच्या सर्व प्रकारच्या चळवळी सुरू झाल्या. महाराष्ट्रांत पुण्याला महात्मा फुले यांनीं १८५१ सालीं मुलींची शाळा घातली व आपल्या पत्नीला शिक्षण देऊन तिला तेथें शिक्षिकेचें काम सांगितलें. विष्णुशास्त्री पंडित यांनीं जुन्या शास्त्रांचें मंथन करून त्यांतून विधवाविवाहास शास्त्राधार काढून त्यासाठीं महाराष्ट्रांत मोठी चळवळ केली; अनेक वाद केले, लेख लिहिले, व्याख्यानें दिलीं व स्वतः पुनर्विवाहहि केला. लोकहितवादी, भांडारकर, रानडे, आगरकर यांनीं आणि वाच्छा, मलबारी या पारशी गृहस्थांनीं स्त्रियांचें शिक्षण, प्रौढविवाह आणि त्यांचें आर्थिकस्वातंत्र्य यांसाठीं अखंड परिश्रम करून लोकमताला नवीन वळण लावलें. पंजाबांत दिल्ली येथें सर सय्यद अहंमद आणि त्यांचेच अनुयायी चिराग अल्ली, मुस्ताफा खान व खुदाबक्ष यांनीं इस्लाम धर्मात परिवर्तन घडवून आणण्याचें कार्य अशाच जोमानें सुरूं केलें होतें. स्त्रियांचा पडदा, बहुपत्नीकत्व, त्यांचें दास्य, अज्ञान यावर त्यांनीं जोरानें टीकास्त्र चालवून इतके क्रांतिकारक विचार सांगण्यास प्रारंभ केला कीं, मुसलमान–समाज खवळून जाऊन त्यानें सर सय्यद यांना खुनाच्या धमक्या देण्यापर्यंत मजल आणली. पण ते किंवा त्यांचे अनुयायी स्वीकृत कार्यापासून ढळले नाहींत. पंजाबांतील हिंदु समाजांत स्वामी दयानंद व त्यांचे शिष्य लाला हंसराज, गुरुदत्त विद्यार्थी व लाला लजपतराय यांनीं स्त्रीजीवनांत अशीच क्रान्ति घडवून आणण्यासाठीं अनेक उद्योग आरंभिले. सत्यार्थप्रकाश या दयानंदाच्या ग्रंथांत बाल-

विवाहाचा निषेध केला असून विधवाविवाहांस अनुमति दिली आहे. स्त्रीशिक्षणाचा तर त्यांत फारच जोरानें पुरस्कार केला आहे.

स्त्रीस्वातंत्र्याच्या ज्या चळवळी गेल्या शतकांत झाल्या, त्यांचा समग्र इतिहास येथें पहावयाचा नाहीं. साधारण बहुश्रुत वाचकास तो ठोकळ मानानें ज्ञात असतो. लोकशाहीच्या दृष्टीनें या चळवळींमुळें येथल्या समाजाची मनोवृत्ति कशी बदलत गेली, स्त्रीकडे पहाण्याची दृष्टीच कशी आमूलाग्र फिरून गेली तें आपणांस पहावयाचें आहे. सतीचा विचार करतांना याचें थोडेसें दिग्दर्शन वर केलेंच आहे. इतर पंडितांच्या उद्गारांवरून त्याचाच पाठपुरावा कसा होतो तें आतां पाहूं.

## स्त्रीदास्यविमोचन

स्त्रीजीवनाविषयीं जेवढे म्हणून नवीन आणि क्रान्तिकारक विचार आहेत तेवढे बहुतेक लोकहितवादी यांनीं सांगून टाकले आहेत. संसारांत व समाजांत स्त्रियांचे अधिकार पुरुषांच्या पूर्ण बरोबरीचे आहेत हा विचार त्यांनीं अनेक वेळां सांगितला आहे. ‘ जसे पुरुष तशा स्त्रिया आहेत हें आंधळया हिंदु लोकांस समजो ’ ( शतपत्रें पृ. १७९ ) ‘ ज्या देशांत स्त्रियांचे अधिकार लोक मानीत नाहींत त्या देशांत लोकांची स्थिति वाईट असते. ’ ( ३७९ ) ‘ याकरितां माझें ऐका आणि स्त्रियांस पुरुषांसारखे अधिकार आहेत असें ठरवा आणि हा धर्म चालूं करा. ’ ( ३८६ ) अशा तऱ्हेचें समान अधिकाराचें प्रतिपादन लोकहितवादींनीं केलें आहे. स्त्रीशिक्षणाचे व विधवापुनर्विवाहाचे अनेक पुरस्कर्ते गेल्या शतकांत झाले. पण त्यांतील अनेकांनीं जुन्या शास्त्रांतील वचनें काढून त्यांच्या आधारें स्त्रियांची स्थिति सुधारण्याचा प्रयत्न केला. स्त्रियांच्या व एकंदर समाजाच्या दृष्टीनें हें कार्य मोठें आहे यांत शंका नाहीं. पण त्यांत लोकशाहीचीं व व्यक्तित्वाचीं बीजें नाहींत. तीं वरच्यासारख्या प्रतिपादनांत आहेत. म्हणूनच आपल्या अभ्यासाच्या दृष्टीनें त्यांना महत्त्व आहे. लोकहितवादींनीं तर अनेक ठिकाणीं असा स्पष्ट उपदेश केला आहे कीं सुधारणेच्या आड धर्मशास्त्र येत असेल तर त्यास बाजूस सारून आपण सुधारणा केली पाहिजे. ‘ शास्त्र म्हणजे लोकांस सुख होण्याकरितां रीति घातली आहे त्यांहून जर कांहीं

विपरीत असेल तर एकीकडे ठेवल्यास चिंता काय?' असा त्यांनी निर्भयपणें प्रश्न केला आहे (३९८). स्त्रीचा विवाह प्रौढपणीं व्हावा एवढेंच ते सांगत नाहींत, तर तिचें 'स्वयंवर व्हावें हेंच प्रशस्त. लग्न हें ज्याचें त्याचें काम आहे. त्यांत इतरांनीं पडणें योग्य नव्हे' असा विचार सांगतात. (१८८) यांत स्त्रीच्या व्यक्तित्वास त्यांनीं मान्यता दिल्याचें स्पष्ट दिसून येतें. त्यांच्या मतें, सुखाविषयींचाहि अधिकार पुरुषाप्रमाणेंच स्त्रियांना आहे. अमेरिकन व ब्रिटिश लोकशाहीचें विवेचन करतांना 'प्रत्येक व्यक्तीस सुखाचा समान अधिकार आहे' हेंच तत्त्व लोकसत्तेच्या बुडाशीं कसें आहे आणि एकोणीसाव्या शतकांत जुन्या मतांत क्रांति होऊन हें नवें मत मान्य होतांच लोकशाहीची वाढ कशी झपाट्यानें झाली तें अनेक पंडितांनीं सांगितलें आहे. त्यावरून लोकहितवादींच्या या विचाराचें महत्त्व ध्यानांत येईल. स्त्रिया, हीनजाती, अस्पृष्ट यांचा समाजांत निर्माण होणाऱ्या सुखावर अधिकारच नाहीं अशी विचारसरणी लोकसत्तापूर्व युगांत सर्वत्र रूढ होती. तिला या लेखकानें धक्का दिला आहे. जो अधिकार संसारासंबंधीं व सुखाविषयीं पुरुषांस आहे तोच स्त्रियांस असावा असें त्यांचें पूर्ण पुरोगामी मत होतें (३९८). एके ठिकाणीं ते म्हणतात कीं, 'स्त्रिया सुशिक्षित होतील तेव्हां आपला अधिकार स्थापतील आणि संसारसुखास हानि करणाऱ्या पंडितांपासून तहनामाच करून घेतील. जेव्हां स्त्रिया विदुषी होतील तेव्हां या पंडितांस चरण-संपुष्टांनीं पूजा अर्पण करतील यांत संशय नाहीं; परंतु याच कारणास्तव ब्राह्मण लोक स्त्रियांस शहाण्या करण्यास प्रतिकूल आहेत' (४०१).

विष्णुबुवा ब्रह्मचारी यांनीं स्त्रियांनीं विवाह केलाच पाहिजे असें नाहीं, असा विचार आपल्या वेदोक्तधर्मांत सांगितला आहे. विष्णुबुवांनीं विवाहविच्छेदालाहि मान्यता दिली होती; पण याहिपेक्षां विष्णुशास्त्री चिपळूणकर यांनीं मांडलेलें मत कालौघ फिरल्याचें खरें द्योतक म्हणतां येईल. विधवा स्त्रियांना आपल्या समाजांत अगदीं अमंगळ व हीन लेखतात. शुभप्रसंगीं त्यांचें दर्शन अगदीं त्याज्य असें अजूनहि मानलें जातें. याचा शास्त्रीबुवांना

फार संताप येत असे. लोकभ्रम या निबंधांत त्यांनीं स्पष्टपणें असें सांगितलें आहे कीं, आपल्या पतीच्या मागें वर्षानुवर्ष एखाद्या तपस्व्याप्रमाणें राहणाऱ्या या योगिनीचें दर्शन अपवित्र तर नाहींच, पण तें अत्यंत शुभ मानलें पाहिजे. अशी खडतर तपश्चर्या करून कालक्रमणा करणारी ही स्त्री खरोखर आपल्या कुलास व मानवजातीस भूषणच आहे. ( निबंधमाला पृ. २०४ ). आगरकरांचे विचार या बाबतींत किती क्रांतिकारक होते हें सर्वांस विदितच आहे. स्त्री ही पुरुषास मोह घालणारी, त्याला मोक्षमार्गापासून च्युत करणारी, त्याच्या उत्कर्षाच्या आड येणारी अशी कोणी दुष्ट शक्ति आहे म्हणून तिचा सहवासच नव्हे दर्शनहि शक्य तों टाळावें अशी त्याकाळीं सनातनी रूढी असतांना, स्त्रीपुरुषांचा सहवास हरएक प्रसंगीं घडून यावा, पाश्चात्य समाजास जी एक उल्हासवृत्ति प्राप्त झाली आहे ती स्त्रीपुरुषांच्या मिश्रणामुळेंच होय, असा उपदेश त्यांनीं केला आहे आणि जुनी कुटुंबव्यवस्था स्त्रीच्या व्यक्तित्वाच्या आड येते हें जाणून ' सासुरवासाचें घोडें मुळींच नाहींसें झालें पाहिजे. लग्न झाल्यावर मुलीनें आईबापांचें घर सोडावें तें एकदम नवऱ्याच्या स्वतंत्र संसाराचें आधिपत्य पत्करावें ' असें आजहि फारसें अमलांत न येणारें मत त्यांनीं मांडलें आहे. ( निबंधसंग्रह पृ. २२९ )

याच सुमारास स्त्रीच्या व्यक्तित्वविकासास पोषक अशी एक निराळीच विचारप्रणाली आपल्याकडे सुरू झाली. आतांपर्यंतचे सुधारक बहुधा, पाश्चात्य समाजांत स्त्रियांचा दर्जा श्रेष्ठ आहे, असें सांगून त्या रीतीचें आपण अनुकरण केलें पाहिजे असें प्रतिपादन करीत. पण १८९० च्या सुमारास ही लाट फिरली. या वेळीं अनेक पंडितांनीं असें प्रतिपादन सुरु केलें कीं आमच्या पूर्वींच्या धर्मशास्त्रांत स्त्रियांचा जो दर्जा सांगितला आहे, त्यांना जी प्रतिष्ठा आहे तशी जगांत कोठेंच नाहीं. त्यामानानें पाश्चात्य स्त्रियांची स्थिति फारच अनुकंपनीय आहे. तेव्हां आम्हांला पाश्चात्यांपासून कांहींच शिकावयाचें नाहीं. डॉ. ए. के. कुमारस्वामी यांनीं हा विचार मोठ्या अट्टाहासानें मांडला आहे ( इंडियन नेशन बिल्डरस, भाग १ रा. पृ. ३२०—३२३ ). यावेळीं हिंदुस्थानांतल्या सर्वच जमातींत ही विचारप्रणाली प्रादुर्भूत झाली होती. मुसलमान समाजांतील नेतेहि याच तऱ्हेचें प्रतिपादन करूं लागले. ' इस्लाम धर्मानें स्त्रियांना जो मान दिला आहे, तो इतर कोणत्याहि धर्मानें दिला

नाहीं ' ' इतर कोणत्याहि समाजांत मुसलमान समाजाइतके स्त्रियांना व्यक्ति-स्वातंत्र्य मिळत नाहीं. ' अशीं विधानें मुस्लीम समाजधुरीणांनीं याच काळांत केली. ( मॉडर्न इस्लाम इन् इंडिया-स्मिथ पृ. ७८ )

या सगळ्याचा तात्पर्यार्थ असा कीं स्त्रीचें व्यक्तित्व व तिचें स्वतंत्र अस्तित्व या काळांत सर्वांना मान्य होऊं लागलें होतें. डॉ. कुमारस्वामींनीं जुन्या धर्मग्रंथांचा अभिमान धरला तरी तो नवे विचार सांगण्यासाठींच धरला. ' प्रत्येक क्षेत्रांत स्त्रियांना पुरुषांच्या बरोबरीनें संधि मिळाली पाहिजे. स्त्रियांना समाजानें आर्थिक स्वास्थ्य प्राप्त करून दिलें पाहिजे. स्त्रियांनीं पुरुषांचें अनुकरण करण्याच्या भरीस न पडतां स्त्रीत्वाची प्रतिष्ठा वाढविण्या-साठीं-खऱ्याखुऱ्या स्त्रिया होण्यासाठीं-लढा केला पाहिजे ' अशाच विचारांचा त्यांनीं पुरस्कार केला आहे. तेव्हां स्त्रियांचें स्वतंत्र स्थान, त्यांचें व्यक्तित्व, त्यांच्या जीविताची प्रतिष्ठा राम मोहनरॉयापासून डॉ. कुमार-स्वामीपर्यंत सर्वांनाच या काळांत मान्य झाली होती असें दिसतें. कोणीं तीं पाश्चात्यांच्या आधारें सांगितली, कोणी पौर्वात्यांच्या. ती मान्य झाली हाच भाग महत्त्वाचा आहे. लोकसत्ताक शासनाच्या प्रगतीस महत्त्व त्याचें आहे.

गेल्या शतकांत लोकशाहीची सिद्धता कशी होत होती, तें आपण पहात आहों. मानवत्वाच्या प्रतिष्ठेची प्रतीति हा लोकसत्तेच्या तत्त्वांचा मूलाधार आहे, हें आरंभींच सांगितलें आहे. त्या प्रतिष्ठेच्या विवेचनांतूनच आपण समतेच्या विचाराकडे आलों. कारण अंध कर्मकांडाप्रमाणेंच जन्मनिष्ठ विषमता ही मानवाच्या प्रतिष्ठेला घातक आहे.

## विषमतेला सुरुंग-भौतिकज्ञान

ही विषमता नष्ट करावी म्हणून कोणी कसे प्रयत्न केले तें येथवर आपण पाहिलें. आतां विषमता नष्ट करणाऱ्या आणखी एका शक्तीचा विचार करावयाचा आहे. भौतिक ज्ञान ही ती शक्ति होय. मानवामानवांत उच्चनीचता निर्माण होते ती त्यांच्या जवळच्या विषम धनामुळें होते. विषमतेला कारण होणारीं हीं धनें अनेक प्रकारचीं आहेत. उच्च कुलांत जन्म, पारमार्थिक अधिकार व भौतिक संपत्ति, या धनांची महती लोकशाही पूर्वयुगांत फार होती आणि अजूनहि ती समूळ नष्ट झालेली नाहीं. या

धनांची प्राप्ति होणें हें पुष्कळसें नशिबावर अवलंबून असल्यामुळें तीं विषमतेला कारणीभूत होतात. पण ज्ञानधनाचें तसें नाहीं. तें मानवाच्या स्वाधीन आहे आणि त्यामुळेंच सर्व प्रकारच्या विषमतेवर ज्ञानधन हा मोठा प्रभावी उतारा आहे. सामाजिक, राजकीय व आर्थिक क्षेत्रांत समता निर्माण झाल्यावांचून लोकसत्तेला अर्थ नाहीं हें मागें अनेक वेळां सांगितलें आहे. ही सर्व प्रकारची समता प्रस्थापित करण्याचें एक प्रभावी साधन म्हणजे भौतिक ज्ञान हें होय. स्वतःला शूद्र गणणारे ज्योतिबा फुले उंच स्थानीं जाऊन बसले ते यामुळेंच. याच्याच जोरावर दादोबा पांडुरंग हे वैश्य असून पाणिनीच्या पदवीला गेले आणि याच्याच साह्यानें डॉ. आंबेडकर हे भरतभूमीचे मनु झाले आहेत. या ज्ञानामुळेंच पुढेंमागें सांस्कृतिक समता निर्माण होऊन जातिभेद नष्ट होण्याचा संभव आहे.

शास्त्रीय ज्ञानाचा लोकसत्तेशीं किती निकटचा संबंध आहे, तें ब्रिटिश लोकसत्तेचा इतिहास वाचणाऱ्यांना सांगावयास नको. सर्व प्रकारच्या दास्यांत अज्ञानजन्य दास्य हे मानवी प्रतिष्ठेला अत्यंत घातक आहे. कारण त्यामुळें मानवाचें मनच प्रज्ञाहत होतें. आणि मग प्रज्ञासंपन्न व प्रज्ञाहत असे समाजाचे दोन गट होऊन तेथें विषमता निर्माण होते. लोकशाहींत प्रत्येक मनुष्य समभूमीवर असून तत्त्वतः तरी तो भावी राज्यकर्ता आहे असें गृहीत धरलेलें असतें. आणि राज्यकर्त्या पुरुषाच्या मनाला जी रग असणें अवश्य आहे ती ज्ञानावांचून दुसऱ्या कशानेंहि उत्पन्न होणें शक्य नाहीं. भोळे-भाबडे, वेडेवांकुडे, अज्ञ, साधे, बालमनाचे, निष्पाप, निष्कपटवृत्तीचे लोक अध्यात्मक्षेत्रांत कितीहि उंच पातळीवर असले तरी राष्ट्रीय व्यवहारांत आणि विशेषतः लोकायत्त शासनांत अशा लोकांना कसलेंहि स्थान प्राप्त होणें शक्य नाहीं.

ज्ञानाविषयींचा हा महासिद्धांत गेल्या शतकांतील धुरंधरांनीं पूर्णपणें जाणला होता. आणि म्हणूनच त्यांनीं या भौतिक ज्ञानाचा जणूं ध्यास घेतला होता. गेल्या शतकांतील कोणच्याहि क्षेत्रांतील कोणचाहि कार्यकर्ता घेतला तरी त्याचा ज्ञानप्रसाराशीं कोठें ना कोठें संबंध आलेलाच आहे असें दिसतें. या ज्ञानावांचून आपल्या समाजाची उन्नति होणें अशक्य आहे, याविषयीं त्या विचारवेत्त्यांना तिळप्राय संदेह नव्हता. ज्ञान हीच संजीवनी

होय, ज्ञान हेंच सामर्थ्य होय, ज्ञान हाच राष्ट्रीय मोक्ष होय, हा सिद्धांत त्यांच्या मनःपटलावर अगदीं कोरून गेला होता आणि म्हणूनच त्यांनीं अशा या चिंतामणीच्या अधिगमासाठीं विश्वप्रयत्न केलेले दिसतात.

१८२३ सालीं विलायत सरकारनें हिंदी लोकांमध्यें विद्याप्रसार व्हावा यासाठीं मंजूर केलेल्या रकमेचा विनियोग कसा करावा, ती रक्कम कोणत्या विद्येच्या प्रसारासाठीं खर्च करावी याविषयीं हिंदुस्थान सरकार विचार करीत होतें. त्यावेळीं ही सर्व रक्कम पाश्चात्य विद्येच्या प्रसारासाठींच खर्च केली जावी असा राममोहन यांनीं सरकारकडे अर्ज केला. त्या अर्जांत, " गणित, रसायन, शरीरशास्त्र, भौतिकविद्या इ० ज्या शास्त्रांना पूर्णत्वास नेल्यामुळें युरोपीयन राष्ट्रें जगाच्या पुढें गेलीं, तीं शास्त्रें आम्हांस शिकवावीं. जुनें व्याकरण, किंवा तत्त्वज्ञान यांचा आज तें शिकणाराला किंवा समाजाला कांहीं उपयोग नाहीं. वेदांताच्या सिद्धांतापासून तरुणांना समाजाचे उत्कृष्ट घटक कसे बनवावे याचें शिक्षण मिळणार नाहीं. लॉर्ड बेकनच्या पूर्वींच्या काळीं जें ज्ञान युरोपांत होतें तें इकडे विपुल प्रमाणांत आहे. येथें उणीव आहे ती भौतिक विद्येची आहे. " अशा तऱ्हेचे विचार त्यांनीं सांगितले आहेत. यावरून अनुभवशून्य ग्रंथप्रामाण्याचें युग संपून येथें अनुभवगम्य व बुद्धिगम्य ज्ञानाचें युग सुरू व्हावें याविषयीं राममोहन यांना कशी तळमळ लागून राहिली होती तें दिसून येतें.

## विद्येची महती

दादोबा पांडुरंग यांनीं महाराष्ट्रांत याच तऱ्हेचे विचार प्रसृत करून भौतिकज्ञानाच्या प्रसारासाठीं त्यांनीं ' स्टूडंट्स लिटररी अँड सायंटिफिक् सोसायटी ' ही संस्थाहि १८४८ सालीं काढली होती. हिच्या मराठी शाखेचे अध्यक्ष दादोबा असून गुजराथी शाखेचे अध्यक्ष दादाभाई नौरोजी हे होते. दादोबांचे मित्र गोवर्धनदास हे एका प्रसंगीं म्हणाले, ' इंग्रजांच्या राज्यापासून प्रजा निर्धन होऊन गेली आहे. व्यापार सर्व बुडाला. इंग्रजी राज्य आणखी पांचपन्नास वर्षें राहील तर प्रजा दरिद्री होऊन जाईल. ' यावर दादोबांनीं उत्तर दिलें, ' तुम्ही म्हणतां ही गोष्ट खरी आहे; पण यांत सारा दोष आपल्याच लोकांचा आहे, हें लक्षांत ठेवलें पाहिजे. हें सर्व लोकांच्या

दुर्बलपणामुळें व विद्याराहितपणामुळें झालें आहे. आपल्या देशांतील लोक विद्यांचा अभ्यास करीत नाहींत. निरनिराळ्या देशांचे वृत्तांत वाचीत नाहींत. जुन्या शास्त्रांवर फाजील विश्वास ठेवतात. त्यामुळें अज्ञान वाढलें आहे. आतां हाच उपाय राहिला आहे कीं, आम्हीं विद्या व कला यांचें ज्ञान संपादन करावें, नीतिमान् व्हावें आणि सरकारजवळ स्वतःचे खरे हक्क मागावे.' वरील संस्थेच्या सभेंत पहिल्या वर्षी रसायनशास्त्र, मराठ्यांचा उत्कर्षापकर्ष, हिंदुस्थानांतील विद्या व कला अशा तऱ्हेच्या विषयांवर निबंध वाचले गेले. त्यावरून तिच्या कार्याचें स्वरूप समजून येईल. (दादोबा पांडुरंग–प्रियोळकर पृ. १८०, ४०४)

सर सय्यद अहंमद यांनीं १८६२ सालीं गाझीपूर येथें 'सायंटिफिक सोसायटी' नांवाची संस्था स्थापन केली. ती आपल्या लोकांत पाश्चात्य विद्येचा प्रसार करावा या हेतूनेंच केली. या संस्थेच्या द्वारां इंग्रजींतील अनेक उत्तम ग्रंथांचें उर्दूंत भाषांतर झालें. पुढें अलीगड विद्यापीठ स्थापन झालें. त्यांतहि भौतिक विद्येच्या प्रसारास फारच महत्त्व होतें आणि वरील संस्थेची प्रगतीहि त्या विद्यापीठाच्या अनुषंगानें होत होती. गेल्या शतकाच्या शेवटच्या चरणांत मुसलमान समाजांत पाश्चात्य विद्येचा जो कांहीं प्रसार झाला त्याचें पुष्कळसें श्रेय वरील संस्थांनाच आहे.

विष्णुशास्त्री चिपळूणकर यांचें, आतांपर्यंत वर ज्या सामाजिक सुधारणा सांगितल्या त्यांना त्या अकालीं घडत आहेत म्हणून फारसें अनुकूल मत नव्हतें; पण भौतिक ज्ञानाच्या बाबतींत मात्र त्यांची दृष्टि सर्वथैव पुरोगामी होती. 'इंग्लिश लोकांच्या उत्कर्षाचा हेवा करण्यापेक्षां त्यास कारणीभूत जे त्यांचे गुण त्यांचा हेवा करणें हितावह होईल. तेव्हां आपल्या सुदैवानें ज्ञानप्रसाराचीं जीं अमोलिक साधनें आपल्या हातीं आहेत, त्यांचा उपयोग करून घेण्यास आमच्या देशबंधूंनीं कसूर करूं नये. असें केलें असतां त्यांनीं आपला धर्म जगविला व आपल्या देशास मोठें भूषण आणलें असें होईल.' अशा तऱ्हेचीं मतें सांगून शास्त्रीबुवांनीं ज्ञानाची महती गायिली आहे. 'आमच्या देशाची स्थिति' या निबंधांत विष्णुशास्त्री म्हणतात, 'अमेरिकेंतल्या लोकांनीं गेल्या शतकांत काय प्रकार केला तो तर जगजाहीरच आहे. असो. तर एकंदरींत सांगावयाचें काय कीं सज्ञान दशेचें फळ देशोन्नति

हें होय. यास्तव आपल्या देशांत जों जों इंग्रजी विद्येचा प्रसार होत जाईल तों तों सुधारणा, स्वातंत्र्य, सुख, यांचा अवश्य प्रसार होत जाणार ! एक इंग्रजी विद्येचें वज्र आमच्या हातीं असलें, म्हणजे मग लिटनशाही, टेंपलशाही, चाटफिल्डशाही, मूरशाही वगैरे शंभर शाह्यांनासुद्धां आम्ही दाद देणार नाहीं !'

वर तीनचार कार्यकर्त्यांचाच उल्लेख केला आहे. पण तेवढ्यांनाच भौतिक ज्ञानाची महती समजली व पटली होती असें नाहीं. ब्रिटिश अंमल येथें सुरू होऊन जो जो कोणी इंग्रजी विद्या पढूं लागला त्याला त्याला त्या विद्येचें अतुळ सामर्थ्य प्रतीत झालें होतें. आणि पाश्चात्यांचें सर्व बळ या विद्येंत असून आपल्या अधःपाताचें कारण म्हणजे तिचा अभाव हेंच होय असा त्याच्या बुद्धीचा ठाम निश्चय झाला होता. गेल्या शतकांत धार्मिक, सामाजिक व राजकीय अशा सर्व प्रकारच्या सुधारणा चालू झाल्या होत्या व प्रत्येक क्षेत्रांत भिन्न भिन्न मतांचे लोक आपल्या दृष्टीनें कार्य करीत होते. पण त्यांतील प्रत्येकानें शाळा, कॉलेज आणि वर्तमानपत्र या त्रयीचाच आश्रय केला होता. सुरेन्द्रनाथ बॅनर्जी यांनीं 'बंगाली' हें पत्र व 'रिपन' हें कॉलेज यांच्या साह्यानें राजकीय चळवळ केली. टिळक–आगरकर यांनीं 'केसरी, व मराठा' हीं पत्रें व 'फर्ग्युसन' हें कॉलेज याच साधनांचा आश्रय केला. स्वामी दयानंदांचे अनुयायी लाला हंसराज, लाला लजपतराय व गुरुदत्त विद्यार्थी यांना प्राधान्यानें धार्मिक चळवळ करायची होती. पण त्यांचीं साधनें 'रीजनरेटर ऑफ आर्यावर्त' हें पत्र व 'दयानंद अँग्लो वैदिक कॉलेज' हें विद्यालय हींच होतीं. सर सय्यद अहमद यांचें पत्र 'सोशल रिफार्मर' व 'अलीगड कॉलेज' यांचा उल्लेख वर आलाच आहे. या सर्वांवरून हें स्पष्ट दिसतें कीं चळवळ कोणच्याहि प्रांतांतली असो, कोणच्याहि धर्मपंथाची असो, कोणच्याहि क्षेत्रांतली असो, तिची प्रगति पाश्चात्य विद्येवरच अवलंबून होती; आणि हें जाणूनच येथल्या नेत्यांनीं त्या भौतिक विद्येचा आश्रय केला होता.

भौतिक विद्या नसली कीं मनुष्य निसर्गाचा व त्यामुळेच अनेक शक्तींचा गुलाम होतो. आणि मग लोकसत्तेस अवश्य ती मनोवृत्ति निर्माण होणें अशक्य होतें. इंग्लंडमध्यें शास्त्रज्ञांची अखंड परंपरा निर्माण झाली; भौतिक

विद्येच्या प्रगतीला कधीं खंड पडला नाहीं, म्हणूनच तेथली लोकसत्ता यशस्वी होऊं शकली. भारतांत याच कार्यकारणसंबंधाची पुनरावृत्ति होत आहे. अजून ही विद्या अल्पशा सुशिक्षितांच्याच कक्षेत आहे. तिचा प्रसार बहुजनांत जसजसा होत जाईल त्या त्या प्रमाणांत त्यांचें कर्तृत्व वाढून समाजांतील विषमता नष्ट होईल आणि त्यामुळें लोकसत्तेची बैठक जास्त विस्तृत आणि म्हणूनच जास्त दृढ व दुर्भेद्य अशी होत जाईल.

जगांतल्या कोणच्याहि प्रांताचा, कोणत्याहि कालखंडाचा इतिहास पाहिला तरी, समता तेथें उन्नति व विषमता तेथें अधोगति हा महासिद्धान्त आपल्याला दिसून येतो. राजशासन कोणच्याहि प्रकारचें असलें तरी हा सिद्धान्त ढळलेला दिसत नाहीं. मग लोकायत्त शासनाला समतेची किती आवश्यकता असेल, याची सहज कल्पना येईल. येथल्या पूर्वसूरींना ही कल्पना आली होती, आणि म्हणूनच आपल्या समाजांतील जन्मनिष्ठ विषमता नष्ट करण्याचे त्यांनीं यावत्शक्य प्रयत्न केले. त्या प्रयत्नांचा इतिहास आपण येथवर पाहिला. पुढील प्रकरणांत वरील प्रकारच्या विशेष अंगांच्या सुधारणेच्या नादीं न लागतां समाजाचें मूळ अधिष्ठानच बदलून टाकण्याचे आगरकरांनीं जे महनीय प्रयत्न केले, त्यांचें स्वरूप विशद करून त्यानंतर लोकशाहीच्या राजकीय अंगाच्या अभ्यासाकडे आपण वळूं.

---

## प्रकरण चौथें

# भौतिक अधिष्ठान

## आगरकर व विवेकानंद यांचें कार्य

### धर्मनिरपेक्ष शासन

आज भरतभूमीच्या राजशासनाचीं सूत्रें ज्यांच्या हातीं आहेत, त्या पुरुषांनीं एकमुखानें असें जाहीर केलें आहे कीं, या भूमीचें शासन हें धर्मनिरपेक्ष असच राहील. शासनसंस्था धर्माधिष्ठित असेल तर लोकसत्ता

कधींच यशस्वी व्हावयाची नाहीं, असें त्यांचें निश्चित मत आहे आणि त्यामुळेंच आपलें शासन धर्मनिरपेक्ष ठेवावयाचें अशी त्यांची प्रतिज्ञा आहे. आणि ती सर्वथैव योग्यच आहे याविषयीं लोकसत्तेच्या अभ्यासकांत मतभेद होणार नाहीं.

पण देशाचें शासन धर्मनिरपेक्ष करावयाचें तर त्याला केवढी पूर्व तयारी करणें अवश्य असते, याची फारच थोड्यांना कल्पना असेल. आज या भूमींत हिंदू, मुसलमान, ख्रिस्ती इ० जे समाज आहेत, त्यांच्या मनावर हजारों वर्षें धर्माची सत्ता अप्रतिहतपणें चाललेली आहे. या समाजांची सर्व बैठकच धर्माच्या पायावर स्थिरावलेली आहे. त्यांच्या जीवनाच्या आर्थिक, राजकीय, सामाजिक सर्व अंगोपांगांवर धर्माची सर्वव्यापी सत्ताच निरंकुशपणें अधिराज्य गाजवीत आहे. त्यांचा व्यवहार पारलौकिक असो, ऐहिक असो, त्यांतील धोरण धर्माचा कौल घेऊनच निश्चित केलें जातें. त्यांच्या जीवनांत असा एकहि आचार नाहीं, विचार नाहीं, तत्त्व नाहीं, रूढी नाहीं कीं, जिचा प्रत्यक्ष वा अप्रत्यक्षपणें पारलौकिक धर्माशीं संबंध जोडलेला नाहीं. अशा या भिन्न समाजांनीं एकत्र येऊन घडविलेला जो भारतीय समाज त्याचें राजशासन—म्हणजे त्याच्या राष्ट्रीय प्रपंचाचें प्रधान अंग हें धर्मनिरपेक्ष करावयाचें म्हणजे या भारतीयांच्या जीवनावर धर्माची जी सर्वव्यापी सत्ता चालते ती नष्ट करून टाकणें किंवा बव्हंशीं शिथिल करून टाकणें ही पहिली आवश्यक गोष्ट होय. समाजाच्या जीवनापासून केवळ शासनसंस्था कधींच विलग करतां येत नाहीं. निदान अर्वाचीन काळांत तर तें अशक्यच आहे. शासनसंस्था हें समाजवृक्षाचें अंतिम फळ आहे. तेव्हां एखाद्या झाडाच्या फळांत सुधारणा करावयाची असेल, त्याची गोडी, त्याचा रस, त्याचा आकार व तेज वाढवावयाचें असेल तर ज्याप्रमाणें नुसती शेंड्याच्या आसपास छाटाछाट करून तेथें निराळी पुष्टि देण्याचा कांहीं उपयोग नसतो, तर त्या वृक्षाच्या मुळापासून नवीन जीवनरसांचें पोषण देणें अवश्य असतें, त्याचप्रमाणें समाजवृक्षाचें अंतिम फळ म्हणजे जी शासनसंस्था तिच्यांत आमूलाग्र परिवर्तन करावयाचें असेल, तिचें स्वरूप समूळ बदलून टाकावयाचें असेल तर त्या वृक्षाचें मुळापासूनचें पोषणच बदललें पाहिजे, त्या समाजाचें अधिष्ठानच बदलून टाकिलें पाहिजे. पूर्वीचे

हे धर्माधिष्ठित समाज धर्मनिरपेक्ष लोकायत्त शासनाच्या अंकित रहावे अशी इच्छा असेल तर त्यांचें धर्म हें अधिष्ठान बदलून त्यांच्यावरची धर्माची सत्ता नष्ट करून त्यांना भौतिक शास्त्राधिष्ठित केलें पाहिजे. आणि हें धोरण त्यांच्या एकाददुसऱ्या अंगाविषयीं न अवलंबिता त्यांच्या सर्व अंगोपांगांच्या बाबतींत त्याचा पुरस्कार केला पाहिजे. येथले राजकारण, समाजकारण, येथली नीतिव्यवस्था येथले वैयक्तिक संबंध, कौटुंबिक संबंध, स्त्रीपुरुषांचें वैवाहिक संबंध, येथले शैक्षणिक धोरण, त्यांतील गुरुशिष्य संबंध—सर्व सर्व भौतिकशास्त्राधिष्ठितच असले पाहिजे. असें केलें तरच शासन धर्मनिरपेक्ष करण्यांत यश येऊन अंतीं लोकसत्ता दृढ व अभंग होते. आपल्या शास्त्यांनीं धर्मनिरपेक्ष शासनाची घोषणा केली तेव्हां तिला या भूमींत जवळजवळ मुळींच विरोध झाला नाहीं आणि त्या तत्त्वान्वयें शासन चालविण्यांत त्यांना कांहींसें यशहि प्राप्त झालें आहे. या यशाचें पुष्कळसें श्रेय प्रथम केसरीचे व नंतर सुधारक पत्राचे संपादक असलेले भरतभूमीचे थोर सुपुत्र गोपाळ गणेश आगरकर यांना व त्यांनीं प्रसृत केलेल्या विवेकनिष्ठ विचारप्रणालीला आहे. भौतिकाधिष्ठित समाजरचनेचे बहुतेक सर्व सिद्धान्त आगरकरांच्या या विचारप्रणालींत समाविष्ट झालेले आहेत.

## विज्ञानप्रणीत समाजरचना

आगरकर हे स्वतः अज्ञेयवादी होते. 'ईशस्वरूप आमच्या सांप्रतच्या ज्ञानेंद्रियास अगम्य आहे, हा धर्मसंबंधींचा शेवटचा सिद्धांत आहे' असें त्यांनीं 'आमचे काय होणार' या निबंधांत सांगून टाकलें आहे. आणि या अनुरोधानेंच ते समाजशास्त्रीय तत्त्वांचें विवेचन करीत. 'आम्हां मनुष्यांना पाहिजे काय व तें मिळेल कशानें?' या आपल्या निबंधांत ऐहिक अभिवृद्धीला, मानवाच्या इहलोकींच्या उन्नतीला (पारलौकिक) धर्माची मुळींच आवश्यकता नाहीं असें त्यांनीं निःसंदिग्धपणें प्रतिपादिलें आहे. ते म्हणतात, 'ग्रीस व इटली देशाचें जुनें वैभव, फ्रान्स देशांतील वडी राज्यक्रांति, जर्मनी आणि रशिया यांचे जय, पेशव्यांचा प्रचंड राज्यविस्तार, अमेरिकन लोकांचें स्वातंत्र्य व ज्यावरून सूर्य कधीं मावळत नाहीं असें इंग्रजांचें अफाट राज्य यांचा धर्माशीं म्हणण्यासारखा कांहींएक संबंध नाहीं. यासाठीं

ऐहिक सुख पाहिजे असेल त्यांनीं राजनीति, पदार्थविज्ञान, नीतिप्रसार, विद्योत्तेजन यंत्रकलाप्रसार व धनसंचय या विषयांकडे आपलें तनमनधन लावावें.' याच निबंधांत अन्यत्र त्यांनीं म्हटलें आहे कीं, 'ऐहिक व पारमार्थिक सुखाचे विषय व ते संपादण्याची साधनें अगदीं भिन्न असल्यामुळें एकमेकांचें एकमेकांशीं बहुधा पटत नाहीं, किंवा तीं परस्पराला उपरोधक असतात असें म्हटलें तरी चालेल.' हा विचार सांगून, ऐहिक उन्नतीसाठींहि धर्माची आवश्यकता आहे, असें आग्रहानें प्रतिपादन करणारे जे न्या. मू. रानडे त्यांच्यावर आगरकरांनीं कडक टीका केली आहे.

या स्पष्ट प्रतिपादनांपेक्षांहि आगरकरांनीं आपल्या धर्मकल्पना, देवदेवता, पुराणें व त्यांतील रूढी यांची ऐतिहासिक पद्धतीनें जी चिकित्सा केली आहे तिच्यामुळें रूढ पारमार्थिक धर्मकल्पनांना मोठा हादरा बसून समाजप्रवृत्ति विवेकप्रधान करून टाकण्याकडे फारच उपयोग झालेला आहे. 'देवतांच्या कल्पना पिशाच्चापासून निर्माण झालेल्या आहेत.' 'अनादि कालापासून मनुष्यास ईशशक्तीचें ज्ञान आहे असें जें अनेक श्रद्धाळूंचें फार जुनें म्हणणें आहे तें साधार नाहीं.' हे व असले त्यांनीं सांगितलेले विचार आज सर्वमान्य झाले आहेत; आणि म्हणूनच आज आपली आहे इतकी तरी प्रगति शक्य झाली. भौतिकशास्त्राधिष्ठित समाजाचें मुख्य लक्षण हें कीं, त्याची सर्व नियमनें, बंधनें,त्यांतील सर्व विधिनिषेध, त्याचे उत्कर्षापकर्षाचे सिद्धांत हे सर्व अनुभव, इतिहास, तर्क, प्रयोग, विवेक यांवर आधारलेले असतात. अतींद्रिय साधनांनीं प्राप्त झालेलें ज्ञान हिशेबांत धरून या समाजाला वळण लावण्याचा प्रयत्न कोणीहि करीत नाहीं. त्याचें राजकारण, समाजकारण, अर्थकारण, युद्धशास्त्र, शिक्षणशास्त्र, सर्व कांहीं अनुभवप्रमाणगम्य असें असतें. अर्थात् समाजाच्या मनावरील अतींद्रियधर्माचें वर्चस्व नष्ट झाल्याखेरीज समाज असलीं अनुभवगम्य बंधनें मानण्यास व त्याचा आदर करण्यास कधींच सिद्ध होणार नाहीं हें सांगण्याची जरूर नाहीं. हें वर्चस्व नष्ट होण्यास जुन्या धार्मिक रूढींची, आचारविचारांची आणि गृहीत सिद्धांतांची ऐतिहासिक पद्धतीनें केलेली चिकित्सा पुष्कळच कारणीभूत होते. आगरकरांनीं अनेक निबंधांत ही चिकित्सा अगदीं कठोर अशा शास्त्रीय दृष्टीनें केली आहे. आपल्या समाजाची आज जी कांहीं शास्त्रप्रवण प्रवृत्ति झाली आहे तिचें श्रेय

आगरकरांना देण्यांत येतें तें याच कारणानें. (निबंधसंग्रह भाग १ ला पृ. २८-२९ भाग २ रा पृ. १०-३०)

## पूर्णावस्था पुढें आहे

भौतिकाधिष्ठित किंवा विज्ञानप्रणीत समाजरचनेचा दुसरा सिद्धांत हा मनुष्यजातीच्या पूर्णावस्थेविषयीं आहे. ब्रिटिश लोकसत्तेचा अभ्यास करणारांना हें माहीतच आहे कीं मानवसमाजाची उत्तरोत्तर प्रगति होत आहे हा विचार इंग्लंडमध्यें अठराव्या शतकाच्या अखेरीस जर्मी बेंथाम यानें रूढ केला आणि त्यामुळेंच समाजांत चैतन्य निर्माण होऊन इंग्लंडचा उत्कर्ष झाला. या विचारानें मिळणाऱ्या प्रबल प्रेरणेवांचून मानवाला पराक्रम करणें शक्यच नाहीं. इंग्लंडमध्यें जॉनसनच्या काळापर्यंत प्रगतीचा सिद्धांत फारसा कोणाला मान्य नव्हता. आणि हजारों वर्षें जगाची तीच स्थिति होती. मनु, कानफ्यूशियस इ. धर्मवेत्त्यांचे समाजाला स्थिरावस्था आणण्याचेच प्रयत्न असत आणि त्यांत ते यशस्वी झालेले होते. त्यांच्या तत्त्वज्ञानाप्रमाणें समाजाला फार प्राचीनकाळीं पूर्णावस्था येऊन गेलेली आहे व तेथून उत्तरोत्तर त्याचा ऱ्हासच होत आहे. सत्य, त्रेता, द्वापर व कली ही आपली युगकल्पना याच तत्त्वज्ञानांतली आहे. तिच्याअन्वयें पुढील काळांत समाजाची प्रगति होणें शक्यच नाहीं. उत्तरोत्तर कालक्रमानें अपरिहार्यपणें त्याचा ऱ्हासच होत जाणार. या कल्पना ज्या समाजांत दृढमूल झालेल्या असतात त्याचा उत्कर्ष होणें किती कठीण आहे हें सहज ध्यानांत येण्यासारखें आहे. कांहीं केलें तरी प्रगति अशक्य आहे अशी मनुष्याची खात्री झाली तर तो उद्योगाला प्रवृत्त होणार नाहीं. त्याच्या मनांत उत्साह व मनगटांत बळ येणार नाहीं. अशीं माणसें दैववादी बनून प्रवाहपतित होऊन बसतात. भारतीय समाजाला ब्रिटिशांच्या पूर्वकाळीं हीच अवस्था प्राप्त झाली होती. अशा समाजाची उन्नति होणें अशक्य आहे. आणि तेथें लोकसत्ता तर क्षणभरही टिकणार नाहीं. लोकसत्ता ही गतिशीलतेवर दृढश्रद्धा असणाऱ्या लोकांनाच यशस्वी करतां येते. स्थिरावस्थेच्या पुरस्कर्त्यांना नाहीं.

ही गतिशीलता आपल्या समाजांत निर्माण करण्यासाठीं आगरकरांनीं फार प्रयत्न केले आहेत. ' आमच्या अल्पसमजुतीप्रमाणें मनुष्याची पूर्णावस्था

अद्याप यावयाची आहे ' हें मत ' आमचें काय होणार ' या निबंधांत त्यांनीं सांगितलें आहे आणि त्याचें विशेष विवेचन ' मनुष्यजातीची पूर्णावस्था ' या निबंधांत केलें आहे. ( केसरींतील निबंध पुस्तक २ रें. पृ. ८१ ). ते म्हणतात, " ज्यांची जातिभेदावर श्रद्धा आहे त्यांच्या मतें मानवाच्या पूर्णावस्थेचा काळ मागेंच होऊन गेला असून आतां समानतेकडे मानवाचा कल होत असल्यामुळें दिवसेंदिवस मनुष्यजाति भ्रंश पावत आहे; पण जेथें मनुष्यास जन्मतः सर्वांमध्यें साम्य आहे असें वाटत असतें तेथें याहून भिन्न स्थिति असते. तेथें कोणासहि आपण आहों तीच पूर्णावस्था आहे असें भासत नाहीं. आपल्या स्थितीमध्यें सुधारणा करण्यास जागा आहे असें प्रत्येकास वाटतें व त्यास ती करण्यास पुष्कळ उमेद असते. युरोपीय समाजांत ही समजूत दृढ होत आहे. या समजुतीनेंच त्यांचे सुधारणेकडे सदोदीत प्रयत्न चालले आहेत. या समजुतीनें युरोपीय लोकांत किती परिश्रम, किती उद्योग, किती धाडस व किती धडामोड सुरू आहे, याची आमच्यानें कल्पनाहि करवत नाहीं. " ( उक्तग्रंथ पृ. ८८ )

आपला प्राचीन व मध्ययुगीन इतिहास पाहिला तर प्रगति तत्त्वावर व मानवाचें पूर्णत्व पुढें आहे या तत्त्वावर समाजाची श्रद्धा असण्याचें महत्त्व किती आहे तें कळून येईल. आपली आजची कलियुगाची घातकी कल्पना महाभारतकाळीं या स्वरूपांत नव्हती. निदान कालगतीविषयीं तिच्या अगदीं उलट अशीहि एक कल्पना त्या काळीं मान्य झाली होती. सत्य, त्रेता, कलि इ० युगें हीं कालक्रमानें येत नसून तीं राजाच्या कर्तृत्वावर अवलंबून असतात असें महाभारतांत पितामहांनीं सांगितलें आहे. राजा जेव्हां आपल्या पराक्रमानें देशांत शांतता प्रस्थापून प्रजेचा उत्कर्ष घडवितो तेव्हां सत्ययुग अवतरतें—दण्डनीत्यां यदा राजा सम्यक् कार्त्स्न्येन वर्तते । तदा कृतयुगं नाम कालसृष्टं प्रवर्तते ॥ ( शांति पर्व ६९।८० )—आणि राजा दुष्ट किंवा दुबळा असला व त्यामुळें सर्वत्र अराजक माजलें कीं कलियुग माजतें, असा अगदीं पुरोगामी विचार त्या वेळीं सांगितला गेला होता. आपला प्राचीन इतिहास अत्यंत वैभवशाली व उज्ज्वल असा होता याचीं जीं अनेक कारणें आहेत त्यांतील मानवाच्या पूर्णत्वासंबंधींचें हें तत्त्वज्ञान हें एक निश्चितच कारण आहे. मागें पूर्णावस्था होऊन गेली व आतां दिवसेंदिवस ऱ्हास होत

जाणार हा विचार जेव्हां रूढ होतो तेव्हां मानवाच्या सर्व कर्तृत्वाचा झराच आटून जातो. ‘ आपण स्ववश नसून कालवश आहों ’ हा विचार मानवी पराक्रमाला अत्यंत बाधक आहे. हाच विचार, हेंच तत्त्वज्ञान ब्रिटिशांपूर्वी शेंकडों वर्षें येथें रूढ होतें. आगकरांनीं तें उलथून टाकण्याचा प्रयत्न केला आहे.

## सुखभोगाचें महत्त्व

युरोपच्या प्रगतीस कारणीभूत झालेलें भौतिकवादांतील तिसरें तत्त्व म्हणजे, माणसानें पराक्रम करून अधिकाधिक सुखोपभोग मिळविण्याचा प्रयत्न करावा, त्यांत अनुचित असें कांहीं नसून तें त्याचें कर्तव्यच आहे, तें त्याला भूषणच आहे हें होय. वेदान्ती, संन्यासमार्गी, पारलौकिकधर्मनिष्ठ पंडित सुखभोगांचा नेहमीं तिरस्कार करतात व त्यांचा त्याग करण्यास सांगतात. हे भोग मानवाच्या मोक्षमार्गाच्या आड येतात असें सर्व धर्मांचें मत आहे. पण हें मत रूढ होतांच मानवाचें पौरुष खच्ची होतें व तो इहलोकींचें वैभव गमावून बसतो, हें पौर्वात्य राष्ट्रांच्या अर्वाचीन काळच्या इतिहासावरून स्वच्छ दिसून येतें. हा अनर्थ टाळावयाचा असेल तर समाज भौतिकशास्त्राधिष्ठित होऊन सुखभोगाकडे मानवाची प्रवृत्ति होणें अवश्य आहे. हें जाणूनच आगरकरांनीं हें तत्त्व प्रतिपादिलें आहे. ‘ भातभाकरीवर कसातरी जीव राखावा व दोन जाडेभरडे कपडे घालून शरीर झांकावें या पलीकडे आमच्या लोकांची सुखोपभोगाची कल्पना जातच नाहीं ’ या विषयीं खेद प्रदर्शित करून आगरकर पुढें म्हणतात, ‘ आपल्यामध्यें स्वसुखोपभोगाची ही जी हेळसांड माजली आहे ती अत्यंत दूषणीय आहे, इतकेंच नव्हे तर ती देशाला शारीरिक व मानसिक दारिद्र्य येण्याचें आदिकारण होय. ’ ( उक्तग्रंथ पृ. ११२ ) ऐहिक सुखाकडे या दृष्टीनें पहाण्याची प्रवृत्ति असल्यामुळेंच आगरकरांनीं पुढील उद्‌गार काढले आहेत. ‘ तीव्र भूक व विषयवासना यांस उत्तम रीतीनें भागवितां आल्यास जें समाधान होतें तें अद्वितीय व अवर्णनीय आहे, हें सत्यप्रिय व विचारी मनुष्यास कबूल केलें पाहिजे ’ ( पृ. १४४ ) ऐहिक सुखाची व त्यांतल्यात्यांत विषयसुखाची उठल्याबसल्या निंदा करण्यास चटावलेल्या वेदान्तप्रवण मनुष्यास हे उद्‌गार

अगदीं असह्य होतील; पण हेच विचार राष्ट्राच्या समृद्धीला व म्हणूनच लोकशासनाला पायाभूत होत असतात, हें जाणून ते सांगितल्याबद्दल आपण आगरकरांना शतशः धन्यवाद दिले पाहिजेत.

## महातत्त्व

व्यक्तिस्वातंत्र्य किंवा बुद्धिप्रमाण्य हें विज्ञानाधिष्ठित समाजाचें मूलमहातत्त्व होय. त्याचा तर आपल्या लेखनांत आगरकरांनीं उच्च स्वरानें सारखा उद्घोष चालविला होता. 'सुधारक काढण्याचा हेतु' या सुधारकांतील पहिल्याच लेखांत त्यांनीं व्यक्तिस्वातंत्र्याची घोषणा केली आहे. ते म्हणतात, 'ज्या तत्त्वांचें अवलंबन केल्यानें इतर राष्ट्रें अधिकाधिक सुधारत चाललीं आहेत, तीं तत्त्वें हा सुधारक महाराष्ट्र लोकांपुढें वारंवार आणील. तसें करण्यास त्यास, आज ज्याचा जारीनें अंमल चालत आहे त्या लोकमताविरुद्ध बरेंच जावें लागणार असल्यामुळें, बराच त्रास पडणार आहे. पण त्याची तो पर्वा करीत नाहीं. कारण ज्या लोकमताचा पुष्कळांस बाऊ वाटतो त्याचा बऱ्याच बाबतींत आदर करण्यापेक्षां अनादर करणें हाच श्लाघ्यतर मार्ग होय.'

'मनुपाराशरादिकांचें प्रामाण्य आम्ही मानीत नाहीं' हें सांगतांना अत्यंत आवेशानें त्यांनीं पुढील घोष केला आहे 'एकाद्यादुसऱ्या मनूची आणि पाराशराची कथा काय ! आमच्या अर्वाचीन विचारास ज्या धार्मिक व सामाजिक गोष्टी अप्रशस्त वाटूं लागल्या आहेत त्यांस शेंकडों मनूंचे व सहस्रावधि पाराशरांचे आधार दाखविलेत तरी ज्याप्रमाणें पर्वताच्या माथ्यावरील सरोवराच्या भिंती फोडून तुफान वेगानें कड्यावरून पडूं लागलेल्या वारिवाहाची गति कुंठित करण्यास कोणीहि धजत नाहीं, त्याप्रमाणें आमच्या मूर्खपणाच्या सामाजिक व धार्मिक समजुतीस लागलेला वणवा कोट्यवधि अजागळ कीटकांच्या क्षुद्र पक्षपातानें किंवा मोठ्या किड्यांच्या शुष्क श्वासवातानें विझण्याचा मुळींच संभव नाहीं. उलट तेच त्यांत होरपळले जाण्याचा संभव आहे.' (निबंधसंग्रह भाग १ ला पृ. १४५) बुद्धिस्वातंत्र्याच्या आनंदाचें तर एका ठिकाणीं त्यांनीं ब्रह्मानंदासारखें वर्णन केलें आहे. 'बुद्धिमंदिरांत सत्याचा दीप प्रकाशित झाल्यावरोबर वृत्ति

आनंदमय होऊन एकप्रकारें ज्याचें देहावसान सुटतें असा एखादा महात्माच आईबापांची, गणगोतांची, धनद्रव्याची, जातीची, देशाची किंबहुना समग्र मनुष्यतेची पर्वा न ठेवतां अन्तरोत्थित अमर्याद प्रेरणाबलाच्या भरंवशावर हवें तेवढें महत्कृत्य हातीं घेऊन तडीस नेतो.' ( वरील ग्रंथ पृ. २०७ )

भौतिक शास्त्राधिष्ठित समाजरचनेचीं कांहीं प्रधान तत्त्वें वर सांगितलीं. पण तेवढींच सांगून आगरकर थांबत नाहींत. सामाजिक व वैयक्तिक संबंधांच्या अगदीं बारीक तपशिलांतहि ते शिरतात व या नव्या तत्त्वांच्या अवलंबनानें तेथें कोणचीं परिवर्तनें होतील व होणें अवश्य आहे तेंहि ते दाखवितात. पितापुत्रांचें, पतिपत्नींचें, सासूसुनेचें नातें नव्या समाजरचनेंत आमूलाग्र बदलून गेलें पाहिजे असें त्यांनीं आग्रहानें सांगितलें आहे. मुलांनीं आईबापाशीं कृतज्ञतेनें वागावें, त्यास दुःख देऊं नये, त्यांची सेवा करावी हें युक्तच आहे; पण स्वतः प्रौढ झाल्यावर सामाजिक, धार्मिक वा राजकीय बाबतींत त्यांच्या आज्ञा सतत पाळीत रहाणें हें समाजाला घातक होईल, असें त्यांनीं स्पष्टपणें बजावलें आहे. प्रगति व्हावयाची तर जुन्या व नव्या पिढीचा कलह होणें अवश्यच आहे, तो जेथे होत नसतो तेथें सर्व प्रगति खुंटलेली असते, हें प्रतिपादन त्यांनीं केलें आहे. पुरुषाच्या व्यक्तित्वाइतकीच त्यांना स्त्रीच्या व्यक्तित्वाची महती वाटत होती. म्हणूनच विवाहाच्या बाबतींत स्वयंवर, प्रियाराधन, वल्लभोपासना हीं रूढ करावीं आणि लग्न झाल्यावर मुलीनें आईबापांचें घर सोडून एकदम नवऱ्याच्या स्वतंत्र संसाराचें आधिपत्य पतकरावें व अशा रीतीनें सासुरवासाचें घोडें मुळींच नाहीसें करावें, असा उपदेश त्यांनीं केला आहे. ( निबंधसंग्रह भाग १ ला पृ. २२९ )

शासनसंस्था ही धर्मनिरपेक्ष व्हावयाची तर समाजाच्या अगदीं अंगोपांगांत आमूलाग्र परिवर्तन होणें अवश्य आहे हें आगरकरांनीं किती सूक्ष्मपणें जाणलें होतें तें वरील उताऱ्यावरून आपल्या ध्यानांत येईल. तीं सर्व अंगोपांगें–धर्मसंस्था, नीतिसंस्था, कुटुम्बसंस्था, आणि त्यांत अंतर्भूत असलेल्या व्यक्तींचे परस्परसंबंध या सर्वांचेंच अधिष्ठान बदललें पाहिजे आणि त्यांना नवें विज्ञानाचें, बुद्धिवादाचें अधिष्ठान दिलें पाहिजे, हें तत्त्वज्ञान सांगणें हें आगरकराचें जीवितकार्य होतें. तें त्यानीं किती उत्कटत्वानें व

तळमळीनें केलें आहे, तें आपल्या ध्यानीं येईल तर भारतीय लोकसत्ता त्यांची किती ऋणी आहे, तें आपणांस कळून येईल.

## मूलगामी बुद्धिवाद

वरील तत्त्वांमध्यें बुद्धिप्रामाण्याचें जें तत्त्व आहे तें आगरकरांनीं प्रथम सांगितलें असें नव्हे. राजा राममोहन हे बुद्धिप्रामाण्यवादीच होते. त्यांचा ब्राह्मसमाज व महाराष्ट्रांतील प्रार्थनासमाज हे वेद किंवा इतर कोणताहि तत्सम ग्रंथ ईश्वरप्रणीत मानीत नाहींत; त्याचप्रमाणें दादोबा पांडुरंग, लोकहितवादी, रानडे, भांडारकर हे त्या काळचे सुधारकहि बुद्धिप्रामाण्याचा पुरस्कार करीत;पण त्यांच्या बुद्धिवादाचा प्रभाव आगरकरांच्या बुद्धिवादासारखा पडूं शकला नाहीं. याचें कारण हेंच कीं, जुन्या धर्माधिष्ठानावर उभे राहून त्यांनीं या नव्या तत्त्वाचा स्वीकार केला होता. या विषयीं 'आधुनिक भारत' या आपल्या ग्रंथांत आचार्य जावडेकरांनीं केलेलें विवेचन उद्‌बोधक होईल. ते म्हणतात, 'धर्माची सर्वव्यापी सत्ता नष्ट करून राजकीय, आर्थिक व सामाजिक व्यवहारांचीं स्वतंत्र पृथक् शास्त्रें निर्माण करणें आणि धर्माकडे केवळ अंतरंग सुधारणेचें किंवा आत्मिक उन्नतीचें कार्य ठेवणें हें एक आधुनिक युरोपीय संस्कृतीचें लक्षण आहे. आधुनिक युरोपीय सुधारणेंत सामाजिक, आर्थिक व राजकीय व्यवहारांची धर्मांशीं फारकत केलेली आहे. इतकेंच नव्हे तर नीतिशास्त्राचाहि धर्माशीं व अध्यात्माशीं कांहीं संबंध नाहीं असें प्रतिपादण्यांत येत आहे. ही विचारसरणी आज आपल्या समाजांतहि रूढ होऊं पहात आहे. परंतु राजा राममोहन रॉय यांच्या वेळच्या हिंदुसमाजाची तशी स्थिति नव्हती. त्या वेळचा हिंदुसमाज हा मध्ययुगीन युरोपीय समाजासारखा होता. त्याच्या सर्व व्यवहारावर धर्माची सत्ता अप्रतिहत नसली तरी तत्त्वतः चालत होती व ती तशी चालावी हेंच साहजिक व इष्ट आहे, अशी त्या वेळीं हिंदी समाजाची कल्पना व श्रद्धा होती.' (पृ. ६२)

यावरून हें ध्यानांत येईल कीं, आगरकरांच्या पूर्वीच्या सर्व सुधारकांनीं बुद्धिप्रामाण्य जरी स्वीकारलें होतें, तरी त्याची खरी प्रखरता त्यावेळीं भासमान

होणें शक्य नव्हतें. कारण या पूर्वसूरींची धर्मनिष्ठा अचल होती. त्यांचे सर्व प्रयत्न धर्माचें स्वरूप उज्ज्वल करावें या हेतूनें चालले होते. धर्माच्या सर्वव्यापी सत्तेचा उच्छेद करावा असा त्यांचा प्रयत्न नव्हता व हेतुहि नव्हता. इतकेंच नव्हे तर त्याला त्यांचा तीव्र विरोध होता. न्या. रानडे, डॉ. भांडारकर यांना तर भौतिकवादाचा संताप येत असे. आणि म्हणूनच आपण हें ध्यानांत घेतलें पाहिजे कीं, त्या सर्व सुधारकांच्या बुद्धिप्रामाण्याचा व्याप फार मर्यादित होता. भौतिकवादांतील एका तत्त्वाचा त्यांनीं कांहींसा अंगीकार केला होता इतकेंच. आगरकरांच्या प्रतिपादनाचा आत्माच भौतिकवाद होता. त्यांना समाजाचें धर्म हें अधिष्ठानच बदलून टाकावयाचें होतें. ऐहिक व्यवहारवरील जी आध्यात्मिक मतप्रणालींची सत्ता तीच आम्हांस बाधक झाली आहे, असा त्यांचा बुद्धिनिश्चय होता आणि त्या दृष्टीनें त्यांनीं बुद्धिप्रामाण्याचें प्रतिपादन चालविलें होतें. धर्मनिरपेक्ष लोकायत्त शासनाला तेंच तत्त्वज्ञान अवश्य होतें; राममोहन किंवा रानडे यांच्या बुद्धिप्रामाण्यानें हें कार्य झालें नसतें, कारण त्यांचें अधिष्ठान जुनेंच होतें. तें अधिष्ठान बदलून टाकावें हें आगरकरांचें तत्त्वज्ञान होतें आणि म्हणूनच त्यांच्या कार्याची महती जास्त ठरते.

## अंतर्ज्ञान व लोकसत्ता

आगरकरांनीं पुरस्कारिलेल्या भौतिकाधिष्ठित बुद्धिप्रामाण्याचा लोकसत्तेशी किती घन संबंध आहे, तें पाश्चात्य पंडितांनीं इतर अनेक देशांतील लोकसत्तांविषयीं जीं विवेचनें केलीं आहेत. त्यावरून सहज ध्यानांत येईल. पारलौकिक धर्माचा मुख्य आधार म्हणजे अतींद्रिय ज्ञान, अंतर्ज्ञान हा होय. इतिहास, अनुभव, तर्क, प्रयोग हीं सर्व तेथें गौण होत. बुद्धि व पंचज्ञानेंद्रियें याहून एक निराळी ज्ञानशक्ति मनुष्याला असते हें पारलौकिक धर्मांत, अध्यात्मशास्त्रांत गृहीत धरलेलें आहे आणि लोकशाहीला हेंच तत्त्व अत्यंत मारक असें ठरतें. कारण अध्यात्मशास्त्रांत त्या अतींद्रिय ज्ञानशक्तीनें संपन्न असा जो पुरुष त्याचें वचन प्रमाण धरलेलें असतें. त्याला स्फुरेल तें सत्य. त्यापुढें दुसऱ्या कोणी शंका घेणें हेंहि अधर्म्य आणि त्यानें सांगितलेलें तेंच एकमेव सत्य असें मानणें हा धर्म होय. लोकसत्ता बरोबर याच्या उलट

तत्त्वावर अधिष्ठिलेली असते. माझ्या विचाराइतकाच दुसऱ्याचा विचार, माझ्या मताइतकेंच दुसऱ्याचें मत सत्य असूं शकेल व त्याला तें मत सांगण्याचा माझ्याइतकाच, किंबहुना जगांतल्या इतर कोणच्याहि श्रेष्ठ पुरुषाइतकाच हक्क आहे, म्हणजेच त्याला विचारस्वातंत्र्य आहे, हें तत्त्व म्हणजे लोकशाहीचा प्राण होय. अध्यात्मशास्त्रांत अतींद्रियज्ञानसंपन्न पुरुषांइतका अधिकार दुसऱ्या कोणाचाहि नसतो आणि त्यांनीं सांगितलेल्या सिद्धांताइतका दुसरा विरोधी सिद्धांतहि खरा असूं शकेल ही कल्पना त्या शास्त्राला असह्य आहे. म्हणजे मानवाची मूलभूत समता व नवीन सत्य-संशोधनाचा अवसर हे लोकशाही घटक अध्यात्माला मंजूरच नाहींत आणि म्हणूनच अध्यात्माच्या, पारलौकिक धर्मांच्या वर्चस्वाखालीं लोकसत्ता वाढणें कधींच शक्य नाहीं. अध्यात्माला पोप, शंकराचार्य, खलिफा, मनु यावांचून गति नाहीं व यांचे अधिकार मानणें हें लोकशाहीला कधींच मानवणार नाहीं. अध्यात्मवर्चस्व व लोकसत्ता यांचा असा हा मूलभूत विरोध आहे आणि म्हणूनच लोकसत्तेचें शासन धर्मनिरपेक्ष असणें अवश्य आहे. बुद्धि-प्रामाण्याच्या प्रसारावांचून असें शासन निर्माण करणें व तें टिकविणें अशक्य आहे. म्हणून लोकशाहीला त्याची फार आवश्यकता आहे. आगरकरांनीं नेमकें तेंच कार्य केलें म्हणून त्यांची महती विशेष.

आज आगरकरांचें तत्त्वज्ञान आपण सर्वांशीं नाहीं तरी बव्हंशीं आत्मसात् केलें आहे आणि त्याअन्वयें समाजरचना करण्याची ईर्षा धरली आहे; पण त्यांच्या काळीं म्हणजे सुमारें साठ वर्षांपूर्वी समाजानें त्याचें मुळींच स्वागत केलें नव्हतें, इतकेंच नव्हे तर समाजाला तें अत्यंत तिरस्करणीय व त्याज्य असेंच वाटत होतें. परमेश्वराचें अस्तित्व, पुनर्जन्मसिद्धांत, वर्णाश्रमव्यवस्था, परंपरेचा अंध अभिमान व कुटुंबांतील अधिकारश्रेणी हे पांच घटक म्हणजे हिंदुसमाजाचे पंचप्राण होते आणि त्यांवरच आगरकरांनीं टीकास्त्र चालविलें होतें. मनुष्यतेचें ऐहिक सुखसंवर्धन हा एकच धर्म ते मानीत असत आणि पाश्चात्य पंडितांच्या आधारें शुद्ध विवेकनिष्ठेनें त्याचें प्रतिपादन करीत असत. त्यांना आपल्या भारतीय पूर्वजांचा अगदीं प्रखर असा अभिमान असला तरी ‘ सध्यांच्या काळीं त्यांच्या विद्या, त्यांचे ग्रंथ, त्यांचें तत्त्वज्ञान आपणांस उपयोगी पडण्याजोगें नसून आपण आतां पाश्चात्य सुधारणांचा

अंगीकार केला पाहिजे, पाश्चात्यांचें शिष्यत्व पत्करिलें पाहिजे ' असें ते निःसंदिग्धपणें प्रतिपादीत असत. तसलें तें तत्त्वज्ञान व त्याचें असलें हें प्रतिपादन त्या काळीं समाजाला रुचणें व पचणें शक्य नव्हतें; त्यामुळें त्याच्याविरुद्ध त्या वेळीं प्रतिक्रियेची एक प्रचंड लाट उसळली. ती लाट एवढी जबरदस्त प्रभावी होती कीं, आजहि आपण धर्मनिरपेक्ष समाजाच्या गोष्टी बोलत असलों तरी, आणि जीवनाच्या प्रत्येक अंगोपांगांत पाश्चात्यांचें अनुकरण करीत असलों तरी तात्विकरीत्या तसें कबूल करणें आपणांस जड जातें आणि त्या लाटेची शीग होती त्यावेळीं जी भाषा आपण बोलत होतो तीच भाषा आज ती शीग व लाटहि ओसरून गेली आहे तरी आपण कायम ठेवली आहे. म्हणून या प्रतिक्रियेची मीमांसा करणें अवश्य आहे.

व्यक्तिस्वातंत्र्य, विवेकनिष्ठा, आमूलाग्र परिवर्तन, क्रांतिप्रवृत्ति, गतिशीलता इ० भौतिकवादांतील जीं तत्त्वें त्याविरुद्ध त्या काळीं भरतभूमीच्या सर्वच प्रांतांत जोराची प्रतिक्रिया सुरू झाली होती. पंजाबांत स्वामी दयानंदांनीं स्थापलेला आर्यसमाज भौतिकवादाचा कट्टा विरोधक होता. मद्रासमध्यें अड्यारला स्थापन झालेला जो थिऑसफीचा पंथ त्यानें तर पाश्चात्य तत्त्वज्ञानाविरुद्ध मोहीमच काढली होती. महाराष्ट्रांतहि आगरकरांच्या तत्त्वज्ञानाला कसून विरोध होत होता; पण या लाटेला जें खरें उधान आलें तें स्वामी विवेकानंदांनीं अमेरिकेंतील जगद्धर्मपरिषदेंत जें अलौकिक यश मिळविलें त्यामुळें. या विवेकानंदप्रणीत प्रतिक्रियेविषयीं आपणांस जरा जास्त चिकित्सेनें विचार करणें अवश्य आहे. त्यावांचून आगरकरांचें तत्त्वज्ञान व भौतिकवाद यांचें खरें महत्त्व व खरी आवश्यकता आपल्या ध्यानीं येणार नाहीं.

भौतिकवादाविरुद्ध जी प्रतिक्रिया झाली ती आज जरी आपणांस अप्रिय वाटत असली, ती प्रतिक्रिया मारून काढून भौतिकवादाचाच आपण आज आश्रय केला पाहिजे हें जरी खरें असलें तरी त्या काळीं ती प्रतिक्रिया होणें आपल्या देशाच्या उन्नतीच्या दृष्टीनें फार अवश्य होतें हा विचार आपण कधींहि दृष्टिआड होऊं देऊं नये. प्रतिक्रिया अवश्य होती असें म्हणण्याचें कारण हें कीं, त्या वेळीं आपला समाज राष्ट्रीय जीवनाच्या प्रत्येक क्षेत्रांत पराभूत झाला होता. राजकीय दृष्टीनें तर आपण निश्चेष्ट झालोंच होतों; पण

इतर क्षेत्रांतहि तीच गत झाली होती. पाश्चात्यांचें विज्ञान, त्यांचें यंत्रशास्त्र, त्यांचें अर्थशास्त्र, त्यांचें इतिहासपांडित्य व त्यांचा दिग्विजय यांमुळें केवळ शरीरानेंच नव्हे तर मनानेंहि भारतीय जनता पराभूत व मृतकल्प झाली होती. आपली धर्मव्यवस्था, समाजरचना, आपलें नीतिशास्त्र, आपलें विज्ञान, आपलें अर्थशास्त्र—एवंच आपलें सर्व राष्ट्रीय जीवनच अगदीं हीन आहे. आपण पूर्वींहि श्रेष्ठ नव्हतों. आज तर नाहींच आणि पुढेंहि कधींकाळीं आपल्याला श्रेष्ठ पदवी मिळण्याची आशा नाहीं अशा तऱ्हेचे निराशेचे विचार भारतीय मनाला गांजून सोडीत होते. आणि त्यामुळें या समाजाचा आत्मप्रत्ययच ढळतो कीं काय अशी भीति विचारवेत्त्यांना वाटूं लागली होती. येथें जी प्रतिक्रिया झाली ती या भीतींतून निर्माण झाली होती.

वैयक्तिक जीवनांत आत्मप्रत्यय ढळतांच मनुष्य आत्महत्येला प्रवृत्त होतो. राष्ट्रीय जीवनांत प्रत्यक्ष शारीर आत्महत्या झाली नाहीं तरी संपूर्ण शरणागतीच्या रूपानें राष्ट्र आत्महत्या करीत असते. गेल्या शतकाच्या तिसऱ्या चरणांत भारतीय समाजाच्या आयुष्यांत तसा भयानक क्षण येण्याचा संभव निर्माण झाला होता. रोगग्रस्त माणसाच्या जीवनांत असे प्रसंग पुष्कळ वेळां येतात. त्या वेळीं वैद्यकीय मतानें त्याच्या शरीरांत कसलेंहि त्राण उरलें नसलें तरी त्याला तसें सांगणें धोक्याचें असतें. वस्तुस्थितीचें ज्ञान त्यावेळीं घातकच ठरतें. अशा वेळीं तुला कांहींहि झालेलें नाहीं, कांहीं लहानशी विकृति आहे ती तेव्हांच नाहींशी होईल, असा धीर देण्यानेंच तो मनुष्य रोगमुक्त होऊन चांगला सशक्त व सुदृढ होईल. तसें झाल्यावर त्याच्या भावी आरोग्याच्या दृष्टीनें त्याला त्याच्या रोगाचें यथार्थ ज्ञान करून देणें अवश्य ठरेल. पण प्रत्यक्ष रोगग्रस्त असतांना तें ज्ञान कधींहि हितावह ठरणार नाहीं. भरतभूमीची त्या वेळीं अशा मरणोन्मुख माणसाप्रमाणेंच स्थिति झाली होती तिला आगरकरांचें तत्त्वज्ञान त्या वेळीं कोठल्याच अनुपानाशिवाय देणें घातक ठरलें असतें. तिला त्या स्थितींत स्वामी विवेकानंदासारखा कुशल धन्वंतरीच हवा होता.

## हितावह प्रतिक्रिया

वर सांगितलेंच आहे कीं, पाश्चात्यांच्या भौतिकवादाचा जो प्रसार येथें होत होता त्याच्याविरुद्ध त्या काळीं येथें प्रतिक्रिया होणें अवश्य होतें. ती प्रतिक्रिया घडवून आणण्यास स्वामी विवेकानंदासारख्या विभूतीचा भरत-भूमींत जन्म झाला हें आपलें भाग्य होय. दुसऱ्या एखाद्या कट्टर सनातन्याच्या हातून हें कार्य झालें असतें तर त्यानें ती लाट दुसऱ्या ध्रुवापर्यंत खेचून पुन्हां दुसऱ्या उलट्या प्रतिक्रियेची तयारी करून ठेवली असती. आणि मग त्या क्रियाप्रतिक्रियांच्या हेलकाव्यापायीं भरतभूमि हैराण होऊन गेली असती. पण तसें घडलें नाहीं. याला कारण स्वामीजींची प्रज्ञा, त्यांची दिव्यदृष्टि, त्यांची अलौकिक समयज्ञता हेंच होय. भारताचा तेजोभंग झाला आहे, तो पराभूत झाला आहे, त्याचा आत्मप्रत्यय ढळण्याचा क्षण आला आहे हें त्यांनीं जाणलें होतें. आणि या रोगावर स्वाभिमानजागृति, पूर्वजांच्या वैभवाचें दर्शन, परंपरेच्या दिव्य तेजाची प्रतीति, हीच संजीवनी होय असा त्यांचा बुद्धिनिश्चय तर होताच; पण त्याबरोबरच भौतिकवाद हा हितावह आहे, पाश्चात्य सुधारणा या मारक नसून त्या तारकच आहेत, त्यांचा स्वीकार हा अपरिहार्य आहे हेंहि सत्य त्यांनीं आकळिलें होतें आणि म्हणूनच आपला संदेश आपल्या राष्ट्राला देत असतांना त्यांनीं हें अनुसंधान कधींच सुटूं दिलें नाहीं. आरंभीं प्राचीन इतिहासाच्या मुक्तकंठ प्रशंसेनें, परंपरेच्या उज्ज्वल वर्णनानें व उपनिषद्धर्माच्या पुनरुज्जीवनानें त्यांनीं स्वकीय समाजाला विश्वासांत घेतलें, त्याचें मन उल्हसित केलें, त्याच्या मनाला नवजीवन दिलें आणि नंतर त्याचा आत्मप्रत्यय ढळण्याची भीति नष्ट होतांच त्यांनीं त्याच्या खऱ्या अवस्थेचें त्याला ज्ञान करून देऊन थोड्याफार फरकानें त्याला आगरकरांच्या तत्त्वज्ञानावरच आणून ठेवलें. आपल्या समाजाला भौतिक अधिष्ठान प्राप्त करून देऊन त्याचें शासन धर्मनिरपेक्ष करण्यांत आणि त्यामुळें येथली लोकसत्ता दृढमूल करून टाकण्यांत जें अल्पस्वल्प यश आपल्याला येत आहे, त्याचें बरेंचसें श्रेय स्वामी विवेकानंदांच्या अलौकिक दिव्यप्रज्ञेला दिलें पाहिजे. स्वामीजींची 'कोलंबो अल्मोरा व्याख्यानमाला' पाहिली म्हणजे हा चमत्कार त्यांनीं कसा घडवून आणला तें आपल्या ध्यानीं येईल.

१५ जानेवारी १८९७ रोजीं पश्चिमेतून परत येऊन स्वामीजींनीं कोलंबोच्या भूमीवर पुन्हा पाय ठेवला; पण त्यापूर्वींच त्यांची कीर्ति दाही दिशांना पसरून भरतभूमींत येऊन पोंचली होती. १८९३ सालीं विवेकानंदांचें जगद्धर्मपरिषदेंत व्याख्यान झालें आणि त्याक्षणींच त्यांनीं पश्चिमेवर अपूर्व विजय मिळवून आपल्या मायभूमीच्या पराभूत मनावरील मालिन्य नष्ट करून तिच्या अंगीं चैतन्याचा संचार घडवून आणला. ती व्याख्यानाची घडी अमृत घडीच होती. कारण ज्या पाश्चात्यांच्या पायापाशीं सुद्धां बसण्याची आपली लायकी नाहीं, असें भारतीय समाजाला वाटत होतें तेच पाश्चात्य त्याच समाजाच्या पायाशीं बसून 'शिष्यस्तेऽहम् शाधि मां त्वां प्रपन्नम्' अशा भावनेनें याचना करूं लागले होते. अमेरिकेनें अगदीं प्रांजळ मनानें 'अलौकिक धर्मवेत्ता,' 'श्रीखिस्ताचा अवतार,' 'अध्यात्माचा प्रदीप' अशा स्वामींचा गौरव करून त्यांच्यावर स्तुतिसुमनें उधळलीं आणि त्यापेक्षांहि विशेष म्हणजे शेंकडो अमेरिकन स्त्रीपुरुष रामकृष्णमठाचें सदस्य होऊन स्वामीजींचे शिष्य बनले. 'ज्या भूमींत असला अलौकिक धर्मवेत्ता पुरुष निर्माण होतो, तिच्याकडे धर्मप्रसारासाठीं आपण आपले मिशनरी धाडणें हा मूर्खपणा आहे हें आतां तरी अमेरिकनांच्या ध्यानीं येईल काय!' असें अमेरिकन वर्तमानपत्रें विचारूं लागलीं.

स्वामी विवेकानंदांनीं मिळविलेला हा विजय शिकंदर किंवा नेपोलियन यांच्या विजयापेक्षां अनेकपटीनें श्रेष्ठ होता. त्या विजयाच्या जाणिवेनें एक पराभूत, निराशाग्रस्त, मृतकल्प राष्ट्र संजीविनी दिल्याप्रमाणें सजीव झालें. त्याचा राष्ट्रीय अहंकार जागृत झाला. आत्मप्रत्ययाचें दिव्य स्फुरण त्याच्या चित्तांत झालें, त्याच्या इतिहासांतील युगायुगाची रात्र संपून नव्या युगाच्या उषेची दिव्यप्रभा त्याच्या मुखावर दिसूं लागली आणि अशा स्थितींत स्वामीजी आपल्या अमेरिकन शिष्यपरिवारासह कोलंबोला जेव्हां उतरले तेव्हां तर या राष्ट्राला सूर्योदय झाल्याचाच भास झाला. अशा या भूमिकेवरून स्वामीजींनीं आपल्या कार्याला प्रारंभ केला.

'आपण पूर्वीं जगताचे गुरु होतों. जगताला अध्यात्मज्ञान देण्याचें कार्य अनेक युगें आपण केलें आहे. आणि पुढेंहि आपण तेंच करणार आहों' स्वामीजींची वाणी भारताच्या नभोमंडलांत घुमूं लागली. 'इतर

देशांनीं जग बाहुबलानें जिंकलें. आपण तें वाणीच्या बलानें जिंकलें, अध्यात्म तेजानें जिंकलें. प्रत्येक देशाला कांहीं विशिष्ट असें जीवितकार्य असतें. धर्म हें भारताचें कार्य आहे. राजकीय साम्राज्यें व आर्थिक साम्राज्यें आम्हीं स्थापलीं नाहींत. तो आमचा हेतूच नव्हता. अध्यात्म ही भारताची जगाला देणगी आहे. जगांत असा एकहि धर्म नाहीं कीं, जो कोणत्याना कोणत्या बाबतींत हिंदुधर्माचा ऋणी नाहीं. आमच्या कांहीं रूढि चुकल्या म्हणून आमच्यावर कोणी टीका करतात; पण काल परवांच्या उपटसुंब राष्ट्रांनीं आम्हांला उपदेश करणें हें हास्यास्पद आहे. त्यांना म्हणावें प्रथम दीर्घकाल टिकणाऱ्या रूढी निर्माण करा व मग आम्हांस शिकवावयास या. अध्यात्म, त्याग, संन्यास हें आमचें ध्येय आहे. जग हें मायामय असून त्यांतून मोक्ष मिळविणें हें आमचें अंतिम प्राप्तव्य आहे. शास्त्रज्ञान, सत्ता, संपत्ति, कीर्ति या सर्वांना त्यापुढें गौण स्थान आहे. ही आध्यात्मिकता हा आमच्या राष्ट्राचा कणा आहे. आणि तिचा सर्व जगाला उपदेश करून जडवादापासून त्याला मुक्त करणें हें आमचें कार्य आहे. तो आमचा अधिकारहि आहे. ( स्वामी विवेकानंद समग्र ग्रंथ खंड २ रा. प्रबुद्ध भारत कचेरी १९१८ पृ. १०६–३२ )

## परंपरेंतून क्रान्तीकडे

अशा तऱ्हेच्या दिव्य संदेशानें विवेकानंदांनी प्रथम भारतीय समाजाचा आत्मविश्वास जागृत केला, त्याच्या स्वत्वाला उजाळा दिला व त्याच्या राष्ट्रीय अहंकारावर आलेली काजळी झाडून टाकून त्याला पुन्हां प्रदीप्त केला आणि आतां कठोर टीकेनें त्याचें मन हाय खाणार नाहीं अशी खात्री होतांच त्यांनीं आपलें धोरण हळूंहळूं पालटण्यास सुरवात केली.

'जगाला अध्यात्म शिकविणें हें आपलें कार्य आहे, तो आपला अधिकार आहे हें खरें; पण आपल्याला जगापासून कांहींच शिकावयाचें नाहीं काय ? तसें नाहीं. आपल्यालाहि थोडें शिकण्याजोगें आहे. थोडें भौतिक ज्ञान, संघटन कौशल्य, सत्ता खेळविण्याचें सामर्थ्य हे गुण आपण पाश्चात्यांपासून घेतले पाहिजेत.' असें सांगण्यास त्यांनीं प्रारंभ केला. मदुरा येथील व्याख्यानांत श्रोत्यांना त्यांनी तशी जाणीवहि दिली. 'आपलें राष्ट्र

अधोगामी झालें आहे ही कल्पना नष्ट करून टाकली पाहिजे. आपल्या श्रेष्ठत्वाचा अभिमान आपण धरिला पाहिजे; हें सर्व ठीक आहे. पण आतां मला थोडें कटु सत्य सांगावयाचें आहे. त्यावरून आपण रुष्ट होणार नाहीं अशी आशा आहे.' अशी प्रस्तावना करून स्वामीजींनीं गेल्या हजार वर्षांच्या आपल्या हीनदीन स्थितीचें, आपल्या अधःपाताचें चित्र श्रोत्यांच्या समोर उभें केलें व त्या अधःपाताला आपले आपणच सर्वस्वी कारण आहों असें त्यांना बजावलें. यापुढें स्वामीजींचा सूर अगदींच पालटला. 'आमच्यावर मुसलमानांचें आक्रमण झालें, खिस्त्यांचें झालें. आमच्यापैकीं कोट्यवधि लोक धर्मच्युत झाले. पण त्यांनीं न व्हावें अशी कोणची व्यवस्था आम्हीं केली होती! जे भिकारी होते, हीनदीन दरिद्री होते, त्यांना आम्ही थोडें सुख देण्याऐवजीं निवृत्तीचे धडे देत बसलों. आमच्या पंडितांनीं सगळा धर्म सोवळ्याओवळ्यांत आणून ठेवला आणि ऐहिक वैभवाकडे दुर्लक्ष केलें त्याचे हे परिणाम आहेत. (पृ. १४९). आपण अध्यात्माचा अतिरेक कला आहे, तेव्हां आतां आपला उद्धार होण्यास भौतिकवादाचा आश्रय करणें अवश्य आहे. एका दृष्टीनें येथें भौतिकवाद आला आहे, तो आपल्या उद्धारार्थच आला आहे. त्याच्यामुळें जन्मनिष्ठ उच्चनीचता नष्ट होईल, बुद्धिप्रामाण्य निर्माण होऊन धर्मग्रंथांची ठेव सर्वांच्या हातीं येईल व सुखी जीवनाचे दरवाजे सर्वांना खुले होतील. पश्चिम ही धनिकांच्या टांचेखालीं चेंगरली असली तर पूर्व ही धर्ममार्तंडांच्या टांचेखालीं चिरडली आहे हें ध्यानांत ठेवा. आतां एकीनें दुसरीवर नियंत्रण ठेवून समतोल राखिला पाहिजे. केवळ अध्यात्मानें जगाची प्रगति होणार नाहीं.' (पृ. १५७)

## प्रछन्न भौतिकवाद

स्वामीजींनीं किती धोरणानें व चतुराईनें आपल्या संदेशाचा प्रसार चालविला होता, तें यावरून ध्यानांत येईल. ते स्वतः भौतिकवादी कधींच झाले नाहींत. पण भौतिकवादाचा आश्रय केल्यावांचून आपला उद्धार होणार नाहीं, ही त्यांची खात्री झाली होती. पण त्याचें प्रतिपादन कांहीं एका पद्धतीनें झालें पाहिजे असा त्यांचा आग्रह होता. सुधारकांवर ते तुटून

पडत ते केवळ त्यांच्या पद्धतीमुळें. मदुरा, कुंभकोणम् येथील व्याख्यानांत त्यांनीं हा विचार स्पष्टपणें मांडला आहे. 'सुधारकांनाहि झेपणार नाहीं इतकी सुधारणा व्हावी अशा मताचा मी आहें. पण तसें करतांना स्वकीयांचा तेजोभंग केला तर कांहीं साधणार नाहीं. गेल्या शंभर वर्षांत सुधारकांना कांहींच फल मिळालें नाहीं, याचें कारण हेंच कीं, त्यांनीं अतिरिक्त आत्म-निर्भर्त्सना केली. असला तेजोभंग करून कार्यभाग होत नसतो.' असें त्यांचें मत होतें.

पुष्कळ वेळां आगरकरांनीं जी भाषा वापरली तीच किंवा तिच्यापेक्षांहि जास्त कडक भाषा विवेकानंदांनीं वापरली आहे; पण एक एका अर्वाचीन संस्थेचे प्रिन्सिपल होते तर दुसरे प्राचीन पद्धतीचे संन्यासी होते. स्वामींचा संन्यास हा भौतिकवादाच्या कडू औषधी गोळ्यांना अनुपानासारखा उपयोगी पडला. 'आपल्यापुढील कार्य' या भाषणांत ते म्हणतात, 'आपणच सर्वांत श्रेष्ठ आहों, आपण जगाचे त्राते आहों हा भ्रम सोडून द्या. आपल्या पूर्वजांविषयीं मला निःसीम आदर असूनहि मी तुम्हांस सांगतों कीं आपणांस इतर राष्ट्रांपासून खूपच शिकवावयाचें आहे. (आरंभींच्या व्याख्यानांत थोडें शिकावयाचें आहे असें ते म्हणत.) कोणाच्याहि पायांपाशीं बसण्याची आपली सिद्धता असली पाहिजे. आपण दुसऱ्यास शिकविण्यास समर्थ आहों हें विसरूं नये. पण जगाशीं आपल्याला कांहीं कर्तव्य नाहीं, हा समज मूर्खपणाचा आहे. त्या समजामुळेंच आपण गेलीं हजार वर्षें गुलामगिरीचें प्रायश्चित्त भोगीत आहों' (पृ. २७२). नव्या शास्त्रीय ज्ञानांतून कोठले तरी सिद्धान्त घेऊन आपल्या जुन्या रूढींचें, लोकभ्रमांचें व कर्मकांडांचें वेडगळ समर्थन करण्याची पद्धत स्वामींच्या वेळीं थोडी थोडी सुरू झाली होती. या प्रकाराची त्यांना अत्यंत चीड असे. त्याचा निषेध करून ते म्हणतात, "अशा तऱ्हेनें जुन्या लोकभ्रमांचें समर्थन करणें हें अत्यंत लज्जास्पद होय. असे भोळसट होण्यापेक्षां तुम्ही कट्टर नास्तिक झाला तरी चालेल. कारण नास्तिक मनुष्य खरा जिवंत मनुष्य असतो. व त्याच्या मनाला वळण लावण्याची शक्यता तरी असते. निरीश्वरवादांत एकप्रकारचें सामर्थ्य आहे, एकप्रकारची रग आहे. अंधश्रद्धा, भोळसटपणा हा मात्र मृत्यु होय. म्हणून कुजट रूढींच्या समर्थनापेक्षां

नास्तिकतेनेंच राष्ट्र वर येण्याचा जास्त संभव आहे." (पृ. २७९) 'सुधारक काढण्याचा हेतु ' या लेखांत आगरकरांनीं यापेक्षां जास्त तीव्र असें काय लिहिलें आहे !

एके ठिकाणीं स्वामीजी म्हणतात, 'आम्ही हिंदुस्थानांतले संन्यासी ! बहुजनसमाजासाठीं, गरीब जनतेसाठीं आम्हीं काय केलें आहे ! आम्हीं संन्यासी त्यांना अध्यात्म शिकवीत आहों ! यापेक्षां मूर्खपणा तो काय ? भुकेल्या माणसाला परमार्थ सांगणें ही धर्माची शुद्ध चेष्टा आहे. आज लक्षावधि लोक अन्नान्न करीत आहेत. त्यांची पशूसारखी अवस्था झाली आहे. त्यांना सोडून परमेश्वराचा तुम्ही अन्यत्र कोठें शोध चालविला आहे ? ही गरीब जनता हाच परमेश्वर नव्हे काय ? त्यांची सेवा करतांना मला नरकवास आला तरी मी तो पतकरीन. भारताचें भवितव्य मूठभर उच्च लोकांवर अवलंबून नसून या कोट्यवधि जनतेवर आहे. तिला समतेचा व स्वातंत्र्याचा संदेश दिला पाहिजे. असें करतांना आपण कट्टरांतले कट्टर पाश्चिमात्य झालें पाहिजे. मात्र त्याच वेळीं आपल्या हिंदुत्वाचा, आपल्या श्रेष्ठधर्माचा आपणांस कधींहि विसर पडतां कामा नये." ( विवेकानंद चरित्र खंड ४ था. प्रबुद्धभारत. पृ. १७७–१८२ )

वर दिलेल्या अनेक उताऱ्यांवरून स्वामी विवेकानंदांच्या विचारसरणीची कल्पना येईल. आपल्या समाजाचें धार्मिक अधिष्ठानच बदलून टाकावें असें त्यांचें मत नव्हतें हें खरें, पण भौतिकवाद ते त्याज्य मानीत नव्हते, इतकेंच नव्हे तर आजच्या परिस्थितींत आपल्या उन्नतीसाठीं त्याचा स्वीकार करणें अवश्य आहे असें ते आग्रहानें सांगत होते, हें आपण विसरूं नये. त्यांचा विरोध होता तो मार्गासंबंधीं होता. येथल्या परंपरांचा नाश करून किंवा येथल्या जीवनाचे ओघ आमूलाग्र बदलून येथें नवेंच कांहीं स्थापावें हें त्यांना मान्य नव्हतें. जें कांहीं नवें यावयाचें तें पूर्वस्थितींतून विकसित होऊन यावें असें त्यांचें मत होतें. 'मला सुधारणा किंवा क्रान्ति मान्य नसून विकास मान्य आहे, ' असें ते नेहमीं म्हणत.

जगांतल्या सुधारकांचे सगळीकडेच दोन वर्ग पडलेले दिसतात. एक शुद्ध तर्काच्या व बुद्धिवादाच्या आश्रयानें आमूलाग्र क्रांति करूं पहात असतो,

तर दुसरा जुन्या समाजपीठिकांतूनच नवीन पीठिका निर्माण करण्याचा प्रयत्न करीत असतो. नवतत्त्वांना विरोध कोणाचाच नसतो. त्या तत्त्वांची प्रतिष्ठापना करण्याच्या मार्गाविषयींच मुख्यतः मतभेद असतो. या दोन वर्गांपैकीं आगरकर हे पहिल्या वर्गांतील असून स्वामी विवेकानंद हे दुसऱ्या वर्गांतील होत. लो. टिळक, महात्मा गांधी यांची विचारसरणी स्वामीजींच्या विचारसरणीसारखीच होती आणि म्हणूनच टिळकांनीं आगरकरांना विरोध केला होता. या दोन्ही प्रेरणांचा म्हणजे क्रान्तिप्रेरणा व विकासप्रेरणा यांचा विचार केला तर असें दिसून येईल कीं समाजाच्या प्रगतीला या दोहोंची सारखीच आवश्यकता असते. श्रीकृष्ण, टिळक, महात्माजी, विवेकानंद या विभूतींची जगाला जेवढी आवश्यकता असते तेवढीच गौतमबुद्ध, आगरकर, मार्क्स यांची पण असते. कोणच्या काळीं कोणची प्रेरणा कमीजास्ती प्रमाणांत हितावह ठरेल, एवढाच काय तो प्रश्न असतो.

आणि या तारतम्याचा विचार पाहून निर्णय करावयाचा तर आज आपण आगरकरांचें शिष्यत्व पत्करण्यास कोणताच प्रत्यवाय येण्याचें कारण नाहीं. स्वामी विवेकानंदांचें कार्य आतां होऊन गेलें आहे. त्यानंतर टिळक व महात्माजी यांच्या कार्यांची परिणति होऊन आपणांस स्वातंत्र्याची प्राप्तिहि झाली आहे. आतां आपला राष्ट्रीय अहंकार इतका प्रबल झाला आहे, कीं पाश्चिमात्य तत्त्वांचा आपण कितीहि व कसाहि अंगीकार केला तरी आपला आत्मप्रत्यय ढळण्याची कालत्रयीं शक्यता नाहीं. तेव्हां अशा स्थितींत लोकशाहीला अवश्य असें भौतिक अधिष्ठान आपल्या समाजाला प्राप्त करून देण्यांत कसलीहि हानि नाहीं, कसलाहि धोका नाहीं. धर्माचें अधिष्ठान बदलणें म्हणजे धर्माची अवहेलना करणें असा मुळींच अर्थ होत नाहीं. ऐहिक व्यवहारांतील प्रत्येक क्षेत्रांत पारमार्थिक मोक्षधर्माची, त्याच्या नियमनांची जी अप्रतिहत सत्ता चालत असे ती नाहींशी करून तेथलीं नियमनें इतिहास, अनुभव, प्रयोग, अवलोकन यांच्या साहाय्यानें निश्चित करणें एवढाच भौतिक अधिष्ठानाचा अर्थ आहे. भारताच्या प्राचीन व अर्वाचीन आध्यात्मिक वैभवाला यामुळें अणुमात्र धक्का लागण्याचें कारण नाहीं. उलट त्या अध्यात्मानें कारण नसतांना ऐहिकाची जी आतांपर्यंत हानि केली ती बंद झाल्यामुळें समाज त्याच्याकडे जास्तच आदरानें पाहूं

लागेल. भौतिक अधिष्ठानाचे पुरस्कर्ते पूर्वपरंपरेचा अभिमान धरीत नाहींत, तिला तुच्छ लेखतात हाहि समज भ्रामक आहे. या पंथांतील मार्क्सवादी लोकांची ती वृत्ति होती हें खरें आहे. पण एक तर रशियांतूनहि ती आतां समूळ नष्ट झाली आहे आणि दुसरें म्हणजे एका शाखेवरून सर्व तत्त्वज्ञानाचा अधिक्षेप करणें युक्त होणार नाहीं. प्राचीन आर्यत्व सोडावयाचें नाहीं हा तर आगरकरांचा बाणा होता. सुधारक पत्रांतील पहिल्या लेखांतच त्यांनीं त्याचा घोष केला होता. तेव्हां भौतिकवादासंबंधींची ती भीतिहि निर्मूल आहे हें जनतेनें ध्यानांत घ्यावें आणि निःशंक मनानें आपल्या लोकायत्त शासनास आवश्यक असलेल्या क्रांतीला पाठिंबा द्यावा.

या विचारानेंहि पुष्कळांचें समाधान होणार नाहीं. कारण अजूनहि समाजांतील बहुसंख्य लोकांच्या मनांत धर्मश्रद्धा अगदीं जाज्वल्य स्वरूपांत टिकून आहे. त्यांनीं हें ध्यानीं घ्यावें कीं, लोकशाहीएवढा श्रेष्ठ धर्म जगांत दुसरा नाहीं. प्रत्येक व्यक्तीची बुद्धि, तिचें मानसिक सामर्थ्य, तिचे हृदयाचे गुण, या सर्वांच्या म्हणजेच तिच्या व्यक्तित्वाच्या विकासाला अवसर देणें यापेक्षां जास्त उदात्त असें दुसरें काय आहे? प्रत्येक व्यक्तीला हक्कानें उद्योग व अन्नवस्त्र मिळावें हें तत्त्व दानधर्मापेक्षां जास्त श्रेष्ठ नाहीं काय? या गोष्टी आज सिद्ध झाल्या तर लोकशाहीच्या परिणतीनेंच होतील. पण आध्यात्मिक व पारमार्थिक धर्माचें वर्चस्व जर ऐहिक व्यवहारावर राहिलें तर मात्र या गोष्टी कालत्रयीं प्रत्यक्षांत येणार नाहींत. हें ध्यानांत येऊनच लो. टिळकांसारख्या हिंदुधर्म व भारतीय संस्कृति यांच्या कडव्या पुरस्कर्त्यांनें काँग्रेस डेमोक्रॅटिक पक्षाच्या जाहीरनाम्यांत धर्मनिरपेक्ष शासनाला मान्यता दिली होती. तेव्हां भौतिकवादाच्या आश्रयानें कोणत्याहि प्रकारची आध्यात्मिक, धार्मिक वा सांस्कृतिक अधोगति होण्याचा अणुमात्रहि संभव नाहीं हें जाणून भारतीय जनतेनें हें मन्वंतर घडवून आणावें. तसें केलें तरच भारतीय लोकसत्ता यशस्वी होऊन आपलें राष्ट्र बलशाली व वैभवशाली होऊं शकेल.

मानवाची प्रतिष्ठा, समता व भौतिक अधिष्ठान या तत्त्वांच्या प्रतिपादनानें व उपदेशानें राममोहन रॉय, रानडे, आगरकर यांनीं व त्यांच्या सहकाऱ्यांनीं भारतीय लोकसत्तेची पूर्वतयारी कशी केली, त्याचें येथवर विवेचन केलें. आतां लोकशाहीचें अगदीं आत्मीय क्षेत्र जे राजकारण तेथील कार्यांचा

विचार आपणास करावयाचा आहे. पहिल्या क्षेत्रांत जशी राममोहन, रानडे व आगरकर यांची नांवें डोळ्यापुढें उभीं राहातात, तशीं या क्षेत्रांत लो. टिळक, महात्मा गांधी व पंडित जवाहिरलाल नेहरू या थोर विभूतींचीं नांवें पुढें येतात. भारताच्या आपल्या आजच्या लोकसत्तेचे हे तीन शिल्पकार आहेत. यांपैकीं एकाचेंहि कार्य उणें केलें तर आपल्या लोकसत्तेचें मंदिर उभें राहूं शकणार नाहीं. म्हणून त्यांच्या कार्यांचा आपणांस साकल्यानें विचार करावयाचा आहे. त्यांपैकीं पहिले शिल्पकार, आपल्या लोकसत्तेचे मंत्रद्रष्टे जे लोकमान्य टिळक त्यांच्या दिव्य मंत्रांचें मनन व चिंतन करण्यास आतां आपण प्रारंभ करूं.

---

## प्रकरण पांचवें

# भारतीय लोकसत्तेचा आद्यप्रणेता

जगांतील एकंदर लोकसत्तेचा इतिहास लिहावयास जो कोणी इतिहासकार बसेल त्याला सर विन्स्टन चर्चिल यांना त्या इतिहासांत फार मोठें मानाचें स्थान द्यावें लागेल. याचें कारण अगदीं उघड आहे. हिटलरी दण्डसत्तेच्या आक्रमणांतून जगाला सोडविण्याचें महत्कार्य त्या पुरुषानें केलें आहे. त्याच्या अभावीं आज जगांतली सर्व लोकसत्ता नामशेष झाली असती आणि जग दण्डसत्तेच्या पाशवी सामर्थ्याला बळी पडून पुन्हां रानटी स्थितीप्रत पोंचलें असतें. जगावरची ही आपत्ति विन्स्टन चर्चिल यांनीं आपल्या महान् सामर्थ्यानें टाळली आहे आणि म्हणूनच जग त्यांचें ऋणी झालें आहे. हें जर खरें असेल, चर्चिल यांनीं लोकसत्तेची जी सेवा केली तीमुळें सध्यांचें जग त्यांचें ऋणी आहे हें जर आपण मान्य करणार असलों—आणि तें आपणांस मान्य केलेंच पाहिजे—तर यापुढचें जग भरतभूमीचे विख्यात सुपुत्र लोकमान्य बाळ गंगाधर टिळक यांचें त्याच्यापेक्षां दसपट, शतपट जास्त ऋणी राहील हें आपणांस मान्य करावें लागेल. कारण या भूमींतली लोकसत्ता

यशस्वी होण्यास ज्या एका व्यक्तीचे प्रयत्न सर्वांत जास्त कारणीभूत झाले आहेत ती व्यक्ति म्हणजे लो. टिळक हीच होय. आज हिंदुस्थानांत लोकायत्त शासन स्थिर करण्यांत, यशस्वी करण्यांत अल्पस्वल्प यश आलें आहे आणि पुढील वीसपंचवीस वर्षांत हा देश म्हणजे एक अत्यंत बलाढ्य लोकायत्त राष्ट्र होईल अशी आशा आहे. तसें झाल्यास जगांतल्या लोकशाहीला हा एक प्रचंड आधार निर्माण होईल. आज जगांत कम्यूनिझमच्या नांवाखालीं अत्यंत उग्र अशी दण्डसत्ता सर्वत्र प्रस्थापित होत आहे. तोच पायंडा पडला तर लोकशाहीच्या तत्त्वावर पुन्हां भयानक अरिष्ट आल्यावांचून राहणार नाहीं. अशा वेळीं भरतखंड हें जर एक प्रबल असें लोकसत्ताक म्हणून टिकून राहिलें तर जगाच्या इतिहासाला निराळें वळण लागेल. आपलें राष्ट्र ही एक प्रबल अशी लोकसत्ता घडविण्यांत आपल्याला यश येईल याविषयीं येथल्या नेत्यांना मुळींच संदेह नाहीं आणि येथील जनतेलाहि ती आशा वाटूं लागली आहे. आणि त्यामुळेंच जगाच्या इतिहासाला वळण लावण्याचें कार्य आपल्या हातून होईल असा आत्मविश्वास या भूमींत स्फुरण पावत आहे. जगाला लोकायत्त शासनाचें वळण लावण्याचें कार्य या भूमीला करतां आलें तर भावी जग पिढ्यान् पिढ्या तिचें ऋणी राहील आणि मग या महान् कार्याचें श्रेय, येथल्या लोकसतेचा ज्या महापुरुषानें सतत चाळीस वर्षें खपून भरभक्कम पाया घातला त्याच्या, म्हणजे लोकमान्य टिळकांच्या पायांवर वहाण्यास जग मोठ्या भक्तीनें तयार होईल.

## कोणच्या शक्तीची आराधना?

लो. टिळकांनीं १८८०।८१ च्या सुमारास सार्वजनिक कार्यास प्रारंभ केला. त्या काळच्या जगांतल्या भिन्नभिन्न राष्ट्रांतील कर्त्या पुरुषांच्या चरित्रांकडे आपण दृष्टि टाकली, त्यांनीं आपल्या देशांतील राजकारण कसें चालविलें हें पाहिलें आणि कोणच्या शक्तीच्या साहाय्यानें आपल्या देशांची उन्नति घडवून आणली याचा विचार केला म्हणजे टिळकांचें लोकोत्तरत्व, त्यांचें जगांतलें अद्वितीय स्थान व लोकसत्तेची त्यांनीं जी सेवा केली तिचें महत्त्व आपल्या ध्यानीं येईल. जर्मन राष्ट्र त्या वेळीं संघटित होऊन नुकतेंच उदयास येत होतें. १८७० सालीं त्यानें फ्रान्सचा पराभव करून राष्ट्रीय

संघटनेचें कार्य पूर्ण करीत आणलें होतें आणि त्यानंतर पुढील ४०।५० वर्षे त्या राष्ट्राचा सारखा उत्कर्ष होत राहिला. या उत्कर्षाचें श्रेय बव्हंशीं त्या देशांतील राजाचे वज्रबाहु प्रधान प्रिन्स बिस्मार्क यांना देण्यांत येतें आणि तें युक्तच आहे. पण आपल्यापुढें प्रश्न असा आहे कीं, स्वदेशाचा हा अभ्युदय बिस्मार्क यांनीं कोणच्या शक्तीच्या साहाय्यानें घडवून आणला? राजा व त्याचें सैन्य हीच शक्ति बहुतेक सर्व देशांत प्रधान असते. जमीनदार, सरंजामदार ही दुसरी शक्ति होय. राजा दुबळा असेल तर देशांत हिचेंच वर्चस्व असतें. तिसरी अर्वाचीन काळांत निर्माण झालेली शक्ति म्हणजे भांडवल ही होय. तिचेंच कमीअधिक प्राबल्य आज जगांतील बहुतेक देशांत आहे. यानंतर एक शक्ति राहिली. कष्टाळू जनता, शेतकरी, कामकरी ही ती शक्ति होय. गेल्या शतकाच्या प्रारंभापर्यंत हा वर्ग म्हणजे एक शक्ति आहे हेंच कोणाला मान्य नव्हतें. कार्लमार्क्सनें जगांतल्या या अजिंक्य व अतुल शक्तीला आवाहन करून तिला जागृत केलें व तिच्या ठायींचा आत्माहंकार प्रदीप्त केला. आज जगांत असा एकहि देश नाहीं कीं जेथें या शक्तीचें अधिराज्य तत्त्वतः अमान्य आहे. बिस्मार्कच्या वेळीं या शक्तीच्या अस्तित्वाची, प्रभावाची व भवितव्याची जाणीव पश्चिम युरोपांतील सर्व देशांना झाली होती. इंग्लंडमध्यें या शक्तीचा प्रभाव कांहींसा दिसूंहि लागला होता. तेथले वारे त्या दिशेनें वाहूं लागले होते. असें असूनहि बिस्मार्कनें त्या शक्तीची उपासना करण्याचें मनांतहि आणलें नाहीं. राजा, लष्कर, जमीनदार याच शक्तीचा त्यानें आश्रय केला व स्वदेशाची उन्नति घडवून आणली. लोक, जनता, समाज या शक्तीला त्यानें आवाहनच केलें नाहीं. तेंच धोरण बिस्मार्कनंतरच्या सर्व जर्मन नेत्यांनीं अवलंबिलें आणि म्हणूनच जर्मनींत लोकसत्ता मूळहि धरूं शकली नाहीं. जर्मनीच्या शेजारचें राष्ट्र इटली. तेथेंहि वीस वर्षांपूर्वी हाच प्रकार घडून आला. तेथील राष्ट्रनायक काव्हूर यांनीं ‘ जनता ’ या शक्तीची उपसना केली नाहीं. मॅझिनी हा लोकसत्तेचा व म्हणून जनशक्तीचा कट्टा उपासक होता हें खरें पण ती जनशक्ति प्रत्यक्ष संघटित करून राष्ट्राचें स्वातंत्र्य परत मिळविण्याच्या कार्यांत दुर्दैवानें त्याला यश आलें नाहीं. राष्ट्रीय स्वातंत्र्य मिळालें तें काव्हूरनें ज्या राजशक्तीचा आश्रय केला व ज्या सरदार जमीनदारांनीं त्याला साह्य

केलें, त्यांच्या सामर्थ्यानें आणि म्हणूनच मिळालेलें स्वातंत्र्य त्याच शक्तीच्या ताब्यांत राहिलें. १८७० नंतर इटलींत कांहीं मर्यादित स्वरूपांत लोकसत्ता सुरू झाली, पण तिला पायाच नव्हता. कारण 'लोक' ही शक्ति तेथें कोणी जागृत केली नव्हती आणि म्हणूनच इटलींत लोकसत्ता यशस्वी होऊं शकली नाहीं. ज्या शक्तीनें स्वातंत्र्य मिळविलें तिनेंच तें आपल्या ताब्यांत ठेविलें. आतां इटलींत ही शक्तिहि जर्मनीप्रमाणें संघटित नसल्यामुळें त्या देशांत लोकसत्ता तर नाहींच पण कोणचीच शासनसंस्था प्रबळ होऊं शकली नाहीं; पण तो भाग निराळा. आपणांस लक्षांत घ्यावयाचें तें हें कीं, ब्रिटन अमेरिकेचें उदाहरण डोळ्यांसमोर असून, मार्क्सप्रणीत आंदोलनें जोरानें उसळत असून जर्मनी व इटली या देशांतील नेत्यांनीं देशांतील खरी शक्ति, स्वतःच्या भूमीचा खरा आत्मा, तेथलें खरें चैतन्य जागृत करण्याचा प्रयत्नहि केला नाहीं. इतकेंच नव्हे तर त्या चैतन्याचा त्यांनीं तेजोभंगच केला आहे. लोकशाहीचें मूलभूत तत्त्वज्ञानच या धुरीणांना मान्य नव्हतें.

## जपान

त्याच काळांत उदयास आलेलें तिसरें राष्ट्र म्हणजे जपान. या देशांत मेजी युगाचा १८६७ ते १९१२ हा काल अत्यंत उज्ज्वल असा होता. अनेक शतकें अंधारांत घोरत पडलेल्या या राष्ट्रानें ४०।५० वर्षांत जी प्रगति केली ती केवळ अपूर्व होती. तेथील सरदारवर्ग व सामुराई हा लढाऊ वर्ग यांनीं जो त्याग केला तो निस्तुळ असाच होता. या युगांत प्रारंभीं ज्या सुधारणा झाल्या त्या लोकशाहीला व जनशक्तीच्या वाढीला पोषक अशाच होत्या. जन्मनिष्ठ उच्चनीचता सम्राटाच्या एका आज्ञापत्रानें नष्ट करण्यांत आली. ज्ञानावरील निर्बंध एकदम दूर करण्यांत आले. परदेशगमनास उत्तेजन देण्यांत आलें. अनेक जुन्या घातक रूढी नष्ट करण्यांत आल्या आणि याच दिशेनें प्रगति झाली असती तर जपानमध्यें जनशक्ति जागृत झाली असती. पण जपानमध्यें टिळक किंवा महात्माजी हे जन्मास आले नाहींत. तेथील नेत्यांना, आरंभींच्या उदारमतवादी नेत्यांनाहि राष्ट्रांतील खऱ्या शक्तीचा, जनता या शक्तीचा अवगम झाला नाहीं. तिचें

महत्त्व ते जाणूं शकले नाहींत. खरें चैतन्य कोठें आहे हें कळण्याइतकी दिव्यदृष्टि त्यांना नव्हती. त्यामुळें राजा, सैन्य, जमीनदार, भांडवलदार याच शक्ति तेथें जोरावल्या. जपानी नेत्यांनीं आपली शासनसंस्था जर्मनीच्या नमुन्यावर उभारली आणि व्यक्तिस्वातंत्र्य, मुद्रणस्वातंत्र्य यासाठीं निर्माण झालेल्या चळवळी दडपून टाकल्या. ओकुबा व किडो या दोन थोर पुरुषांनीं लोकसत्तेची चळवळ रूपाला आणली होती, पण त्यांचे खून करण्यांत आले आणि तेव्हांपासून जपानमध्यें भांडवली लष्करशाहीचा अंमल सुरू झाला. सत्सुमा, चोशीयु अशा एकदोन धनसंपन्न घराण्यांच्या हातीं राजसत्तेचीं सर्व सूत्रें गेलीं आणि थोड्याच अवधींत जपानवर पूर्ण अनियंत्रित अशी सत्ता प्रस्थापित झाली. याच्याच जोडीला अंध व अतिरेकी राजनिष्ठा व पूर्वजपूजा यांचें तत्त्वज्ञान जपानमध्यें पसरलें आणि तेथील सामान्य जनता प्रज्ञाहत होऊन व्यक्तिस्वातंत्र्याचा विचारहि विसरून गेली.

## चीन

चीनचे राष्ट्रपुरुष डॉ. सन्यत्सेन यांची गोष्ट जरा निराळी असली तरी त्यांच्या प्रारंभींच्या चळवळींचें सूत्र जनशक्तीची उपासना हें नव्हतें. आयुष्याच्या उत्तरकालीं ते लोकसत्तेचे कट्टे पुरस्कर्ते झाले, पण प्रारंभीं क्रान्ति घडवून आणण्यासाठीं त्यांनीं देशांतील लष्करी बळाचाच उपयोग केला होता. त्यांची चळवळ ही गुप्त कट, खून, दहशत या मार्गानें जाणारी असून राजसत्तेविरुद्ध त्या राजसत्तेची सेनाच उठवून द्यावी असा या क्रान्तिकारकांचा प्रयत्न होता. तो १९११ सालीं यशस्वी झाला आणि राजसत्ता उलथून पडली. पण ही क्रान्ति म्हणजे लष्करकृत क्रान्ति होती. लोककृत नव्हती आणि त्यामुळेंच क्रान्तीनंतर सर्वत्र बेबंदशाही माजली. सर्वत्र सरदार, जमीनदार व लष्करशहा यांचें राज्य सुरू झालें. देशामध्यें लोक, जनता ही खरी शक्ति असून लष्कर ही खरी शक्ति नव्हे, हे डॉ. सन यांनीं प्रथम ध्यानीं घरलें नव्हतें. निदान त्या दिशेनें त्यांनीं प्रयत्न केले नव्हतें हें निश्चित. त्यामुळेंच ते क्रान्तीनंतर लगेच फशी पडले. ज्या लष्करी शक्तीनें स्वातंत्र्य हें फल मिळविलें होतें तिनें तें आपल्याच ताब्यांत ठेवलें आणि संघटनेच्या अभावीं ती शतधा भिन्न होतांच देशाचीहि तितकीच

शकलें झाली. १९२१ नंतर डॉ. सन्यत्सेन यांनी आपल्या कुओमिंटांग पक्षाची पुन्हां संघटना केली व तेव्हांपासून मात्र त्यांनी देशांतल्या खऱ्या शक्तीला आवाहन करण्यास प्रारंभ केला होता. पण १९२५ साली ते कालवश झाले आणि त्यांचा वारसा चिआंग कैशेक या लष्करशहाकडे गेला.

## लोकशक्ति—टिळकांची दिव्यदृष्टि

१८६० ते १९२० या कालांतील जगांतील उदयोन्मुख राष्ट्रांच्या नेत्यांचें ध्येयधोरण काय होतें तें आपण येथवर पाहिलें. त्यांपैकीं कोणींहि आपल्या भूमींतील खऱ्या शक्तीची उपासना केली नव्हती. किंबहुना दीन, हीन, अज्ञ, दरिद्री, मुकी अशी भोंवती पसरलेली जी जनता तिच्यांतून कांहीं एक अद्‌भुत सामर्थ्य निर्माण होऊं शकेल हें आकलनच त्यांना झालें नव्हतें. या शक्तीचें दर्शन व्हावें अशी दिव्यदृष्टि त्यांना प्राप्तच झाली नव्हती. भरतभूमीचें अलौकिक भाग्य हें कीं तिच्या एका सुपुत्राला जनशक्तीच्या या सुप्त सामर्थ्याचें दर्शन प्रारंभापासूनच घडत होतें आणि या ध्रुव-ताऱ्यावरून त्याची दृष्टि शेवटपर्यंत कधींहि विचलित झाली नाहीं. केसरीच्या दुसऱ्या वर्षाच्या एप्रिल—मे च्या अंकांतच देशांतल्या खऱ्या शक्तीचा निर्देश टिळकांनीं केला आहे. ते म्हणतात, ‘इतक्या दिवसांच्या गाढ निद्रेतून अंमळ डोळे उघडून पहाण्याची मनीषा आम्हांला होऊं लागली आहे; परंतु सार्वलौकिक मत म्हणून जो एक नियामक अद्‌भुत उपाय आहे—ज्याला जुलमी राजे व अहंपणाचा तोरा बाळगणारे मंत्रीहि भितात—तशा तऱ्हेचें मत आपल्यामध्यें अजून उत्पन्न होऊं लागलें नाहीं.’ राजसत्तेला जो शह द्यावयाचा तो दहशतवादानें किंवा देशांत असलेल्या सैन्याच्या बळानें द्यावयाचा नसून लोकमतानें द्यावयाचा, हें या वेळेपासूनच टिळकांचें ठरीव धोरण आहे. ‘लोकांचा धाकवचका नसल्यामुळें राजे प्रजेस पीडा-दायक होतात’ असें सांगून ‘स्वदेशभक्तिजन्य जुटीनेंच हा धाकवचका राजांना बसेल’ असें ‘जूट’ या निबंधांत त्यांनीं सांगितलें आहे. १९०१ सालीं शेतकऱ्यांचा जमिनीवरचा हक्क नष्ट करण्याचा एक प्रस्ताव सरकारनें संमत करून घेतला. त्या वेळीं, आमचें लोकमत निर्बल असल्यामुळेंच हें घडूं शकतें, असें टिळकांनीं लिहिलें. त्या वेळीं त्यांनीं सैन्याला, सरदार

वर्गाला किंवा दहशतवादी क्रांतिकारकांना चिथावणी दिली नाहीं. त्या शक्तींना आवाहन केलें नाहीं. जनशक्ति जागृत नसतांना सैन्य हें सामर्थ्य आहे, असें टिळकांच्या स्वप्नांतसुद्धां कधीं आलें नाहीं. ‘ आमचें लोकमत दुर्बल आहे, सरकारवर पगडा बसविण्याइतकें सामर्थ्य त्याच्यांत नाहीं. तेव्हां तें लोकमत जागृत केलें पाहिजे ’ हा टिळकांचा महामंत्र होता. ( केसरी २७।८।१९०१ ) यानंतरच्या काळांतहि सरकार ज्या ज्या वेळीं अत्यंत जुलमाचें व दडपशाहीचें कृत्य करी त्या त्या वेळीं टिळकांनीं याच शक्तीला आवाहन केलेलें आहे. बंगालच्या फाळणीच्या वेळीं त्यांनीं याच शक्तीला उधान आणून तिला संघटित करण्याचा प्रयत्न केला. ‘ सरकार लाखों लोकांच्या मताला काडीइतकीहि किंमत देत नाहीं. या गोष्टीचा प्रतिकार करण्याचा कांहीं मार्ग आम्हीं काढला नाहीं तर लोकांचा चळवळीवरचा विश्वास उडून जाईल. तेव्हां हें लोकमत जागृत करणें, हें पुढाऱ्यांचें काम आहे. हल्लींचें लोकमत अळणी आहे. त्याचा हा अळणीपणा कसा घालवावा हा महत्त्वाचा प्रश्न आहे. ’ ‘ लोकमताचा प्रवाह समुद्रास मिळविण्याची खटपट आम्हीं केली नाहीं तर आमचा देशाभिमान व वक्तृत्व सर्व व्यर्थ होय. ’ असें व या तऱ्हेचें प्रतिपादन केसरींत त्यांनीं सारखें चालू ठेविलें होतें. ( केसरी १५–८–१९०५ )

स्वातंत्र्यप्राप्ति किंवा राष्ट्रीयसंघटना यासाठीं उपरिनिर्दिष्ट काळांत जगांत जे देश प्रयत्न करीत होते, त्यांपैकीं एकाहि देशांतील नेत्यानें, ब्रिटनचें उदाहरण डोळ्यांसमोर असूनहि, आपल्या देशांतील खऱ्या सामर्थ्याचा ठाव घेतला नाहीं, खऱ्या शक्तीला जागृत करण्याची आस धरली नाहीं. सर्व बळांत श्रेष्ठ असें जें जनताबळ त्याची उपासना त्यांनीं कोणी केली नाहीं. जगांत सर्वत्र असा अंधेर असतांना हिंदुस्थानची स्थिति तरी काय होती ? प्रारंभींच्या लेखांत सांगितलेंच आहे कीं, येथें आधीं लोकायत्त शासनाच्या परंपरा निर्माणच झाल्या नव्हत्या आणि कधींकाळीं झाल्या असल्या तर त्या निपटून नाहींशा झाल्या होत्या. ब्रिटिशांचा अंमल येथें स्थिरावल्यानंतर येथें स्वातंत्र्यप्राप्तीचा एक मोठा प्रयत्न झाला आणि तो म्हणजे १८५७ सालचा. तो सर्व प्रयत्न पूर्णपणें जुन्या पठडींतला, जुन्या चाकोरींतला होता. सरदार, संस्थानिक, जमीनदार हेच त्याचे प्रणेते होते. जनता त्यांत असली तर ती

मूक, अंध, अज्ञ अशी अनुचर म्हणून होती. तशी ती जगाच्या प्रारंभापासून प्रत्येक संग्रामांत आहेच. बळी जाणें एवढेंच तिचें दरवेळीं कार्य असे. तसें तें या वेळींहि होतें. तो संग्राम जनतेचा नव्हता. जनता हें सामर्थ्य त्यावेळीं प्रगटच झालें नव्हतें. या संग्रामाची सर्व कल्पना, त्याची योजना, त्याचें नेतृत्व व त्याचें सूत्रचालकत्व, सर्वच्या सर्व नानासाहेब, कुमारसिंह, अयोध्येचे नबाब यांच्या हातीं होतें. त्याचा आरंभ, मध्य व पर्यवसान त्यांच्याच हातून व्हावयाचें होतें व तसें झालेंहि. सर्वसाधारण अज्ञ जनतेला या संग्रामांत कसलेंच आकर्षण नव्हतें. हा संग्राम तिच्यासाठीं आहे किंवा तिच्या सामर्थ्यानें तो चालावयाचा आहे, अशी कोणाचीच कल्पना नव्हती. 'आपण म्हणजे एक महाशक्ति आहों' अशी अस्फुटसुद्धां जाणीव जनतेला नव्हती. स्वातंत्र्यानंतर पुन्हां पूर्वीप्रमाणेंच अंदाधुंदी चालू होईल, असा धसकाच जनतेला होता. तो संग्राम फसला त्याचें कारण हेंच होय असें स्वतः सावरकरांनींच म्हटलें आहे. (सत्तावन्नचें स्वातंत्र्य-समर पृ. ५६४) असो. तात्पर्यार्थ असा कीं टिळकांच्या पूर्वी या देशांत इतर देशापेक्षांहि निकृष्ट स्थिति होती. तेथें लोकसत्तेचे नाहीं पण निदान राष्ट्रीय संघटनेचे तरी प्रयत्न होते. येथल्या स्वातंत्र्ययुद्धांत तेहि नव्हते. अशा सर्व अंधेऱ्या अवस्थेंत जग असतांना हिंदुस्थानसारख्या एका मागासलेल्या देशांत टिळकांनीं 'जनता' याच नेमक्या शक्तिदेवतेस आवाहन करावें यांतच त्यांचें लोकोत्तरत्व, त्यांची कालज्ञता व त्यांची सर्वगामी दिव्यदृष्टि यांचें प्रत्यंतर येतें. सध्यां क्रान्तीच्या उत्तर काळांत, स्वातंत्र्यप्राप्तीनंतर या देशांत लोकसत्ता यशस्वी होण्याचा संभव निर्माण झाला आहे. इतर देशांत जुनी सरंजामशाही नष्ट करण्याचे भगीरथ प्रयत्न लोकांना करावे लागले तरी अजूनहि कित्येक ठिकाणीं ती जीव धरून आहे. या देशांत एका वर्षाच्या आंत ती नामशेष झाली. जनता जागृत झालेली नसती तर हें कालत्रयीं शक्य झालें नसतें. भोपाळकर, कोल्हापूरकर, इंदूरकर—सर्वसर्व नमले ते मेनन यांना किंवा वल्लभभाईंना नमले नाहींत. त्यांच्या मागच्या विराट जनतेपुढें ते नमले. भांडवलशाही अजून येथें मग्रूरपणें वागत आहे. तिची पकड अजून ढिली होत नाहीं. तरी तिलाहि लवकरच नेस्तनाबूत करतां येईल, असा आत्मविश्वास येथील नेत्यांना व जनतेला वाटत आहे. या सर्वांचें श्रेय १८८१।८२ सालीं

टिळकांनीं केसरीच्या गर्जना करून या देशांतील महाशक्तीला जें आवाहन केलें त्याला आहे हें कोणाच्याहि सहज ध्यानांत येईल. हिंदुस्थानचें भाग्य असें कीं टिळकांच्या मागून या दिव्यशक्तीची उपासना पुढें चालविण्यास महात्माजींसारखा अलौकिक उपासक येथें जन्मास आला आणि आज पंडित जवाहिरलाल नेहरूहि त्याच सामर्थ्याच्या साह्यानें पुढें पाऊल टाकीत आहेत. सन्यत्सेननंतर चीनमध्यें जसा चिआंग कैशेक प्रबळ झाला तसा कोणी दंडसत्ताधर येथें टिळकांच्या मागून आला असता तर त्यानें कांहीं काल तरी त्यांचें कार्य शून्यवत् करून टाकलें असतें. पण तो सर्व पुढचा इतिहास आहे. सध्यां आपणांस टिळकांचें कार्य पहावयाचें आहे.

लोकमान्यांचा हिंदुस्थानांत कमी गौरव झाला असें नाहीं. पण आतांपर्यंत 'हिंदी असंतोषाचें जनक' 'भारतीय स्वातंत्र्याचे उद्गाते' याच पदव्यांनीं आपण त्यांना गौरविलें आहे; पण याचबरोबर लोकशाहीची त्यांनीं जी सेवा केली तिच्याकडे द्यावें तितकें लक्ष आपण दिलेलें नाहीं. इतके दिवस ही उपेक्षा कांहीं अंशीं क्षम्य असली तरी, आतां आपली लोकशाही कशी यशस्वी करावी याचें आपण चिंतन करीत असतांना या भूमींतल्या लोकसत्तेच्या त्या आद्यप्रणेत्याच्या प्रयत्नांचा आपण अभ्यास न करणें आत्मघातकीपणाचें होईल. या दृष्टीनें आपण विचार केला तर आपणांस असें दिसून येईल कीं, टिळकांनीं आपलें शक्तिसर्वस्व ही भरतभूमि लोकसत्ताक व्हावी यासाठीं खर्च केलें आहे. त्यांच्या जीवितांचें अंतिम ध्येय केवळ स्वातंत्र्य हें नसून लोकसत्ताक स्वातंत्र्य हें होतें. या धोरणाला अनुसरूनच त्यांनीं स्वातंत्र्याचे मार्ग आंखले होते आणि संघटना उभारल्या होत्या. त्यांचें ध्येय, त्यांचे मार्ग, त्यांच्या निष्ठा व त्यांचे प्रयत्न यांचा आपण अभ्यास केला, तर पौर्वात्य जगांत लोकमान्यांच्या एवढा लोकायत्त शासनाचा निःसीम व समर्थ पुरस्कर्ता कोणीहि झाला नाहीं, हें आपल्या सहज ध्यानीं येईल व आपल्या सध्यांच्या खडतर मार्गक्रमणाच्या काळीं त्यांनीं पाजळून ठेवलेल्या नंदादीपाचा प्रकाश क्षणभरहि मंदावूं द्यावयाचा नाहीं असा आपण निश्चय करूं. यासाठींच तो अभ्यास आतां करावयाचा आहे.

## ' स्व ' म्हणजे लोक

टिळकप्रणीत लोकसत्तेचें जें तत्त्वज्ञान आपणांस अभ्यासावयाचें आहे, त्यांतील पहिलें तत्त्व म्हणजे, लोकसत्ता व स्वातंत्र्य यांचें अद्वैत हें होय. स्वतंत्रराष्ट्र म्हणजे लोकसत्ताक राष्ट्र असाच त्यांच्या हिशेबीं अर्थ होता. पश्चिमेंतील लोकसत्तेच्या पुरस्कर्त्यांचा मुकुटमणि जो जोसेफ मॅझिनी त्याचेंहि हेंच तत्त्व होतें. इटलीचें स्वातंत्र्य म्हणजे लोकसत्ताक स्वातंत्र्य असाच त्याच्या मनांत अर्थ होता. दुर्दैवानें, मागें सांगितल्याप्रमाणें त्याची ती मनीषा पुरी झाली नाहीं. गॅरीबॉल्डी, काव्हूर या थोर पुरुषांच्या प्रयत्नानें इटलीला स्वातंत्र्य प्राप्त झालें पण तें राजसत्तेच्या अंकितच राहिलें. त्यामुळें इटली स्वतंत्र झाला हें मॅझिनीला कधींच मान्य झालें नाहीं. लो. टिळकांची हीच भूमिका होती. ९ एप्रिल १९०७ च्या ' स्वराज्य व सुराज्य ' या लेखांत ते म्हणतात "नुसता स्वदेशी राजा असला, कीं सर्व कांहीं कार्यभाग होत नाहीं. राजा स्वदेशस्थ कीं परदेशस्थ या प्रश्नापेक्षां प्रजेच्या हातांत सत्ता किती हा प्रश्न अधिक महत्त्वाचा होऊन बसला आहे. स्वराज्य-प्राप्तीकरितां झटा असें जेव्हां आम्ही लोकांस सांगतों, तेव्हां याच अर्थानें स्वराज्य शब्दाचा उपयोग करतों. ' स्व ' म्हणजे ज्याचा तो किंवा एकंदर लोक किंवा प्रजा आणि त्यांचें म्हणजे त्यांच्या सल्ल्यानें चालणारें राज्य तें स्वराज्य. या अर्थानें रशियांतील राज्य सुराज्य असलें तरी तें स्वराज्य नव्हे, असें म्हणावें लागेल. हिंदुस्थानांतील नेटिव्हसंस्थानांचें राज्यहि खरें स्वराज्य नव्हे. जर्मनीचें उदाहरण असेंच आहे. जर्मन बादशहा कांहीं परके नाहींत. जर्मन राष्ट्राचा व्यापार, संपत्ति व बोज वाढावा म्हणून ते नेहमीं प्रयत्न करीत असतात. तथापि त्यांच्या प्रजेपैकीं बऱ्याचजणांस ही व्यवस्था सुखकारक वाटत नाहीं व त्यामुळें राज्यकारभार आपल्या तंत्रानें चालेल अशा प्रकारची राज्यव्यवस्था करून घेण्यास ते झटत आहेत. जर्मनींतील सोशॉलिस्टांच्या चळवळीचें समर्थन याच दृष्टीनें केलें पाहिजे." हें सर्व सांगून पुढील भविष्यहि त्यांनीं वर्तवून ठेविलें आहे. ' जगांत शिक्षणाचा अधिक फैलाव झाल्यावर प्रजासत्ताक राज्याखेरीज खरें स्वराज्यच नव्हे असें म्हणण्यापर्यंत लोकांची मजल येऊन ठेपेल."

## लोक शब्दाची व्याप्ति

वरील उताऱ्यांतून लोकांची सत्ता, प्रजेचे हक्क, लोकांचें सुख असा उल्लेख वारंवार आढळतो. त्यांतील 'लोक' या शब्दाची टिळकांच्या मनांत काय व्याप्ति होती असा एक प्रश्न उपस्थित होतो. कारण हा शब्द वापरणारे लोक पुष्कळ वेळां जनतेची दिशाभूल करीत असतात. 'सर्व लोक' या अमेरिकेच्या स्वातंत्र्याचा जाहीरनाम्यांतील शब्दांत निग्रोंचा समावेश मुळींच होत नव्हता. पेरिक्लीज जेव्हां ग्रीक लोकशाहीचा अभिमानानें उल्लेख करी तेव्हां त्याच्या 'लोक' या शब्दांत अथेन्सच्या एकदशांश नागरिकांचाच समावेश होत असे. सोव्हिएट रशियांत सर्वांना मुद्रणस्वातंत्र्य मिळेल असें म्हणून प्रवदा पत्रानें पुढल्याच वाक्यांत कम्युनिस्ट पार्टीच्या विरोधकांना कागदाचा एक कपटाहि मिळणार नाहीं असें सांगून टाकल्याचें आपण पाहिलें आहे. टिळकांच्या मनांतहि अशीच फसवणूक असेल असें गृहीत धरून टीकाकारांनीं 'लोक' या शब्दाची टिळकांची विवक्षा अगदीं मर्यादित होती असा अभिप्राय दिला आहे. इंग्रजांनीं तसा प्रचार चालविला होता; सायमन कमिशननें तर महात्माजींच्या चळवळीवरहि तसाच शेरा मारला होता. पण यांत कांहीं नवल नाहीं. नवल आहे तें हें कीं, पामीदत्त नांवाच्या एका हिंदी गृहस्थानेंहि आपल्या 'इंडिया टुडे' या नांवाच्या पुस्तकांत अशीच टीका केली आहे. 'टिळकांच्या नेतृत्वानें चाललेल्या राष्ट्रीयपक्षाचें आवाहन कनिष्ठ मध्यम वर्गापर्यंतच गेलें होतें. शेतकरी, कामकरी वर्गापर्यंत त्याची गति नव्हती. या पक्षाच्या नेत्यांना अर्वाचीन दृष्टि नव्हती. ती असती तर त्यांनीं या कनिष्ठ वर्गाची संघटना केली असती. खरें म्हणजे या राष्ट्रीय पक्षाच्या नेत्यांजवळ शास्त्रशुद्ध असें कोणतेंच राजकीय तत्त्वज्ञान नव्हतें. जुनाट धर्माच्या व लोकभ्रमाच्या पायावर राष्ट्रीय चळवळ उभारण्याचा त्यांचा प्रयत्न होता.' असा पामीदत्तांनीं अभिप्राय दिला आहे. याहिपेक्षां विस्मयजनक गोष्ट अशी कीं कित्येक काँग्रेसभक्तांतहि हा समज रूढ आहे. १९२० सालानंतरच्या नव्हे तर त्या आधींच्या केसरीवरहि तो जमीनदार, सावकार, संस्थानिक, वरिष्ठवर्ग यांचा पक्षपाती होता, वरिष्ठ वर्गाचें वर्चस्व

त्याला टिकवावयाचे होतें, असे आरोप कोणी कोणी केले आहेत. काँग्रेस हीच खरी टिळकांची वारसदार आहे, असें अभिमानानें सांगणाऱ्या लोकांतहि हा समज असावा हें टिळकांचें नव्हे तर जनतेचें दुर्दैव होय.

तें कसेंहि असो. हा समज अत्यंत भ्रामक आहे. लोक किंवा जनता या शब्दाचा जेवढा व्याप आज आपल्या मनांत आहे, तेवढा सर्व व्याप टिळकांच्या मनांत अगदीं आरंभापासून शेवटपर्यंत, म्हणजे १८८० सालापासून १९२० पर्यंत, सतत अविचलित अशा स्थितींत होता. या पदाच्या व्याप्तीविषयीं त्यांच्या मनांत कधीं अणुमात्रहि संदेह आलेला दिसत नाहीं. केसरीचे पहिल्या पंचवीस वर्षांचे अंक पाहिले तर मजूर, काबाडकष्ट करणारे लोक, शेतकरी, कारागीर, कोष्टी, साळी, माळी, भिल्ल, कातवडी यांची चिंता, त्यांच्या हिताची जपणूक, त्यांच्या उन्नतीची काळजी ही पानापानावर लिहिलेली आपणांस दिसेल. (केसरीचे पुढील अंक पहा. २–२–९२, ६–१२–९२, २४–१–९३, ४–७–९३, १०–४–९४, १८–९–९४, ८–८–९९, मार्च ते जुलै १९०० बहुतेक अंक, जून ते सप्टेंबर १९०१ बहुतेक अंक, ११–११–१९०२, ६–८–१९०७) हे लोक म्हणजेच जनता, हे लोक म्हणजेच देश हा विचार प्रथम केसरीनेंच अट्टाहासानें सांगितला आहे. 'समाइकीनें उभारलेल्या भांडवलाचे कारखाने' या केसरीच्या पहिल्या वर्षी लिहिलेल्या लेखांत संपादक म्हणतात 'देश सधन असो कीं निर्धन असो, जित असो वा अजित असो, लोकसंख्येच्या मानानें हलक्या दर्जाचे म्हणजे काबाडकष्ट करून निर्वाह करणारे लोकांची संख्या जास्त असावयाची. याकरितां या समाजाची स्थिति जोंपर्यंत सुधारली नाहीं, तोंपर्यंत देशस्थिति सुधारली असें कधींहि म्हणतां येणार नाहीं.' या वचनावरून प्रारंभापासूनच केसरीकारांची दृष्टि कोणाकडे होती तें दिसून येईल. आणि पुढील लेख वाचल्यावर या खऱ्या जनतेचा टिळकांना कधींच विसर पडला नव्हता, किंबहुना तेंच त्यांचें अचल असें लक्ष्य होतें याविषयीं शंका उरणार नाहीं. 'मध्यमवर्गीय सुशिक्षितांनीं या लोकांच्या झोंपडींत जाऊन त्यांच्यांत मिसळून त्यांची स्थिति सुधारण्याचे प्रयत्न केले पाहिजेत' असा तरुणांना ते सारखा उपदेश करीत असत. 'समाजाहून सुशिक्षितांचा वर्ग निराळा समजण्याइतकें मौर्ख्य

कशांतहि नाहीं. शिकलेले लोक समाजाचे व समाजांतलेच आहेत. समाज तरला तरच ते तरतील, समाजाला सोडून त्यांचें कांहींहि चालावयाचें नाहीं,' असें त्यांनीं नवशिक्षितांना बजावून सांगितलें आहे. (केसरी ८–९–९६). १८९६ सालच्या राष्ट्रीय सभेच्या अधिवेशनापूर्वी त्यांनीं राष्ट्रसभेला एक नवा संदेश दिला. 'अकरावी राष्ट्रीय सभा' या लेखांत (७–१–९६) ते म्हणतात, 'राष्ट्रीय सभेस पुढील दहा वर्षांत जें वळण द्यावयाचें तें अशा धोरणानें दिलें पाहिजे कीं, ज्यामुळें सभेस शेतकरी, कारागीर वगैरे लोकांचें साह्य मिळून तिचे ठराव अमलांत येण्यास ते मदत करतील.' हिंदी राष्ट्र व शेतकरी आणि कामकरी यांच्यांतील हाच अभेद, हेंच अद्वैत त्यांनीं १४–१–१९०२ च्या लेखांत मांडलें आहे. 'हिंदुस्थानची खरी स्थिति पहावयाची असेल तर शहरें पाहून उपयोग नाहीं. खेड्यांतील शेतकऱ्यांची किंवा मजुरांची स्थिति पाहिली पाहिजे.' असा विचार त्यांनीं मांडला आहे आणि या जनतेची सेवा करणें हेंच आपलें जीवितकार्य होय अशी निःसंदिग्ध शब्दांत त्यांनीं घोषणा केली आहे. 'हिंदुस्थान ही आमची मातृभूमि आणि देवता, हिंदुस्थानवासी हेंच आमचें बंधुत्वाचें नातें व त्यांची राजकीय व सामाजिक स्थिति सुधारण्याचा एकनिष्ठपणें प्रयत्न करणें हाच आमचा धर्म.' (केसरींतील लेख, खंड १ ला पृ. २५९)

लोकसत्ता, लोकांचें राज्य, लोकांचें सुख या शब्दांतील 'लोक' या पदार्थी टिळकांच्या मनांत कोणची व्याप्ति होती हें यावरून कळेल. त्यांच्या मनांत कांहीं अन्यथा भाव असता, सरदार, जमीनदार, संस्थानिक यांचे ते पक्षपाती असते तर त्यांनीं त्यांची संघटना करण्याचे प्रयत्न केले असते. ज्याला मिरासदारी प्रिय व लोकसत्ता अप्रिय असते त्याची मुख्य चिंता ही असते कीं, कष्टजीवी जनता जागृत होऊं नये, शहाणी होऊं नये, तिला आपल्या हक्कांची जाणीव होऊं नये. आणि या जनतेला जागृत करण्यासाठीं तर टिळकांनीं आपलें सर्वस्व वेंचलें, हें पुढें दिलेल्या इतिहासावरून सहज दिसून येईल. आतां सावकार, जमीनदार, संस्थानिक या वर्गांशीं त्यांनीं वैर धरलें नाहीं, किंवा त्यांच्यावर अन्याय होईल तेव्हां त्यांची कड घेऊन त्यांनीं लिहिलें हें खरेंच आहे; पण यांत वावगें तें काय आहे ? चीनमधील मा ओ-

त्सि टंगचें हेंच धोरण आहे. ( अन्फिनिशड् रेव्होल्यूशन इन् चायना. पृ. २०३ ) मूळ जनता ही शक्ति जागृत केल्यानंतर या वर्गांशीं वैर धरण्याचें कांहींच कारण नाहीं. निर्विष झालेले हे लोक काय करूं शकतील ?

येथवर लो. टिळकांच्या तात्त्विक बुद्धिनिश्चयाविषयीं, त्यांच्या कृतबुद्धि-विषयीं विवेचन केलें पण हा त्यांच्या जीवितकार्याचा केवळ पूर्व भाग होय. तें सर्व प्रत्यक्षांत आणणें हा पुढील भाग होय. कल्पना व कृति हे जसे काव्यरचनेचे किंवा इतर कोणच्याहि कलाकृतीचे दोन भाग होत, त्याचप्रमाणें तत्त्वज्ञान व कृति हे कोणच्याहि समाजविषयक कार्याचे दोन भाग होत. त्यांतील पहिल्याला दुसऱ्याची, तत्त्वज्ञानाला कृतीची जोड मिळाली नाहीं तर तत्त्वज्ञान पुष्कळ वेळां व्यर्थ ठरतें आणि तसें झालें असतें तर टिळक हे टिळक झाले नसते. पण त्यांच्या वाङ्मयाचा अभ्यास केला तर स्पष्ट असें दिसून येतें कीं पहिल्या आठदहा वर्षांच्या कालांत त्यांचें तत्त्वचिंतन चालूं होतें आणि पुढील तीस वर्षें त्या अन्वयें कृती करण्यासाठीं, तो बुद्धिनिश्चय प्रत्यक्षांत आणण्यासाठीं ते अविश्रांत श्रम करीत होते. लोकसत्तेवांचून स्वातंत्र्य व्यर्थ होय, लोकशक्ति हीच खरी शक्ति होय व श्रम करणारी जनता, शेतकरी, मजूर म्हणजेच लोक होत हें लोकशाहीचें मूलभूत सिद्धान्त प्रारंभींच्या कालांत त्यांच्या मनांत निश्चित झाले. आतां हें जें त्यांना वाटलें तें शेतकऱ्याला वाटावयास लावणें, आपण म्हणजेच खरा समाज असून आपल्या ठायीं एक महाशक्ति वास करीत आहे हा अहंकार शेतकऱ्याच्या ठायीं निर्माण करून त्याला कार्यप्रवृत्त करणें, हें पुढील कार्य होतें. हजारों वर्षें या देशांतील श्रमिक जनता अज्ञान, दारिद्र्य व दास्य यांत पिचत पडली होती. अन्याय, जुलूम, छळ सहन करणें, हें तिच्या अंगवळणींच पडून गेलें होतें. अन्यायाचा प्रतिकार हा तिच्या स्वप्नांतहि नव्हता. अर्थात् अशी जनता लोकशाही कधींच स्थापूं शकत नाहीं. लोकायत्त देशाच्या नागरिकांचें 'अन्यायाचा प्रतिकार' हें पहिलें लक्षण असतें. त्या वृत्तीच्या अभावीं माणूस या संज्ञेला सुद्धां तो पात्र नसतो. तेव्हां या भूमींतील शेतकऱ्याला त्याच्या स्वत्वाची जाणीव देऊन प्रतिकाराला प्रवृत्त करून येथल्या भावी लोकशाहीच्या मंदिराचा पाया रचावयाचा हें धोरण निश्चित करून १८९० सालापासून टिळक त्या कार्याला लागले.

टिळकांनीं हें जें लोकजागृतीचें कार्य केलें, त्याचे दोन भाग पडतात. १८९२ ते १९०३ हा एक व १९०३ च्या नंतरचा दुसरा. पहिल्या कालखंडांत 'कायदेशीर झगडा' हें त्यांचें धोरण होतें. पण १९०४ सालापासून तें टाकून हळूंहळूं कायदेभंगाच्या तत्त्वज्ञानाचा प्रसार ते करूं लागले. बंगालच्या फाळणीमुळें निर्माण झालेल्या प्रक्षोभाचा फायदा घेऊन कायदेभंग, करबंदी, निःशस्त्र प्रतिकार, बहिष्कार किंवा ज्याला अलीकडे सत्याग्रह म्हणतात त्याच्या प्रचारास त्यांनीं मोठ्या साहसानें प्रारंभ केला. १९०७ सालच्या 'नव्या पक्षाचें तत्त्वज्ञान' या व्याख्यानांत कायदेभंग व करबंदी यांची संपूर्ण कल्पना त्यांनीं मांडलेली आहे. या कार्यक्रमाला हात घालून अखिल देशव्यापी आंदोलन प्रचलित करावयाचें हा त्यांचा १९०७ सालीं निश्चित निर्धार झालेला दिसतो. एवढ्यांत त्यांना अटक झाली आणि ही मोहीम तशीच राहिली. त्यांचें तें कार्य महात्माजींनीं पुढें सिद्धीस नेलें. येथें आपणांस आतां टिळकांनीं १८९० ते १९०३ या कालखंडांत येथल्या जनतेला अन्यायाचा प्रतिकार करण्याचें शिक्षण देऊन लोकायत्त शासनाच्या नागरिकत्वाचे गुण तिच्या अंगीं निर्माण करण्यासाठीं जे प्रयत्न केले त्यांचा इतिहास पहावयाचा आहे.

## दारिद्र्य व ज्ञान

"दुष्काळांत आज लाखों लोक मुकाट्यानें उपासमार होऊन मरतात. पण इंग्रजी राज्यपद्धतीचें जसजसें ज्ञान होत जाईल तसतशी दारिद्र्याचीं कारणें काढून टाकण्याची त्यांच्या मनांची जास्त प्रवृत्ति होईल व त्यामुळें अखेरीस सर्वत्र शेतकरी लोकांचे दंगे सुरूं होतील. शेतकरी लोक जोंपर्यंत अज्ञान आहेत अगर सज्ञान असून सुखी आहेत तोपर्यंत कांहींएक भीति नाहीं. पण दारिद्र्य व ज्ञान हीं एकत्र झालीं म्हणजे त्यांची चकमक झडून लागलीच त्यांची ठिणगी पडते असें ब्लंटसाहेबांनीं म्हटलें आहे व तें त्यांचें म्हणणें अगदीं यथार्थ आहे. सरकारनें नाहींतर मध्यमस्थितींतील लोकांनीं शेतकऱ्यांची ही स्थिति सुधारण्याचें योग्य उपाय वेळींच अवश्य केले पाहिजेत." (केसरींतील लेख, खंड १ ला. पृ. १४२)

## असंतोषाची जागृति

टिळकांनीं शेतकऱ्यांची संघटना करण्याची जी चळवळ हातीं घेतली तिचें स्वरूप, तिचें उद्दिष्ट, तिची पद्धति व त्यांच्या मनांतील अंतःस्थ हेतु याची संपूर्ण कल्पना वरील अवतरणावरून येईल. गेल्या शतकाच्या शेवटच्या पंचवीस वर्षांत हिंदुस्थानांत अठरा वेळां दुष्काळ पडला आणि त्यांत लक्षावधि शेतकरी कुटुंबें धुळीस मिळालीं. या ज्वालामुखीचा बरोबर उपयोग करून त्यांत इंग्रजी राज्याची आहुती द्यावयाची हें टिळकांनीं निश्चित ठरविलें होतें. या निमित्तानें शेतकऱ्यांच्या चित्तांत धुमसणारा जो दुःखाग्नि त्याला योग्य चेतना देऊन त्याचें राजकीय असंतोषांत रूपांतर करण्याचें काम सुशिक्षित वर्गाकडून करावयाचें ही त्यांची पद्धति ठरली होती. पण तो काळ फारच कठिण असल्यामुळें बाह्यतः इंग्रज सरकारच्या राज्याच्या चिंतेमुळें आपण बोलत आहोंत, असें आपल्या प्रतिपादनाला रूप द्यावयाचें असें त्यांचें धोरण होतें. तात्पर्यार्थ असा कीं, आपल्याला आलेल्या हीन दशेचें कारण इंग्रजी राज्य हें आहे, हें शेतकऱ्यांना दाखवून देऊन त्यांना त्या राज्याच्या प्रतिकारासाठीं सिद्ध करावें असा त्यांचा प्रयत्न होता. या पहिल्या कालखंडांतील अनेक लेखांतून याचें प्रत्यंतर आपणांस येईल. ‘ हिंदुस्थानांतील शेतकरी लोकांस बंड करावें लागेल काय ? ’ असें शीर्षक एका अग्रलेखाला त्यांनीं दिलें आहे ( ६–१२–९२ ). अर्थात् ‘ नाहीं ’ हेंच उत्तर त्यांनीं त्यावेळीं दिलें आहे, पण हें इंग्रजी राज्यास संकट आहे आणि दारिद्र्य दूर झालें नाहीं तर इंग्रजी राज्यास धोका आहे असें त्यांनीं सांगून ठेविलें आहे. एकीकडे शेतकऱ्यांचें दारिद्र्य दूर करा, दारिद्र्य दूर करा असें ते सरकारला विनवीत आहेत व हें न झाल्यास साम्राज्याला धोका आहे असें इंग्रजी पंडितांच्या साह्यानें बजावीत आहेत आणि दुसरीकडे सुशिक्षितांना, शेतकऱ्यांचें कल्याण करण्यांत तुमचेंच कल्याण आहे, ( तेव्हां ही आग तुम्ही पेटवाच ) अशी प्रेरणा ते देत आहेत. ‘ सुशिक्षितांनीं काय केलें पाहिजे ? ’ या निबंधांत ही चेतना जास्त स्पष्टपणें दिलेली आहे. “ चिंचवड, नाशीक, चाफळ अशा ठिकाणीं जे धार्मिक उत्सव होतात तेथें खेड्यांतील लाखो लोक जमतात. तेथें तरुण सुशिक्षितांनीं जावें आणि

पांचपन्नास व्यासपीठें मांडून राजकीय चळवळीचा लोकांत प्रसार करावा. आपली खरी स्थिति काय आहे, सरकार कसा जुलूम करीत आहे त्याचें ज्ञान अशा प्रसंगानें सुशिक्षितांनीं लोकसमूहाला करून द्यावें. असें केलें तरच आपल्या राजकीय चळवळीचा प्रवेश खेड्यांतील झोपडींत होईल. तेव्हां 'आपण शिकलेले' ही ऐट न करतां सुशिक्षितांनी लोकांत मिसळण्याची ही संधि साधावी " असा उपदेश त्यांनीं केला आहे. (केसरी ८-९-९६)

१८९६ सालापर्यंत शेतकऱ्यांवर जुलूम होईल, त्यांचें दारिद्य वाढेल, व त्यांच्या द्रव्याचा अपहार होईल असे अनेक प्रकार घडले. त्या प्रत्येकाची केसरींतून चर्चा करून या अन्यायाचा प्रतिकार केला पाहिजे अशी चेतवणी टिळक देत होते. १८९३ सालीं चांदीची व रुपयाची सरकारनें फारखत केली. यामुळें दर दहा रुपयामागें शेतकऱ्याचें दोन रुपयांचें नुकसान होऊन त्याचे कोट्यवधि रुपये कसे गेले, हें केसरीनें स्पष्ट करून दाखविलें. ही फारकत सरकारनें कशासाठीं केली होती? तर कांहीं बड्या कामगारांना आपले पैसे विलायतेस पाठविणें सोपें जावें म्हणून! (केसरी ४-७-९३) १८९५ सालीं मँचेस्टरच्या कापडावरचा कर सरकारनें कमी केला. ५० लक्षांची सूट त्यांना मिळाली आणि येथल्या जाडी कापडावर कर बसविल्या-मुळें जनतेचे ११ लक्ष रुपये गेले. यामुळें येथला कोष्टी मरत आहे असें सांगून केसरीनें असें बजावलें आहे कीं, 'अमेरिकेंत क्रान्ति झाली ती असल्याच अन्यायामुळें झाली. आतां आम्हांस अमेरिकेसारखा प्रकार करावयाचा नाहीं हें निराळें. पण या अन्यायाचा प्रतिकार केलाच पाहिजे. येथला राज्यकारभार मँचेस्टरवाल्यांच्या हितासाठीं चालला आहे. तेव्हां आपणहि प्रतिकार म्हणून स्वदेशी व्रत घेऊन मँचेस्टरवाल्यांचा सूड घेतला पाहिजे.' याच वेळीं सरकारनें अमर्याद सारावाढहि केली होती आणि शिवाय शेतकी कमिशन नेमून शेतकऱ्याच्या दारिद्याचें खरें कारण म्हणजे सावकार हें आहे अशी चुकीची मीमांसा करून धूळफेंक केली होती. त्यावरहि अनेक लेख लिहून, 'सरकारनें उद्योगधंदे नाहींसे केले, पाटबंधारे बांधले नाहींत, जमिनीचा कस गेला त्याची व्यवस्था केली नाहीं इ० कारणामुळें दारिद्य येत आहे' याची जाणीव जनतेला करून दिली. आणि 'अमेरिकेसारखा प्रकार आपणांस करावयाचा नसला तरी जुलूम केला असतां चालणार नाहीं अशी सरकारची

खात्री करून दिली पाहिजे, त्याशिवाय जुलूम थांबणार नाहीं' असें शेतकऱ्यांना बजावून सांगितलें.

## कायदेशीर संग्राम

पहिलीं चारपांच वर्षें अशीं जागृतीच्या कामीं खर्च केल्यानंतर १८९६ सालीं टिळकांनीं महाराष्ट्रांत सरकारविरुद्ध कायदेशीर संग्रामाच्या पहिल्या मोहिमेस प्रारंभ केला. त्या सालीं सर्व महाराष्ट्रांत भयंकर दुष्काळ पडला असून लोकांची अन्नान्न दशा झाली होती. या वेळीं सरकारनें 'फॅमिन रिलीफ कोड' तयार करून कोठें साऱ्याची तहकुबी, कोठें सूट, कोठें तगाई असें अनेक तऱ्हेचें साह्य जाहीर केलें; त्याचप्रमाणें दुष्काळी कामें काढून लोकांना मजुरी मिळण्याची सोय केली. पण या औदार्याचा बराचसा भाग कागदावरच रहात असे. कायद्यांत सूट दिलेली असतांना अधिकारी दडपून सारा वसूल करीत. हुकमाप्रमाणें जंगलें खुलीं करीत नसत. पिकाची आणेवारी वाढवून दाखवीत आणि दुष्काळी कामावर योग्य ती मजुरी देत नसत. म्हणून टिळकांनीं शेतकऱ्यांना आपल्या हक्कांची जाणीव करून देण्याची चळवळ या वेळीं सुरू केली. दुष्काळाच्या कायद्यासंबंधींचें पुस्तक मराठींत छापून तें गांवोगांव वांटलें आणि प्रत्येक जिल्ह्यांत सार्वजनिक सभेचे प्रचारक पाठवून शेतकऱ्यांना अन्यायाचा प्रतिकार करण्याची शिकवण दिली. उंबरगांव पेट्यांतील खत्तलवाड या गांवीं साठे नांवाच्या प्रचारकांनीं वारली, कोळी या लोकांची जंगी सभा भरविली होती. त्या वेळीं मामलेदार, असिस्टंट कलेक्टर इ० अधिकारी सशस्त्र पोलीस घेऊन आले होते. त्यांच्या देखत प्रो. साठे यांनीं 'तुमचें पीक बुडालें आहे, तुम्ही सारा देऊं नका' असें सभेला सांगितलें. बेळगांव, धारवाड, विजापूर, सोलापूर, खानदेश इ. अनेक जिल्ह्यांत याच तऱ्हेनें प्रचार चालू होता आणि केसरीच्या अंकांतून तरुणांना आवाहन करून, तुम्ही तालुक्यांत जाऊन रयतेला हक्कासाठीं भांडण्यास शिकवा, म्हणून टिळकांनीं उपदेश चालविला होता. १५-१२-९६ च्या केसरींतील लेखांत टिळक म्हणतात, 'कायदेशीर रीत्या सरकारशीं भांडावयास रयतेस कसें शिकवावें ही विद्या आमच्या

पुढारी लोकांस अद्यापि शिकावयाची आहे. ती जेव्हां तें शिकतील तेव्हांच सरकारी अधिकाऱ्यांचा उर्मटपणा उतरेल. '

अन्यायाचा प्रतिकार करण्याची वृत्ति प्रत्येक नागरिकाच्या अंगीं बाणविणें हा लोकायत्त शासनाचा पहिला धडा होय. या वृत्तीवांचून लोकसत्ता कधींहि टिकावयाची नाहीं. इतर देशांत सरदार, भांडवलदार हे लोक राजसत्तेशीं झगडले, पण ते स्वतःच्या स्वार्थासाठीं. मध्यम वर्गातील क्रांतिकारक जनतेसाठीं दहशतवादी चळवळी करीत; पण त्यांतून खरी जनशक्ति निर्माण होणें शक्य नव्हतें. आपल्या हक्कांची जाणीव होऊन स्वतः रयतच जेव्हां प्रतिकारार्थ उभी ठाकते त्या वेळीं स्वातंत्र्य व लोकसत्ता प्राप्त करून देणारी व ती टिकविणारी शक्ति निर्माण होते, हें ध्यानीं घेऊनच टिळकांनीं ही अमोघ शक्ति जागृत करण्याचा दृढनिश्चय केला होता. कायदेशीर संग्राम हा चळवळींचा पहिला टप्पा होता. पुढील कायदेभंग व करबंदी या मोहिमांची ती पूर्वतयारी होती. कारण सरकारनें प्रजेच्या हिताचे कागदावर जरी कायदे केले होते तरी वास्तविक ती धूळफेक होती. प्रजेला त्या कायद्यांचा फायदा मिळावा अशी सरकारची मुळींच इच्छा नव्हती. आंतून सरकारी अधिकाऱ्यांना निराळ्याच सूचना असत. आंतले कायदे निराळेच असत. त्यामुळें बाह्यतः कायदेशीर दिसणारी ही मोहीम वस्तुतः कायदेभंगाचीच मोहीम होती. तेथल्या मामलेदारानें वा कलेक्टरानें सरकारच्या अंतःस्थ पाठिंब्यानें जारी केलेला कायदा मोडावयास शिकविणें हेंच टिळकांचें धोरण होतें. १८९९ सालीं सारा-वाढीसाठीं जी फेरपहाणी झाली तिच्या कामांत सर्व्हे अधिकाऱ्यांनीं लँड रेव्हिन्यू कोड धुडकावून देऊन मनमानेल तसा सारा वाढविला होता. या अन्यायाला टिळकांनीं वाचा फोडली. (केसरी २४-१०-९९) म्हणजे सरकारी अधिकारी फॅमिन रिलीफ कोड धाब्यावर बसवीत, लँड रेव्हिन्यू कोड धुडकावून लावीत आणि निराळाच कायदा जारी करीत. या कायद्यांचा भंग करण्यास टिळकांनीं जनतेला शिकवून तिचें प्रतिकारसामर्थ्य जागृत केलें. १९०३ पर्यंत दुष्काळी व्यवस्थेतील अनास्था व जुलूम यांखेरीज, सारावाढ आणि शेतकऱ्यांचा जमिनीवरील हक्क नष्ट करणें हीं दोन आणखी दडपशाहीचीं कृत्यें सरकारनें केलीं. या प्रत्येक वेळीं केसरीच्या द्वारां गर्जना करून टिळकांनीं शेतकऱ्यांना हांक दिली आणि,

'तूं प्रतिकारार्थ सिद्ध हो, अन्याय सहन करूं नको,' अशी चेतवणी त्यास दिली. शेतकऱ्याच्या दैन्याचें अनेक लेखांत वर्णन करून, याला कारण इंग्रजी राज्यव्यवस्था होय असा सारखा घोष त्यांनीं चालविला होता. सरकारनें शेतकऱ्यांचे हक्क बुडविले, त्याला गुलामाच्या नीच अवस्थेस नेऊन पोंचविलें (४-६-१९०१). इंग्रजीराज्यांत गरिबी हा गुन्हा आहे (८-८-९९). पेशवाईपेक्षां दीड कोट रुपये सरकार जास्त सारा घेतें (१४-४-१९०३). आमचे उद्योगधंदे ठार करून सरकारनें येथला कोष्टी मारला (११-११-१९०२). इंग्रजसरकारनें देशांत शांतता राखली खरी पण तिची किंमत म्हणून हिंदुस्थानच्या कोटयवधि प्रजेला आपली अर्धी भाकर द्यावी लागते (६-१२-९२). लोकांवर जलूम होण्यास सर्व्हें हें एकच खातें आहे असें नाहीं. जंगल, मीठ, अबकारी, देवी, रजिस्ट्रेशन, शाळा, या खात्यांनीं चोहोंकडून रयतेस भंडावून सोडलें आहे. गरीब बिचारा कुणबी! ज्यास पूर्वीं आपल्या राज्यांत हवें तें करण्याची मोकळीक होती त्यासच आतां घराबाहेर पाऊल पडलें म्हणजे मी कोणत्या खात्याच्या तडाक्यांत सांपडतो अशी धास्ती वाटूं लागली आहे (२४-१-१८९३). मुसलमानी राज्यांतहि सध्यांसारखा जुलूम होत नव्हता (२०-४-९७). सनदी नोकरांच्या चैनीकरतां व लष्कराच्या जय्यत तयारीकरितां पाण्यासारखा पैसा खर्च करून कर्जबाजारी झालेल्या सरकारच्या लहरी मनास योग्य वाटेल तेवढ्याच रकमेंत शेतकऱ्यांच्या सर्व गरजा भागवाव्या लागतात, ही मोठी दुर्दैवाची गोष्ट आहे (२५-५-९७). दुष्काळी कामावरील मजुरांना सरकार तुरुंगांतील कैद्यांपेक्षांहि कमी अन्न देतें. म्हणजे दुष्काळी मजूर हा बदमाष चोराहूनहि कमी दर्जाचा झाला. इंग्रजांच्या न्यायबुद्धीस काळीमा लावणारी यापरती दुसरी गोष्ट असेल असें आम्हांस वाटत नाहीं (२५-५-९७). शेतकऱ्यांच्या जमिनीचा सारा थकला कीं, त्या जप्त करून सरकारनें आपल्या ताब्यांत घ्याव्या. तीस तीस वर्षांनीं सारे वाढवावे आणि शेतकीचे उद्योगधंदे सर्व बुडवून टाकावे; पण त्यास आम्ही नांवें ठेवूं नये. इतकेंच नव्हे तर गंगानदीप्रमाणें विलायतेच्या स्वर्गाहून हा राजनीतीचा ओघ आमचें आचंद्रार्क कल्याण करण्याकरितांच या देशांत

येऊन घडकला आहे असें आम्ही मानावें, असा लेली साहेबाच्या म्हणण्याचा खरा अर्थ आहे ( ६-१०-१९०३ ). हें व या तऱ्हेचें ज्ञान व विचार केसरींतून सतत दहाबारा वर्षें टिळक लोकसमूहांत पसरून देऊन येथील जनतेच्या अंगचें चैतन्य जागृत करून तिच्या अंगच्या सुप्त शक्तींना जागृति आणीत होते आणि तिला 'अन्यायाचा प्रतिकार' हा लोकसत्तेचा पहिला पाठ देत होते.

हिंदुस्थान हा देश प्रामुख्यानें शेतकऱ्यांचा आहे. टिळकांनीं लोक-जागृतीच्या कार्यास प्रारंभ केल्याला आतां पन्नासच्या वर वर्षें होऊन गेलीं. आजहि जवळ जवळ तीच स्थिति आहे. या मधल्या अवधींत येथें कामगारांचा—शहरी कामगारांचा—वर्ग निर्माण झाला आहे; पण अजूनहि तुलनेनें पाहतां तो फार लहान आहे. बहुसंख्य जनता अजून शेतीवरच अवलंबून आहे. तेव्हां देशांत खरी 'लोक' सत्ता प्रस्थापित व्हावयाची व ती यशस्वी व्हावयाची तर हे 'लोक', ही जनता, म्हणजे हे किसान सुबुद्ध, कार्यक्षम, समंजस व समर्थ होणें अवश्य आहे. देशाला स्वतंत्र करण्याचें व सार्वभौम सत्ता लोकांच्या हातीं आणून देण्याचें सामर्थ्य जनतेलाच आहे. १८८० च्या सुमारास, आपल्या सार्वजनिक आयुःक्रमाच्या प्रारंभीं वयाच्या पंचविसाव्या वर्षींच टिळकांनीं हें जाणलें होतें. त्यांचा तसा बुद्धिनिश्चय झाला होता. पुढील पंचवीस वर्षांत हा ध्रुवतारा डोळ्यापुढें ठेवून त्या दिशेनें त्यांनीं मार्गक्रमण कसें केलें हें आतांपर्यंत आपण पाहिलें. आपल्या भूमीला स्वातंत्र्य मिळवावयाचें तें लोकांकरितांच मिळवावयाचें व तें लोकशक्तीच्या साह्यानेंच मिळवावयाचें हें तत्त्व त्यांनीं तेव्हांपासून अवलंबिलें होतें. पूर्वेकडच्या दीर्घकाल पारतंत्र्यांत खितपत पडलेल्या इतर अनेक देशांहून आपल्या देशाचा इतिहास जो कांहींसा निराळा झाला आहे, लोकायत्त शासन प्रारंभापासूनच यशस्वी होण्याचा जो कांहीं थोडा संभव येथें निर्माण झाला आहे त्याचें श्रेय या तत्त्वाला आहे, हें येथपर्यंतच्या विवेचनावरून ध्यानांत येईलसें वाटतें. टिळकांच्या कार्याचा पूर्वार्ध येथें संपला. आतां उत्तरार्धाचें विवेचन करावयाचें आहे. कायदेशीर संग्रामाचा प्रयोग दहाबारा वर्षें केल्यानंतर कायदेभंगाच्या मोहिमेच्या तयारीस ते कसे लागले आणि १९०८ सालीं तुरुंगांत जाण्यापूर्वींच या दुसऱ्या लढ्याचें

सर्व तत्त्वज्ञान त्यांनीं या भूमींत कसें पसरून दिलें होतें, तें या उत्तरार्धांत प्रथम पहावयाचें आहे आणि त्यानंतर या प्रक्षोभानें जागृत झालेलें लोकमत संघटित करून कार्यैकप्रवण करण्याची विद्या म्हणजेच लोकसत्तेच्या यशाची जी राजविद्या त्यांनीं जनतेला शिकविली तिचें सम्यक् ज्ञान करून घ्यावयाचें आहे.

## सुप्त शक्तीला आवाहन

अन्याय, जुलूम, आक्रमण यांचा प्रतिकार करण्याची शक्ति असणें हें कोणच्याहि समाजाच्या जिवंतपणाचें लक्षण होय आणि त्यामुळें ही शक्ति जो जागृत करील तो समाजाचा सर्वांत मोठा हितकर्ता ठरतो. मागल्या काळीं सामान्य जनतेच्या अंगीं अशी प्रतिकारशक्ति बहुधा कधीं निर्माण झालेली नसे. परकीयांचें आक्रमण आलें तर तें मोडून काढण्याची जबाबदारी राजेलोकांवरच असे आणि ते ती पार पाडण्यास असमर्थ ठरले तर ती भूमी परकीयांच्या आहारीं जात असे. स्वकीय राजाचा जुलूम झाला तरीसुद्धां त्याचा प्रतिकार सरदार, जमीनदार हेच करीत. अखिल जनतेनें जागृत होऊन राजाला वठणीवर आणल्याचीं उदाहरणें मागल्या इतिहासांत अपवादात्मकच आहेत. हिंदुस्थानचा मागला इतिहास असाच आहे. परकीयांचें आक्रमण मोडून काढणारे, किंवा स्वकीय राजांच्या जुलमाला पायबंद घालणारे जे वीरपुरुष त्यांना जनतेचें साह्यच मिळालें नाहीं असें नाहीं, पण त्यांच्या सैन्यांत दाखल होऊन त्यांची मनोभावें सेवा करण्यापलीकडे जनतेनें या भूमींत जास्त कर्तबगारी कधींच कांहीं केलेली नाहीं. अशा या भरतभूमींत सरदार, जमीनदार, संस्थानिक यांच्या साह्याची व नेतृत्वाची कसलीहि अपेक्षा न ठेवतां, इतकेंच नव्हे तर त्यांचा संबंधहि न येऊं देतां लो॰ टिळकांनीं सामान्यजनतेची सुप्त प्रतिकारशक्ति जागृत केली, अन्यायाला तोंड देण्याचें धैर्य तिच्या ठायीं निर्माण केलें व या शक्तीची संघटना करून ब्रिटिशांच्या विरुद्ध तिला संग्रामांत उभे केलें, हीच त्यांनीं केलेली लोकसत्तेची अत्यंत मोठी सेवा होय. ही पूर्वतयारी झाल्यावांचून लोकसत्ता कधींहि यशस्वी होत नाहीं. पोलंड, जर्मनी, इटली, झेकोस्लोव्हाकिया, मेक्सिको, चीन या देशांत स्वातंत्र्यप्राप्तीनंतर किंवा

जुलमी राजसत्ता नष्ट झाल्यानंतर लोकसत्ता प्रस्थापित करण्याचे प्रयत्न झाले, पण ते मुळींच सफल झाले नाहींत. कारण तेथें लोकसत्ता फक्त बाह्यरूपांतच आली होती. जनता ही शक्ति जागृत व संघटित करण्याचा त्या देशांत कोणी कधींच प्रयत्न केला नव्हता. तो प्रयत्न टिळकांनीं या भूमींत केला. इतर देशांतल्या नेत्यांप्रमाणें ५७ सालच्या रीतीनेंच त्यांनीं येथें पुन्हां उठावणी केली असती, त्या वेळीं ज्या सरदार जमीनदार संस्थानिकांनीं आपलें वैभव गेलें म्हणून संग्राम पुकारला त्यांच्याच वारसांची व वर्गीयांची टिळकांनीं संघटना करून पुन्हां बंड पुकारलें असतें, तर कदाचित् तें यशस्वी होऊन या भूमीला स्वातंत्र्याची प्राप्ति झालीहि असती; पण मग आपण स्वातंत्र्यानंतर जुन्या सरंजामी युगांतच राहिलों असतों. आज या देशांतली सरंजामशाही समूळ नष्ट झाली आहे. जुनें युग अस्त पावलें आहे आणि नव्या युगाचा उदय झाला आहे. या उदयाचें कारण एकच आहे. जनता प्रतिकारक्षम झाली आहे, तिला आपल्या हक्काची जाणीव होऊन आत्मसामर्थ्याचा प्रत्यय आला आहे, हें तें कारण होय. जो प्रतिगामी आहे, ज्याला जुनेंच टिकवावयाचें आहे, तो जनतेची शक्ति जागृत करण्याचा कधींहि प्रयत्न करणार नाहीं. चीनमधील चिआंग कै शेकचें उदाहरण आपल्या डोळ्यांपुढेंच आहे. त्यानें पाश्चात्य भांडवलदारांचें साह्य घेतलें, आक्रमण करून येणाऱ्या जपानशीं संगनमत केलें, आपल्या भूमीचीं शकलें होण्याचा धोकाहि पत्करला, पण चिनी जनतेची संघटना करण्याचें मनांतहि आणलें नाहीं. एवढेंच नव्हे तर तिनें आपण होऊन दिलेलें साह्य घेण्याचेंहि नाकारलें आणि इकडे जपानशीं युद्ध चालूं असतांना स्वतःच्या जनतेवरच त्यानें हत्यार धरलें. त्याला एकच भीति होती. जनता जागृत होईल ही ती भीति होय. तें टळावें म्हणून त्यानें वाटेल ते अनर्थ पत्करले व शेवटीं आपला सर्वनाश करून घेतला. आणि जी गोष्ट टळावी म्हणून चिआंग आपलें शक्तिसर्वस्व खर्च करीत होता तीच गोष्ट भरतभूमींत घडवून आणण्यासाठीं टिळकांनीं आपलें शक्तिसर्वस्व अर्पण केलें होतें. नव-शक्तीची ही ज्योत त्यांनीं निर्माण केली असतांना, त्यांची सनातन धर्मावरील निष्ठा, त्यांचें जुन्या आचारावरील प्रेम, त्यांनीं संस्थानिक, सावकार, मामलेदार यांचा ब्रिटिशांविरुद्ध पक्ष घेऊन ( जनतेविरुद्ध नव्हे ) त्यांचें

केलेलें समर्थन, असल्या गोष्टीकडे बोट दाखवून त्यांना जे प्रतिगामी म्हणतात त्यांनीं तारतम्य शब्दाचा अर्थ समजावून घेण्यांत एक जन्म घालविणें अवश्य आहे.

जनता ही शक्ति जागृत करण्यासाठीं टिळकांनीं कायदेशीर संग्राम करून पहिल्या पंचवीस वर्षांत कोणचे प्रयत्न केले ते आपण पाहिले. आतां निःशस्त्र प्रतिकार, कायदेभंग किंवा बहिष्कार हा जो जनता जागृतीचा प्रभावी मार्ग त्या मार्गाचा अवलंब करून त्यांनीं भारतीय जनतेची प्रतिकारशक्ति कशी चेतविली तें आपणांस पाहावयाचें आहे.

## बहिष्कार-योग

या मार्गास टिळकांनीं स्वतः 'बहिष्कार-योग' असें नांव दिलें होतें. बहिष्कार या शब्दानें फक्त विदेशी मालावरील बहिष्कार असा अर्थ आपल्या मनांत येतो. टिळकांची विवक्षा इतकी संकुचित नव्हती. ब्रिटिश लोक अगदीं अल्पसंख्य आहेत. येथल्या तीस कोटी लोकांवर केवळ दोनतीन लक्ष लोकच राज्य करीत असतात. इतक्या अल्पसंख्यांचें राज्य एवढ्या बहुसंख्येवर चालतें याचें कारण असें कीं हे जुलमी राज्य चालविण्यास ते बहुसंख्य लोकच सर्वतोपरी साह्य करीत असतात. त्यावांचून हें राज्य चालणें शक्य नाहीं. सरकार ब्रिटिश असलें तरी त्याच्या प्रत्येक खात्याचा कारभार हिंदी लोकच चालवितात. पोस्ट, रेल्वे, सेक्रेटरिएट, जमाबंदी हीं सर्व खातीं आम्हीच चालवितों. पोलीस खात्यांत बहुसंख्या आमचीच आहे. न्यायखातें आमच्या लोकांनींच भरलें आहे. हा सर्व व्यवहार नीट चालावा म्हणून कराच्या रूपानें पैसा आम्हीच देतों आणि राज्यव्यवस्थेंत कोठें बिघाड झाला तर बंडखोरांना शासन करणारें जें सैन्य त्यांत बहुसंख्येनें आमचेच लोक आहेत. तेव्हां सरकारचा सर्व कारभार, इतकेंच नव्हे तर सरकारचा श्वासोच्छ्वासहि आम्हीं चालविला आहे. या सर्व कारभारावर आम्हीं जर बहिष्कार घातला तर हें सरकार एका क्षणांत कोसळून पडेल आणि त्या क्षणींच आपण स्वतंत्र होऊं. बहिष्कार या शब्दाचा इतका व्यापक अर्थ टिळकांच्या मनांत होता. आणि हें राजकीय शस्त्र, देशाची खरी शक्ति तें जागृत करीत असल्यामुळें तोफा-बंदुकापेक्षांहि जास्त प्रभावी आहे असें त्यांचें निश्चित मत

होतें. १९०७ सालीं कलकत्त्याला ' टेनेट्स् ऑफ दि न्यू पार्टी ' नव्या राष्ट्रीय पक्षाचें तत्त्वज्ञान, या विषयांवर व्याख्यान देतांना त्यांनीं अगदीं स्पष्ट शब्दांत हें बहिष्कारयोगाचें तत्त्वज्ञान समजावून दिलेलें आहे.

साधारणतः १९०५ सालापासून टिळकांनीं हें कायदेभंगाचें, निःशस्त्र प्रतिकाराचें किंवा या सर्वांचा समावेश करणाऱ्या बहिष्कारयोगाचें तत्त्वज्ञान लोकांत प्रसृत करण्यास प्रारंभ केला. त्याच्या आधीं कायद्याच्या कक्षेंत राहून लढा करावा असें त्यांचें धोरण व आचरणहि असे. पण असें जरी असलें तरी भारतीय स्वातंत्र्याचा लढा कायदेभंगाच्या या पद्धतीनेंच करावयाचा अशा तऱ्हेचे विचार त्यांच्या मनांत १८८१ सालापासूनच घोळत असले पाहिजेत. केसरीच्या पहिल्या वर्षाच्या सातव्या अंकांतच ' बहिष्कार ' हा लेख आला आहे. त्यांत ते म्हणतात, " राजकीय शिक्षा ही लोकमता-वरच अवलंबून असते. आपण जर उद्यां तुरुंगांत जाणें ही शिक्षा असें मानलें नाहीं तर राजकीय शिक्षेचा उपयोग काय होणार ! लोक आनंदानें तुरुंगांत जातील. याचा प्रत्यय घेण्यास फार लांब जावयास नको. गेल्या दुष्काळांत तुरुंगांत जाणें ही शिक्षा आहे असें कितीकांस वाटलें ! " १९०७ सालच्या भाषणांत बहिष्काराचा जो व्यापक अर्थ सांगितला आहे तो यांत नाहीं. पण सरकारशीं लढण्याचें हें एक शस्त्र आहे, हा भावार्थ त्यांत स्पष्ट आहे. याच निबंधांत पुढें म्हटलें आहे कीं, ' आयर्लंडांत लँडलीग म्हणून जी सभा आहे त्या सभेनें पुष्कळ जमीनदार लोकांस बहिष्कृत केलें आहे. तर अशाच तऱ्हेनें जर या वेळेस आपल्याकडे बहिष्काराचें रूपांतर होईल तर त्यापासून पुष्कळच फायदा होईल ' या एकंदर निबंधांतील ' बहिष्काराचें ' रूप कांहींसें अस्पष्ट असलें तरी राजशक्तीपेक्षां लोकशक्ती ही जास्त प्रभावी असते व लोकांनीं राजशक्ति मानली नाहीं तर ती तत्काळ निस्तेज होते, हा विचार मात्र निःसंदिग्ध शब्दांत मांडलेला दिसतो. आणि हा विचारच पुढील सर्व ' बहिष्कार योगाच्या ' तत्त्वज्ञानाचा पाया आहे.

## कायदेभंग

प्रत्यक्ष कायदेभंगाच्या प्रचारास टिळकांनीं १९०५ सालीं बंगालच्या फाळणीच्या प्रसंगानें सुरवात केली असली तरी त्याच्या आधीं दोनतीन

वर्षे, राजकीय चळवळीची दिशा पालटली पाहिजे, जुन्या अर्जविनंतीच्या मार्गानें कांहीं एक मिळणार नाहीं, हें प्रतिपादन त्यांनीं सारखें चालू ठेविलें होतें. 'कायदेशीर चळवळ फलद्रूप होत नसेल तर दुसरा मार्ग काढला पाहिजे' ( २९-१२-१९०३ ). 'सरकारच्या जुलमाखालीं तुम्ही मरत असाल तर तो दोष तुमचा आहे, सरकारचा नाहीं. राज्यपद्धति असह्य झाली असेल तर आपल्या वर्तनानें तसें दाखवा व इंग्रजांस सळो कीं पळो करून टाका.' 'पाश्चिमात्य देशांप्रमाणें हिंदुस्थानांतील लोक एकराष्ट्रीयत्वाच्या कल्पनेनें प्रेरित होऊन आपल्या हक्कासाठीं एकीनें भांडणारे असते तर हिंदुस्थानावर इंग्रजांचें राज्यच झालें नसतें' अशा तऱ्हेची प्रक्षोभक प्रेरणा ते सारखे देत होते.त्यामुळें कायदेभंगाची भूमिका तयार होत आली होती आणि वंगभंगाचा जुलमी प्रसंग येतांच टिळकांनीं त्या कारणानें प्रक्षुब्ध झालेल्या भारतीयांच्या भावनांचा ओघ वहिष्कारयोग अथवा निःशस्त्र प्रतिकार या मार्गाकडे वळविला.

वंगभंगाची घोषणा सरकारनें २० जुलै १९०५ या दिवशीं केली. ती ऐकून सर्व बंगाल अगदीं संतप्त झाला व बाल-वृद्ध, गरीब-श्रीमंत, हिंदु-मुसलमान, ग्रामीण-नागर, सर्व वंगीय जनता या सुलतानीच्या प्रतिकारार्थ सिद्ध झाली. प्रतिकाराचें स्वरूप निश्चित करण्यासाठीं प्रारंभीं ज्या सभा झाल्या त्यांत सुरेंद्रनाथ बॅनर्जी, शचींद्रप्रसाद बोस, कृष्णकुमार मित्र, मोतिलाल घोष इ. बंगाली धुरीणांनीं हें निश्चित ठरविलें कीं, यावेळीं नुसत्या सभा, अर्ज, विनंत्या, शिष्टमंडळें यांवर विसंबून रहावयाचें नाहीं. या द्वारानें प्रगट झालेल्या लोकमताचा कर्झन पदोपदीं अवमान करीत होता. तेव्हां पुन्हां त्यांचाच अवलंब करण्यांत अर्थ नाहीं. यापेक्षां जास्त प्रभावी उपाययोजना आतां केली पाहिजे. असें ठरवून त्यांनीं स्वदेशी व बहिष्कार हें दुधारी शस्त्र हातीं घेण्याचा निश्चय केला व त्याप्रमाणें ७ ऑगस्टला कलकत्त्याला सभा भरवून प्रचाराला व चळवळीला सुरुवात केली.

अर्जविनंत्यांच्या पलीकडे आपण गेलें पाहिजे, सरकारी राज्ययंत्र अडवून पाडलें पाहिजे, त्यावांचून तरणोपाय नाहीं, हा घोष टिळकांनीं गेलीं तीनचार वर्षें चालवलाच होता. बंगाली पुढाऱ्यांनीं स्वयंस्फूर्तीनें तोच निश्चय केल्याचें पाहून टिळकांना अत्यंत समाधान वाटलें आणि १५ ऑगष्टपासून केसरी-

मराठ्यांत सारखे लेख लिहून या प्रक्षोभाचें लोण ते पंजाब, मद्रास, संयुक्त प्रांत इ० प्रांतांतून पोचवीत राहिले. या प्रसंगानें हिंदुस्थानच्या राजकीय चळवळीला टिळकांना कोणचें वळण लावावयाचें होतें तें पुढील अवतरणांवरून दिसून येईल. ‘ शंभरांपेक्षां अधिक वर्षांच्या शिक्षणानें बंगाली लोक इंग्रजी रीतीची चळवळ करण्यास शिकले आहेत व त्यांनीं जर संघशक्ति अशीच कायम ठेवली तर त्यांच्या चळवळीस जोर मिळून तिचा पगडा सरकारवरहि बसण्याचा संभव आहे’ ( १५–८–१९०५ ). ‘प्रजा कितीहि दुबळी असली तरी जुटीनें व निश्चयानें ती अरेरावी राज्यकर्त्यांस शस्त्रावीणहि भारी होते ही गोष्ट इतिहासप्रसिद्ध आहे.’ ( २२–८–५ ) ‘ प्रजेचा निग्रह आणि संप यांची शक्ति कांहीं सामान्य नाहीं. रशियाचे झार अधिक जुलमी. पण रशियांतील प्रोफेसरांनीं, विद्यार्थ्यांनीं, मजुरांनीं, कारखानदारांनीं, एडिटरांनीं, दुकानदारांनीं, आपलें मागणें नेटानें व धैर्यानें कशाचीहि परवा न करतां, जेव्हां झारसाहेबापुढें मांडलें, तेव्हां जगांतील सर्व बादशहांत प्रबळ असे हे बादशहा मट्टयास आले. हिंदुस्थानांतहि अशी लढाई जुंपण्याचीं चिन्हें दिसूं लागलीं आहेत ( २८–११–१९०५ ).

ही चळवळ इंग्रजी रीतीनें करावयाची आहे, म्हणजे प्रजा ही शक्ति तेथें जागृत करावयाची आहे, आणि ही शक्ति इतकी प्रभावी आहे कीं तिच्यापुढें कोणचाहि मदोन्मत्त राजा टिकूं शकणार नाहीं, हाच या सर्वांचा मथितार्थ आहे.

वंगभंगाच्या प्रतिकारार्थ स्वदेशी बहिष्काराची चळवळ चालू असतांना तिच्यांतूनच पुढील सालीं बारिसाल प्रकरण उद्‌भवलें आणि या प्रकरणांत बंगाली धुरीणांनीं धैर्यानें एक पाऊल पुढें टाकून हिंदुस्थानांतील कायदेभंगाच्या चळवळीचा पहिला मंत्र म्हटला. रस्त्यानें मिरवणुकी काढावयाच्या नाहींत व वंदे-मातरम् गीत म्हणावयाचें नाहीं, असें जुलमी आज्ञापत्र सरकारनें काढलें होतें. १४ एप्रिल १९०६ रोजीं बारिसाल येथें भरणाऱ्या बंगाल प्रांतिक परिषदेसाठीं जमलेल्या बंगाली नेत्यांनीं या निर्बंधाचा भंग करावयाचा असें ठरविलें व त्याप्रमाणें मोठी मिरवणूक काढून ते मंडपाकडे निघाले. पोलीस लाठीहल्ला करतील ही त्यांना कल्पना होती. तरी हा भंग करावयाचाच असें ठरवून वंदेमातरम्‌चा घोष करीत मिरवणूक निघाली.

पोलीसांनीं लाठीहल्ला करून सुरेन्द्रनाथांना अटक केली व दोनशें रुपये दंड केला. तो भरून ते लगेच मंडपाकडे आले आणि सभा झाल्यावर पुन्हां तोच घोष करीत सभाजन घरोघरीं गेले.

हें बारिसाल प्रकरण म्हणजे निःशस्त्र प्रतिकारांतील पहिला संग्राम होता. पोलीसांनीं लाठी चालविली तरी आपण हात उचलावयाचा नाहीं, आपण बरोबर काठी सुद्धां न्यावयाची नाहीं असें सुरेन्द्रनाथांनीं लोकांना बजाविलें होतें. लोकांनीं या आज्ञेचें तंतोतंत पालन केलें होतें. चित्तरंजन गुह या विद्यार्थ्याला पोलिसांनीं लाठीचे अनेक तडाखे दिले. दर प्रहाराबरोबर तो शांतपणें 'वदे मातरम्' चा घोष करीत होता. शेवटीं पोलीसांनीं त्याला एका तळ्यांत फेंकून दिलें. त्यांतून तो कसाबसा वांचून बाहेर येतांच परिषदेच्या मंडपांत आला.

या प्रसंगानें व पुढें प्रतिपक्षाला उत्तर देण्याच्या निमित्तानें टिळकांनीं आपलें कायदेभंगाचें व बहिष्कारयोगाचें सर्व तत्त्वज्ञान सांगून टाकलें आहे. त्याचा थोडक्यांत सारांश असा—हिंदुस्थानांत 'सनदशीर चळवळ' या शब्दांना कांहीं एक अर्थ नाहीं. इंग्लंडमध्यें पूर्वकाळीं राजानें प्रजेला अनेक सनदा देऊन प्रजेचे बहुविध हक्क मान्य केलेले आहेत. त्यामुळें त्या सनदांनीं दिलेल्या हक्कांच्या रक्षणासाठीं त्या सनदान्वयेंच होणारी जी चळवळ ती सनदशीर चळवळ होय. हिंदुस्थानाला ब्रिटिश सरकारनें तशी कसलीहि सनद दिलेली नाहीं. तेव्हां येथें सनदच नाहीं; त्यामुळें सदनशीर चळवळ करतों, असें म्हणणें म्हणजे दूध म्हणून पिठाचें पाणी पिण्यासारखें आहे. (केसरी १२–२ आणि ५–३–१९०७) आतां कायदेशीर शब्दांचा विचार करावयाचा. सरकारचें एखादें कृत्य कायदेशीर असलें म्हणजे तें जुलमी नाहीं असें ठरत नाहीं. औरंगजेब बेकायदेशीर कधींच वागला नाहीं. म्हणजे तो जुलमी नव्हता असं म्हणावयाचें कीं काय! त्याची लहर हाच कायदा असल्यामुळें त्याचें कोणतेंहि कृत्य कायदेशीर ठरूं शकत होतें. तीच गोष्ट सध्यांच्या सरकारची आहे. चार माणसें टेबलाभोंवतीं जमलीं कीं वाटेल तितके कायदे जन्मास येतात. आतां कोणाच्याहि कृत्यावर सरकारला 'कायदेशीर' असा शिक्का मारतां येतो त्याचप्रमाणें हें कृत्य जुलमी आहे असा त्यावर शिक्का मारण्याचा प्रजेचा हक्क आहे. सरकारला कांहीं विशिष्ट

प्रक्रियेनें आपलें कृत्य कायदेशीर ठरवितां येतें; प्रजेलाहि दुसऱ्या एका प्रक्रियेनें तें कृत्य जुलमी ठरवितां येतें. त्या कायदेशीर पण जुलमी हुकमाचा शांततेनें, हालअपेष्टा सोसून, व अवश्य तर स्वतःचा बळी देऊन प्रतिकार करणें हीच ती प्रक्रिया होय. ( १५ मे १९०६ ) बंगाली नेत्यानीं नेमकें हेंच केलें. हालअपेष्टांच्या भट्टींतून याप्रमाणें जाणें हा इंग्रजी राष्ट्राचा प्रघात आहे. त्याचेंच अनुकरण करून पोलीसांच्या दंडुक्यानीं डोकीं फोडून घेऊन ' दुःखें सोसण्यास आम्ही तयार आहों ' असें जाहीर करण्याचा विधि बंगाली पुढाऱ्यांनीं ऐतिहासिक रीतीनें पार पाडला.आणि जुलमी कायद्यांना प्रतिकार करण्याचें सामर्थ्य प्रजाजनांत आहे हें त्यांनीं सिद्ध केलें. अशा प्रकारच्या शांततेच्या आग्रहाखेरीज आतां कार्यभाग व्हावयाचा नाहीं. या मार्गालाच इंग्रजींत पॅसिव्ह रेझिस्टनस् असें म्हणतात. ( १०–७–१९०६ )

तेव्हां यापुढें कोणचीहि चळवळ करतांना न्याय, नीति आणि ऐतिहासिक परंपरा किंवा प्रगति यांचा आमच्या कृत्यास आधार आहे कीं नाहीं एवढेंच आम्ही पाहिलें पाहिजे. ते कायदेशीर आहे कीं बेकायदेशीर आहे याचा विचार करण्यांत हंशील नाहीं. प्रजेच्या नैसर्गिक हक्कांस धरून नीतिदृष्ट्या एखादें कृत्य योग्य ठरल्यावर तें कायद्याचें कक्षेंत येतें कीं नाहीं याची पर्वा करून उपयोगी नाहीं. आतां येवढें खरें कीं कायदा मोडला कीं शिक्षा होणार. पण त्याला इलाज नाहीं. कायदा एकदां जुलमी ठरल्यावर शिक्षा सोसूनच त्याचा प्रतिकार केला पाहिजे. नीति व कायदा यांची फारकत होते तेव्हां असेच प्रकार घडून येतात ( १२–२–१९०७ ).

टिळकांचें कायदेभंगाचें तत्त्वज्ञान शक्य तों त्यांच्याच शब्दांत वर दिलें आहे. हिंदुस्थानांत लोकसत्ता निर्माण व्हावयाची व टिकावयाची तर सामान्य जनतेला अन्यायाचा प्रतिकार करण्याचें सामर्थ्य प्राप्त झालें पाहिजे हा सिद्धांत त्यांच्या मनाशीं दृढ होऊन गेला होता. तो प्रतिकार कायद्याच्या कक्षेंत राहून करावयाचा नसून कायदा जेव्हां जुलमी असेल तेव्हां त्याचा भंग करूनहि केला पाहिजे ही शिकवण त्यांनीं कशी दिली, हें वरील अवतरणांवरून स्पष्ट होईल. आरंभीं उल्लेखिलेल्या कलकत्त्याच्या भाषणांत त्यांनीं आपल्या बहिष्कार योगाचें किंवा असहकारितेचें सर्व शास्त्र अगदीं थोडक्यांत सांगितलें आहे. ' आपल्याजवळ शस्त्रास्त्रें नाहींत; पण त्यांची जरूरहि नाहीं. बहिष्कार हें

त्यापेक्षांहि प्रभावी शस्त्र आहे. प्रत्यक्ष प्रतिकार करतां येत नाहीं; पण परकी सरकारला आपल्यावर राज्य चालविण्यास साह्य करावयाचें नाहीं ही प्रतिज्ञा तर तुम्हांला करतां येईल ना ? बहिष्कार हें राजकीय शस्त्र आहे असें आम्ही म्हणतों,तेव्हां आमच्या मनांत हा अर्थ असतो. करवसुली, न्यायदान, पोलीस, यांपैकीं कोणच्याहि खात्यांत सरकारला साह्य करूं नका. हिंदुस्थानाबाहेर लढाई चालविण्यास साह्य करूं नका. आपण आपलीं न्यायालयें स्थापूं. आपण आपला कारभार करूं. आणि तशी वेळ येतांच आपण कर बंद करूं. आपल्या संघशक्तीनें आपण हें घडवून आणूं, असा तुम्हांस आत्मविश्वास असेल तर तुम्ही उद्यांपासून स्वतंत्रच आहां.' (कलकत्याचें २-१-१९०७ चें भाषण.)

भारतीय लोकसत्तेच्या प्रस्थापनेंत लो. टिळकांचें कार्य काय तें आपण पहात आहों. भारतीय जनतेंत अन्यायाचा प्रतिकार करण्याची वृत्ति जागृत करून लोकसत्ता पेलण्यास अवश्य अशी जी लोकशक्ति ती टिळकांनीं चाळीस वर्षांच्या दीर्घ परिश्रमांनीं निर्माण केली, अशी एका वाक्यांत त्यांच्या कार्याची फलश्रुति सांगतां येईल. आतां या जागृतीसाठीं टिळकांनीं ज्या चळवळी केल्या त्यांना अखिल भारतीय रूप कसें प्राप्त झालें तें प्रथम पाहून नंतर या जागृत लोकशक्तीची टिळकांनीं संघटना कशी केली त्याचा विचार करून हें प्रकरण संपवूं.

कायदेशीर चळवळ व कायदेभंगाची चळवळ असे टिळकांच्या चळवळींचे दोन भाग पडतात. १८९१-९२ सालापासून व विशेषत: १८९६ सालापासून १९०३ पर्यंत महाराष्ट्रांत टिळकांनीं कायदेशीर संग्राम चालविला होता. त्या वेळीं इतर प्रांतांत असल्या तऱ्हेची सौम्य चळवळसुद्धां चालू नव्हती. अर्जविनंत्यापलीकडे कॉंग्रेसची मजल गेली नव्हती. जनता तर निपचीप जमिनीसरपट पडून होती. १९०३ च्या सुमारास कायदेशीर चळवळीच्या मर्यादा संपल्या, हें जाणून टिळकांनीं निःशस्त्रप्रतिकार, बहिष्कार-योग, कायदेभंग यांचें तत्त्वज्ञान प्रतिपादण्यास प्रारंभ केला. या दुसऱ्या प्रकारची चळवळ टिळकांनीं प्रत्यक्ष अशीं कधींच केली नाहीं. तिचें तत्त्वज्ञान सांगून जनतेची मनोभूमिका तयार करीत असतांनाच त्यांना सहा वर्षांची शिक्षा झाली, आणि हें नवें तेज क्षणभर मालवल्यासारखें झालें. पण

बहिष्कारयोगाचें तत्त्वज्ञान पसरविण्याचें जें कार्य टिळकांनीं आरंभिलें होतें, त्यांत मात्र त्यांना इतर प्रांतांतील धुरीणांचें पुष्कळच साह्य झालें. पहिल्या चळवळीचे पडसाद महाराष्ट्राबाहेर इतर प्रांतांत कोठेंच उमटले नाहींत. पण वंगभंगाच्या निमित्तानें निर्माण झालेली प्रक्षोभाची लाट मात्र एकदम सर्व हिंदुस्थानभर पसरली आणि स्वदेशी बहिष्काराच्या चळवळीला एकदम अखिल भारतीय रूप प्राप्त झालें. प्रत्यक्ष कायदेभंग व करबंदी येथपर्यंत ही चळवळ गेली नाहीं. पण वंगभंगाच्या अन्यायाचा प्रतिकार केवळ अर्ज-विनंत्यांनीं न करतां ब्रिटिश मालावर बहिष्कार घालून करावयाचा, या पायरीवर मात्र भारतांतील सर्व प्रांतांतले लोक एकदम चढले. कायदेभंगाचा एकच प्रसंग त्या वेळीं झाला आणि तो म्हणजे बारिसालचा; आणि त्याचें सर्व श्रेय बाबू सुरेंद्रनाथ बॅनर्जी व त्यांचे सहकारी यांनाच आहे. टिळकांनीं त्यांच्या या अपूर्व राष्ट्रसेवेबद्दल केसरींतून त्यांच्यावर धन्यवादाचा नुसता वर्षाव केलेला दिसतो. कारण त्या एका दिवसाच्या त्या एका प्रहरांत सुरेंद्रनाथांनीं भारतांतील राजकीय चळवळीचा सगळा मोहराच पालटून टाकला होता. बंगालमधील राष्ट्रीय पक्षाचे धुरीण बाबू बिपिन चंद्रपाल व बाबू अरविंद घोष यांनीं बहिष्कारयोग किंवा निःशस्त्र प्रतिकार या मार्गाचा फारच जोरानें पुरस्कार केला. अरविंद घोषांनीं आपल्या अलौकिक, त्यागमय, साहसी व तेजस्वी जीवनानें बंगालचें वातावरण विजेच्या स्फुल्लिंगांनीं भरून टाकलें. पंजाबमध्यें लाला लजपतराय यांनीं निःशस्त्र-प्रतिकाराच्या मार्गास अशीच चालना दिली. १६–१०–१९०५ या दिवशीं त्यांचें भाषण झालें, तें अतिशयच तेजस्वी असें होतें. ‘ सर्व हिंदुस्थानांत बंगाल अग्रेसर असून तो या जुलुमानें जागृत झाला आहे. आपल्या राष्ट्राच्या चळवळीची धुरा वाहण्याचा अग्रमान बंगालनें मिळविला, याचा मला हेवा वाटतो. आपल्या राष्ट्राला हा पुण्ययोग आणून दिल्याबद्दल आपण कर्झनसाहेबांचे आभार मानले पाहिजेत. ब्रिटिशांनीं असे व्हाइसरॉय वरचेवर पाठवावे अशी माझी मागणी आहे. इंग्लिश राष्ट्राच्या इतिहासाचा संदेश मी तुम्हांस सांगतों. निःशस्त्र प्रतिकार हाच तो संदेश होय. तुम्ही अधिक पौरुष दाखवा, अधिक कणखर व्हा म्हणजे आपलें ध्येय सहज साध्य होईल’ ( लजपतराय दि मॅन इन् हिज् वर्ड्स्. पृ. १४९ ). यानंतर बंगालप्रमाणेंच

पंजाबातहि असंतोषाच्या ज्वाला भडकल्या. हा असंतोष लष्करापर्यंत पोचल्याचीं चिन्हें दिसूं लागलीं. तेव्हां लालाजींना १९०७ च्या मे महिन्यांत हद्दपार करण्यांत आलें. मद्रासमध्यें १९०७ च्या ऑगस्टमध्यें अकोटला भरलेल्या प्रांतिक परिषदेंत सुब्रह्मण्य अय्यर यांनीं प्रतिकाराच्या याच मार्गाचा पुरस्कार केला.

पण बहिष्कारयोगाची चळवळ अशी अखिल भारतव्यापी होऊं लागली असली तरी त्या केवळ पहिल्या लाटा होत्या. हें पाणी जमिनीच्या खालच्या थरांत अजून पोचलें नव्हतें. त्यामुळें टिळकांना शिक्षा होतांच सर्वत्र कोरड पडून चळवळीचें अवसान एकदम गेलें. या चळवळीचा पुरस्कार करणारे प्रत्येक प्रांतांतले पुढारी पुढील सातआठ वर्षें कार्य करण्यास मोकळेच होते. कोणालाही अटक झाली नव्हती. पण त्यापैकीं एकानेंहि ही चळवळ पुढें चालविली नाहीं. अरविंद घोष पाँडेचरीला अध्यात्मचिंतनासाठीं निघून गेले. बिपिनचंद्र पॉल बरेचसे साम्राज्यनिष्ठ झाले. लजपतराय पुढील ८।१० वर्षांत प्रकृतीच्या अस्वास्थ्यामुळें इंग्लंड–अमेरिकेंतच असत. केळकर–खाडिलकर महाराष्ट्रांत होते. सुब्रह्मण्य अय्यर मद्रासेंत होते. पण ते विशेष कांहीं करूं शकले नाहींत. सर्वांत दुःखद कथा सुरेंद्रनाथ बॅनर्जी यांची आहे. वास्तविक कायदेभंगाच्या चळवळीस प्रत्यक्ष प्रारंभ त्यांनींच केला होता. पण बारिसालनंतर पुन्हां त्या मार्गांत त्यांनीं पाऊल टाकलें नाहीं. इतकेंच नव्हे तर १९२५ सालीं लिहिलेल्या आत्मचरित्रांत त्यांनीं बहिष्कार योग, निःशस्त्र प्रतिकार यांचा अनेक ठिकाणीं निषेध केला आहे. सनदशीर मार्ग सोडून आम्ही कधीं रेसभरहि गेलों नाहीं, असेंच त्यांचें म्हणणें आहे. एके ठिकाणीं आम्हीं बारिसालला सत्याग्रह केला असें त्यांनीं मान्य केलें आहे, पण 'त्या वेळीं आम्हीं भोगलेलीं दुःखें आमचीं आम्हांस ठाऊक. पुन्हां त्या मार्गानें जाण्यांत अर्थ नाहीं.' असें त्याबद्दल सांगून टाकलें आहे (ए नेशन इन दि मेकिंग पृ. २४०). १९१७ सालीं त्यांची ब्रिटिश साम्राज्यनिष्ठा वाढीस लागली व ते काँग्रेसमधून फुटून निघाले आणि १९२५ सालीं सनदशीर मार्ग सोडून रेखामात्रहि तुम्ही जाऊं नका, कारण ब्रिटिशांचें मन व धोरण आतां बदललें आहे, उदार झालें आहे, असा आपल्या देशबांधवांस त्यांनीं शेवटचा संदेश दिला.

## अखिल भारतीय

टिळक सुटून आले त्या वेळीं हिंदुस्थानच्या सर्व प्रांतांत असा अंधेर होता; तरी टिळकांचीं मंडालेचीं सहा वर्षे फुकट गेलीं असें म्हणण्याचें कारण नाहीं. तीं सहा वर्षे टिळक जणुं काय इंद्रजिताप्रमाणें एकांतांत बसून अमोघ शक्तीच्या प्राप्तीसाठीं यज्ञ करीत होते आणि अप्रत्यक्षरीत्या कां होईना, प्रत्येक भारतीयाच्या मनांत त्या तेजाचा संचार होत होता. असें वाटण्याचें कारण हें कीं, टिळक सुटून आल्यानंतरच्या सहा वर्षांत येथें इतकी अपूर्व अशी लोकशक्ति जाग्रत झाली कीं, मागल्या तीन तपांच्या टिळकांच्या खडतर तपश्चर्येचें फल सिद्ध झाल्यासारखें वाटावें. १८८१ सालीं टिळकांनीं या कार्यास प्रारंभ केला होता व १९१६ सालीं त्याला तीन तपें पुरीं होत होतीं. टिळकांच्या वयालाहि या सालीं ६० वर्षें होत असून ते आतां परिणतप्रज्ञ होऊन जनतेच्या अग्रभागीं उभे होते. पुढील चार वर्षांत लखनौ, कलकत्ता व अमृतसर येथें काँग्रेसचीं अधिवेशनें झालीं. चिकोडी, बेळगांव, अहमदाबाद, गोध्रा येथें प्रांतिक परिषदा झाल्या. या सर्व सभापरिषदांना टिळक गेलेच होते. त्याशिवाय सिंध, मद्रास, बंगाल या प्रांतांत त्यांचे दौरे निघाले होते. दिल्ली, कानपूर, अजमीर, अलाहाबाद अशा शहरीं त्यांचीं व्याख्यानें झालीं. या सर्व सभांची, अधिवेशनांची व दौऱ्यांची हकीकत पाहिली कीं असें दिसतें कीं अखिल भारतीय जनता जागृत होऊन आतां या महापुरुषाच्या मागें उभी होती. कोट्यवधि लोकांनीं त्यांना मानपत्रें दिलीं. त्यांत मुस्लीमसंघ, ब्राह्मणेतर पक्ष, मजूरसंघ यांचींहि मानपत्रें होतीं. हिंदी स्वराज्यसंघाच्या शाखा हिंदुस्थानच्या प्रत्येक गांवीं निघाल्या. अलीबंधूंच्या अटकेसारख्या प्रसंगीं दिल्लीपासून मद्रासेपर्यंत सभा होऊन सरकारचा निषेध होऊं लागला आणि होमरूलच्या मागणीसाठीं ॲनी बेझंट यांना अटक होतांच हिंदुस्थानांतल्या सर्व प्रांतांतील लोकांनीं, 'ती मागणी बेकायदेशीर असली तर आम्ही तीच जाहीरपणें करीत आहों, व त्यासाठीं होईल ती शिक्षा भोगण्यास सिद्ध आहों' असा घोष शेंकडों जाहीर सभांतून केला व तशीं लेखी प्रतिज्ञापत्रकेंहि दिलीं. अशा रीतीनें चाळीस वर्षांच्या दीर्घ परिश्रमानें टिळकांनीं अखिलभारतीय जनतेची प्रतिकारशक्ति जाग्रत केली,

तत्त्वज्ञान सांगून व त्यासाठीं स्वतः झिजत राहून व अनेक संग्राम करून तिच्या ठायीं आत्मप्रत्यय निर्माण केला आणि स्वातंत्र्य व लोकसत्ता यासाठीं जो महासंग्राम पुढें व्हावयाचा त्यासाठीं तिला सिद्ध केलें.

लोकसत्ता ही मानवी समाजाची अत्यंत परिणत अशी अवस्था आहे. ती प्राप्त होण्यासाठीं त्या समाजांतील मानव हा आमूलाग्र निराळा होणें, त्याच्या मनाची घडण सर्वथैव बदलणें अवश्य असतें. जेथें लोकसत्तेचा उदय झालेला नसतो तेथें मानव हा व्यक्ति या पदवीला प्राप्त झालेला नसतो. पूर्वीच्या काळांत त्या त्या भूप्रदेशांत मानवांचे समूह असत. धुळीच्या राशींतील कणांना ज्याप्रमाणें भिन्नपणा नसतो, पृथगहंकार नसतो त्याप्रमाणें या मानवानांहि नसतो. पशूंचे जसे कळप तसेच मानवांचे हे समूह किंवा कळपच होत. त्या काळीं भिन्नत्व नसतें एवढेंच नव्हे तर कोणा मानवाच्या ठायीं असें भिन्नत्व निर्माण झालें तर तें नष्ट करून टाकावें असेंच समाजाचें धोरण असतें. जातीचे जे सामान्य धर्म त्यांशीं जातीचा प्रत्येक घटक अनुगामी असलाच पाहिजे असा समाजाचा कटाक्ष असे. आणि या बंधनांमुळेंच मानवाचें कर्तृत्व कुंठित होत असे. पाश्चात्य संस्कृतीचा आपल्या भूमींत प्रवेश होण्यापूर्वी हजार दीड हजार वर्षें येथला समाज अशा स्थितींत होता. येथें मानवाचें समूह होते. येथें जाति होत्या. पण त्या जातींतून व्यक्ति निर्माण होत नव्हत्या. निर्माण होऊंच नयेत अशी समाजरचना येथें होती. अशीं धर्मबंधनें येथें होतीं.

## राजकीय म्हणजेच सामाजिक व आर्थिक

अशा या समाजांतून व्यक्ति निर्माण करण्याचा प्रयत्न गेल्या शतकांतील थोर पुरुषांनीं कसा केला तें आपण येथवर पाहिलें. राजा राममोहन, माधवराव रानडे यांनीं येथल्या मानवाला त्याच्या आत्मप्रतिष्ठेची जाणीव करून दिली. गलिच्छ अशा जड आचारधर्माच्या बंधनांतून त्याला मुक्त करून आपण मानव म्हणजे देह नसून कांहीं वरच्या शक्तीहि आपणापाशीं आहेत, याची संज्ञा त्याला आणून दिली. जो धर्म मानवाच्या देहालाच महत्त्व देतो तो समाजाला कळपाचीच अवस्था प्राप्त करून देतो. त्या काळचा हिंदुधर्म या स्वरूपाचा होता. तो उच्छिन्न करून या धर्मवेत्त्यांनीं

तेथें मनाला महत्त्व देणारा धर्म प्रस्थापित केला. पण या धर्माचीं बंधनेंहि गूढ अध्यात्माच्या वर्चस्वामुळें मानवी मनाला व बुद्धीला म्हणजेच त्याच्या व्यक्तित्वाला जाचक होतात हें जाणून आगरकरांनीं त्या बंधनांवरहि घाव घातले आणि शुद्ध भौतिकवादाचा संदेश सांगून भारतीयांचें मन अगदीं निर्मुक्त करून टाकलें. या पुढची महनीय कामगिरी टिळकांनीं केली. धार्मिक व सामाजिक बंधनापेक्षां राजकीय बंधनें शतपटीनें, सहस्रपटीनें जाचक असतात. मग तीं बंधनें स्वकीयांनीं लादलेलीं असोत वा परकीयांनीं ! मानवाच्या मानवत्वाचा, प्रतिष्ठेचा, व व्यक्तित्वाचा राजकीय पारतंत्र्याच्या शृंखलांनीं सर्वस्वी कोंडमारा होत असतो. अशा या अत्यंत घातक शृंखलांवर टिळकांनीं घण घालण्यास सुरवात केली, आणि हे घण घालण्याचें शिक्षण जनतेला दिलें. सरदार, जमीनदार, संस्थानिक यांच्या साह्यानें या शृंखला तोडून त्यांनीं स्वातंत्र्य आणलें असतें तरी जनतेचें राजकीय पारतंत्र्य तसेंच राहून तिच्या व्यक्तित्वाचा विकास झाला नसता. पण टिळकांनीं लोकशक्ति जागृत केली. आणि सामाजिक सुधारणांच्या आधीं राजकीय सुधारणा अवश्य आहेत, राजकीय सुधारणा येतांच सामाजिक सुधारणा आपोआप येतील असें ते जें म्हणत त्यांतील मर्म यांत आहे. सामान्य जनता, शेतकरी व कामकरी जनता, बहुसंख्य जनता अन्यायाच्या प्रतिकारार्थ एकदां सिद्ध झाली, जुलमाविरुद्ध प्रतिकार करण्याची रग तिच्याठायीं निर्माण झाली, प्रबळ अशा पाशवी सत्तेशीं संग्राम करून तिला आपण खडे चारूं शकतों, असा आत्मविश्वास तिच्याठायीं निर्माण झाला म्हणजे जनतेच्या व्यक्तित्वाचा संपूर्ण विकास होतो; आणि अशी ही जनता मग कसलीहि विषमता, कसलीहि सामाजिक वा धार्मिक अन्याय्य बंधनें टिकूं देणार नाहीं हें उघडच आहे. आगरकरप्रणीत सामाजिक सुधारणेला टिळकांनीं अनेक वेळां विरोध केला एवढ्यावरून कांहीं अडाणी लोक त्यांना प्रतिगामी म्हणतात. हिंदुधर्मातली जुनी विषमता, कनिष्ठवर्णीयांचीं जुनीं दास्यें त्यांना तशींच टिकवून ठेवावयाचीं होतीं असें या लोकांना वाटतें. ज्याला जनता दास्यांत ठेवावयाची आहे तो तिच्या ठायींची सुप्त शक्ति कधींहि जागृत करणार नाहीं. अन्यायाचा प्रतिकार करण्याची वृत्ति तिच्यांत निर्माण करणार नाहीं. कारण ती एकदां निर्माण झाल्यानंतर कोणचीहि

विषमता ही जनता सहन करणार नाहीं. आज अस्पृष्ट जनतेची मागणी काय आहे ती पहा. देवळांत जाण्याचे व सहभोजनाचे हक्क यांचें महत्त्व आज त्यांना वाटत नाहीं. त्यांना राजकीय हक्क पाहिजे आहेत. व आपली आर्थिक स्थिति सुधारली पाहिजे, अशी त्यांची मागणी आहे. या सुधारणा होतांच सामाजिक व धार्मिक बंधनें तटातट् तुटून पडतील ही त्यांची खात्री आहे. टिळकांनीं नेमकें हेंच तत्त्व प्रतिपादिलें व अवलंबिलें. व्यक्तित्व जागृत करणें हीच सर्वांत श्रेष्ठ सामाजिक व धार्मिक सुधारणा होय. आणि अन्यायाचा प्रतिकार करण्याकरतां वाटेल ते कष्ट व क्लेश भोगण्याची सिद्धता होणें येथूनच व्यक्तित्वाच्या जागृतीस प्रारंभ होतो. सर्व सुधारणांची ही गुरुकिल्ली जाणूनच टिळकांनीं जनताजागृतीच्या कार्यास प्रारंभ केला होता. आतां ही जागृति करतांना सामाजिक सुधारणास विरोध करणें अवश्यच असतें असें नाहीं; पण तो काळ निराळा होता. सामाजिक सुधारणास जनतेचाच विरोध होता. तिचा पुरस्कार त्यांनीं केला असता तर ती आगरकरांवर उलटली तशी त्यांच्यावर उलटली असती. उलट राजकीय संग्रामासाठीं ती लवकर सिद्ध होईल हें स्पष्ट होतें आणि त्या संग्रामांतून तिचें व्यक्तित्व जागृत होऊन पुढें सामाजिक व धार्मिक सुधारणांना ती स्वयमेवच सिद्ध होईल हें टिळकांना दिसत होतें आणि म्हणूनच त्यांनीं तो मार्ग पत्करिला. आतां सामाजिक सुधारणांना विरोध करतांना पुष्कळ वेळां आज आपणांस अप्रिय वाटणाऱ्या गोष्टी त्यांनीं केल्या हें खरें आहे. संमतिवयाचा वाद त्यांनीं करावयास नको होता हें खरें आहे. वेदोक्ताचा हक्क ब्राह्मणेतरांस नाकारावयास नको होता हें खरें आहे. आंतरजातीय विवाहाच्या बिलास त्यांनीं विरोध केला नसता तर बरें झालें असतें असें मलाहि वाटतें; पण आपला काल, आपली परिस्थिति व आपले संस्कार यांतून कार्लमार्क्ससारखा सर्वश्रेष्ठ क्रान्तिकारकहि मुक्त नसतो असें जेथें त्याचे अनुयायीच आज म्हणत आहेत तेथें टिळकांसारखा सनातन धर्माचा व पूर्वपरंपरांचा अभिमानी पुरुष कांहीं वेळां त्यांच्या आहारीं गेला तर त्यांत नवल तें काय ! पण तेवढेंच लक्षांत घेऊन, त्यांनीं अखिल जनतेला राजकीय संग्रामाची दीक्षा देऊन तिच्या ठायींचा पृथगहंकार जागृत करून तिच्या व्यक्तित्वाच्या विकासाला जी

चालना दिली आणि त्या मार्गानें सामाजिक व धार्मिक सुधारणांनाहि गति देण्याची व्यवस्था करून लोकसत्तेची जी अपूर्व सेवा केली तिकडे आपण दुर्लक्ष करणार असलों तर आपल्यासारखे करंटे आपणच! टिळकांना १९०८ सालीं शिक्षा झाली. त्या वेळीं मुंबईंत कामगारांचे दंगे झाले. कामगारांनीं सहा दिवसपर्यंत संप केला आणि गोळीबारालाहि दाद न देतां तो चालू ठेवला. हें वृत्त रशियांतील कामगारचळवळींचा सूत्रधार निकोलाय लेनिन याच्या कानीं जातांच, "हिंदुस्थानांतील कामगारांचा हा पहिलाच राजकीय संग्राम असून तो उज्ज्वल भविष्यकाळाचा निदर्शक आहे म्हणून मी त्याचें स्वागत करतों" असे उद्गार त्यानें काढले. टिळकांनीं कोणची शक्ति जागृत केली होती हें आपल्याला कळलें नाहीं तरी जाणत्यांनीं हें त्या वेळींच जाणलें होतें.

## जागृतीनंतर संघटना

भरतभूमींतील लोकशक्ति टिळकांनीं जागृत कशी केली हें येथवर आपण पाहिलें. आतां ती लोकशक्ति संघटित करण्याचें तितकेंच महत्त्वाचें कार्य त्यांनीं कसें केलें तें पहावयाचें आहे. इतर देशांतील इतिहासावरून आपण पहातोंच आहों कीं, जागृत झालेली लोकशक्ति संघटित झाली नाहीं तर ती शक्ति त्या भूमीला वराप्रमाणें न ठरतां शापाप्रमाणें ठरते. संघटनाकौशल्य नसल्यामुळें सध्यांच्या काळांत अनेक देशांतील जनता शतधा भिन्न होत आहे अगर दण्डसत्तेला शरण जात आहे असें दृश्य दृष्टीस पडतें. हिंदुस्थानांत गेल्या सत्तर वर्षांच्या इतिहासांत असा प्रकार फारसा झाला नाहीं आणि याचें कारण म्हणजे टिळक व महात्माजी यांनीं कॉंग्रेस ही संस्था अभंग राखण्याचे केलेले पराकाष्ठेचे प्रयत्न हें होय.

देशांतल्या सर्व पक्षोपपक्षांचें बळ कॉंग्रेसमध्यें एकटवून तिला समर्थ करावयाचें, ती दुभंगू नये म्हणून व ती आपत्ति आलीच तर तिला सांधण्यासाठीं पडेल ती किंमत द्यावयाची व जें पाऊल टाकावयाचें तें कॉंग्रेसला बरोबर घेऊन टाकावयाचें हें टिळकांचें जन्मभर ठरलेलें धोरण होतें आणि त्यांनीं जन्मभर तें एकनिष्ठपणें पाळलें होतें. लोकशाहीच्या युगांत लोकायत्त संस्थामध्यें अखंड ऐक्य राखून समाजाची संघशक्ति अभंग

कशी राखावी या विषयींचे आपले विचार त्यांनीं १९०७-८ सालच्या केसरीच्या अंकांतून मांडलेले आढळतात. १९०४ पर्यंत मवाळ जहाल हा भेद राष्ट्रसभेस फारसा जाणवत नव्हता. १९०५ सालीं वंगभंगाच्या चळवळीपासून त्या भेदाला तीव्र रूप येऊं लागलें. १९०६ सालीं दादाभाईंच्या पुण्याईमुळें प्रकरण विकोपाला गेलें नाहीं; पण १९०७ सालीं ती आपत्ति आली आणि राष्ट्रसभा दुभंगली. त्या वेळीं जहालांनीं म्हणजेच राष्ट्रीय पक्षानें आपली निराळी कॉंग्रेस काढावी अशी कोणीतरी सूचना केली. तिचा परामर्श घेतांना टिळकांनीं पक्षोपपक्षांच्या ऐक्यासंबंधींचें सर्व तत्त्वज्ञान सांगितलें आहे; त्याचा मथितार्थ असा.

राष्ट्रसभा ही हिंदुस्थानांतील सर्व जातींची, पंथांची व पक्षांची आहे. तिचें स्वरूप ब्रिटिश पार्लमेंटसारखें आहे. पार्लमेंटांत जसे भिन्नभिन्न पक्ष नांदतात तसेंच आपण राष्ट्रसभेंत नांदूं दिले पाहिजेत. कॉन्झरवेटिव्ह, लिबरल, लेबर, रॅडिकल असे अनेक पक्ष झाले तरी निराळें पार्लमेंट कोणी काढीत नाहींत. त्याच पार्लमेंटांत राहून तेथें आपापल्या पक्षाचें बहुमत करून घेण्यास हे पक्ष झटत असतात. आपल्याकडील राष्ट्रीय, नेमस्त इ. पक्षांनीं हेंच धोरण अवलंबिलें पाहिजे. अशा सभांचा निर्णय अर्थातच बहुमतानें होणें अवश्य आहे. आणि सभेचा निर्णय होईपर्यंत भिन्न पक्षांनीं कितीहि विरोधी भूमिका घेतल्या असल्या तरी एकदां निर्णय झाल्यावर तो आपलाच निर्णय असें समजून सर्वांनीं तो शिरोधार्य मानिला पाहिजे. याचा अर्थ असा नव्हे कीं एकदां बहुमतानें निर्णय झाल्यावर सर्वांचें विचारस्वातंत्र्य संपतें. तसें मुळींच नाहीं. बहुमत आपल्या बाजूस वळवून घेण्याचा प्रत्येक व्यक्तीस नेहमींच हक्क आहे. तो कधींहि कोणीहि हिरावून घेऊं शकत नाहीं. असा हक्क हिरावणें म्हणजे लोकांचें विचारस्वातंत्र्य हिरावून घेण्यासारखें होय. आणि विचारस्वातंत्र्य हा तर राष्ट्राचा आत्मा होय. जेथें विचारस्वातंत्र्य नाहीं तें राष्ट्र मेल्यासारखेंच होय. म्हणून हें स्वातंत्र्य नष्ट करूं पहाणारा मनुष्य राष्ट्राचा शत्रू समजला पाहिजे ( केसरी २७-८-१९०७ ).

राष्ट्रांत भिन्न पक्ष असणें हें घातक तर नाहींच पण अवश्यच आहे. त्यांवाचून प्रत्येक प्रश्नाचा सर्व बाजूंनीं विचार होणार नाहीं. मात्र भिन्नभिन्न

पक्षांनीं हें ध्यानांत ठेवलें पाहिजे कीं राष्ट्राचा अभ्युदय कशांत आहे तें ठरविणाचा मक्ता परमेश्वरानें आपणा एकट्याकडेच दिलेला नाहीं. मवाळ किंवा जहाल या दोन्ही पक्षांना देशहितच साधावयाचें आहे, हें प्रत्येक पक्षानें कबूल केलें पाहिजे. दुसऱ्याच्या हेतूच्या शुद्धतेविषयीं कोणीहि शंका घेतां कामा नये. दोन्ही पक्ष एकाच राष्ट्रकार्यधुरेचे वाहक आहेत हें कोणी विसरूं नये. अशा तऱ्हेनें सावधगिरी बाळगली कीं मतभेद, पक्षभेद, यांना भिण्याचें कारण नाहीं. मतभेदांतहि मतैक्य कसें निर्माण करावयाचें याचा निकाल पाश्चिमात्य राष्ट्रांनीं दिलेला आहे. संघशक्ति निर्माण करण्यास मतभेदांचें निर्मूलन करणें हा उपाय नसून सर्व मतभेद एककार्यवाही करण्याचा प्रयत्न करणें हा आहे (१८–२–१९०८).

हें सर्व ध्यानीं घेऊन दोन्ही पक्षांनीं राष्ट्रसभा अभंग राखण्याचा प्रयत्न केला पाहिजे. दोन्ही पक्षांच्या सहकार्यात जी शक्ति आहे ती हे पक्ष वेगळे झाले तर टिकून रहाणें शक्य नाहीं. आपापलीं मतें लोकापुढें मांडून लोकांस आज नाहीं तर उद्यां आपले वतीचे करून घेण्याची दोन्ही पक्षाची जी झटापट चालते तीच राष्ट्राच्या प्रगतीचें खरें साधन होय. ही झटापट चालू ठेवूनच दोन्ही पक्षांनीं विशिष्ट कार्यापुरतें, विशिष्ट नियमांनीं पार्लमेंटांतील भिन्नभिन्न पक्षांप्रमाणें एकत्र झालें पाहिजे आणि वागलें पाहिजे (३–३–१९०८).

राष्ट्रसभेची संघशक्ति अभंग राखण्याचा प्रयत्न करणें, हें टिळकांच्या आयुष्याचें ब्रीद-वाक्य होतें. त्यासाठीं वाटेल ती किंमत देण्यास, वाटेल ती झीज सोसण्यास व वाटेल तो अपमान सहन करण्यास ते नेहमीं तयार असत. १९०७ सालीं सुरतेला कॉंग्रेसची बैठक मोडली व राष्ट्रीय आणि नेमस्त या दोन्ही पक्षांचे लोक आपापल्या शिबिरांत गेले. त्या वेळीं सर्वांनाच आपल्या राष्ट्रांतील ही सर्वांत मोठी व कार्यकारी संस्था भंगली याबद्दल पराकाष्ठेचें दुःख झालें. आणि कांहीं विचारी नेते दोही पक्षांचें ऐक्य कसें साधतां येईल याचा विचार करूं लागले. अमृतबझार पत्रिकेचे संपादक बाबू मोतीलाल घोष हे अशा विचारकर्त्यांत अग्रेसर होते. चर्चा करतांना त्यांच्या असें ध्यानांत आलें कीं कॉंग्रेस मोडण्याचें सर्व पातक टिळकांच्या माथीं लादावें असा मवाळ पक्षाचा हट्टाग्रह आहे. टिळकांची कांहीं चूक आहे असें

मोतीबाबूंना वाटत नव्हतें. पण टिळकानीं तें पातक आपल्या शिरीं घेतलें तर समेट होण्याचा संभव आहे असें वाटून ते राष्ट्रीयपक्षाच्या शिबिरांत आले व टिळकांना म्हणाले, ' त्या लोकांना तुमचा बळी पाहिजे आहे. मी तुम्हांला सांगतों तुम्ही तो देऊन टाका. काँग्रेसला वांचविण्यासाठीं हा त्याग तुम्ही करावा. असें करतांना तुमच्या विवेकबुद्धीला असह्य यातना होतील. पण काँग्रेससारख्या राष्ट्रीय संघटनेला वांचविण्यासाठीं या यातना तुम्ही सहन कराव्या असें माझें सांगणें आहे. ' मोतीबाबूंना टिळक वडील बंधूच्या ठायीं मानीत असत. त्यांच्यावर त्यांचा पूर्ण विश्वास असे. त्यामुळें ही अत्यंत विलक्षण मागणीहि त्यांनीं तत्काळ मान्य केली. ते म्हणाले, ' मवाळपक्ष इतउत्तर काँग्रेसमध्यें राहून कार्य करण्यास तयार असेल, काँग्रेस अभंग रहात असेल तर या सर्व अपेशाचें खापर मीं माझ्या माथीं घेण्यास तयार आहे. ' पण मवाळांना काँग्रेस भग्नच करावयाची होती. त्यामुळें टिळकांच्या या विलक्षण त्यागबुद्धीचा कांहीं उपयोग झाला नाहीं. ( ए स्टेप इन् दी स्टीमर प्रस्तावना–मोतिलाल घोष ).

१९१६ सालीं टिळकांनीं हिंदी–स्वराज्य–संघाची स्थापना केली. काँग्रेसहून ही संस्था निराळी खरी पण काँग्रेसचेंच काम पुढें चालविण्यासाठीं तिचा जन्म होता. बॅ. बॅप्टिस्टा यांना संघानें विलायतेला धाडलें होतें. त्या वेळीं संघाची स्वराज्याची स्वतंत्र योजना होती. पण विलायतेला बॅप्टिस्टांनीं काँग्रेसप्रणीत योजनाच मांडावी असा टिळकांनीं निर्णय दिला. कारण काँग्रेस हें बळ आहे, आणि तेंच वृद्धिंगत केलें पाहिजे ही टिळकांची निष्ठा होती. पुढें टिळक विलायतेला गेले तेव्हांहि त्यांचें हेंच धोरण होतें. ज्या मागणीच्या मागें काँग्रेस नाहीं त्या मागण्यांचा पुरस्कार करणें वेडेपणाचें आहे, असें टिळकांचें मत होतें. त्यामुळें १९१८ च्या डिसेंबर महिन्यांत दिल्ली येथें काँग्रेसचें अधिवेशन झालें त्याची आज्ञा त्यानीं शिरसावंद्य मानून त्या अन्वयेंच विलायतेंतील चळवळ चालविली. ॲनी बेझंट व इतर कांहीं काँग्रेसमधलीच पुढारी मंडळी तेथील धोरण जरा चढें ठेवावें या मताचीं होतीं. पण हें टिळकांनीं मुळींच मान्य केलें नाहीं. चळवळ करतांना काँग्रेसच्या अधिवेशनांत ते सर्व पुरोगामी मतें मांडीत. पण अंतिम निर्णय काँग्रेसचा मानीत. काँग्रेसची जी शक्ति ती [redacted] ते जाणत होते.

यामुळें कृति करतांना कॉंग्रेसनें घालून दिलेल्या मर्यादेबाहेर जावयाचें नाहीं हें त्यांचें निश्चित ठरले होतें. आणि कॉंग्रेस अजून बरीच नेमस्त व मवाळ असल्यामुळें टिळकांना पुष्कळ वेळां नेमस्त व्हावें लागे. विलायतेंत बेझंट व इतर जहाल म्हणविणारे लोक यांनीं टिळकांवर हाच आरोप केला. त्याला टिळकांनीं केसरींतून पुढीलप्रमाणें उत्तर दिलें. ' विलायतेंत टिळक मॉडरेट झाले होते असें बेझंटबाई म्हणतात. पण राष्ट्रीयसभेच्या ठरावांत रेसभर देखील फरक न करतां ते ठरावच सयुक्तिक, न्याय्य खऱ्या मुत्सद्देगिरीचे आहेत असें समर्पक रीत्या पण ठासून प्रतिपादन करणें, हें जर बाईंच्या मतें टिळकांच्या मॉडरेटपणाचें लक्षण असेल तर तो आरोप सुखानें माथीं घेण्यास टिळक तयार आहेत. राष्ट्रीयसभेचा मान राखावयाचा का आपलाच हेका अगर अहंकार पुरवावयाचा हा प्रत्येक शिष्टमंडळापुढें प्रश्न होता. (त्या वेळीं कॉंग्रेसखेरीज आणखी तीन शिष्टमंडळें विलायतेस गेलीं होतीं.) आणि बाईंचा किंवा इतर शिष्टमंडळांचा कित्ता न गिरवितां टिळकांनीं व कॉंग्रेसच्या शिष्टमंडळानें राष्ट्रसभेचें मत ब्रिटिश मजूरपक्षाकडून मान्य करून घेतलें हीच त्यांची मुख्य कामगिरी होय. राष्ट्रसभा चुकत असून हिंदुस्थानचें खरें हित मलाच कळतें, असें बाईंना सांगावयाचें होतें, तर टिळकांना राष्ट्रसभेची महती स्थापित करावयाची होती.' (टिळक चरित्र–केळकर, खंड ३ भाग ६, पृ. ३४.)

कॉंग्रेस हा टिळकांच्या पुढील अचल असा ध्रुवतारा होता. कारण लोकशक्ति जागृत करण्याचें महत्त्व ते जितके जाणीत होते तितकेंच तिच्या संघटनेचें महत्त्वहि जाणीत होते. त्यामुळें तत्त्वज्ञान सांगतांना जितकें जहाल सांगतां येईल तितकें ते सांगत, पण प्रत्यक्षांत कॉंग्रेसचे ठराव शिरसावंद्य मानीत. मॉटफर्डसुधारणा जाहीर झाल्या तेव्हां त्या अपुऱ्या व निराशाजनक आहेत असें त्यांनीं सांगून टाकलें, पण लगेच, स्वीकारनकाराच्या बाबतींत कॉंग्रेस ठरवील तें आम्ही मान्य करूं, असेंहि त्यांनीं जाहीर केलें. (वरील ग्रंथ १–३–५५). खिलाफत चळवळ त्यांना पूर्णपणें मान्य नव्हती, पण ऑल इंडिया कॉंग्रेस कमिटीच्या आज्ञेप्रमाणें वागण्यास आपण तयार आहों असें त्यांनीं सांगून ठेविलें होतें. (कॉंग्रेसचा इतिहास, पट्टाभि, पृ. २२८) या धोरणामुळेंच १९०५ सालापासून जरी त्यांनीं कायदेभंगाचें तत्त्वज्ञान

सांगण्यास प्रारंभ केला होता तरी प्रत्यक्ष स्वतः कायदेभंग त्यांनीं कधीं केला नाहीं. कॉंग्रेसकडून तो ठराव करून घेऊन मग त्या रणांत उतरावयाचें असें त्यांचें ठरलेलें होतें. १९१७ सालापर्यंत कॉंग्रेसला त्यांनीं तिकडे जवळ जवळ खेचीत नेलेंच होतें. २८ जुलै १९१७ रोजीं भरलेल्या ऑ. इं. कॉं. कमिटीनें, सर्व प्रांतिक कॉंग्रेस कमिट्यांनीं निःशस्त्र प्रतिकाराचा विचार करून आपला निर्णय कळवावा असा आदेश दिला होता. त्यावेळीं अनेक प्रांतिक कमिट्यांनीं अनुकूल निर्णय दिला होता. एवढ्यांत मॉंटेग्यू यांचा २० ऑगस्टचा जाहीरनामा प्रसिद्ध झाला. त्यामुळें सर्वच वातावरण बदललें. सरकारी भेदनीति यशस्वी होऊन नेमस्त पक्ष कॉंग्रेसमधून फुटला आणि अशा सुधारणांना विरोध करणें किंवा त्यावर बहिष्कार घालणें हें देशद्रोहीपणाचें आहे असें सुरेन्द्रनाथांसारखे मवाळाग्रणी म्हणूं लागले. ( ए नेशन इन् दि मेकिंग पृ. ३१३ ) कॉंग्रेसनेंहि यामुळें निःशस्त्र प्रतिकाराचा विचार पुढें ढकलला आणि म्हणून टिळकांनींहि आपल्या ठरीव धोरणाप्रमाणें सबूर केली. मात्र त्यामार्गाचें महत्त्व पटविण्याचें कार्य त्यानीं थांबविलेलें नव्हतें. अवन्तिकाबाई गोखले यांनीं १९१८ सालीं लिहिलेल्या गांधीचरित्राला टिळकांनीं प्रस्तावना लिहिली आहे. त्यांत गांधींच्या सत्याग्रहाची प्रशंसा करून टिळकांनीं, महात्माजींनीं तो मार्ग आपल्या तपश्चर्येनें शास्त्रपूत करून ठेविला आहे, असें म्हणून, त्यांना धन्यवाद दिले आहेत. १९१९ सालीं ते विलायतेहून परत आले. त्यावेळीं मानपत्राच्या पहिल्या सभेंत, रौलट बिलाविरुद्ध गांधींनीं केलेल्या सत्याग्रहांत भाग घेण्यास आपण नव्हतों म्हणून आपणांस वाईट वाटतें, असे त्यांनी उद्‌गार काढले. कारण २१ एप्रिल व ८ जून रोजीं ऑ. इं. कॉं. कमिटीनें सत्याग्रहावर आपले शिक्कामोर्तब केलें होतें. महात्माजीशीं बोलणें झालें तेव्हां टिळकांनीं हेंच सांगितलें होतें. ' असहकारितेचा कार्यक्रम मला पसंत आहे. पण देश आपल्यामागून येईल कीं नाहीं याची मला शंका वाटते. लोकांना तुम्ही वळविलेत तर मी चळवळीला उत्साहानें पाठिंबा देईन. ' असें ते म्हणाल्याचें महात्माजी सांगतात.

टिळकांची कॉंग्रेसविषयीं कोणच्या प्रकारची निष्ठा होती हें वरील विवेचनावरून कळून येईल. अखिल भरतखंडांतील सर्व प्रांत सर्व पक्ष, सर्व धर्म, सर्व वर्ग यांचें ऐक्य घडवून त्यांचें बळ या राष्ट्रसभेच्या मार्गें

उभें करावें, कारण त्यावांचून लोकसत्ता क्षणभरहि टिकणार नाहीं, हें जाणून या सर्वांची संघटना करण्यासाठीं त्यांनीं जिवापाड मेहनत घेतली. हिंदूप्रमाणेंच मुसलमान, पारशी, ख्रिस्ती यांना त्यांनीं या संघटनेंत ओढून आणलें. श्रीमंत व मध्यम यांच्याप्रमाणेंच शेतकरी व कामकरी यांचा राष्ट्रसभेंत रिघाव घडवून आणला. बंगाल, मद्रास, पंजाब, महाराष्ट्र यांच्याप्रमाणेंच सिंधरजपुतान्या-सारख्या मागासलेल्या प्रांतांतहि दौरे काढले आणि या सर्वांना बहिष्कार-योगाचें तत्त्वज्ञान सांगून त्याचा प्रत्यक्ष आचार करण्याइतकें सामर्थ्य, निर्भयता व त्याग त्यांच्या ठायीं निर्माण केला. या त्यांच्या प्रयत्नांमुळें वर्षाकालांत ज्याप्रमाणें पर्वताच्या पहाडांतून, दऱ्याखोऱ्यांतून, जमिनीच्या गर्भांतून सर्वत्र पाण्याचे उमाळे बाहेर येतात त्याप्रमाणें अखेरीस या भरतभूमीच्या सर्व प्रांतांतून प्रतिकारशक्तीचे उमाळे येऊं लागले व आंतून स्फुरणाऱ्या या अहंकाराच्या चैतन्यामुळें ही मागासलेली जनता एका अत्यंत मदांध व धुंद अशा साम्राज्यसत्तेशीं काळझुंज घेण्यास उभी राहिली. टिळकांनीं हें पाहिलें; त्यांच्या चित्ताचें समाधान झालें; आणि त्या समाधानांतच तीन तपांच्या अविरत कष्टांनीं जर्जर झालेला आपला देह अखेरच्या विश्रांतीसाठीं त्यांनीं भूमीवर ठेविला.

---

## प्रकरण सहावें

# जनताजागृति

लोकमान्य टिळक व महात्मा गांधी या दोन पुरुषांमध्यें अंतिम ध्येय, तत्त्वज्ञान व कार्यपद्धति या दृष्टींनीं कितीहि फरक असला, तरी भरतभूमीच्या उद्धारार्थ कोणच्या शक्तीला आवाहन करावयाचें याविषयीं त्यांच्यांत मतभेद नव्हता. सामान्य जनता हेंच राष्ट्रशक्तीचें मूलस्थान आहे, भावी काळांतील सर्व संग्राम याच शक्तीच्या जोरावर करावयाचे आहेत आणि ही शक्ति एकदां जागृत झाली म्हणजे राजे, सेनापति, सरदार इत्यादि जुनाट शक्तींना

ती सहज पादाक्रांत करील, याविषयीं त्या दोघांच्या मनांत अणुमात्र संदेह नव्हता. या दोन्ही विभूति सर्वस्वी स्वयंभू व स्वयंप्रकाश अशा असूनहि अगदीं प्रारंभापासून त्यांनीं कार्याची जी दिशा आंखली ती याच तत्त्वानें. आणि हेंच भरतभूमीचें विशेष भाग्य होय. इटलीमध्यें मॅझिनीचे सहकारी व त्यांच्या मागून आलेले इटालियन नेते हे दंडसत्तेचे पुरस्कर्ते होते आणि चीनमध्यें डॉ. सनयत्सेन यांचा वारसा चिआंग कै शेक या दण्डधराकडे गेला. त्यामुळें या दोन्ही देशांत लोकसत्ता मूळच धरूं शकली नाहीं. हिंदुस्थानांत लोकशाहीच्या वृत्तीचें बीजारोपण झालें आणि पुढेंमागें केव्हां तरी त्यांतून तो कल्पवृक्ष निर्माण होण्याची आशा वाटते याचें मुख्य कारण हेंच होय कीं, येथें टिळकांच्या मागोमाग राष्ट्राची धुरा महात्माजींनीं खांद्यावर घेतली.

## लोकशक्तीचा पाया

सामान्य मानवाची शक्ति जागृत करावयाची याचा नेमका अर्थ काय तें महात्माजींचें आफ्रिकेंतील कार्य पाहतांच कळून येईल. नारायण स्वामी, स्वामी नागप्पा, वली अम्मा हे केवळ मुदतबंदीचे मजूर होते. नागप्पा व वली अम्मा हीं तर सतराअठरा वर्षांचीं पोरें होतीं. महात्माजींच्या आगमनापूर्वी त्यांच्या जीवनाची पातळी कोणची होती? अहोरात्र काबाडकष्ट, गुलामगिरी आणि कांहीं चूक झाल्यास किंवा न झाल्यासहि लाथाबुक्या! आणि इतकेंहि करून पोटाला पुरेशी भाकरी नाहींच! यांतच त्यांचा जन्म, यांतच त्यांचा मृत्यु. या स्थितींतून हीं माणसें कोणच्या उंचीला गेलीं! मायभूमीच्या उद्धारासाठीं, सेवेसाठीं अन्यायाचा प्रतिकार करीत करीत यांनीं आत्मबलिदान केलें. यापेक्षां जास्त उंच, जास्त उदात्त असें मानवी जीवनांत कांहीं नाहीं. जमिनीवरून सरपटत जाणाऱ्या त्या मजुरांना पूर्वकाळ नव्हता व भावी काळहि नव्हता. तो त्यांच्या जीवनांत निर्माण झाला. स्वदेश, स्वधर्म, आत्मसामर्थ्य हीं वैभवें कित्येक पिढ्यांत त्यांच्या स्वप्नांतहि नव्हतीं. अवमान सोशीत, लाथा खात, कष्ट करीत, भुकेल्या पोटीं राहून, पिचून पिचून मरून जावें, हाच त्यांचा आयुष्यक्रम. अन्यायाचा प्रतिकार, स्वत्व-रक्षणासाठीं संग्राम, जुलमाविरुद्ध लढा या शब्दसंहतीचा अर्थहि त्यांना

माहीत नव्हता. पण याच हीन-दीन-दलित जनतेंतून स्वजनासाठीं आत्मार्पण करणारे वीरपुरुष महात्माजींनी निर्माण केले; शीलासाठीं जोहार करणाऱ्या अंगना यांतूनच निर्माण झाल्या; 'स्व' जाणणें व त्याच्या रक्षणासाठीं संग्रामाला व आत्मार्पणाला सिद्ध होणें हाच लोकशक्तीचा पाया, हीच जनताजागृति, हाच राष्ट्रशक्तीच्या गंगौघाचा प्रभव.

निवडून दिलेल्या लोकप्रतिनिधींची सत्ता ती लोकसत्ता होय. पण हें लोकसत्तेचें केवळ बाह्यरूप झालें. आपल्या भूमीची उन्नतिअवनति, तिचें स्वातंत्र्यपारतंत्र्य, तिची कीर्तिअपकीर्ति यांची चिंता प्रत्येक नागरिक—नारायण-स्वामी, नागप्पा, वलीअम्मा यांसारखे मजूरसुद्धां—ज्या शासनांत वाहूं लागतो तेंच शासन लोकसत्ता या अभिधानास पात्र आहे. एरवीं या पातळीवरच्या लोकांना स्वदेश, स्वभूमि, संस्कृति, प्रगति यांच्या कल्पनाहि नसतात. त्यांच्या जीवनांत यांचा प्रवेश झालेला नसतो. पण अन्यायाचा प्रतिकार करण्याची वृत्ति ही अशी कांहीं दिव्य संजीवनी आहे कीं, तिच्या नुसत्या सिंचनानें या पशुसम मानवांत दिव्यस्फुरण होऊं लागतें. त्यांचें जीवन पालटून जातें. त्यांच्या 'स्व'च्या मर्यादा वाढतात. धैर्य, चिकाटी, त्याग, निष्ठा, बंधुभाव इ० गुणांचा प्रादुर्भाव त्यांच्या ठायीं होतो आणि अंतीं लोकसत्तेस अवश्य ते 'लोक' त्यांच्यातून निर्माण होतात. महात्माजींनीं भारतीय लोकसत्तेची जी सेवा केली ती ही होय. टिळकांनीं भारतांत असंतोष धुमसत ठेविला होता. येथील जनतेंत ते 'लढा' निर्माण करीत होते आणि त्यासाठीं अखिल भारतीय जनतेला ते आवाहन करीत होते. पण तें अजून तिच्या कानापर्यंत नीट पोचलें नव्हतें. सुशिक्षित मध्यमवर्गा-पर्यंतच ती हांक गेली होती. महात्माजींनीं तेथूनच प्रारंभ केला आणि चंपारण्य, खेडा, जालियनवाला, दांडी, अशा एकसारख्या चढत चाललेल्या मोहिमांनीं स्वदेश, स्वातंत्र्य, समता, या विषयींच्या निष्ठांचें जनतेंत बीजारोपण केलें. अखेरपर्यंत त्यांचें जागृतीचें साधन एकच होतें. आक्रमकांविरुद्ध लढा, अन्यायाचा प्रतिकार! वर सांगितल्याप्रमाणें ही एक वृत्ति निर्माण होतांच समाजाचें रूप पालटून जातें. पशूंचे मानव होतात, मानवांत अनंत सद्गुणांचा उद्भव होतो आणि 'लोक' या महनीय पदावर आरूढ होण्याची योग्यता त्यांच्या ठायीं निर्माण होते.

## चंपारण्यांतील क्रांति

चंपारण्यांतील गरीब शेतकऱ्यांची स्थिति आफ्रिकेंतल्या मजुरांपेक्षां फारशी निराळी नव्हती. लोकायत्त शासनाच्या नागरिकत्वापासून म्हणजेच 'लोकत्वा' पासून ते शेतकरी त्या मजुराइतकेच दूर होते. साध्या मनुष्यत्वाशीं सुद्धां त्यांची ओळख शिल्लक राहिली नव्हती. गोरे मळेवाले त्यांना भाल्शांनीं मारीत, गोळ्या घालीत, जाळून टाकीत. त्यांचें अन्न, त्यांचें वस्त्र आणि त्यांच्या नववधूहि हिरावून नेत. हा किळसवाणा जुलूम अनेक पिढ्या चालू होता. या अवधींत त्या शेतकऱ्यांनीं चारपांच वेळां दंगे केले हें खरें. पण ते दंगे होते. ते संग्राम नव्हते, ते लढे नव्हते. दंग्यांनीं मानवाची उंची वाढत नाहीं. दंगा हा जड, शारीर उद्रेक आहे. त्याचा मनोबलाशीं, तत्त्वज्ञानाशीं संबंध नसतो. म्हणून त्यांतून सद्गुणांची निपज होत नाहीं. ती संग्रामांतून होते. कारण त्याच्यामागें तत्त्वज्ञानाची अढळ बैठक असते. तत्त्वज्ञान म्हणजे मानवाच्या विशाल व उन्नत आकांक्षांचें समर्थन. माझ्या एकट्याचें सुख किंवा दुःखमुक्तता ही अल्प आकांक्षा आहे. मजसारख्या शेकडों बांधवांचें सुख, स्वातंत्र्य, त्यांची उन्नति ही मोठी आकांक्षा आहे. तिलाच तत्त्वज्ञानाचें रूप येतें. आणि तिच्या मोठेपणामुळेंच तिच्या प्रेरणेनें निष्ठा, त्याग धैर्य हे गुण निर्माण होऊन व्यक्तीच्या मनःसामर्थ्याचा विकास होतो. मानवाचें हें मनःसामर्थ्य हाच लोकसत्तेचा पाया आहे. महात्माजी जेथें जात तेथील सामान्य जनतेच्या मनःसामर्थ्याचा आविष्कार घडवून आणीत. चंपारण्यांतील शेतकरी गोऱ्या मळेवाल्याचा नुसता जमादार आला तरी घाबरून जात, लपून बसत. पण महात्माजी तेथें जातांच ते निर्भय झाले व त्या मळेवाल्या-लाच आव्हान देण्यास सिद्ध झाले. या जागृतीमुळें तेथें अगदीं अल्प अवधींत कल्पनातीत यश आलें. चंपारण्यांत १५ एप्रिल १९१७ या दिवशीं महात्माजींनीं पाऊल ठेवलें आणि २९ नोव्हेंबर १९१७ रोजीं विधिमंडळांत चंपारण्य ॲग्रेरियन बिल मांडलें गेलें व त्यामुळें तेथील सर्व अन्याय नष्ट झाला. तो इतका कीं, अन्यायावरच जगत असलेल्या गोऱ्या मळेवाल्यांना थोड्याच वर्षांत तेथील जमिनी व कारखाने विकून तोंड काळें करावें लागलें.

## नव्यायुगाचें शस्त्र—सत्याग्रह

चंपारण्यांतील या विजयामुळें भारतीय जनतेंत एक अपूर्व चैतन्य निर्माण झालें. ब्रिटिशासारख्या बलशाली, सार्वभौम, अजिंक्य सत्तेविरुद्ध आपण अगदीं सामान्य शेतकरी हात उचलूं शकूं ही आशा त्या लोकांच्या स्वप्नांतहि कधीं आली नसेल. कधीं संग्राम करण्याची वेळ आलींच तर तो तेथले बडे लोक करतील; येथले राजे, सरदार, जमीनदार यांचें तें काम आहे; आपल्या हातीं त्यांतलें कांहीं नाहीं; आपण गरीब लोक हमाली, कष्ट, सेवाचाकरी यापलीकडे कांहीं करूं शकणार नाहीं, ही भावना बहुसंख्य भारतीय जनतेच्या मनांत युगानुयुगें दृढमूल होऊन बसली होती. आतां तिच्या असें ध्यानांत आलें कीं आपल्याहि हातीं एक शस्त्र आहे आणि मनांत आणलें तर या शस्त्रानें कोणच्याहि प्रचंड शक्तीशीं आपण सामना देऊं शकूं. या नव्या जाणीवेनें तिच्या अंगीं केवढा आत्मविश्वास संचरला असेल याची कोणालाहि सहज कल्पना करतां येईल. सत्याग्रह संग्रामाची अलौकिकता आहे ती यांत आहे. दीन, दुबळे, दलित, निःशस्त्र युगानुयुगें दास्यांत खितपत पडलेले असे जे बहुसंख्य मानव त्यांना आपली उन्नति करून घेण्याचें एक अमोघ साधन सत्याग्रहानें प्राप्त करून दिलें. लोकशाही राज्यपद्धति सत्याग्रहाची अखंड ऋणी राहील ती यासाठीं. ज्यांच्या आधारावर तिचें मंदिर उभें रहावयाचें ते मानव या संग्रामामुळें व्यक्तित्वसंपन्न होतात.

चंपारण्यानंतर खेडा जिल्ह्यांत जो लढा सुरू झाला त्यानें युग पालटल्याचें हें चिन्ह स्पष्टपणें दाखवून दिलें. दुष्काळानें पिकें बुडालीं तरी सरकारनें सगळा सारा दडपून वसूल करावा ही गोष्ट नवीन नव्हती. हाच जगाचा इतिहास होता. तरी आतांपर्यंत भारतांतील शेतकऱ्यानें असल्या अन्यायाविरुद्ध चकार शब्द काढला नव्हता. आपण कांहींही प्रतिकार करूं शकणार नाहीं ही त्याला मनोमन असलेली जाणीव हीच या दैन्याच्या बुडाशीं होती. पण सत्याग्रहाचें प्रभावी शस्त्र त्याच्या हातीं देऊन, अन्यायाचा प्रतिकार करणें तुला शक्य आहे, वाटेल त्या शक्तीशीं तूं लढूं शकशील, तिला नमवूं शकशील, असा दिव्य संदेश महात्माजींनीं त्याला दिला. त्याबरोबर त्या दलित मनाचें रूप अंतर्बाह्य पालटून गेलें. ' राजकीय शिक्षा लौकिक शिक्षेस

अनुसरून नसल्यास तीपासून कधींहि फायदा होणार नाहीं; फार काय पण राजकीय शिक्षा लोकमतावरच अवलंबून असते. आपण जर उद्यां तुरुंगांत जाणें ही शिक्षा आहे असें मानलें नाहीं तर राजकीय शिक्षेचा उपयोग काय होणार! लोक आनंदानें तुरुंगांत जातील.' असें टिळकांनीं १८८१ सालीं लिहून ठेविलें होतें. महात्माजींनीं टिळकांचे तें दिव्य स्वप्न प्रत्यक्षांत आणलें; आणि 'सार्वलौकिक मत म्हणून जो एक नियामक अद्‍भुत उपाय आहे—ज्याला जुलमी राजे व अहंपणाचा तोरा बाळगणारे मंत्रीहि भितात'—(केसरी १८८२) तो नियामक उपाय, तें सार्वलौकिक मत या देशांत निर्माण करण्यास प्रारंभ केला. चंपारण्य व खेडा येथील लढा हा शेतकऱ्यांचा लढा होता. अहमदाबादला महात्माजींनी कामगारांचा प्रश्न हातीं घेऊन त्यांनाहि आपल्या प्रभावी शस्त्राचा परिचय करून दिला. या दोनतीन लढ्यांनीं भावी संग्रामांतील प्रास्ताविक घटना संपल्या आणि १९१९ सालीं रौलेट बिलाविरुद्ध महात्माजींनी जी सत्याग्रहाची चळवळ सुरू केली तिला एकदम अखिल भारतीय रूप प्राप्त झालें.

भारतीय स्वातंत्र्याचा लढा चालविण्यासाठीं गांधीजींनीं शांततामय सत्याग्रहाच्या मार्गाचा अवलंब केला. यासाठीं ही भरतभूमीच केवळ नव्हे तर सर्व जग त्यांचें कायमचें ऋणी राहील. या मार्गाची कांहींशीं कल्पना टॉलस्टॉय यांनीं सांगितली होती. हंगेरींतील खाणी-कामगारांनीं त्याचा एक यशस्वी प्रयोगहि केला होता. पण हिंदुस्थानसारख्या खंडप्राय देशांत, तीस-चाळीस कोटी लोकांच्या समाजांत व स्वातंत्र्यप्राप्तीसारख्या महान् कार्यासाठीं या अस्त्राचा प्रयोग अजून कधींच कोणी केला नव्हता. तो प्रयोग यशस्वी करून भावी काळांतील लोकायत्त देशांतील संग्रामांना महात्माजींनीं कायमचा आदर्श निर्माण करून ठेविला आहे.

येथें सत्याग्रहाचा विचार त्यांतील कायदेभंग व करबंदी या प्रधान घटकांकडेच फक्त लक्ष ठेवून केला आहे. त्यांतील आत्मबल, प्रतिपक्षाविषयींचें प्रेम, त्यांतील कायावाचामनाची अहिंसा यांचा विचार येथें केलेला नाहीं. अन्यायाचा शांततेनें प्रतिकार करणें, जुलमी सत्तेविरुद्ध निःशस्त्र लढा पुकारून त्या लढ्यांमुळें भोगावे लागणारे सर्व क्लेश, शारीरिक व

मानसिक यातना आणि इतर आपत्ति या शांतपणें सोसणें हें जें सत्याग्रहाचें लौकिक रूप तेंच फक्त येथें अभिप्रेत आहे आणि त्या दृष्टीनें पाहतां असें निश्चित वाटतें कीं, या पंचवीस वर्षांच्या सत्याग्रहसंग्रामानें लोकसत्तेच्या दृष्टीनें भारतीय जनतेंत जेवढी प्रगति झाली तितकी दुसरी कशानेंहि झाली नसती. या संग्रामाचें प्रधान कार्य म्हणजे लोकजागृति हें होय. शासन स्वकीय असो वा परकीय असो, तें जर जुलमी असेल तर देशांतील जनतेची तें अनेक प्रकारांनीं गांजणूक करीत असतें. लोकांना त्यामुळें अनंत यातना सोसाव्या लागतात. या यातना दूर करण्यासाठीं संघटित होऊन त्या सरकारला शस्त्रबळानें किंवा मतांच्या संख्याबलानें पदच्युत करणें हाच उपाय असतो. पण या उपायाचा अवलंब करण्यास जनता जागृत असावी लागते. नाहीं तर हे मार्ग व्यर्थ होत. अशा वेळीं त्या यातना दूर करण्यासाठीं देशांतील कांहीं धीर पुरुष सरकारच्या कायद्यांचा भंग यरून त्यासाठीं होणारी शिक्षा शांतपणें भोगूं लागले कीं, बाकीच्या जनतेंत हळूंहळूं प्रक्षोभ होऊन ती जागृत होऊं लागते आणि हें आंदोलन सर्वव्यापी होऊं लागतें. मूलतः सत्याग्रह हा प्रेमाचा मार्ग असून त्यामुळें हळूंहळूं प्रतिपक्षाचा हृदयपालट घडविणें हें त्याचें अंतिम उद्दिष्ट असतें. महात्माजींनीं त्याचा जो पुरस्कार केला तो याच उदात्त पातळीवरून. जुलूम करणाराचा हृदयपालट घडविणें किंवा जुलूम निमूटपणें सहन करणाऱ्यांचा स्वाभिमान जागृत करून, त्यांची शक्ति संघटित करून जुलमी शासकाला नमविणें, हे जुलूम नाहींसे करण्याचे दोन उपाय होत. महात्माजींनीं सत्याग्रह सुरू केला तो पहिल्या हेतूनें. पण आतांपर्यंतच्या इतिहासावरून हें ध्यानीं येईल कीं सत्याग्रहाचें हें सात्त्विक रूप प्रत्यक्षांत कधींच दिसलेलें नाहीं. जे भांडवलदार, जमीनदार किंवा जे इंग्रज राज्यकर्ते यांच्याविरुद्ध जनतेनें सत्याग्रह केला त्यांचा अणुमात्रहि कधीं हृदयपालट झाला नाहीं. पण त्यामुळें माझ्यामतें महात्माजींच्या सत्याग्रह संग्रामांचें महत्त्व मुळींच कमी होत नाहीं. कारण प्रतिपक्षाचा जरी त्यामुळें हृदयपालट झाला नाहीं तरी भारती जनतेचा हृदयपालट, कायाकल्प निश्चित झाला आहे. शतकानुशतकें पारतंत्र्यांत पिचत पडलेला, स्वतःच्या हीनदीन स्थितीची आणि गुलामगिरीची जाणीवहि नसलेला, अज्ञान व दारिद्य यांनीं ग्रासलेला, अन्यायाचा प्रतिकार स्वप्नांतहि न करणारा असा हा भारतीय

समाज हळूंहळूं प्रबुद्ध झाला, संघटित झाला आणि ब्रिटिशांचें राज्य नष्ट करण्यासाठीं आत्मबलिदान करण्यास सिद्ध झाला, हें कल्पनातीत असें परिवर्तन होय. सत्याग्रहानें केलेला हृदयपालट तो हाच. हा दुसऱ्या कोणच्याहि मार्गानें झाला नसता. दहशतवादानें सर्व देशभर तीव्र अहंकाराची जाणीव उमटून जाते, नाहीं असें नाहीं. पण ती क्षणभरच; आणि त्याची प्रतिक्रिया फार भयंकर स्वरूपाची असते. सरकार आपल्या सर्व आसुरी सामर्थ्यानिशीं दहशतवादी तरुणांचें निर्दाळण करतें व तें पाहून जनता जास्तच भयग्रस्त होऊन चिडीचीप होऊन जाते. त्यापेक्षांहि दहशतवादाचें मोठें वैगुण्य म्हणजे तो मार्ग आपला नव्हे, त्याशीं आपला कांहीं संबंध नाहीं, अशीच जनतेची त्याविषयींची भावना असते. तो मार्ग अत्यंत अल्पसंख्यांचा आहे. जनता जागृतीचें, सुप्त लोकशक्तीला आवाहन करण्याचें उद्दिष्ट त्यानें साधत नाहीं. सरदारवर्गाच्या किंवा लष्कराच्या साह्यानें क्रान्ति घडविणें हा दुसरा मार्ग. त्याचा विचार आपण मागें केलाच आहे. जर्मनी, इटली, स्पेन यांनीं तो अंगीकारला आणि त्यामुळें तेथील सत्ता कायमच्या लोकविन्मुख राहिल्या. त्या मार्गांतहि सर्वांना सहभागी होतां येत नसल्यामुळें, सर्वांच्या शक्तीला आवाहन नसल्यामुळें, लोकसत्तेच्या प्रगतीच्या दृष्टीनें त्याचें महत्त्व अल्प आहे. सत्याग्रहाचें स्वरूप याहून निराळें आहे. त्याचा पहिला मोठा गुण म्हणजे त्यांत बहुसंख्य लोकांना सहभागी होतां येतें. यातना, हाल, देहदंड यांच्या दृष्टीनें पहातां हा मार्ग इतर मार्गांपेक्षां सोपा आहे. सुसाध्य आहे. पण याचें फल मात्र फार मोठें आहे. कोणचेंहि राजशासन जनतेची कळत वा नकळत संमति असल्यावांचून टिकूं शकत नाहीं हा राज्यशास्त्राचा सिद्धांत आहे. सत्याग्रहानें जनतेची संमति हा जो शासनाचा मूलाधार तोच उखडला जातो. प्रारंभीं अगदीं अल्पसंख्य लोक जरी चळवळींत असले तरी हळूंहळूं हा असंतोष, हा क्षोभ, ही जागृति पसरत जाते व शेवटीं या लाटा सैन्यापर्यंत पोंचतात आणि सैन्यानें राजसत्तेची सेवा करण्यास नकार देणें ही सत्याग्रहाच्या वा निःशस्त्र-प्रतिकाराच्या चळवळीची परिणति होय. कायदेभंग व करबंदी यांचे या लोकजागृतीच्या दृष्टीनें महत्त्व आहे. चार पोतीं मीठ लोकांनीं नेलें, किंवा एकाद्या जिल्ह्यांतील लोकांनीं एखाद्या वर्षी सरकारसारा दिला नाहीं, तरी

तेवढ्यामुळें सरकारचें विशेष नुकसान होणार आहे असें नाहीं. पण सरकारच्या राक्षसी सामर्थ्याला अवहेलून अखिल जनता——केवळ मूठभर दहशतवादी नव्हे——कायदेभंगाला किंवा करबंदीला सिद्ध होते यांत विश्वव्यापी अर्थ आहे. हे इतके लोक प्रबुद्ध झाले, आपल्या देशाची उन्नति-अवनति त्यांना उमजूं लागली आणि देशाच्या उन्नतीसाठीं वाटेल तो त्याग, प्राणत्यागसुद्धां करण्यास ही जनता सिद्ध झाली असा विशाल अर्थ या घटनेंत समावलेला आहे आणि तोच अर्थ या भूमींत महात्माजींनीं प्रगट केला.

वर सांगितल्याप्रमाणें १९१९ सालीं रौलेटाबिलाविरुद्ध जी चळवळ झाली तिच्या वेळीं महात्माजींच्या सत्याग्रहाला प्रथम अखिल भारतीय रूप प्राप्त झालें. पुढील वर्षी खिलाफतीची चळवळ झाली; आणि नंतर बार्डोलीच्या संग्रामाची महात्माजींनीं सिद्धता केली. हा संग्राम आयत्या वेळीं महात्माजींनीं स्थगित केला व त्यामुळें निराशेची फार मोठी लाट देशावर आली हें खरें. पण मार्च १९१९ ते मार्च १९२२ या पहिल्या मोहिमेमुळें या देशांत नवयुग निर्माण झालें यांत शंका नाहीं. जर्मनीसारख्या अत्यंत बलाढ्य व शस्त्रास्त्रांनीं संपन्न अशा देशाला ब्रिटिशांनीं नुकतेंच लोळविलें होतें. त्यामुळें अशा बलशाली राष्ट्रापुढें शस्त्रास्त्राच्या लढाईत आपला निभाव लागेल अशी पुसटसुद्धां आशा येथें कोणाला वाटत नव्हती. शस्त्रास्त्राच्या लढाईत आशा नाहीं आणि दुसरा कोणचाहि मार्ग माहीत नाहीं यामुळें १९१८।१९ सालीं भारतीय जनतेवर निराशेची अत्यंत घोर अशी अवकळा पसरली होती. सामान्य जनता अजून राजकारणांत फारशी आलीच नव्हती आणि जो मध्यमवर्ग चळवळीच्या आघाडीवर होता तो शत्रूच्या या भयानक सामर्थ्याच्या दर्शनानें हबकून गेला होता. अशा वेळीं महात्माजींनीं जेव्हां हें नवीन अस्त्र लोकांच्या हातीं दिलें आणि ब्रिटिशांसारखा समर्थ शास्ताहि या अस्त्रापुढें नमतो हें लोकांना सप्रयोग दाखवून दिलें तेव्हां या भूमींत कांहीं अपूर्व उत्साह व आशा निर्माण झाली असल्यास नवल नाहीं.

बार्डोलीचा संकल्पित लढा स्थगित झाल्यानंतर, पुढें काय, असा प्रश्न निर्माण झाला. या लढ्याकडे सारा भारतवर्ष डोळे लावून बसला होता.

त्याच्याबद्दल त्याला फार मोठ्या आशा होत्या, पण त्या अगदीं धुळीस मिळाल्यानें त्याला घनदाट निराशा सर्वत्र दिसूं लागली आणि गांधीजींनीं 'पुढें काय ?' या प्रश्नाला जें उत्तर दिलें तेंहि फारसें आशादायक नव्हतें. 'विधायक कार्यक्रम' हें त्यांचें उत्तर होतें. या त्यांच्या कार्यक्रमाचाही आपण वरच्याच दृष्टीनें विचार केला पाहिजे. सत्याग्रहाचें जसें लोकशाहीच्या दृष्टीनें आपण मूल्यमापन करीत आहों तसेंच याचें केलें पाहिजे. खादी, ग्रामोद्धार, अस्पृश्यतानिवारण, मद्यपानबंदी, जातीय ऐक्य, मूलोद्योग शिक्षण, गांव-सफाई, प्रौढशिक्षण इ० बहुविध कार्यांचा गांधीजींनीं विधायक कार्यक्रमांत अंतर्भाव केला होता. सत्याग्रहाचा अंतिम हेतु जसा भारताच्या राजकीय स्वातंत्र्याहून अगदीं निराळा होता, त्याचप्रमाणें विधायक कार्यक्रमाचाहि अंतिम हेतु गांधीजींच्या मनांत निराळा होता. अखिल भारतीय जीवन आमूलाग्र बदलून टाकावें, पाश्चात्य संस्कृतीचें आपल्यावर दृढ होत चाललेलें वर्चस्व नष्ट करावें आणि साधी, ग्रामप्रधान, वैराग्याभिमुख अशी भारतीय संस्कृति निर्माण करावी हें महात्माजींच्या मतें विधायक कार्यक्रमाचें उद्दिष्ट होतें. म्हणजे सत्याग्रहाप्रमाणेंच विधायक कार्यक्रमाचाहि हेतु भरतभूमीची आध्यात्मिक प्रगति हाच होता. पण सत्याग्रह जसा उच्च आध्यात्मिक पातळीवरून, प्रत्यक्षांत येतांना, निःशस्त्र प्रतिकाराच्या भौतिक पातळीवर आला आणि म्हणूनच लोकजागृतीचें महान् कार्य त्यानें साधलें त्याचप्रमाणें विधायक कार्यक्रमाचेंहि झालें. निःशस्त्र प्रतिकाराचें जें लोकजागृतीचें कार्य त्याला पोषक असा जेवढा भाग विधायक कार्यक्रमांत होता तेवढ्यालाच तेज प्राप्त झालें व हें तेजहि विधायक कार्यक्रमाचा पुढें करावयाच्या लढ्याशीं स्पष्ट संबंध दिसत असे तेवढ्यापुरतेंच टिकून राही. एरवीं विधायक कार्यक्रम लोकांना अगदीं नीरस, शुष्क व हेतुशून्य असा वाटे. १९२२ नंतर कायदे-भंग व करबंदी गेली व गांधीजींनीं आणि कॉंग्रेसनें देशाला विधायक कार्यक्रम करीत रहा, असा आदेश दिला. पण एकदोन वर्षांतच त्याची गति मंदावली व पुढें पुढें तर लोक त्याची चेष्टा करूं लागले. पं. जवाहरलाल यांना तर विधायक कार्यक्रमाचा फारच कंटाळा असे. खादीविरुद्ध ते एखादे वेळीं अगदीं उसळून उठत. १९३५ सालीं युरोपांतून आल्यावर ते जेव्हां

काँग्रेसचे पुन्हां अध्यक्ष झाले तेव्हां त्यांनीं गांधींना प्राणभूत वाटणाऱ्या विधायक कार्यक्रमाचा एकहि ठराव केला नाहीं. त्याचा नामनिर्देशहि केला नाहीं. काँग्रेसमधलि अनेक कार्यकर्त्यांची हीच वृत्ति होती. याचा अर्थ असा कीं लोकांना स्वतंत्रपणें विधायक कार्यक्रमाची महती मुळींच मान्य नव्हती. चरखा हा गांधीजींच्या स्वातंत्र्यसंदेशाचें प्रतीक म्हणून त्यांना स्वीकार्य वाटे. आणि याच दृष्टीनें विधायक कार्यक्रमांतील इतर भागाकडे लोक पहात.स्वातंत्र्य व क्रान्ति या कल्पना अमूर्त आहेत. त्यांचें नित्य स्मरण रहावें व त्या प्रेरणा लोकांच्या मनांत मूळ धरून बसाव्या येवढ्यासाठीं चरख्याचें महत्त्व फार होतें. त्याला आर्थिक बाजू असल्यामुळें दुधांत साखर पडल्यासारखें झालें. पण खरें दूध म्हणजे लढ्याचा संदेश, स्वातंत्र्याची प्रेरणा हेंच होतें. ती प्रेरणा व तो संदेश खेडुतांच्या घरोघर नेऊन पोचविण्याचें फार मोठें कार्य चरखा व खादी यांनीं केलें यांत शंकाच नाहीं. याचा अर्थ असा कीं निःशस्त्र प्रतिकारानें ज्या प्रक्षोभाच्या लाटा जनसागरावर उठविल्या त्या कालांतरानें मंदावूं लागल्या तरी त्यांनें निर्माण केलेली जागृति कांहीं काल टिकवून धरण्यासाठीं विधायक कार्यक्रमाचा फार उपयोग झाला. खादीचा प्रसार, मद्यपान-निषेध, गांवसफाई, प्रौढशिक्षण, ग्रामोद्योग, राष्ट्रभाषेचा प्रसार, जातीय ऐक्य या निमित्तानें काँग्रेसचे पाईक देशाच्या कान्याकोपऱ्यांत जाऊन पोचले, खेडुतांत, कामगारांत मिसळले आणि त्यांनीं वरच्यापैकीं कोणच्या ना कोणच्या प्रतीकाच्या साह्यानें काँग्रेसचा स्वातंत्र्याचा, क्रान्तीचा संदेश घरोघर पोचविला व तेथें तो स्थिर केला. खादी, हातसडीचे तांदूळ, भरड कागद यांचें आध्यात्मिक व सांस्कृतिक दृष्ट्या महात्माजींना जें महत्त्व वाटे त्याची फारशी कोणाला जाणीवहि नव्हती. म्हणजे विधायक कार्यक्रमाचा आध्यात्मिक हेतु विफल झाला पण त्यानें लोकक्रान्तीला अवश्य ती जागृति मात्र कांहीं अंशीं घडवून आणिली व टिकवून धरिली. ‘ दि इल्यूजनस् ऑफ चरखा ’ या पुस्तकांत अनिल बरण रे यांनीं व्यवहाराच्या व अर्थशास्त्राच्या दृष्टीनें खादीवर जे आक्षेप घेतले आहेत ते सर्व खरे वाटतात; पण खादीनें राजकीय जागृति घडवून आणली हें जें राजेन्द्रबाबूंनीं त्या आक्षेपांना उत्तर दिलें आहे, तें तितकेंच खरें आहे. जें खादीचें तेंच एकंदर विधायक कार्यक्रमाचें. काँग्रेसच्या मध्यमवर्गीय सुशिक्षित पाईकांना क्रान्तीचें कांहीं दृश्य प्रतीक

खेडोपाडीं घेऊन जाण्यास हें साधन फार उपयोगी पडलें; पण लोकजागृतीचें खरें प्रभावी साधन म्हणजे कायदेभंग हेंच होय हें आपण विसरूं नये.

## स्वातंत्र्य संग्राम

बार्डोलीनंतर आठ वर्षांनीं १९३० सालीं महात्माजींच्या दांडीप्रयाणानें सुरू झालेला जगविख्यात असा सत्याग्रह संग्राम झाला. त्याची तयारी महात्माजी वर सांगितल्याप्रमाणें विधायक कार्यक्रमानें करीत होते; पण त्याच्याच बरोबर त्या आठ वर्षांत ब्रिटिश सरकारच्या सत्तेस आव्हान देऊन तिच्याविरुद्ध लोकांनीं अनेक लहानमोठे संग्राम केले त्यामुळेंच जनतेंत खरें चैतन्य टिकून राहिलें व तिचा आत्मविश्वास वृद्धिंगत झाला. मुळशी पेट्यांत आपल्या जमिनी जाऊं नयेत म्हणून शेतकऱ्यांनीं लढा केला. दरवडेखोरांना सामील असल्याच्या खोट्या आरोपावरून गुजराथेंतील बोरसद तालुक्यावर सरकारनें जादा पोलीस बसवून खेडुतांना जबर दंड केला होता. त्याविरुद्ध त्या तालुक्यांतील लोकांनीं सत्याग्रह करून सरकारला माघार घेण्यास भाग पाडिलें. शीखांनीं केलेला ‘ गुरुका बाग ’ सत्याग्रह प्रसिद्धच आहे. १९२३ सालीं नागपूरला राष्ट्रध्वजाचा अपमान झाला त्या वेळेस अखिल भारतांतून स्वयंसेवक जमले व त्यांनीं सत्याग्रह करून त्या ध्वजाची इभ्रत राखिली. वरील प्रत्येक सत्याग्रहांत एक हजारपर्यंत लोक तुरुंगांत गेले होते. लाठीमार याच्यापेक्षां किती तरी जास्त लोकांनीं साहिला आणि तो साहतां साहतां अन्यायाचा प्रतिकार करण्याची वृत्ति भरतभूमींत निर्माण झाल्याची ग्वाही दिली. १९२८ साली बार्डोलीस सरदार वल्लभभाईंच्या नेतृत्वाखालीं झालेला सत्याग्रह हा मोठाच संग्राम होता. सारावाढ हें त्याचें कारण होतें आणि ती इंग्रजी राज्याची खरी नस होती. हें ओळखूनच १८९६ सालापासून टिळकांनीं तिच्यावर प्रहार करण्यास प्रारंभ केला होता. तोच लढा आतां महात्माजींच्या अभिनव पद्धतीनें रंगास आला होता. सरदारांनीं सर्व तालुका संघटित करून त्याला एखाद्या लष्करी छावणीचें रूप आणलें. झगडा, लढा, प्रतिकार, संग्राम या शब्दांनीं वातावरण अगदीं कोंदून गेलें होतें. लढा सुरू झाला. सरकारनें अनन्वित जुलूम केले. धमकी, दंड, कैद,

असी, लाठी हीं आपलीं सर्व पाशवी शस्त्रें वापरलीं; पण शेतकऱ्यांनीं धीरानें, चिकाटीनें व शांततेनें तें सर्व सोसलें. सर्व भरतखंडावर या प्रतिकाराच्या नादलहरी उमटूं लागल्या. तेव्हां सरकारनें नमतें घेतलें. बार्डोलीपेक्षांहि सायमन कमिशनवरील बहिष्कारानें उद्भवलेला लढा जास्त प्रक्षोभक व व्यापक स्वरूपाचा होता. मद्रास, लखनौ, पाटणा, लाहोर येथें कायदा तोडून पन्नास पन्नास हजारांच्या मिरवणुकी निघाल्या व लाठीमार, घोडदौड, गोळीबार यालाहि दाद न देतां लोकांनीं आपला निषेध जगापुढें मांडला. लाहोरच्या या मिरवणुकींतच लालाजींना लाठीचा मार बसला व तो प्राणघातक ठरला. आणि सरदार भगतसिंग यांनीं असेंब्लींत फेकलेला बॉंब आणि त्यानंतरचा सॅंडरसच्या खुनाचा खटला हीं प्रकरणें त्यांतूनच उद्भवून त्यांनीं बहिष्कारानें निर्माण केलेल्या प्रक्षोभांत प्रत्यक्ष ठिणगीच टाकली. लाहोरच्या पूर्ण स्वातंत्र्याच्या ठरावाच्या रूपानें त्या प्रक्षोभांतून निघालेली ज्योत भरतभूमीला स्पष्ट दिसूं लागली व राष्ट्र पुन्हां संग्रामाला सिद्ध झालें. त्याला घेऊन महात्माजी दांडीकडे निघाले.

## जनशक्ति

भारतीय जनतेंत निर्माण झालेल्या लढाऊवृत्तीचा खरा आविष्कार १९३० सालच्या संग्रामांतच प्रथम प्रतीतीस आला. मागल्या प्रकरणांत सांगितल्याप्रमाणें, या देशाचे खरे स्वामी म्हणजे येथले जे बहुसंख्य कष्टकरी लोक, त्यांनीं परकीय आक्रमकाविरुद्ध उभे रहावें, यांतच लोकशाहीची खरी प्राणप्रतिष्ठा आहे हा विचार टिळकांनीं १८८० सालींच निश्चित केला होता व प्रारंभापासून चळवळीचें तसें धोरणहि त्यांनीं आंखलें होतें. आतां कष्टकरी जनता लढ्यास उभी राहिलेली पहाण्याचें भाग्य त्यांना जिवंतपणीं लाभलें नाहीं. पण महात्माजींनीं त्यांच्या स्वर्गस्थ आत्म्याला तें मिळवून दिलें. ३० सालचा संग्राम सार्थ नामानें जनतेचा संग्राम होता. या भारतीं राष्ट्राला आपल्या स्वतःच्या सामर्थ्याचें स्वतःलाच एवढें भव्य दर्शन कधींहि घडलें नव्हतें. अखिल भरतभूमि हें एक राष्ट्र आहे, याचा असा प्रत्यय इतिहासांत कधीं आला नव्हता, तो या वेळीं आला.

१९३० सालच्या या संग्रामाचें आपण जितकें बारकाईनें अवलोकन करूं तितकें जास्त स्पष्टपणें, भारतीय लोकसत्ता महात्माजींची किती ऋणी आहे हें आपल्या ध्यानीं येईल. ब्रिटिश सरकारच्या राज्याचें कायद्याचें अधिष्ठान नष्ट करावयाचेंच या हिरिरीनें भारताचा शेतकरी या संग्रामांत उतरला होता. धारासना येथें २५०० लोकांनीं मिठागरावर हल्ला केला. वडाळयाला ही संख्या पंधरा हजारांवर गेली. संगमनेरला एक लाख लोकांनीं जंगलाचा कायदा तोडला. बागलाणांतील भीलवाड या क्षेत्राच्या ठायींहि असाच एक लाख लोकांनीं कायदेभंग केला. या मोहिमेंत दोन हजारावर तर स्त्रियाच होत्या. साक्री ( खानदेश ), चिरनेर ( पनवेल ), बिळाशी ( सातारा ) विरमगांव, विलेपार्ले, शिरोडा इ० अनेक ठिकाणी सहस्रावधि शेतकऱ्यांनीं आपल्या ठायीं लढा जागृत झाला असल्याचीं लक्षणें स्पष्टपणें प्रकट केलीं. कर्नाटकांत तीन लाख ताडीचीं झाडें तोडण्यांत आलीं. संयुक्तप्रांत, पंजाब, बिहार, बंगाल, येथेंहि कायदेभंगाच्या चळवळीला असेंच उधान आलें होतें. मुंबई, सोलापूर, पेशावर हीं तर नित्याचींच रणक्षेत्रें झालीं होतीं. मिठाचा कायदा मोडणें, जंगलचा कायदा तोडणें, निरोधन करणें, बहिष्कार घालणें, करबंदी करणें, जप्त वाङ्मय जाहीरपणें वाचणें व विकणें, बेकायदा सभा भरविणें व मिरवणुका काढणें इ० अनेक मार्गांनीं जनतेनें राज्ययंत्राला हादरे देऊन तें खिळखिळें करून टाकलें. प्रत्यक्ष तुरुंगांत असे सव्वा लक्ष लोकच गेले. पण वरील अनेक मार्गांनीं, सरकारला आव्हान देऊन, प्रत्यक्ष कायदेभंग करून लाठी व गोळी खाण्याची सिद्धता ज्यांनीं दाखविली, त्यांची संख्या याच्या दसपट तर सहजच होती. शिवाय गिरण्या, रेल्वेचे कारखाने, इतर कारखाने यांतील लक्षावधि कामगारांनीं संप पुकारून सहानुभूति दाखविली ती निराळीच. या चळवळीचें महत्त्व आहे तें यासाठींच. या देशावर पारतंत्र्यामुळें जी आपत्ति आली होती तिची खरी झळ या बहुसंख्य जनतेलाच लागत होती. दारिद्र्य, उपासमार, रोग, गुलामगिरी या यातना खऱ्या तिच्या कपाळीं आल्या होत्या. त्याची तिला आतां जाणीव होऊन ती या आक्रमणाच्या प्रतिकारार्थ सिद्ध झाली. यांतच भारतीय स्वातंत्र्यसंग्रामाची

अलौकिकता आहे. येथें लोकसत्तेचा पुढें मागें उत्कर्ष होईल असा विश्वास वाटतो तो जनतेच्या या जागृतीमुळेंच.

सत्याग्रह, कायदेभंग, करबंदी या चळवळींचें खरें कार्य शत्रूचें हृदय-परिवर्तन हें नसून जनताजागृति हें आहे, हें मागें सांगितलेंच आहे. या जागृतीची जी अंतिम सीमा महात्माजींनीं सांगितली होती ती कांहीं अंशीं तीस सालच्या चळवळींनेंच गांठली होती. विधिमंडळें व न्यायालयें यांवरील बहिष्कार, सरकारी नोकऱ्यांचा त्याग, कायदेभंग व करबंदी या पायऱ्यानंतर पोलीस व लष्कर यांनीं सरकारशीं असहकारितां करणें ही शेवटची पायरी, असें महात्माजींनीं सांगितलें होतें. यामध्यें फार मोठें तत्त्व आहे. परकीय आक्रमण नष्ट करण्यासाठीं प्रारंभींच लष्करांत क्रांति घडविणें हा मार्ग अयोग्य आहे. जनतेंत जागृति झाली, लोक संघटित झाले, ते निग्रहानुग्रहास समर्थ झाले, म्हणजे त्यानंतर लष्कर जागृत होणें यांतच लोकशाहीचा खरा विकास आहे. प्रारंभींच लष्करी क्रान्ति झाली तर परकीय आक्रमण एखादे वेळीं नष्ट होईलहि, पण मग देशावर त्या लष्कराचें आक्रमण सुरू होईल. जर्मनी, इटली, चीन, जपान येथें हेंच झालें, हें मागें सांगितलेंच आहे. पण जनता जागृत व संघटित होऊन ती सैन्याचें नियंत्रण करण्यास समर्थ झाली म्हणजे मग सैन्य जागृत होऊन तें जनतेकडे येणें हा लोकसत्ताक क्रांतीचा स्वाभाविक क्रम होय. १९३० सालीं येथील जागृति याच स्वाभाविक क्रमानें चालली असल्याचें एक मोठेंच गमक निदर्शनास आलें. सरहद्द प्रांतांत हा प्रसंग घडला. तेथें खानबंधूंची खुदा-इ-खिदमतगार ही चळवळ फोफावत चालली होती. त्यांच्या एका सभेवर सरकारला गोळीबार करावयाचा होता. म्हणून गढवाल पलटणींतल्या शिपायांना तिकडे जाण्याचा हुकूम देण्यांत आला. त्या शिपायांनीं आपल्या निःशस्त्र बांधवांवर गोळी झाडण्याचें नाकारलें. आत्मक्लेशाच्या मार्गानें स्वकीयांचा—परकीयांचा नव्हे—हृदयपालट होतो तो असा. लष्कर ही आक्रमकांची आदिशक्ति होय. परवश असलेली ही आदिशक्ति स्ववश करून घेणें ही निःशस्त्र प्रतिकाराची परिपूर्ति होय. १९३० सालीं सैनिकांत जी जागृति झाली ती अगदीं अल्परूप होती. तरी तिचें महत्त्व या दृष्टीनें फार मोठें आहे. शत्रूच्या बालेकिल्ल्याला पहिला सुरुंग लागला असा त्या घटनेचा अर्थ होता. ब्रिटिश

साम्राज्य हें आतां एक दिवस कोसळून पडण्याचा संभव आहे अशी आशा जाणत्या भारतीयांच्या मनांत त्या दिवशीं निर्माण झाली.

तीस सालच्या लढ्यानंतरचा मोठा लढा म्हणजे ४२ सालचा होय. या लढ्याचें नेतृत्व कॉंग्रेसनें मुंबईच्या ठरावानें जरी महात्माजींकडे दिलें होतें, तरी तो लढा त्यांच्या पद्धतीनें व मार्गानें झाला नाहीं. पहिल्यापासूनच लढ्याचीं सूत्रें सोशॅलिस्टांनीं हातीं घेतलीं व अनत्याचारावर त्यांचा विश्वास नसल्यामुळें त्यांनीं त्याला घातपाताचें व कांहींसें दहशतवादाचें रूप दिलें. हें आंदोलन फार प्रचंड झालें हें खरें; पण महात्माजींच्या कायदेभंग-करबंदीच्या पद्धतीनें ३० सालच्या धर्तीवर हा संग्राम झाला असता तर त्याचें स्वरूप जास्त प्रभावी झालें असतें. तीस सालीं लाख सव्वा लाख लोक तुरुंगांत गेले होते व त्याच्या दसपट लोकांनीं कायदेभंग केला होता. ही संख्या आतां ४०।५० लाखांवर जाऊन हिंदुस्थानांतच लष्करांत क्रान्ति घडून आली असती. त्या वेळीं एक गढवाल झालें. आतां सर्वत्र गढवालच झालें असतें; पण तसें फारसें घडलें नाहीं. तरी सुदैव असें कीं, ही उणीव नेताजी सुभाषचंद्र बोस यांनीं भरून काढली. ४२ चें आंदोलन यशस्वी झालें याचें कारण सुभाषचंद्रांचीं ही उठावणी हेंच होय. लोकजागृतीच्या लाटा लष्करापर्यंत येऊन भिडल्या हें ब्रिटिशांनीं या घटनेमुळें जाणलें आणि ते शहाणे असल्यामुळें त्यांनीं येथून काढता पाय घेण्याचें ठरविलें.

## नेताजी

महात्माजींचा सत्याग्रह व सुभाषचंद्राची लष्करी उठावणी यांचा अन्योन्य संबंध आपण नीट ध्यानांत घेतला पाहिजे. तरच सत्याग्रहाचीं आंदोलनें हीं लोकसत्तेस कोणत्या दृष्टीनें उपकारक झालीं व त्याअन्वयें भावी काळांत आपणांस कोणतें धोरण आंखलें पाहिजे याचा उमज पडेल.

सत्याग्रहाचा पहिला लढा महात्माजींनीं दक्षिण आफ्रिकेंत लढविला. त्याच वेळीं एका सभेंत भाषण करून सत्याग्रह व निःशस्त्र प्रतिकार यांतील फरक त्यांनीं स्पष्ट करून सांगितला. निःशस्त्र प्रतिकार हें दुर्बलांचें साधन आहे. आपल्याजवळ शस्त्रें नाहींत म्हणून या मार्गाचा अवलंब करणें भाग

आहे, असे त्याचे पुरस्कर्ते समजतात. त्या पुरस्कर्त्यांच्या मतें हे निःशस्त्र लढे भावी सशस्त्र लढ्यांची पूर्वतयारी म्हणून लढावयाचे असतात. त्यांनीं जनताजागृति होते. प्रक्षोभ वाढतो आणि अखेरीस सशस्त्र लढा यशस्वी होण्याचा संभव निर्माण होतो. सत्याग्रह हें साधन गांधींच्या मतें या जातीचें नाहीं. तें प्रबलांचें शस्त्र आहे. त्यांत शत्रूला प्रेमानें जिंकावयाचें आहे. शस्त्र नाहीं म्हणून त्याचा अवलंब करावयाचा असें नसून तें सर्वांत प्रभावी साधन आहे म्हणून त्याचा अवलंब करावयाचा असतो. तें सर्वांत प्रभावी व समर्थ आहे याचें कारण असें कीं, तें आत्मिक सामर्थ्य आहे आणि इतर साधनें हीं जड व पाशवी आहेत. म्हणून सत्याग्रह व निःशस्त्र प्रतिकार यांचा कोणी घोंटाळा करूं नये.

महात्माजींनीं दक्षिण आफ्रिकेंत १९०६ सालीं जर्मिस्टन येथें सत्याग्रहाचें जें विवेचन केलें त्याचा आशय वर दिला आहे. त्यावरून असें स्पष्ट होतें कीं ते सत्याग्रहाला निःशस्त्र प्रतिकार म्हणून संबोधण्यास कधींच तयार नव्हते. पण कॉंग्रेसनें त्यांच्या नेतृत्वाखालीं केलेले लढे व स्वतः महात्माजींनीं स्वतंत्रपणें केलेले लढे यांचा इतिहास आपण जर नीट पाहिला तर आपणांस असें दिसून येईल कीं खऱ्या अर्थानें त्यांतील एकाहि लढ्याला सत्याग्रह म्हणतां येणार नाहीं. जेव्हां जेव्हां लढ्यांत यश आलें तेव्हां तेव्हां त्या लढ्यांतून जनतेची जी 'अद्‌भुत नियामक शक्ति' शत्रूला दिसली तिला तो भ्याला होता व म्हणूनच नमला असें दिसतें. जनरल स्मटस् किंवा एखादा चंपारण्यांतील युरोपीय मळेवाला यांच्या मनाचें क्षणभर परिवर्तन झालें असलें तरी त्यावरून आफ्रिकन सरकारला किंवा युरोपीय मळेवाल्यांना हिंदी लोकांबद्दल प्रेम वाटूं लागलें होतें असें कोणी म्हणेल असें वाटत नाहीं. खुद्द महात्माजींनाहि आपल्या पंचवीस वर्षांच्या संग्रामांनीं किंवा उपोषणांनीं ब्रिटिशांचें हृदय-परिवर्तन केलें असें वाटलें नाहीं. ( शिखरे चरित्र पृ. ४४९ ). त्याचप्रमाणें ज्या जनतेनें मळेवाल्यांशीं किंवा ब्रिटिश सरकारशीं लढा दिला, तिच्या मनांत या शत्रूंबद्दल प्रेम वाटत होतें असें म्हणण्याचें धाडस कोणी करील असेंहि वाटत नाहीं. पण शत्रूंबद्दल प्रेम वाटणें व त्याचा हृदयपालट घडवून आणून शेवटीं त्याला आपल्यावर प्रेम करावयास लावणें, हें तर सत्याग्रहाचें मूल तत्त्व आहे. तेव्हां हिंदुस्थानांत जे लढे झाले ते महात्माजींनीं

जरी सत्याग्रहाच्या उच्च व उदात्त पातळीवरून केले असले तरी वस्तुतः ते निःशस्त्र प्रतिकारच होते. निःशस्त्र प्रतिकार म्हणजेच मागच्या प्रकरणांत सांगितलेला टिळकांचा बहिष्कारयोग होय. गांधीजीवनरहस्यांत आचार्य जावडेकरांनीं हें स्पष्ट केलें आहे. 'जनतेला व कार्यकर्त्यांनाहि सत्याग्रहाची खरी वृत्ति अद्यापि समजलेली नाहीं' हें गांधीजींचें १९३४ सालचें मत दोनतीनदां उद्धृत करून त्यांनीं स्वतःचें म्हणून असें मत दिलें आहे कीं, 'राष्ट्रसभेचे लढे व तिचीं साधनें हीं बहिष्कारयोगांतच बसूं शकतात. प्रतिपक्षाविषयीं प्रेम हें जें सत्याग्रहनिष्ठेचें लक्षण तें राष्ट्रसभेच्या मार्गास लावतां येणार नाहीं.' (पृ. ४०५) 'अहिंसा ही आम्ही धोरण म्हणून स्वीकारली आहे,' हें पंडितजींनीं तर अनेकवेळां बोलून दाखविलें आहे. गांधीजींचे उजवे हात राजगोपाळाचारी यांचा प्रथम सत्याग्रहावर विश्वास होता. पण पुढें तेहि अविश्वास दाखवूं लागले. तेव्हां भारतीयांनीं ब्रिटिशांशीं जे लढे दिले ते सर्व सत्याग्रही लढे नसून निःशस्त्र प्रतिकार होते, हें आपण लक्षांत ठेवलें पाहिजे आणि या दृष्टीनें आपण पाहूं लागलों तर नेताजींच्या लष्करी मोहीमेशीं त्यांचा कसा दृढ संबंध आहे तें आपणांस कळून येईल.

निःशस्त्र प्रतिकार हा सशस्त्र प्रतिकाराची पूर्व तयारी म्हणूनच केला जातो. लोकजागृति हें त्याचे मुख्य उद्दिष्ट असतें, आणि या लोकजागृतींतच लोकसत्तेचीं बीजें असतात. सत्याग्रहांत या लोकजागृतीचें महत्त्व नाहीं. त्यांत मानवाची आध्यात्मिक उंची वाढविणें हा हेतु असतो. आणि मुख्य म्हणजे त्यांत संख्येला महत्त्व नसतें. आपणाला अगदीं अस्सल, बावनकशी, एकनिष्ठ असे सत्याग्रही हवे. मग ते कितीहि थोडे असले तरी चालतील, असें महात्माजींनीं अनेक वेळां जाहीर केलें आहे. 'जर आपली बाजू न्याय्य असेल व प्रतिकारसाधनें शुद्ध असतील तर एकटी एक एक व्यक्ति देखील सत्याग्रहलढा सुरू करून तो चालू ठेवूं शकेल' असें रंगराव दिवाकरांनीं म्हटलें आहे. १९३४ सालापर्यंत महात्माजींनीं सुरू केलेल्या लढ्याला १७।१८ वर्षें पुरीं झालीं होतीं. त्या अवधींत दोन प्रचंड संग्राम व अनेक लहानसहान झगडे होऊन गेले होते. तरी सत्याग्रहाचें खरें तत्त्व माझ्याखेरीज कोणालाच समजलें नाहीं, असें ३४ सालीं महात्माजींनीं मत दिलें. लोकसत्तेला शुद्ध सत्याग्रहाचा मुळींच उपयोग कसा नाहीं हें यावरून

ध्यानीं येईल. देशांतील बहुसंख्य जनता आपल्या हक्कांच्या जाणीवेनें जागृत झाली तरच लोकशाहीचा उद्‌भव होतो व ती यशस्वी होते. सत्याग्रहाचीं तत्त्वें कितीहि थोर असलीं तरी ती पूर्णपणें अंगीं मुरलेले लोक जर अगदीं अल्पसंख्य असले तर त्यांचा राष्ट्रीय स्वातंत्र्याला किंवा लोकशाहीच्या प्रस्थापनेला कसलाच उपयोग होणार नाहीं. पण त्यांनींच आपल्या सामर्थ्याचा उपयोग करून लोकांच्या ठायीं प्रतीकार भावना निर्माण केली, व बहुसंख्य जनतेंत लढा निर्माण केला तर त्यायोगें लोकजागृतीच्या ज्या प्रचंड लाटा निर्माण होतील त्यांनीं मात्र राष्ट्राची अभूतपूर्व प्रगति होईल यांत शंका नाहीं. महात्माजींनीं या भरतभूमींत हें कार्य केलें व करविलें. त्यांना जितक्या उंच पातळीवर जनतेस न्यावयाचें होतें तितक्या उंचीवर ती गेली नाहीं हें खरें. पण त्यामुळें त्यांच्या लढ्याचें महत्त्व रतिमात्र कमी होत नाहीं. तीस कोटी लोकांना जागृत करणें हें यश एक आयुर्मान सफल करण्यास अगदीं पुरेसें आहे.

नेताजी सुभाषचंद्र बोस हे सशस्त्र लष्करी क्रान्तीचे पुरस्कर्ते होते आणि शेवटीं त्यांनीं तसा प्रचंड प्रयत्नहि केला होता, हें आतां सर्वश्रुत आहे. पण असें असलें तरी या सशस्त्र क्रान्तीची पूर्व तयारी महात्माजींनीं केलेल्या निःशस्त्र प्रतिकारामुळेंच झाली होती, हें त्यांनीं सिंगापूराहून केलेल्या भाषणांत प्रांजळपणें मान्य केलें आहे. ‘ गेल्या वीस वर्षांत हिंदुस्थानांत जी जागृति झाली आहे ती महात्माजींनीं भारतीयांच्या हातीं जें अभिनव शस्त्र दिलें आहे त्यामुळें झाली आहे या म्हणण्यांत मुळींच अतिशयोक्ति नाहीं. भारतीयांच्या ठायीं जो स्वाभिमान व आत्मविश्वास जागृत झाला आहे त्याचें श्रेय गांधीजींनाच आहे. ’ असे २ ऑक्टोबर १९४३ च्या भाषणांत त्यांनीं निःसंदिग्ध उद्‌गार काढले आहेत. पण हें सांगून वर ते म्हणतात, ‘ हिंदुस्थानांत महात्माजींनीं सत्याग्रहाचा लढा सुरू केला तो सशस्त्र लढा शक्य नव्हता म्हणून. आतां काळ बदलला आहे. आतां भारतीयांना शस्त्र उपसणें शक्य आहे. आतां स्वातंत्र्यसेना सिद्ध झाली आहे याचा मला मोठा अभिमान वाटतो. हिंदुस्थानांत सध्यां भारतीयांनीं जे प्रयत्न चालविले आहेत त्यांनीं स्वातंत्र्य मिळालें तर सर्वांत जास्त आनंद मलाच होईल. पण तशी मुळींच आशा वाटत नसल्यामुळें सशस्त्र क्रान्ति अपरिहार्य आहे

असें माझें निश्चित मत झालें आहे; आणि म्हणूनच आम्हीं हें भारताचें अखेरचें स्वातंत्र्ययुद्ध आरंभिलें आहे.' असें म्हणून नेताजींनीं शेवटीं, 'राष्ट्रपिताजी, आमच्या या पवित्र स्वातंत्र्यसंगरांत आपला आम्हांला आशीर्वाद असावा.' अशी महात्माजींच्या चरणीं प्रार्थना केली आहे.

## टिळक--गांधी-नेताजी

१९१७ सालापासून गांधीजींनीं लढविलेले जे संग्राम त्यांचा अखेरच्या सशस्त्र क्रान्तीशीं कसा अविभाज्य संबंध आहे, ती अखेरची क्रान्ति म्हणजे पूर्वीच्या संग्रामांचीच कशी परिणति आहे, हें नेताजींच्या वरील उद्‌गारांवरून स्पष्ट होईल. १८८० सालापासून या देशांत ज्या चळवळी झाल्या त्या सर्वांचा लोकजागृति हा हेतु होता. त्या महाशक्तीच्या सामर्थ्यानेंच स्वातंत्र्य-प्राप्ति करून घ्यावयाची हें टिळकांनीं प्रारंभींच निश्चित करून अखिल भारतीय जनतेच्या अंगच्या सुप्तशक्तीला आवाहन करण्यास प्रारंभ केला आणि चाळीस वर्षांच्या आपल्या अविरत तपश्चर्येनें जागृतीचें लोण त्यांनीं सुशिक्षित मध्यमवर्गापर्यंत आणून ठेविलें. बहुसंख्य जनतेंत शिरावयाचें व कायदेभंग व करबंदी-म्हणजेच बहिष्कार योग या मार्गानें लढा करावयाचा अशी योजना आंखून जागृत होत चाललेल्या मध्यमवर्गाला जनतेंत मिसळ-ण्याचा व तेथें राजकीय जागृति घडवून आणण्याचा ते सारखा उपदेश करीत होते; पण बहिष्कारयोगाचा प्रत्यक्ष आचार त्यांना त्यांच्या आयुर्मानांत घडवून आणतां आला नाहीं. तें कार्य महात्माजींनीं केलें. सुशिक्षित मध्यमवर्गाच्या कक्षेतून अनंतमुखांनीं पाट फोडून त्यांनीं हा जागृतीचा लोंढा कष्टकरी जनतेपर्यंत नेऊन पोचविला. तिसरी कक्षा लष्कराची. देश परक्यांच्या अधीन असतांना हा सैनिकांचा वर्ग सर्वांत प्रतिगामी व संस्कार-अक्षम असा असतो. तो तसाच रहावा अशी जेत्यांनीं बुद्धिपुरःसर योजना केलेली असते. म्हणून लोकशाही पद्धतीनें निर्माण केलेल्या जागृतीच्या लाटा तेथें सर्वांत शेवटीं पोचतात. त्या तेथें पोचल्या कीं लोकजागृतीच्या कार्याची सांगता होते. ही सांगता नेताजींनीं घडवून आणली. बहुसंख्य जनतेंत महात्माजींनीं निर्माण केलेला प्रक्षोभ, स्वत्वाचा अभिमान, आत्मविश्वास व अन्यायाच्या प्रतिकारार्थ आत्मार्पण करण्याची बुद्धि हे गुण त्यांनीं हिंदी

लष्करापर्येत नेऊन पोचविलें. त्यांचें प्रत्यक्ष कार्य भारताबाहेर झालें असलें तरी त्यांनीं तेथें दिलेल्या प्रेरणा हिंदुस्थानांत लष्करापर्येत येऊन पोचल्या होत्या, हें १९४५–४६ सालीं कलकत्ता, मुंबई व कराची येथें नौदळांत जी उठावणी झाली तीवरून दिसून येतें. १८५७ च्या आधीं एका पलटणीनें ब्रह्मदेशांत जाण्याचें नाकारलें होतें. त्या वेळीं या आज्ञाभंगाबद्दल त्या सर्व पलटणीला तोफेच्या तोंडी देण्यांत आलें होतें. १९३० सालीं गढवाल-पलटणीनें सत्याग्रहीवर गोळ्या झाडण्यास नकार दिला, तेव्हां त्यांतील सैनिकांना १० ते १५ वर्षांपर्येतच शिक्षा झाल्या आणि त्यासुद्धां कांहींना. १९४३ व ४५ सालीं प्रत्यक्ष बादशहाविरुद्ध हिंदी लष्कर लढाईस उभें राहिलें होतें; पण या लष्कराला शिक्षा अशी जवळजवळ झालीच नाहीं. टिळक, गांधी व नेताजी यांचा हा महिमा आहे. त्यांनीं कोणचें परिवर्तन, कोणची क्रांति घडवून आणली आहे, हें ब्रिटिशराजकर्त्यांना कळलें. या अफाट जनसागराचें सामर्थ्य त्यांनीं ओळखलें व शहाणपणानें माघार घेतली. लोकायत्त क्रान्तीच्या महायशाचें हें प्रथम लक्षण होय.

टिळक व गांधी हे दोघेहि लोकशाहीचे निःसीम उपासक होते आणि म्हणूनच जनताजागृति हा त्यांच्या चळवळीचा आत्मा होता. महात्माजी हे स्वातंत्र्यप्राप्ति व लोकसत्तेची प्रस्थापना यापेक्षांहि उच्च हेतूनें प्रेरित झाले होते. अखिल मानव्याकडे त्यांची दृष्टि होती. सत्य अहिंसेचे संदेश देऊन या मानव्याची उंची वाढवावी, असें बुद्धजीजसप्रमाणें त्यांचें ध्येय होतें. प्रत्यक्षांत त्यांचा सत्याग्रह निःशस्त्र प्रतिकाराच्या वर जाऊं शकला नाहीं; पण लोकशाहीच्या दृष्टीनें पाहतां तिच्या प्रस्थापनेस अवश्य ती लोकजागृति घडवून आणण्याचें महाकार्य त्यांच्या संग्रामांनीं घडवून आणलें आहे, यांत आतां शंका घेण्यास जागा आहे असें वाटत नाहीं. या संग्रामांनीं शत्रूचा हृदयपालट झाला नसला तरी हा भारतीय समाज त्यामुळें आमूलाग्र बदलून गेला आहे. ब्रिटिश राज्यकर्ते व त्यांचे अगदीं सामान्य अधिकारी यांच्याकडे मान वर करून बघण्याची ज्या खेडुतांना पूर्वी ताकद नव्हती, तेच आतां पूर्ण निर्भय बनले व त्या राज्य-कर्त्यांना आव्हान देण्यास सिद्ध झाले. मानवत्वाची व म्हणूनच लोकशाहीची ही प्रगति केवळ असामान्य होय. आपल्या मूलभूत हक्कांची जाणीव होऊन

ते हक्क जो हिरावून घेतो त्याच्याविरुद्ध लढा करण्यास सिद्ध होणें व त्या लढ्यांत प्राणार्पणहि करण्याची तयारी करणें हें लोकसत्ताक देशांतील नागरिकांचें पहिलें लक्षण होय. हा गुण नसेल तर स्वातंत्र्यांतहि लोकसत्ता टिकविणें शक्य नाहीं, मग पारतंत्र्यांत तर प्रश्नच नाहीं. हा एक गुण अंगीं येणें याचा अर्थ मानवाचें समूळ परिवर्तन होणें, त्याच्या जीवनांत सर्वस्वीं क्रांति होणें असा होतो. यासाठीं त्याच्या मनाची क्षुद्रता नष्ट झाली पाहिजे, त्याचा दृष्टिकोन विशाल झाला पाहिजे, त्याच्या चित्तांत असंतोष निर्माण झाला पाहिजे, त्याच्या आकांक्षा वाढल्या पाहिजेत आणि त्यांच्या परिपूर्तीसाठीं वाटेल तो त्याग करण्याची त्याच्या मनाची सिद्धता झाली पाहिजे. प्राण देऊनहि कांहीं मिळविण्याजोगें आहे ही भावना क्षुद्र मानवांत नसते. जड शरीरांत प्राण धारण करून ठेवणें हें त्याचें अंतिम ध्येय असतें. त्याला मरण पत्करूनहि कांहीं मिळविण्याजोगें आहे हें पटवून देणें व तशा कृतीस प्रवृत्त करणें यापेक्षां मानवाची व लोकसत्तेची जास्त मोठी सेवा कोणचीहि नाहीं. आपल्या अनेक सत्याग्रह-संग्रामांनीं महात्माजींनीं भारतीय जनतेंत हें परिवर्तन घडवून आणलें आहे आणि म्हणूनच भारतीय लोकसत्ता त्यांची अखंड ऋणी राहील.

---

## प्रकरण सातवें

# गांधीवाद व लोकसत्ता.

## १

### अध्यात्मनिष्ठा

भारतीय लोकसत्तेचा विकास व प्रगति घडवून आणण्याच्या कामीं महात्माजींनीं केवढें अलौकिक व बहुमोल कार्य केलें आहे, त्याचा विचार मागील लेखांत आपण केला. त्यांनीं आपल्या सत्याग्रह-संग्रामांनीं भारतीय जनतेंतील मानव जागृत केला आणि स्वाभिमान, राष्ट्रभक्ति, अन्यायाची चीड,

प्रतिकार करण्याचें धैर्य, आत्मार्पण करण्याची सिद्धता या महनीय गुणांनीं त्याला संपन्न केलें. त्यामुळें या सत्याग्रह-संग्रामांचा इतिहास भारतीय लोकसभेच्या इतिहासांत अग्रस्थानीं राहील, यांत शंका नाहीं; पण हे संग्राम चालवितांना व आपल्या विधायक कार्यक्रमाचा प्रसार करतांना महात्माजींनीं एक मोठें तत्त्वज्ञान प्रस्थापित केलें आहे. त्या तत्त्वज्ञानाचा व्याप केवळ राजकारणापुरता मर्यादित नसून मानवाच्या इहपरलोकींच्या सर्व जीवनाला सामावून घेईल इतका तो मोठा आहे. त्याचें परीक्षण केल्यावांचून महात्माजींच्या कार्याचें परीक्षण पुरें होणार नाहीं. म्हणून आतां त्या तत्त्वज्ञानाचें म्हणजेच साधारणतः गांधीवाद म्हणून प्रसिद्ध असलेल्या सिद्धान्तसमूहाचें किंवा विचारप्रणालीचें विवेचन करण्याचा प्रयत्न करूं.

गांधीवादाची चिकित्सा अवश्य खरी, पण ती फार अवघड आहे. जवळजवळ अर्ध शतकभर गांधीजींचें जीवनकार्य चालू होतें. जीवनाच्या प्रत्येक क्षेत्रांत त्यांनीं कांहीं चळवळी केल्या आहेत व मतें सांगितलीं आहेत. त्यांच्या कार्याचा विस्तारहि असाच प्रचंड आहे. भरतभूमि ही जी त्यांची कर्मभूमि हीच अगोदर खंडप्राय आहे आणि त्यांनीं येथें जें कार्य केलें त्याचे पडसाद सर्व जगभर उमटलेले असून जगांतल्या अनेक पंडितांनीं, शास्त्रज्ञांनीं व कार्यकर्त्यांनीं त्यांच्या कार्याविषयीं चर्चा केलेली आहे. या सर्वांचें मंथन करून कांहीं निर्णय ठरविणें हें मोठें दुष्कर आहे; पण एवढ्यानेंच भागत नाहीं. गांधीवादाची चिकित्सा दुष्कर होण्याचें एवढेंच कारण नाहीं. यापेक्षां जास्त महत्त्वाची अशीं दोनतीन कारणें आहेत. त्यांचा विचार केल्यावांचून आपणांस पुढें जातां येणार नाहीं.

कोणच्याहि तत्त्वज्ञानांत जे भिन्न भिन्न सिद्धान्त सांगितलेले असतात, जीं अनेक मतें प्रगट केलेलीं असतात त्यांत कांहीं सुसंगति किंवा सुसूत्रता असावी अशी अपेक्षा असते. आतां ही सुसंगति राखणें फार अवघड आहे व अत्यंत थोर पुरुषांच्या भिन्न कृतींत व मतांतहि पुष्कळ वेळां विसंगति दिसते हें खरें; पण आपल्या भिन्न सिद्धान्तांत सुसंगति राखण्याचा ते प्रयत्न तरी करीत असतात. महात्माजींच्या बाबतींत ही मूलभूत अपेक्षाच विफल आहे. कारण, ' अशी सुसंगति राखणें हा माझा कधींच हेतु नसतो.

मी लिहूं लागलों कीं पूर्वी आपण काय म्हणालों होतों याचा कधींहि विचार करीत नाहीं. त्या त्या क्षणीं जें सत्य मला प्रतीत होतें त्याशीं सुसंगति ठेवणें येवढेंच माझें धोरण असतें.' असें त्यांनीं स्वतःच सांगून ठेवलें आहे. (हरिजन ३०-९-३९). जन्मनिष्ठ वर्णव्यवस्था त्यांना मान्य आहे. इतकेंच नव्हे तर, आत्म्याच्या विकासासाठीं बेटिबंद जातिव्यवस्था अवश्य आहे, असेंहि ते म्हणतात. पण जातिव्यवस्थेमुळें हिंदुसमाजाचा अधःपात झाला असें सांगून मिश्रविवाह व सहभोजन यांचा पुरस्कारहि ते करतात. वर्धाश्रमांत विवाह व्हावयाचा तर वधूवरांपैकीं एकजण हरिजन असलाच पाहिजे अशी त्यांची शेवटीं अट असे आणि पहिल्या व दुसऱ्या मतांत विसंगति आहे असें कोणी दाखवून दिल्यास 'मला तसें मुळींच वाटत नाहीं' असें ते सांगत. असे प्रकार एकदोनदांच घडले असें नाहीं. गांधी तत्त्वज्ञानाच्या प्रत्येक शाखेंत, महात्माजींच्या प्रत्येक कार्यक्रमांत, प्रत्येक चळवळींत असे प्रकार अनेक वेळां घडले आहेत. यामुळें अभ्यासक हा गुदमरून जाऊन 'गांधी' या प्रचंड घटनेकडे मूढ होऊन पाहूं लागतो.

गांधीवादाचा अभ्यास करून त्यावरून कांहीं निष्कर्ष काढणें हें काम कठीण होण्याचें आणखी एक कारण आहे. महात्माजी कांहीं तत्त्वें, कांहीं विचार, कांहीं मतें हीं अंतिम ध्येयाविषयींचीं म्हणून सांगतात व कांहीं मतें आजच्या व्यवहारास अनुलक्षून सांगतात; आणि या दोहोंचीं वाचकांच्या मनांतच नव्हे तर महात्माजींच्या लेखनांतहि सारखी गल्लत होत असते. त्यांच्या अंतिम रामराज्याचें जें रूप त्यांत कसल्याहि प्रकारचें यंत्र असणार नाहीं हें तर निश्चितच आहे. पण लुईफिशरशीं बोलतांना आजच सर्व आगगाड्या नष्ट झाल्या तरी मला मुळींच दुःख होणार नाहीं असें ते बोलून जातात. साध्य व साधनें दोन्ही सारखींच शुद्ध असलीं पाहिजेत, या दोहोंचा मी अभेद मानतों, असें एकदां म्हणतात. कोणच्याहि व्यवहारांत त्याला अपवाद नाहीं असें सांगतात. पण काँग्रेसचें कार्य हें शेकडा शंभर टक्के भांडवलदारांनीं दिलेल्या पैशावरच चाललें आहे, हें दुर्दैवानें खरें आहे हें लुई फिशरजवळ प्रांजळपणें मान्य करतात. साध्य व साधनें यांच्या या भेदाभेदांतून निश्चित निर्णय करणें जवळ जवळ अशक्य होऊन बसतें.

पण यापेक्षांहि जास्त चमत्कारिक कारण आहे. गांधीवादी पंडित असें सांगतात कीं, गांधीजींचे विचार व मतें आणि त्यांनीं घेतलेले निर्णय बहुधा योग्य व अचूक असतात. पण त्यांचें समर्थन पुष्कळ वेळां ते इतक्या विचित्र पद्धतीनें करतात कीं, त्या विचारांची हानीच व्हावी. तर्कशुद्ध रचना करून आपला मुद्दा सिद्ध करण्याची कला महात्माजींना तितकीशी वश नव्हती व त्यामुळें त्यांचे सिद्धांत समर्थनीय व शास्त्रशुद्ध असूनहि त्यांच्याविषयीं घोटाळा होतो, असें यांपैकीं कांहीं पंडितांचें मत आहे. ' पॉवर ऑफ नॉनव्हायोलन्स ' या आपल्या पुस्तकांत रिचर्ड ग्रेग यांनीं अशासारखाच विचार मांडला आहे. ' अनत्याचारी, अहिंसात्मक, प्रतिकाराच्या सिद्धांताविषयीं गांधीजी जें स्पष्टीकरण देतात, समर्थन करतात तें आपणां पाश्चात्यांना पटण्याजोगें नाहीं. आपणांहून त्यांची जीवनविषयक वृत्ति व वैचारिक पार्श्वभूमि फार निराळी आहे, म्हणून त्यांच्या सत्याग्रहाचें स्वतंत्र विवेचन करण्याची आवश्यकता आहे ' असें प्रारंभींच ग्रेग यांनीं सांगून ठेवलें आहे. आचार्य कृपलानी यांचेंहि मत असेंच आहे.

या कारणामुळें महात्माजींचें कार्य व गांधीवाद म्हणून प्रचलित असलेलें तत्त्वज्ञान यांचा आपण अत्यंत सावधागिरीनें अभ्यास केला पाहिजे. गेल्या प्रकरणांत वर्णिलेले त्यांचे सत्याग्रह—संग्राम व त्यामुळें त्यांनीं घडवून आणलेली लोकजागृति ही क्षणभरहि दृष्टिआड न करतां त्यांच्या प्रकाशांतच महात्माजींच्या कृति व उक्ति आपण जोखून पाहिल्या पाहिजेत. त्यांचीं अनेक तत्त्वें व कृति, सकृत्‌दर्शनीं पहातां, लोकशाहीला व एकंदर समाजाच्या प्रगतीला निश्चित घातक अशीं दिसतात; पण तेवढ्यामुळें आपण त्यांच्या महाकार्याचा विपरीत अर्थ केला, त्यांच्या थोर चारित्र्यावर पामीदत्ताप्रमाणें कलंक फासला तर त्यांत आपलाच घात आहे. उलट पट्टाभीप्रमाणें भोळ्याभाबड्या अंधभक्तीनें सर्वच्या सर्व गांधीवाद आपण उपकारक म्हणून स्वीकारला तर तेंहि हानिकारक आहे. तेव्हां आपला विवेक सर्वतोपरी जागृत ठेवून मोठ्या दक्षतेनें आपण या जगद्वंद्य महाविभूतीच्या कार्याचें परीक्षण केलें पाहिजे.

गांधी-जीवनाचें व म्हणूनच गांधीवादाचें मूल महातत्त्व म्हणजे अध्यात्मनिष्ठा हें होय. पंचज्ञानेंद्रियें व बुद्धि यांना अनाकलनीय अशी एक शक्ति या विश्वाचें नियंत्रण करीत असते, ती विश्वाचें भरणपोषण करते, मानवाच्या

उन्नतीची काळजी वहाते, विश्वांत न्यायाची प्रस्थापना करते, सत्याचा सर्वत्र जय होईल अशी व्यवस्था करते आणि मानवानें मनापासून तिची प्रार्थना केल्यास ती त्याला अनुकूल होते अशी अध्यात्मवादाची श्रद्धा आहे. गांधीजींची अशीच श्रद्धा होती. आगरकरांच्या कार्याचें विवेचन करतांना भौतिक अधिष्ठान या लेखांत आपण असें पाहिलें आहे कीं, ही श्रद्धा मानवाच्या सर्व जीवितावर प्रभुत्व गाजवीत असेल, तिचें वर्चस्व सर्वत्र अबाधितपणें चालत असेल, तर ती श्रद्धा लोकशाहीला मारक झाल्यावांचून रहाणार नाहीं. मानवाची जी अल्पस्वल्प बुद्धिवशता आहे, तर्कनिष्ठा आहे तिच्यावरच लोकशाहीची सर्व इमारत उभी रहात असते आणि अध्यात्मवादांत बुद्धि, तर्क, बौद्धिक चिकित्सा, भौतिक ज्ञान यांची अवगणना होते. गांधीवादानें कळून वा न कळून अशी अवगणना निश्चित केली आहे. महात्माजी परमेश्वराचें स्वरूप वर्णून सांगतांना, सत्य म्हणजेच परमेश्वर, असें कांहीं वेळां सांगतात. ही निष्ठा बुद्धिवादाला मारक होत नाहीं; पण त्यांची खरी निष्ठा तुकाराम-नामदेवांसारखी आहे. त्यांचा परमेश्वर प्रार्थनेला वश आहे. तो अभक्तांना शासन करतो. भक्तांचा योगक्षेम चालवितो. म्हणून त्यांनीं कसलाहि सांठा करण्याची गरज नाहीं. हा परमेश्वर जगाच्या व्यवहारांत नित्य हस्तक्षेप करतो आणि आपण अस्पृश्यतेसारखीं पापें केलीं तर भूकंपासारखे उत्पात घडवून आपणांस शासन करतो. अशा या परमेश्वराचें आकलन होण्यास गुरुकृपेची आवश्यकता आहे, त्यावांचून सत्यज्ञान होणें अशक्य आहे, अशीहि महात्माजींची श्रद्धा आहे. ( आत्मचरित्र पृ. ११३ ). पण जगाच्या व्यवहारांत नित्य हस्तक्षेप करणारा, सत्याचा विजय घडवून आणण्यांत तत्पर असलेला, पापपुण्याची यथायोग्य दखल घेणारा व गुरूच्या मध्यस्थीनेंच वश होणारा परमेश्वर हा बुद्धिवादाला व म्हणूनच लोकसत्तेला अत्यंत घातक आहे.

## आत्मबल

या अध्यात्मनिष्ठेतून निर्माण होणारी आत्मबलाची कल्पना अशीच लोकशाहीशीं विसंगत आहे. या आत्मबलाचा कांहींसा बुद्धिगम्य अर्थ

सांगण्याचा आचार्य जावडेकरांनीं प्रयत्न केला आहे. 'निष्कामसेवा, निःपक्षपाती प्रेम आणि अहिंसक शौर्य या गुणांना आत्मबल ही संज्ञा देतां येईल. सेवा, जनताप्रेम, शौर्यशाली सत्यनिष्ठा, त्याग, शौर्य, चिकाटी हे सर्व आत्मगुण होत' असा अर्थ सांगून, 'जुन्या निष्ठा नष्ट करून नव्या निर्माण करणें हें आत्मबलाशिवाय शक्य होत नाहीं. केवळ बुद्धिबलाचा सामाजिक क्रान्तिकार्यास फारसा उपयोग होत नाहीं,' असा सिद्धान्त आचार्य सांगतात. (गांधी-जीवन-रहस्य पृ. ४२८–२९). पण आत्मबलाचा एवढाच अर्थ असेल, तर त्यांत नवीन असें कांहींच नाहीं. वरील आत्मगुणांची महती सर्वांनाच मान्य होती व आहे. भौतिकनिष्ठ व भोगवादी युरोपांतहि मॅझिनी, लिंकन, लेनिन यांसारखे क्रान्तिधुरीण व सामाजिक क्रान्तीच्या लहानलहान क्षेत्रांतले शेकडों कार्यकर्ते आत्मबलानें संपन्न होते, हें कोणालाहि मान्य करावें लागेल; पण महात्माजींचें आत्मबल तें हें नव्हे. तें कांहीं तरी गूढ व अतींद्रिय असेंच बल असलें पाहिजे. १९३४ सालीं काँग्रेसमधून गांधीजी बाहेर पडले, त्यावेळीं त्यांनीं बाहेर पडण्याचीं जीं कारणें सांगितलीं, त्यांतलें एक प्रमुख कारण त्यांनीं असें सांगितलें कीं, 'सत्याग्रहास अवश्य असणारी शुद्ध आत्मिक शक्ति वाढविण्यासाठीं मीं राष्ट्रसभेच्या कार्यांतून निवृत्त होत आहे.' आतां गांधीजींनीं आत्मशक्ति वाढवावयाची म्हणजे काय करावयाचें तें कळत नाहीं. काँग्रेसमध्यें ते राहिले तर ती वाढणार नाहीं व बाहेर पडले तरच वाढणार, म्हणजे काय तें कळणें त्याहून कठीण आहे. प्राचीन काळच्या ऋषिमुनींसारखेंच हेंहि बल गूढ, अतर्क्य व अनाकलनीय आहे असें मानलें तरच याचा कांहीं अर्थ लागतो. 'खरा प्रामाणिक व निष्ठावंत असा एक जरी सत्याग्रही मिळाला तरी तो इंग्रजांना नमवूं शकेल' असें जेव्हां ते म्हणतात, तेव्हां त्या आत्मबलाचा असाच अर्थ त्यांच्या मनांत असला पाहिजे. ही उक्ति केवळ अतिशयोक्ति असती तर तिचा अर्थ समजला असता; पण महात्माजींच्या बाबतींत तसें म्हणतां येत नाहीं. त्यांच्या अध्यात्मनिष्ठेच्या कोणच्याच बाबतींत हें म्हणणें सयुक्तिक ठरणार नाहीं. वर सांगितलेली भोळी, श्रद्धाळू ईश्वरनिष्ठा ही लोकशाहीच्या अनेक पुरस्कर्त्यांच्या चित्तांत पूर्वी असे व अजूनहि असणें शक्य आहे; पण स्वतःची मनःशांति व मानसिक उन्नति यापलीकडे ते तिची मर्यादा जाऊं देत नाहींत. महात्माजींचें

तसें नाहीं. अध्यात्मक्षेत्रांतील प्रत्येक श्रद्धा सामाजिक प्रपंचाच्या ऐहिक व्यवहारांत प्रभावी ठरते, असें मानून ते त्या धोरणानें कार्याला वळण देतात. एकटा एक सत्याग्रही आत्मबलानें शत्रूला जिंकील, ही त्यांना अत्युक्ति वाटत नाहीं. त्या श्रद्धेमुळें ते वैयक्तिक सत्याग्रहाचा आदेश देतात आणि सत्याग्रहींच्या पापपुण्याची चवकशी करूनच त्यांना चळवळींत भाग घेण्यास अनुज्ञा देतात. याच्या जोडीला त्यांच्या प्रार्थना, त्यांचे रामनामाचे जप, त्यांचीं उपोषणें यांचा विचार केला तर त्यांचें आत्मबल हें एक गूढ व अतींद्रिय बल असलें पाहिजे, याविषयीं शंका रहात नाहीं. समाजाच्या ऐहिक व्यवहारावर बुद्धीला अनाकलनीय अशा अतींद्रिय बलाचें म्हणजेच आत्मबलाचें प्रभुत्व जों जों जास्त होतें, तों तों तो समाज लोकशाहीपासून दूर जाऊं लागतो. कारण हें आत्मबल (अशी कांहीं शक्ति आहे असें क्षणभर गृहीत धरलें तरी) लाखांतून एखाद्याला वश असणार. इतरांना स्वप्नांतहि त्याची प्राप्ति होणें शक्य नाहीं. अर्थात् ही पराकाष्ठेची विषमता होय. भांडवलामुळें निर्माण झालेली विषमता या अध्यात्मामुळें निर्माण झालेल्या विषमतेपुढें कांहींच नव्हे. प्रार्थना, रामनामजप, उपोषणें यांचा जोर वाढला म्हणजे भांडवलशाहींत झालीं नसतील इतकीं जनतेचीं मनें पंगु होतात, दुबळीं होतात. असल्या जनतेला लोकशाही पेलणें कधींच शक्य नाहीं.

## अंतःसंवेदना

गांधीजींची अंतःसंवेदनेवरील श्रद्धा व भारतीय राजकारणाचें त्यांनीं त्या अंतःसंवेदनेनें—म्हणजेच प्राकृत भाषेत आंतल्या आवाजानें—केलेलें सूत्रचालन ही गांधीवादांतील अध्यात्मनिष्ठेची पराकोटी होय. आपलीं ज्ञानेंद्रियें व बुद्धि यांच्याहून निराळें असें एक ज्ञानसाधन थोर पुरुषांना उपलब्ध असतें, अशी कल्पना प्राचीन काळीं सर्व जगांत रूढ होती. सर्व धर्मसंस्थापक, धर्मप्रवक्ते, साधुसंत, पोपसारखे धर्मपीठांचे अधिकारी यांना ही परमेश्वरी वाणी प्रसन्न असते, अशी लोकांची समजूत होती. पंधराव्यासोळाव्या शतकांत विज्ञानाचा उदय झाल्यावर या श्रद्धेचा जोर कमी झाला आणि अलीकडे ऐहिक व्यवहारापुरती तरी बहुतेक सर्व जगांत ही श्रद्धा नाहींशी

होत आली होती. महात्माजींनीं या अंतःसंवेदनेवरील श्रद्धेला पुन्हां दृढता आणली. स्वतःला अंतर्ज्ञान होतें असें त्यांना वाटत असे आणि भारतीय राजकारणांत अनेक महत्त्वाचे निर्णय त्यांनीं या अंतःसंवेदनेवर विसंबून कायम केले आहेत. अंतःसंवेदनेवरील ही श्रद्धा लोकसत्तेला पराकाष्ठेची घातक ठरते. कारण या श्रद्धेमुळें बुद्धिगम्य ज्ञान, तार्किक विचारसरणी, बुद्धिवाद यांना गौण स्थान प्राप्त होतें, त्यांची अवगणना होते आणि ही अवगणना झाली कीं समाजांत पराकाष्ठेची विषमता निर्माण होते. भांडवलशाहींत अपार धन जसें कांहीं थोड्या व्यक्तींनाच लाभते, त्याचप्रमाणें परमार्थशाहींत अंतःसंवेदनेचें धनहि फार थोड्यांनाच लाभतें; आणि मग तीं भाग्यवान् माणसें इतरांना आपले दास करून ठेवतात. भांडवली धनाचा भांडवलशहा जसा आज दुष्ट उपयोग करतात, तसाच याहि बलाचा पोपसारखे लोक दुष्ट उपयोग करतात, हें इतिहासानें दाखविलें आहे. युरोपांत भौतिक विद्येच्या पुनरुज्जीवनाची जी चळवळ झाली तिनें लोकांना या पारमार्थिक शहांच्या गुलामगिरींतून सोडविलें. प्रत्येकाला स्वतःच्या बुद्धीनें निर्णय करण्याचा अधिकार आहे, हें महातत्त्व या चळवळींतून निर्माण झालें आणि लोकशाहीचा पाया तेथेंच घातला गेला. बुद्धीचा अधिकार मान्य झाल्यामुळें माणसांचें व्यक्तित्व सिद्ध झालें. स्वतःची बुद्धि वापरण्याचा हा अधिकार, आपल्या विवेकानें निर्णय करण्याचा हा हक्क, प्रत्येक घटनेची स्वतः चिकित्सा करण्याची मानवाची ही योग्यता अमान्य झाली, तर लोकशाहीला शून्य अर्थ आहे. गांधीवादानें कळून वा नकळून हा हक्क अमान्य केला आहे. महात्माजी दांडीला निघाले तेव्हां आपल्या अनुयायांनीं नंतर काय करावयाचें हें त्यांनीं कोणालाच सांगितलें नव्हतें. त्याविषयीं पट्टाभि म्हणतात, 'कदाचित् गांधींनाहि तें माहीत नसेल. एखाद्या स्फूर्तिस्फुल्लिंगाच्या प्रकाशांत त्यांना ज्ञान होई व अंतःसंवेदनांनीं ते आपला व्यवहार करीत. धर्मप्रवण व्यक्तीला विवेक आणि बुद्धि हीं मार्गदर्शक नसतात आणि म्हणूनच आपल्या प्रतिकार-पद्धतीची बौद्धिक चिकित्सा न करण्याची धोक्याची सूचना गांधीजींनीं दिली होती.' (कॉंग्रेसइतिहास, खंड १ ला, उत्तरार्ध पृ. ६१) १९४० सालीं पुढील लढा कसा द्यावयाचा याची चर्चा कॉंग्रेसच्या बैठकींत चालू होती. लढा तत्काळ सुरू करावा,

राष्ट्र त्याला सिद्ध आहे असें कित्येकांचें मत होतें. गांधीजींना या मतानें धक्काच बसला. त्यांच्या मतें राष्ट्र मुळींच सिद्ध नव्हतें. लढ्याची पूर्वतयारी झाली नव्हती. तेव्हां सत्याग्रह संग्राम सुरू करण्यांत अर्थ नव्हता. आतां लढ्याची पूर्वतयारी म्हणजे काय, असा प्रश्न येणारच. चरखा व खादी हें त्याला गांधीजींचें उत्तर होतें. तें उत्तर देऊन त्यांनीं असें स्पष्ट बजावलें कीं, 'तुमच्यापैकीं बहुतेकांचा चरख्यावर विश्वास नाहीं. तुम्हांला हा कार्यकारणसंबंध मान्य नाहीं; पण मी तुमचा सेनापति आहे आणि काँग्रेस ही लढाऊ संघटना आहे. तिच्यांत शिस्त अवश्य आहे; आणि खरी शिस्त कोणची? आपल्या बुद्धीला पटत नसलेल्या आज्ञासुद्धां उत्साहानें पार पाडणें ही खरी शिस्त होय. सेनापति निवडतांना तुम्ही बुद्धि वापरा; पण नंतर प्रत्येक आज्ञेची चिकित्सा करण्याचा अधिकार तुम्हांला नाहीं. तेवढ्यापुरती लोकशाही संपली असें समजा' (पट्टाभि, काँग्रेस-इतिहास, खंड २ रा पृ. १७७). सेनापति, लढाई हें उदाहरण घेतलें तर वरील आदेश सयुक्तिक दिसतो. कारण लोकशाहींतहि प्रत्येक सैनिकाला चिकित्सा करण्याचा अधिकार देतां येणार नाहीं; पण हें उदाहरण घेण्यांत मोठा हेत्वाभास आहे. सेनापतीनें प्रत्येक सैनिकाला कारणमीमांसा सांगत बसूं नये हें युक्त आहे; पण सेनापतीजवळ कारणमीमांसा तयार असलीच पाहिजे आणि वरिष्ठ अधिकाऱ्यांना तरी त्यानें ती पटवून दिली पाहिजे. महात्माजींच्या जवळ तर्कगम्य अशी मीमांसाच नव्हती आणि म्हणूनच जवाहिरलाल, राजाजी, वल्लभभाई यांनाहि तिचें आकलन होत नव्हतें. तरीसुद्धां आपल्याला सेनापति नेमावयाचें असेल तर लोकांनीं चिकित्सा न करतां आपल्या आज्ञा मानल्या पाहिजेत, असा त्यांचा आग्रह होता. याचा अर्थ असा कीं, गांधीजींची मीमांसा आध्यात्मिक होती, गूढ होती, अतीन्द्रिय होती. महात्माजींच्या सर्व कृतींवर, विचारांवर, मतांवर अध्यात्माचें असें गूढ व अगोचर वातावरण पसरलेलें असे. त्यांचा मुख्य आलंब म्हणजे आंतला आवाज. बार्डोलीचा लढा त्यांनीं स्थगित केला तो त्याच्याच आदेशानें. खादी व अहिंसा यांचा स्वातंत्र्याशीं संबंध ते प्रस्थापित करतात तो त्याच्याच आधारानें. अस्पृश्यतेमुळें भूकंप होतात यालाहि प्रमाण तोच. १९३९ सालीं ते राजकोटला गेले. त्या वेळीं महादेवभाईंना लिहिलेल्या पत्रांत ते म्हणतात, 'मी

कुठें जात आहे, कां जात आहे; याचा कांहींहि विचार केलेला नाहीं. ईश्वर मला नेत आहे. तेव्हां मीं विचार करणें हें ईश्वरी योजनेंत कदाचित् विघ्नहि ठरेल.' वर्णाश्रमधर्मावर महात्माजींची श्रद्धा होती; पण ते म्हणत कीं, 'शूद्रानें ब्राह्मणाचें कर्म करण्यास हरकत नाहीं, तरी त्यानें ब्राह्मण म्हणवून घेण्याचा आग्रह मात्र धरूं नये. या जन्मीं त्यानें पुण्य संपादन केलें कीं, त्याला पुढील जन्मीं ब्राह्मण-जातींतच जन्म मिळेल.' (यंग इंडिया. २३-४-२५) समाजरचनेंतल्या मूल समस्यांनाहि महात्माजी असें अतींद्रिय निष्ठेनें उत्तर देत. एखाद्या व्यक्तीला-मग ती कितीहि लहान किंवा मोठी असो-विशिष्ट हेतूनें राजकोटला घेऊन जाण्याइतका परमेश्वर जेव्हां सामाजिक प्रपंचांत हस्तक्षेप करतो आणि तुम्हीं बौद्धिक चिकित्सा केलीत तर माझ्या योजनेंत विघ्न येईल असें बजावतो, तेव्हां हा परमेश्वर लोकशाहीला ठार केल्यावांचून रहाणार नाहीं असें निश्चित समजावें.

## बुद्धिवादाची अवहेलना

गांधीवादांतील जगत्कल्याणकारी परमेश्वर, त्यांतील आत्मबल व अंतः-संवेदना यांच्या वर्चस्वामुळें म्हणजेच एकंदर अध्यात्मनिष्ठेमुळें समाजाची दोन प्रकारानें कशी हानि होते तें सांगितलें. एक म्हणजे समाजांत पराकाष्ठेची विषमता निर्माण होते व दुसरें म्हणजे त्यामुळें बुद्धिवाद, भौतिकज्ञान, तर्कनिष्ठा यांची अवहेलना होते. त्यांतील दुसऱ्या प्रकारच्या नुकसानीचें थोडें जास्त विवेचन करणें अवश्य आहे. महात्माजींचें एकंदर लेखन वाचतां असें स्पष्ट दिसून येतें कीं, त्यांना भौतिक विद्या, इतिहास, अर्थशास्त्र, नानाप्रकारचीं विज्ञानें, यांतील पांडित्याची, यांच्या खोल अभ्यासाची विशेष महती वाटत नाहीं. इतकेंच नव्हे तर त्यांच्या अंतरांत खोल कोठेंतरी या भौतिक पांडित्याविषयीं तिटकारा आहे. 'हिंदस्वराज्य' या आपल्या पुस्तकांत या ज्ञानाचा जेवढा अधिक्षेप करणें मनुष्याला शक्य आहे, तेवढा त्यांनीं केलेला आहे. ज्या इंग्रजी शिक्षणामुळें आपल्या देशांत वरील ज्ञानाचा प्रसार झाला, त्याच्याविषयीं त्यांनीं काय म्हटलें आहे पहा. 'इंग्रजी शिक्षणाच्या प्रसारामुळें आपला देश गुलाम झाला आहे. इंग्रजी शिकलेल्या लोकांनींच जनतेला फसविलें आहे. खेडीं अजून पाश्चात्य ज्ञानापासून मुक्त आहेत,

म्हणूनच खरी भारतीय संस्कृति तेथें दृष्टीस पडते. जे पाश्चात्य सुधारणांच्या आहारीं गेले, तेच फक्त गुलाम झाले असून त्यापासून मुक्त असलेला शेतकरी हा अजिंक्य आहे. त्याला कोणीं जिंकलेलें नाहीं व जिंकणें शक्य नाहीं. (म्हणजे काय तें कळणें शक्य नाहीं !) अर्वाचीन शिक्षणानें हितापेक्षां अहितच जास्त होतें.' हे व अशा तऱ्हेचे विचार प्रगट करून ते म्हणतात कीं, 'मीं जें प्राथमिक व उच्च शिक्षण घेतलें तें मुळींच घेतलें नसतें तरी माझें जिणें व्यर्थ झालें असतें असें मला वाटत नाहीं. या शिक्षणाच्या घातक वर्चस्वांतून मी सध्यां मुक्त झालों आहें. सत्याग्रही वीराला फक्त मनोजय लागतो. त्याला शिक्षण लागत नाहीं. मनोजय साधला, कीं त्या एकस्या सत्याग्रहीच्या नुसत्या दृष्टिपातानें शत्रु नष्ट होतो.' सामान्यतः विद्यासंपन्न सुशिक्षितांनीं नागर संस्कृति निर्माण केली असें आपण समजतों. पण महात्माजींच्या मतें मोठीं नगरें, शहरें हीं सर्वथा त्याज्य होत. चोर, डाकू, बदमाष, वेश्या हे वर्ग शहरांमुळें निर्माण होतात आणि म्हणूनच ते म्हणतात कीं, 'तुम्ही एक सहा महिने खेड्यांत जाऊन रहा कीं तुम्ही खरे देशभक्त व्हाल.' महात्माजींच्या मतें रेल्वे येण्यापूर्वीं भरतखंड हें एक राष्ट्र होतें. रेल्वे आल्यामुळें सर्व नाश झालेला आहे. रेल्वेमुळें दळणवळण वाढलें व त्यामुळेंच प्लेगासारखे रोग पसरले; दुष्काळ वाढले व तीर्थक्षेत्रें बिघडून गेलीं. परमेश्वरानें मनुष्याच्या हातापायांत बेताची शक्ति ठेवली होती. त्याचा हेतु असा कीं, माणसानें फार प्रवास करूं नये. आसपासच्या टापूंत फार तर जावें; पण माणसानें आपल्या दुष्ट बुद्धीनें या दैवी मर्यादांचें उल्लंघन करण्याच्या युक्त्या शोधून काढल्या (म्हणजे शास्त्रीय शोध लावले) आणि आपल्या बुद्धीचा दुरुपयोग केला.' हे सर्व विचार गांधीजींनीं १९०८ सालीं लिहिलेल्या 'हिंदस्वराज्य' या पुस्तकांत सांगितले आहेत. पुढील काळीं त्यांनीं मत बदललें असें नाहीं. १९३८ सालीं वरील पुस्तकाविषयीं लिहितांना, यांतील एक अक्षरहि फिरविण्यास मी तयार नाहीं, असें त्यांनीं जाहीर केलें आहे.

बुद्धि व भौतिकज्ञान यांची ही अवगणना अगदीं अक्षम्य असून परिणामी घातक ठरल्यावांचून रहाणार नाहीं. निसर्गघटनांचा कार्यकारणभाव

ज्या मनुष्याला कळत नाहीं, तो मनानें कधींहि स्वतंत्र होऊं शकणार नाहीं. त्याचें मन कायम गुलामच रहाणार. भूकंप, ज्वालामुखी, ग्रहणें, धूमकेतु, वादळें, अतिवृष्टि, अनावृष्टि, भरती, ओहोटी, चंद्रसूर्याची खळीं यांमुळें अज्ञानी माणूस भिऊन जातो व या घटनांची खरीखोटी कारणमीमांसा जो कोणी सांगेल त्याचा तो दास होऊन बसतो. मग तो गुरु सांगेल तीं व्रतें तो आचरतो, त्याच्या कोणच्याहि वचनावर श्रद्धा ठेवतो आणि आपला विवेक व बुद्धि सर्वस्वीं त्याला विकून टाकतो. या निसर्गशक्तींच्या अज्ञानांतून ज्यानें मानवाला सोडविलें तें भौतिक ज्ञान हाच लोकशाहीचा खरा आधार होय. अत्यंत खेदाची गोष्ट ही कीं, गांधीवादानें ज्ञानाची ही महती जाणलेली नाहीं. २६-१-४७ च्या हरिजनमधील आपल्या एका लेखांत इंग्लंडमधील औद्योगिक क्रांतीविषयीं डॉ. जे. सी. कुमाराप्पा यांनीं विवेचन केलें आहे. त्यांच्या मतें इंग्लंडचें खरें वैभव या क्रांतीपूर्वीच्या काळीं दृष्टीस पडतें. क्रांती-नंतरची जी व्हिक्टोरिया राणीची कारकीर्द ती म्हणजे ब्रिटनचें तमोयुग होय. क्रांतीपूर्वीच्या वैभवाचीं प्रमाणें म्हणून, त्यांनीं शेक्सपीयर, मिल्टन, जोशा रेना-ल्डस्, खिस्तोफर रेन, लॅटिमर यांचीं उदाहरणें दिलीं आहेत. आश्चर्याची गोष्ट अशी कीं, यांत बेकन आणि न्यूटन यांचीं नांवें नाहींत. ते भौतिक शास्त्राचे आद्यगुरु असून त्यांना अर्वाचीन युरोपचे जनक समजतात. पण कुमाराप्पांच्या मतें इंग्लंडच्या वैभवांत त्यांना स्थान नाहीं! आणि हा अनुल्लेख सहजासहजीं झालेला नाहीं. व्हिक्टोरियाच्या कारकीर्दींत फॅरडे, डार्विन, सिम्सन, लीस्टर, केल्व्हिन, हक्सले, रूदर फोर्ड हे जगविख्यात शास्त्रज्ञ होऊन गेले. मिल्, स्पेन्सर, सिडने वेब् यांसारखे पंडित होऊन गेले. तरी तो काळ कुमाराप्पांच्या मतें तमोयुगाचा आहे! कुमाराप्पा हे आज गांधीवादाचे एक प्रधान पुरस्कर्ते आहेत.

शास्त्रीय ज्ञानाच्या अभावीं मानवी मन गुलामगिरींतून मुक्त होणें कठिण आहे आणि त्या मुक्ततेवांचून त्याला व्यक्तित्वाची रग प्राप्त होणें अशक्य आहे. हा माणूस नेहमीं नेभळा, भावडा, अडाणी, भोळसट असाच रहाणार. त्याला लोकायत्त शासन पेलण्याचें सामर्थ्य कधींहि येणार नाहीं. गांधीवादा-मध्यें सत्य व नीति यांना फार महत्त्व आहे. पण आपण हें विसरतों कीं,

सत्य व नीति यांनाहि भौतिक ज्ञानाचा आधार अवश्य आहे. खोटें बोलूं नये, चोरी करूं नये, मातापित्यांचें ऐकावें ही वैयक्तिक व कौटुंबिक नीति फारतर भौतिक ज्ञानाच्या अभावीं टिकूं शकेल; पण सामाजिक व राष्ट्रीय नीतिमत्ता जिला म्हणतात ती शास्त्रीय भौतिक ज्ञानाच्या अभावीं क्षणभरहि टिकणार नाहीं. अशिक्षित, अडाणी मनाला राष्ट्राच्या विशाल स्वरूपाचें आकलनच होत नाहीं. त्याला आई दिसूं शकते म्हणून तिच्याविषयींचें कर्तव्य त्याला आकळतां येतें; पण अखिल भरतखंड त्याला दिसतच नाहीं. त्याला इतिहास, भूगोल, अर्थशास्त्र, रसायन, पदार्थविज्ञान यांचा नेत्रच प्राप्त व्हावा लागतो. विद्येच्या पुनरुज्जीवनानंतर पश्चिमेच्या युरोपीय राष्ट्रांना तो प्राप्त झाला. म्हणूनच हळूंहळूं त्यांच्यांत राष्ट्रनिष्ठा व लोकशाही यांचा उदय झाला. हिंदुस्थानांत अखिल समाजाला एकत्र बांधून कार्यप्रवण करणारी अशी एकहि निष्ठा उदय पावली नाहीं. इंग्रज व मराठे यांच्या लढाईत इंग्रज हा इंग्रजाविरुद्ध लढणार नाहीं हें ठरलेलें होतें. पण हिंदुस्थानांत तसें कांहींच ठरलेलें नव्हतें. हिंदु—हिंदु एक नव्हता, मुसलमान—मुसलमान नव्हता, मराठा—मराठा नव्हता. स्वामिनिष्ठाहि या समाजाला, किंवा येथल्या कोणच्याहि अल्पसमूहाला दीर्घकाल बांधूं शकली नाहीं. याचें कारण हेंच कीं, यांची मानसिक शृंखला तुटलेली नव्हती व यांना विशाल प्रपंच पाहण्याची दृष्टि आलेली नव्हती. तेव्हां सत्य व नीति यांनाहि ज्ञानाचा आधार अवश्य आहे. पण गांधीवादाला ज्ञानाचें हें सामर्थ्य मान्य नाहीं. उत्तर आयुष्यांतल्या कांहीं लेखनांत गांधींजींनी शिक्षणाचा प्रसार होणें अवश्य आहे, मी उच्च ज्ञानाच्या विरुद्ध नाहीं असें प्रतिपादन केलें आहे. पण ज्या ज्ञानाच्या उपासनेसाठीं माणसानें शक्तिसर्वस्व वेचणें अवश्य आहे त्याविषयीं बोलतांना 'मी त्याच्याविरुद्ध नाहीं.' एवढाच पुरस्कार कोणी करूं लागला तर त्याचा अर्थ सहज कळण्याजोगा आहे.

इतकेंहि करून अंतःसंवेदना ही शक्ति तशीच प्रभावी असती तर तिला मान्यता देऊन बुद्धिवादाला गप्प बसावें लागलें असतें; पण तसें कांहींच नाहीं. ही अंतःसंवेदना महात्माजींना पुष्कळ वेळां असत्य ज्ञानच देत असे व म्हणून त्यांना पश्चाताप करण्याची पाळी येत असे. लोकांना अहिंसा-

धर्म पूर्णपणें कळण्यापूर्वीच आपण त्यांना कायदेभंगाची प्रेरणा दिली हा हिमालयाएवढा प्रमाद झाला, असें १९१९ सालीं त्यांनीच म्हटलें. बार्डोलीचा संग्राम स्थगित करावा असें त्यांना अंत:संवेदनेनें सांगितलें; पण हा इषारा या अद्भुत शक्तीनें दोन महिने आधीं दिला असता, तर राष्ट्राचा तेजोभंग टळला असता. १९४० सालानंतर गांधीजींनीं जाहीर केलें कीं, स्वातंत्र्य मिळाल्यावांचून हिंदुमुसलमानांचें ऐक्य होणें अशक्य आहे. त्यापूर्वी ४० वर्षें हिंदु-मुस्लीम ऐक्यावांचून स्वातंत्र्य नाहीं असें ते आमहानें सांगत. १९४० नंतरचें सत्यज्ञान त्यांना अंत:संवेदनेनें ४० वर्षें आधीं दिलें असतें तर केवढे अनर्थ टळले असते! त्या दृष्टीनें प्रारंभापासून सावधता ठेवली असती तर कदाचित् पाकिस्तानहि टळलें असतें. पण अंतः-संवेदनेनें तें ज्ञान दिलें नाहीं. १९४७ सालच्या अखेरीस साखरेवरचीं नियंत्रणें सरकारनें उठविलीं. त्या वेळीं बुद्धि, विवेक, माहिती, अनुभव या साधनांनीं विचार करणाऱ्या सर्व पंडितांनीं उलट निर्णय दिला होता; पण गांधीजींच्या संवेदनेनें निराळा कौल दिला आणि नियंत्रणें उठवितांच अगदीं थोड्या अवधींत व्यापाऱ्यांनीं जनतेच्या खिशांतले २४ कोटी रु. गिळंकृत केले. म्हणून महात्माजींना स्वतःला तसें वाटत असलें तरी त्यांना बुद्धिपेक्षां जास्त प्रभावी अशी कसलीहि शक्ति वश नव्हती हें आपण ध्यानांत घेतलें पाहिजे आणि या अंतःसंवेदनेपासून सावध राहिलें पाहिजे. बुद्धि ही शक्ति सर्वंकष व सर्वज्ञ आहे असें मुळींच नाहीं; पण मानवाला वश अशी एवढीच शक्ति आहे. तेव्हां तिचीच जास्तींत जास्त जोपासना करणें अवश्य आहे; आणि म्हणूनच भौतिकवादाची व बुद्धिनिष्ठेची आपण केव्हांहि अव-गणना करतां कामा नये. गांधीवादांतील ही प्रवृत्ति आपण वाढूं दिली तर आपली लोकशाही अल्पावधींतच कोसळून पडेल.

## कार्यक्षमतेची उपेक्षा

गूढ अतींद्रिय अशा अध्यात्माचें प्रभुत्व समाजावर बसूं लागलें म्हणजे त्यांत विषमता निर्माण होते आणि भौतिक ज्ञानाची अवहेलना करण्याची प्रवृत्ति निर्माण होते हें येथवर सांगितलें. अध्यात्मामुळें निर्माण होणाऱ्या आणखी एका घातकी प्रवृत्तीचा विचार करून हें विवेचन संपवूं. या

अध्यात्मामुळें बुद्धीची जशी अवहेलना होते त्याचप्रमाणें सुघटित, रेखीव, योजनाबद्ध, शास्त्रनिष्ठ जीवनाची व तज्जन्य कार्यक्षमतेचीहि उपेक्षा होऊं लागते. इंग्रजपूर्व काळांत हें पाप आपण केलेंच होतें. मध्यंतरी कार्यक्षमतेचें, शास्त्रनिष्ठेचें महत्त्व आपण कांहींसें जाणूं लागलों होतों; पण गांधीवादाचें वर्चस्व झाल्यापासून पुन्हां या महनीय गुणांची अनास्था होऊं लागली आहे असें वाटतें. गांधीवादाचा सर्व भर मनाची शुद्धता, सद्भावना, हेतूंची पवित्रता, उच्च संकल्प यांवर असतो. योजना, कुशाग्रता, सावधता, चतुरस्रता या गुणांची तेथें महती नाहीं. शत्रूला जिंकावयाचें तें आत्मबलानें ! अर्थात् तेथें योजनेची व कुशाग्रतेची जरूरच काय ! वर सांगितलेल्या श्रद्धांच्या जोडीला गांधीजींची आणखी एक श्रद्धा होती. 'अत्यंत शुद्ध सद्हेतु असून जर एखाद्याच्या हातून चुका घडल्या तर त्यामुळें वस्तुतः जगाला, इतकेंच नव्हे तर कोणत्याहि व्यक्तीला इजा पोचत नाहीं, अशी माझी श्रद्धा आहे. ईश्वराला भिऊन वागणाऱ्या माणसाकडून अहेतुकपणें झालेल्या चुकांच्या परिणामापासून ईश्वर जगाचें नेहमीं रक्षण करतो. माझ्या चुकांमुळें जगाला कधींहि पीडा सहन करावी लागलेली नाहीं. कारण त्या चुका माझ्या हातून अज्ञानानें घडल्या होत्या' असें प्रतिपादन गांधीजींनीं 'सत्याचा सिद्धांत' या लेखांत केलेलें आहे. ( गांधीजींचें मानस पृ. २६ ) गांधीजींची ही श्रद्धा अनुभव, इतिहास यांशीं अगदीं विसंगत आणि म्हणूनच अगदीं भोळी आहे. पूर्ण अध्यात्मवादी अशा एका तत्त्ववेत्त्यानें सुद्धां 'अग्नि थंड आहे अशा अर्थाचीं शंभर श्रुतिवचनें सांपडलीं तरी तें सत्य मानतां येणार नाहीं.' असें स्वच्छ बजाविलें आहे. ती श्रद्धा बाळगण्याचें धाडस त्यालाहि झालें नाहीं. पण गांधीजींनीं तें केलें आहे. मानवाच्या हातून प्रमाद घडला कीं, परिस्थिति किंवा निसर्ग कसलीहि क्षमा करीत नाहींत असा नित्याचा अनुभव आहे. अत्यंत कठोर व क्रूर अशी शिक्षा ते करतात. यातना भोगायला लावतात. पण यातनांचा हा अग्नि परमेश्वर कृपेनें थंड होतो अशी गांधीजींची श्रद्धा आहे. या अध्यात्मवृत्तीमुळेंच योजना, आंखणी यांचा पूर्ण अभाव हें गांधीजींच्या सर्व संग्रामांचें मुख्य लक्षण होऊन बसलें होतें आणि त्यांचे पट्टाभीसारखे अनुयायी त्यांतच भूषण मानीत असत. तीस सालचा लढा, राजकोट प्रकरण यांचा उल्लेख मागें केलाच आहे.

आपल्या चळवळीची योजना काय, तिचें भवितव्य काय याची गांधीजींनाच स्वच्छ कल्पना नव्हती, मग अनुयायांना कोठून असणार ? गांधीजींचे चरित्रकार शिखरे म्हणतात कीं, 'बार्डोलिच्या प्रकरणानंतर हा नवळ जवळ नियमच झाला.' 'चळवळीची तपशीलवार योजना मजजवळ नाहीं' 'सारा अंधार आहे' 'प्रकाशाची वाट पहात आहे' असे उद्‌गार पुढील चळवळींच्या वेळीं निघूं लागले. ४२ चें आंदोलन ही या दृष्टीनें पाहतां एक दुःखद कहाणीच म्हटली पाहिजे. एवढ्या मोठ्या या संग्रामाची कसलीहि पूर्वयोजना नव्हती. १४ जुलै १९४२ चा ठराव व त्यावर मोर्तब करणारा ८ ऑगस्टचा ठराव यांत 'व्यापक प्रमाणावर देशभर सामुदायिक संग्राम करावा, महात्माजींच्या आज्ञा पाळाव्या' एवढाच संदेश आहे. संग्रामाच्या स्वरूपाची, योजनेची, भवितव्याची कांहीं एक कल्पना त्यांत नाहीं. ८ ऑगस्टनंतर गांधीजी सरकारशीं बोलणीं करणार होते व तीं अयशस्वी झाल्यानंतर संग्राम पुकारणार होते, हें जरी खरें असलें तरी, सरकार आपणावर एकदम झडप घालणार आहे, हें गांधीजींना व सर्वांनाच आधीं माहीत होतें. (पट्टाभि, कॉंग्रेस इतिहास, २ रा खंड. पृ. ३६५) आणि याची तरी काय गरज होती. एवढ्या मोठ्या अखिल भारतीय संग्रामाची योजना व पूर्वतयारी ही काय आठचार दिवसांत होणार होती काय ? तिला वर्ष दोन वर्षें सहज लागलीं असतीं. आतां अशी दीर्घकालीन तयारी गांधीजी करीत होते. नाहीं असें नाहीं. पण ती पूर्वतयारी आध्यात्मिक होती. गूढ व अतींद्रिय होती. तिचा व संग्रामांतील यशापयशाचा संबंध काय हें कोणालाहि कळणें शक्य नव्हतें. १९३९ सालापासूनच 'लढा सुरू करावा' असें अनेकांचे म्हणणें होतें. सुभाषचंद्रांचा तर तो आग्रहच होता. गांधीजींचें उत्तर एक. राष्ट्र तयार नाहीं. त्याची पूर्वतयारी केली पाहिजे. ती कोणती ? तर चरखा, खादी, विधायक कार्यक्रम ! प्रत्येक कॉंग्रेसहौस हें चरखाकेंद्र झालें पाहिजे. प्रत्येक भावी सत्याग्रहीनें रोज सूत कांतलें पाहिजे, रोज हरिजन वस्तींत गेलें पाहिजे, प्रेमभाव वाढविला पाहिजे वगैरे. संग्राम होणार होता तो कायदेभंगाचा, करबंदीचा. पण त्याच्या योजना, त्याची प्रांतवार आंखणी, त्या काळांतील शेतकऱ्यांच्या उपजीविकेची व्यवस्था, या संबंधीं एक अक्षरहि रामगडच्या त्यांच्या भाषणांत नाहीं. म्हणजे ही तयारी

आध्यात्मिक होती. बरें, दोनतीन वर्षें ही जी आध्यात्मिक तयारी केली, तिचें फल काय ? तर चळवळीच्या दुसऱ्याच दिवशीं तिचीं सूत्रें सोशॅलिस्टांनीं हातीं घेतलीं. दोन वर्षांच्या तयारीनंतर महात्माजींच्या तत्त्वान्वयें एकहि दिवस लढा चालला नाहीं. कसलीहि योजना न आखल्यामुळें विध्वंसक चळवळीला महात्माजींची संमति आहे, असें मश्रूवाला, काका कालेलकर यांना सुद्धां वाटलें. म्हणजे अगदीं निकटवर्तीयांना सुद्धां गांधीजींची योजना माहीत नव्हती, त्यांचें मानस कळलें नव्हतें. पण योजना आंखणें व स्वतः विचार करणें हें ईश्वरी नियमनाच्या विरुद्ध आहे असेंच तत्त्व जेथें अंगीकारलेलें आहे तेथें दुसरें काय होणार ? आणि अज्ञानामुळें हातून कितीहि चुका झाल्या तरी त्याचें शासन भोगावें लागत नाहीं, त्यामुळें कोणाचेंच अहित होत नाहीं, ही त्याच्या भरीला श्रद्धा ! आपल्या देशांतील अनेक संस्थांचा कारभार सध्यां या श्रद्धांच्या प्रेरणेनेंच चालला आहे असें वाटतें.

भारतांत गेल्या तीस वर्षांत महात्माजींनीं जे स्वातंत्र्य-संग्राम केले, ते त्यांच्या मनांतून जरी सत्याग्रह-संग्राम करावयाचे होते, तरी ते निःशस्त्र प्रतिकार झाले हें मागें सांगितलेंच आहे. असें असलें तरी कॉंग्रेसचे नेते सत्याग्रहाचेंच तत्त्व मनांत धरून बसल्यामुळें त्यांतील आत्मबलाच्या व आध्यात्मिकतेच्या मायामोहांतून ते सुटले नाहींत. आणि त्यामुळेंच त्यांना योजनापूर्व तयारी, कार्यक्षमता, सावधता या गुणांची महती वाटली नाहीं. तशी वाटली असती तर १९३७ सालीं हातीं सत्ता येतांच, ही सत्ता लवकरच केव्हांतरी सोडावी लागणार आहे, पुन्हां स्वातंत्र्याचा लढा लढावा लागणार आहे, हें जाणून त्या लढ्यासाठीं दर खेड्यांतून संघटना उभारण्याची, त्यांनीं, दारूबंदीचे प्रयत्न करण्याच्या आधीं, व्यवस्था केली असती. हा लढा शांततेनें, अहिंसेनें, अत्याचार न करतांच करावयाचा होता हें जरी खरें तरी, १९२८ सालीं वल्लभभाईंनीं बार्डोलीस जशी तयारी केली होती तशी, या महासंग्रामाची योजना व तयारी करणें फार अवश्य होतें. प्रत्येक खेड्यांतून सत्याग्रहींचें किंवा निःशस्त्र प्रतिकारकांचें दल उभारून त्यांची संघटना करून अखिल भारतीय सत्याग्रह दल तयार करणें यावर कॉंग्रेसनें सर्वस्व खर्च करणें अवश्य होतें. त्यामुळें ४२ चा

लढा पहिल्याच दिवशीं काँग्रेसच्या हातून गेला नसता व हा खरा महात्माजींचा लढा नव्हे असें सांगून आपल्याच लोकांना दुखविण्याची पाळी आली नसती. बार्डोलीचा लढा महात्माजींनीं अंतःसंवेदनेच्या प्रेरणे-मुळें स्थगित केला. त्यामुळें काँग्रेसचा लढाऊ कार्यक्रम संपला. आणि म्हणून पंडित मोतीलाल, चित्तरंजन दास हे लढाऊ वीरहि फुटून निघाले. ४२ च्या लढ्याच्या आध्यात्मिक पूर्व तयारीमुळें सोशॅलिस्टांना फुटावें लागलें. या लढ्यासाठीं अखिल भारतीय संघटना उभारली असती तर वरील आपत्ति तर टळली असतीच;पण शिवाय त्या लढ्याच्या योजनेनें लोकांना कार्यक्षमता, कुशाग्रता, इ. गुणांचें बाळकडू मिळालें असतें. पण ज्ञान, बुद्धि यांची जशी गांधीवादाला आस्था वाटत नाहीं त्याचप्रमाणें योजना, संघटना, आखणी यांची वाटत नाहीं. नानासाहेब हर्डीकरांनीं उभारलेल्या काँग्रेससेवादलाची काँग्रेस-नेत्यांनीं कशी उपेक्षा केली व असली संघटना गांधीवादांत बसत नाहीं, हा घातक विचार ते कसे धरून बसले हें पाहिलें, म्हणजे गांधी-वादांतील अध्यात्मनिष्ठेनें भारतीय लोकसत्तेची किती हानि झाली आहे याची सम्यक् कल्पना येईल.

## कल्याणकारक विसंगति

गांधीवादांतील अध्यात्मनिष्ठा, नित्यहस्तक्षेप करणारा परमेश्वर, आत्मबल, अंतःसंवेदना आणि सद्भावनेनें केलेल्या प्रमादामुळें अहित होत नाहीं ही श्रद्धा ही लोकशाहीला सर्वस्वीं मूले कुठारः सारखी कशी होते त्याचा विचार येथवर केला; पण आरंभीं म्हटल्याप्रमाणें तेवढ्यावरून महात्माजींच्या कार्यासंबंधीं एकदम निर्णय करणें हा मोठाच प्रमाद होईल. कारण या त्यांच्या विविध श्रद्धांशीं अगदीं विसंगत असेहि अनेक सिद्धान्त त्यांनीं सांगितले आहेत व त्याप्रमाणें आचरणहि केलें आहे. मार्क्सविषयीं विवेचन करतांना एका लेखकानें म्हटलें आहे कीं, त्याच्या प्रतिपादनांत विसंगति होती म्हणूनच जगाचें हित झालें आहे. मला हें खरें वाटतें. मार्क्स ही आजच्या जगांतली एक अत्यंत उपकारक, अमोघ व दिव्य अशी शक्ति आहे; पण आर्थिक नियतीच्या मूळ सिद्धान्ताशीं मार्क्स एकनिष्ठ राहिला असता तर ही शक्ति वांया गेली असती. महात्माजींच्याबद्दल असेंच

म्हणावेंसें वाटतें. अध्यात्मनिष्ठेंतले त्यांचे जे सिद्धान्त होते त्यांतून निघणारीं क्रमप्राप्त व अटळ अशीं जीं निगमनें तींहि त्यांनीं पावलोंपावलीं स्वीकारलीं असतीं, त्यांचाहि प्रत्येक वेळीं अवलंब केला असता व आग्रह धरला असता तर गांधी ही महाशक्ति अगदींच वांया गेली असती; पण त्या क्रमप्राप्त निगमनांना महात्माजींनीं थारा दिला नाहीं, असेंहि कधीं कधीं घडलेलें आहे; आणि त्या निगमनांशीं अत्यंत विसंगत व म्हणूनच लोकशाहीला उपकारक असे अनेक सिद्धान्तहि त्यांनीं सांगितले आहेत. अनेक श्रद्धा मनाशीं बाळगल्या आहेत व अनेक कृतीहि केल्या आहेत; त्यामुळें परिणामतः ही महाशक्ति लोकशाहीला उपकारकच झालेली आहे. सनातन धर्मावरील दृढश्रद्धेमुळें टिळकांच्या मनांत अनेक श्रद्धा अशा होत्या कीं, त्यांचा अलगपणें विचार केला तर त्या निश्चितपणें प्रतिगामी वाटाव्या; पण तेवढ्यामुळें त्यांच्या कार्याचा मूलोघ आपण जाणून न घेतां त्याचा अधिक्षेप केला तर त्यांत आपलाच घात आहे हें मागें सांगितलें आहे. महात्माजींच्या कार्याचें मूल्यमापन करतांना हीच दृष्टि ठेवणें अवश्य आहे. महात्माजींच्या बाबतींत हें काम जास्त दुष्कर आहे हें खरें; पण तें केलें नाहीं तर एक महाशक्ति येथें संचरून गेली पण आपण करंटेपणानें तिला आंचवलों असें होईल.

अंतःसंवेदना ही शक्ति आपल्या ठायीं आहे, असें ज्यांना वाटतें ते तिच्या जोरावर समाजावर अनियंत्रित अधिकार गाजवूं पहातात. मागल्या धर्मपीठांनीं हेंच केलें आहे आणि अंतःसंवेदना ही परमेश्वरी प्रेरणा मानली तर तें सयुक्तिकच आहे. बुद्धि, तर्क यापलीकडे ज्यांची धांव जात नाहीं त्यांनीं सर्वज्ञ अशा परमेश्वरीवाणीपुढें नमलेंच पाहिजे, हें बुद्धीला पटण्याजोगें आहे. शब्दप्रामाण्य किंवा वेदप्रामाण्य तें हेंच आणि तेंच लोकशाहीच्या नाशाला कारण होतें. कारण ही ईश्वरी प्रेरणा लाखांतून एखाद्यालाच वश असते. बुद्धि, तर्क ही शक्ति अल्प खरी; पण अल्पप्रमाणांत का होईना ती प्रत्येक मानवाला प्राप्त होऊं शकते आणि म्हणूनच ती समतेला पोषक होते. अंतःसंवेदना ही अलौकिक महापुरुषानांच प्राप्त होते, सामान्यांना ती कालत्रयीं प्रसन्न होणार नाहीं. महात्माजींना हें मत मान्य आहे. अंतर्ज्ञान ज्यांना

होतें ते पुरुष प्रमादरहित असतात, या अत्यंत घातक मतावरहि त्यांची श्रद्धा होती. ( यंग इंडिया ११–१०–२८ ) आणि इतकें असूनहि प्रत्येक व्यक्तीच्या व्यक्तित्वाला सारखाच मान द्यावा असा त्यांचा आग्रह होता. इतकेंच नव्हे तर सामान्य जनांच्या व्यक्तित्वावर, बुद्धिस्वातंत्र्यावर, वैयक्तिक आकांक्षाच्या न्याय्यतेवर बुद्धिवादाचा जसा पराकाष्ठेचा दृढ विश्वास असतो, तसाच त्यांचा होता. कधीं कधीं तर अराजक-वाद्याप्रमाणें दुसऱ्या ध्रुवाला जाऊनहि या बाबतींत तें प्रतिपादन करीत. ‘शासनसंस्था कितीहि शुद्ध असली तरी ती लोकांच्या व्यक्तित्वावर आक्रमण करतेच. त्यामुळें तिच्या सत्तेची वाढ होणें धोक्याचें आहे. कारण व्यक्तित्व हेंच सर्व प्रगतीचें मूल कारण आहे’ असें त्यांनीं म्हटलें आहे. विकेन्द्रीकरणाठीं ते अट्टाहास करीत, त्याचें एक प्रबल कारण हेंच होतें. दिल्लीहून अखिल भारताचा जो राज्यकारभार चालतो, त्यांत सामान्य जनांना कांहींच गम्य नसतें. हल्लींचे गुंतागुंतीचें आर्थिक, सामाजिक व आंतरराष्ट्रीय व्यवहार सामान्य जनांच्या आटोक्यापलीकडचे आहेत; त्यामुळें त्यावर नियंत्रण ठेवणें त्यांना मुळींच शक्य नाहीं. म्हणून ते व्यवहार ज्यांत अवश्य होतात ती समाजाची घडीच बदलावी आणि या सर्व व्यवहाराचें व सत्तेचेंहि विकेन्द्रीकरण करून सामाजिक प्रपंचाचा सर्व व्यवहार सामान्य जनांच्या आकलनांत आणून ठेवील अशीच समाजव्यवस्था रचावी असें त्यांचें मत होतें. ( सर्व समाज-प्रपंच सामान्य जनांच्या आकलनांत आणून ठेवण्याचा आग्रह धरणाऱ्या पुरुषानें त्या सामान्य जनांना सर्वस्वी अनाकलनीय व दुष्प्राप्य अशा अंतर्ज्ञानाची मात्र तरफदारी करावी हें किती विपरीत व विसंगत आहे ! पण तें आहे. ) आतां तें कितपत व्यवहार्य होतें व त्या समाजरचनेमुळें अंतीं राष्ट्राचें काय झालें असतें हे प्रश्न निराळे. वरील मत उद्धृत करण्याचा हेतु एवढाच कीं सामान्य जन, त्यांचे हक्क व त्यांचें व्यक्तित्व यावरची महात्माजींची श्रद्धा अगदीं अढळ होती हें दाखवावें. ही श्रद्धा लोकशाहीला अत्यंत पोषक आहे. लोकशाहीचा तो मुळारंभच होय.

अंतःसंवेदनेवरील श्रद्धा व एकंदर अध्यात्मनिष्ठा ही कोणत्याहि स्वरूपांत समाजाला हानिकारक होणारच; पण महात्माजींची ती श्रद्धा जुन्या काळच्या धर्मगुरूंच्या श्रद्धेइतकी हानिकारक झाली नाहीं. याचें कारण हें कीं, या

विषाचे अनेक उतारेहि त्यांच्याच तत्त्वज्ञानांत त्यांनीं निर्माण करून ठेवले आहेत. स्वतःला अंतर्ज्ञानाचे अधिकारी असें जे म्हणवितात, त्यांचं व्यक्ति व समाज यांच्या संबंधाविषयींचें मत दंडसत्तेच्या पुरस्कर्त्यांप्रमाणेंच असतें. समाज, राष्ट्र हा एक स्वतंत्र पुरुष आहे. त्याचें हिताहित स्वतंत्र आहे. केवळ सर्व व्यक्तींच्या हितांची बेरीज म्हणजे समाजपुरुषाचें हित, असें नाहीं. आणि म्हणूनच व्यक्ति ही समाजासाठीं आहे, व्यक्तिजीवन हें स्वतंत्र अंतिम होऊं शकत नाहीं, समाज पुरुषाचा एक अवयव हेंच व्यक्तीचें स्थान, अशी त्यांची विचारप्रणाली असते. या विचारसरणीनें लोकशाहीचा पायाच उखडला जातो. कारण व्यक्तीचें स्वतंत्र अस्तित्व ती मान्य करीत नाहीं. महात्माजी अंतःसंवेदनावादी आहेत, जन्मनिष्ठ वर्णव्यवस्था, व केव्हांकेव्हां जातिव्यवस्थाहि ते मान्य करतात, परमार्थातील गुरूची महती त्यांना मंजूर आहे, आणि तरीसुद्धां व्यक्ति व समाज यांच्या संबंधाविषयींचें वरील मत त्यांना मुळींच मान्य नाहीं. समाजाचा मूल पाया म्हणजे व्यक्ति हाच होय. व्यक्ति ही कोणाची घटक किंवा अवयव नसून स्वतः पूर्ण आहे, अंतिम आहे, तिचा गुणविकास, तिचें हित हेंच समाजरचनेचें ध्येय आहे, लोकांचें स्वराज्य म्हणजे व्यक्तींच्या स्वराज्याचा समवाय होय, अशा तऱ्हेचीं क्रांतिकारी, व्यक्तिवादाला पोषक अशींच तत्त्वें त्यांनीं पुरस्कारिलीं आहेत. याचा अर्थ असा होतो कीं, गांधीजी हे हाडाचे क्रांतिकारक व व्यक्तिवादी होते; पण सनातन धर्माचे अत्यंत प्रबल संस्कार त्यांच्या मनावर झाले असल्यामुळें त्या क्रांतिवृत्तीवर व व्यक्तिवादावरील निष्ठेवर केव्हांकेव्हां आध्यात्मिकतेचें, परंपराप्रेमाचें व त्यामुळेंच स्थितिवादित्वाचें घन पटल येऊन बसे. आणि त्या अध्यात्मनिष्ठेच्या व परंपरेच्या आहारीं गेल्यावर ते जीं मतें व्यक्त करीत, तीं इतकीं चमत्कारिक व विपरीत असत कीं, त्यांच्या आधारें प्रतिपक्षीयांनीं त्यांच्यावर वाटेल ते आरोप करावे. मिश्रविवाह व मिश्रभोजन यांची बंदी आत्म्याच्या विकासाला अवश्य आहे, असेंच गांधीजींनीं म्हटल्यावर ( यंग इंडिया ६–१०–२१ ) लोकांनीं तरी काय करावें ! एका थोर गांधीवादी पंडिताशीं चर्चा करीत असतांना त्यांनीं मला असें सांगितलें कीं, 'महात्माजींवर तुम्ही वाटेल ते आरोप करा. आणि ते सिद्ध करण्यासाठीं जीं वचनें

अवश्य तीं तुम्हांला सांपडत नसतील तर मी त्यांच्या लिखाणांतून काढून देईन; पण असें असूनहि मी तुम्हांला सांगतों कीं, ' गांधीजीवनाचा तुम्हीं सांगोपांग अभ्यास केलात तर गांधीजींच्यावर एकहि अश्लाघ्य आरोप तुम्हांला करतां येणार नाहीं. ' या म्हणण्यांत पुष्कळच तथ्यांश आहे. टिळकांच्यावर येणाऱ्या प्रतिगामित्वाच्या आरोपांचा विचार करतांना मीं याचें थोडेसें विवेचन केलें आहे. कोट्यवधि सामान्य जनांना जो जागृत करतो, त्यांच्या ठायीं प्रतिकारशक्ति निर्माण करतो, त्यांच्या अहंकारास चेतना देऊन वाटेल त्या सुलतानी सत्तेशीं मी लढूं शकेन, हा आत्मविश्वास त्यांच्या ठायीं जो निर्माण करतो, त्याच्याएवढा मानव जातीचा व लोकशाहीचा मोठा उपकारकर्ता दुसरा कोणी नाहीं. कारण भांडवलशाही, वर्णव्यवस्था, धर्मगुरूंचें प्रभुत्व, असल्या विषम व्यवस्थेचा व तिच्यामुळें होणाऱ्या अन्यायाचा, जुलमाचा निःपात करण्याचें अत्यंत प्रभावी साधनच त्यानें जनतेच्या हातीं देऊन ठेवलेलें असतें. आतां हें करूनहि त्या जुलमी संस्थांचा त्यानें पुरस्कार केला तर परंपरेच्या अभिमानामुळें, कांहीं जुन्या निष्ठांच्या वर्चस्वामुळें किंवा चुकीच्या विचारसरणीमुळें ही विसंगति निर्माण झाली आहे, असें समजून आपण त्याच्या कार्याचें मूल्यमापन करणें अवश्य आहे. तसें न केलें तर त्यांत समाजाची अतिशय हानि आहे. कारण टिळक, गांधी असल्या महाशक्ति निर्माण होऊनहि समाजाच्या या प्रवृत्तीमुळें समाज त्यांना आंचवून बसेल.

## गांधीवाद व गांधीजीवनकार्य

वरील विवेचन करतांना गांधीवाद व गांधीजीवनकार्य अशी विभागणी केली आहे. ही विभागणी अगदीं तर्कशुद्ध आहे असें नाहीं व समाधानकारक आहे असेंहि नाहीं. कारण गांधीवाद म्हणून जो तात्त्विक सिद्धांतसमूह आहे, त्यांतील कांहीं तत्त्वें लोकशाहीला अगदीं घातक आहेत, तर त्याशीं विसंगत असलेलीं कांहीं तत्त्वें तिला पोषक आहेत. जीवनकार्यांतहि असेंच दिसतें आणि त्यामुळेंच महात्माजींच्या कार्याचें मूल्यमापन करतांना अभ्यासक हतबुद्ध होतो असें मीं आरंभीं म्हटलें आहे. स्थूल मानानें पहातां वरील विभागणीमुळें विवेचन करणें सुलभ होतें, मनांतील अभिप्राय बऱ्याचश

यथार्थतेनें व्यक्त करतां येतो, म्हणून तिचा अवलंब केला आहे. या मर्यादा वाचकांनीं ध्यानांत ठेवल्या तर मी असें म्हणेन कीं गांधीवाद हा—त्यांतील अध्यात्मनिष्ठा, वैराग्यवृत्ति, त्यांतील बुद्धीची अवगणना, त्यांच्या ग्रामोद्योगांतून निर्माण होणारी आदर्श समाजरचना— बव्हंशीं लोकशाहीला हानिकारक आहे आणि गांधीजीवनकार्य—त्यानें निर्माण केलेली जनताभिमुख दृष्टि, अस्पृश्यता व जातिव्यवस्था यांचें निर्मूलन करून मानवतेचें वृद्धिंगत केलेलें मूल्य आणि विशेषतः सर्वांत श्रेष्ठ म्हणजे त्यांचे सत्याग्रहसंग्राम व त्यांतून निर्माण केलेली प्रतिकारवृत्ति—लोकशाहीला अत्यंत पोषक झालेलें आहे. यांतील कांहीं घटकांचें विवेचन आपण केलें. ग्रामोद्योग व तत्प्रणीत अर्थव्यवस्था अशा कांहीं महत्त्वाच्या घटकांचें विवेचन करावयाचें आहे. तें केल्यानंतर समारोप करतांना एकंदर गांधीकार्याचें अधिक निर्णायक व निश्चित असें मूल्यमापन करण्याचा प्रयत्न करूं.

---

( गांधीवाद व लोकसत्ता )

## २

## ‘ ग्रामवाद ’

### ( हा लोकसत्तेचा पाया होऊं शकेल काय ? )

महात्माजींच्या कार्याचें लोकशाहीच्या दृष्टीनें येथवर विवेचन केलें. त्यांत त्यांचे सत्याग्रहसंग्राम व त्यांची अध्यात्मनिष्ठा यांचाच प्रामुख्यानें आपण विचार केला. आतां या लेखांत गांधीवादांतील एका महातत्त्वाचें लोकशाहीच्या दृष्टीनें परीक्षण करावयाचें आहे. भारतीय समाजाच्या भवितव्यावर दृश्य व्यवहारांत जो शाश्वत परिणाम व्हावयाचा आहे, तो महात्माजींच्या या तिसऱ्या महातत्त्वानें. तें तत्त्व म्हणजे ‘ग्रामवाद’ हें होय. आक्रमकांचा पराभव करून देशाला स्वातंत्र्य मिळवून दिल्यानंतर येथील समाजाची पुनर्घटना कशी करावयाची, याविषयींचें जें महात्माजींचें तत्त्वज्ञान तें सर्व या ग्रामवादांत समाविष्ट झालेलें आहे आणि त्या

तत्त्वान्वयें समाजरचना केली तरच भारतांत खरीखुरी लोकशाही प्रस्थापित होईल असा गांधीवादी पंडितांचा सिद्धांत आहे; म्हणून त्या ग्रामवादाचें परीक्षण करणें अवश्य आहे.

'ग्रामवाद' हा शब्द स्वतः गांधीजींनीं वापरलेला नाहीं. ग्रामोद्धार, ग्रामसंघटना, ग्रामोद्योग इत्यादि शब्द ते वापरीत; पण यांतील कल्पनांचें प्रतिपादन करतांना आपल्या पन्नास वर्षांच्या कारकीर्दीत त्यांनीं जे अनेक विचार मांडले, समाजरचनेच्या मूलतत्त्वांविषयीं जे अनेक सिद्धांत सांगितले, जे वादविवाद केले, पृच्छकांच्या प्रश्नांना उत्तरें दिलीं व आपल्या बुद्धिनिश्चयाप्रमाणें जें कार्य केलें त्यांतून अखिल जीवनासंबंधीं एक व्यापक असें तत्त्वज्ञान निर्माण झालें आहे आणि त्यालाच गांधीवादी पंडितांपैकीं विख्यात असे डॉ. भारतन् कुमाराप्पा यांनीं 'ग्रामवाद' असें नांव दिलें आहे. 'पुंजीवाद, समाजवाद व 'ग्रामवाद' या आपल्या पुस्तकांत त्यांनीं त्याचें सविस्तर विवेचनहि केलें आहे. स्वतः गांधीजींनीं 'ग्रामवाद' हा शब्द वापरला नसला तरी या वादांतील सर्वसिद्धांत व मतें त्यांचींच आहेत. त्यांच्या आधारानेंच कुमाराप्पांनीं सर्व विवेचन केलें आहे आणि त्या पुस्तकाला गांधीजींनीं जी प्रस्तावना लिहिली आहे, तींत ग्रामवादाचा गौरव करून, 'जगाचा व हिंदुस्थानचा अंतिम विनाश या ग्रामवादानेंच टळेल, कारण तो सत्यअहिंसेवर अधिष्ठित आहे.' असें आपलें मत दिलें आहे. या लेखांत जें विवेचन होईल तें बरेचसें त्या पुस्तकाच्या आधारें होईल. गांधीजींचीं इतर लेखांतील मतें मी उद्धृत करीनच; त्याशिवाय गांधीवादाचे इतर जे थोर पुरस्कर्ते त्यांच्याहि लेखनाचा विचार केला जाईल. प्रा. जे. सी. कुमाराप्पा, मश्रुवाला, विनोबा भावे, सर्वोदय समाजाचे इतर अनुयायी, शंकरराव देव या अनेक विचारवंतांनीं जे विचार वेळोवेळीं प्रकट केले, त्यांचाहि परामर्ष घेतला जाईल. गांधीवादाचे हे सर्व एकनिष्ठ पुरस्कर्ते आहेत, आणि त्या वादान्वयें जर आपल्या समाजाची पुनर्घटना व्हावयाची असली, तर ती हे पंडित त्याला जें रूप देतील त्यावरून व्हावयाची आहे. म्हणून गांधीवादांतील ग्रामवाद हें जें प्रधान तत्त्वज्ञान त्याचें विवेचन करतांना या सर्व विद्वानांच्या विचारांचें सारसंकलन करून तें आधाराला घेणें हें युक्तच होईल.

## केन्द्रीकरण

भांडवलशाही ही जगावरची एक घोर आपत्ति आहे आणि तिच्यांतील मूलतत्त्वांचाच अवलंब यापुढें आपण करीत राहिलों, तर जगाचा लवकरच प्रलय होईल, हें मत जगांतील बहुतेक विचारवंतांना आतां मान्य झालें आहे; पण त्याबरोबर जगाचें यापुढें तारण होईल तें समाजवादाच्या आश्रयानें होईल, हेंहि दुसरें मत तितकेंच सर्वमान्य झालेलें आहे; पण गांधीवादी कार्यकर्त्यांची व पंडितांची समाजवादावर अशी श्रद्धा नाहीं. त्यांना समाजवाद हा मुळींच तारक वाटत नाहीं. उलट एकापरी तो भांडवलवादापेक्षांहि जास्त मारक आहे, असें त्यांचें मत आहे आणि म्हणूनच समाजवादाला विरोध करून त्यांनीं ग्रामवादाचा पुरस्कार केला आहे. तेव्हां या पंडितांचे समाजवादावर आक्षेप काय आहेत, ते प्रथम समजावून घेऊन नंतर त्यांनीं आपल्या तत्त्वज्ञानाचे जे मूलभूत सिद्धांत सांगितले आहेत, त्यांचा परिचय करून घेऊं. म्हणजे त्यांचा परामर्ष घेणें सुलभ होईल.

आजची भांडवलशाही ही अवाढव्य यंत्रांच्या साह्यानें प्रचंड प्रमाणावर धनोत्पादन करते आणि त्या धनाच्या बळावर सर्व सत्ता आपल्या हातीं घेऊन समाजाचें अनेक तऱ्हांनीं शोषण करते, हा भांडवलशाहींतला मुख्य दोष आहे. म्हणजे प्रथम धनाचें व मग त्या जोरावर ती सत्तेचें केंद्रीकरण करते आणि यामुळेंच सर्वनाश होतो. हा दोष जाणून समाजवादी पंडितांनीं, भांडवलदारांच्या हातून धनोत्पादनाचीं साधनें काढून घ्यावीं व तीं जनतेच्या म्हणजेच सरकारच्या स्वाधीन करावीं, म्हणजे धनाचें व सत्तेचें केन्द्रीकरण होणार नाहीं, असा उपाय सुचविला; पण प्रचंड यंत्रें व त्यांच्या साह्यानें होणारें प्रचंड प्रमाणावरील उत्पादन याला त्यांचा विरोध नाहीं. इतकेंच नव्हे तर हें महायंत्रोत्पादन अवश्य आहे, असें त्यांचें मत आहे आणि यालाच गांधीवादाचा विरोध आहे. त्याचें म्हणणें असें कीं, एकदां महायंत्रोत्पादन आपण स्वीकारलें, कीं धनाचें व त्यामुळें सत्तेचें केन्द्रीकरण होणारच. भांडवलदारांच्या हातून तुम्ही उत्पादनसाधनें काढून घेऊन तीं सरकारच्या हातीं देणार. पण सरकार म्हणजे कोण? असेच

कोणी संघटित झालेले पांचपन्नास लोक. पूर्वी कारखाना कंपनीच्या ताब्यांत असे. आतां सरकारच्या ताब्यांत जाणार. पण यांत फरक कांहींच होत नाहीं. कारण ते कंपनीचे चालक हातीं धन केन्द्रित होतांच जसें जनतेचें शोषण करीत, तसेंच शोषण सरकार करील. तें करणार नाहीं, याला हमी कांहींच नाहीं. रशियांत आज हेंच होत आहे. त्यामुळें समाजवादामध्यें धन व सत्ता ही एका अल्पसंख्य गटाच्या हातीं जाणें हें टळत नाहींच. अर्थात् यामुळें लोकशाहीचा नाश, दंडसत्तेचा उद्‌भव हाहि टळत नाहीं; म्हणून महायंत्रोत्पादन हेंच मुळांत नाहींसें केलें पाहिजे; यामुळें सर्व प्रकारचें केंद्रीकरण नष्ट होऊन तज्जन्य सर्व आपत्तीहि टळतील. तेव्हां समाजाचा मूल घटक ग्राम हाच धरावा आणि तेथें चरखा, तेलघाणा, साधा नांगर अशा साध्या हत्यारांनींच उत्पादन करावें. या साध्या हत्यारांत विज्ञानाच्या साह्यानें वाटेल त्या सुधारणा करण्यास हरकत नाहीं; पण त्यांचें अल्परूप मात्र कशानेंहि जातां कामा नये. कारण सामान्य व्यक्तींना, जनतेला अवाढव्य यंत्रावर मालकी ठेवतां येत नाहीं. यंत्रें व उत्पादन अल्परूप राहिलीं म्हणजे तीं सामान्य जनांच्या ताब्यांत रहातील व उत्पादनाचें पूर्णपणें विकेंद्रीकरण होईल. आतां यायोगें आजच्या प्रमाणावर धननिर्मिति होणार नाहीं हें खरें. ज्या वस्तू मिळतील त्या पुष्कळशा जाड्या-भरड्या मिळतील. पण जनतेला त्यावर संतुष्ट रहाण्याचेंच शिक्षण दिलें पाहिजे. कारण मानवाचें सुख, त्याच्या आत्म्याचा विकास, व खरी लोकसत्ता हें आपलें मुख्य साध्य आहे. प्रचंड धनोत्पादन केलें, कीं केंद्रीकरण अपरिहार्य होतें आणि मग जनतेचें शोषण, इतर देशांवर आक्रमण, अमानुष स्पर्धा, संहारक युद्धें आणि जगाचा प्रलय या भांडवलशाहीच्या सर्व आपत्तीहि अटळ होतात. म्हणून विपुल धनाचा मोह माणसानें सोडला पाहिजे. जाड्याभरड्या अल्पधनांत संतोष मानला पाहिजे. मनोविकास, बौद्धिक प्रगति, आत्मिक उन्नति, बहुजनांचें कल्याण यांना खरें महत्त्व आहे. तें विकेंद्रीकरणांत साधत असल्यामुळें मनुष्यानें साध्या रहाणीस तयार झालें पाहिजे.

विकेंद्रीकरणाच्या या पद्धतीनें यंत्रामुळें निर्माण होणारी बेकारीची आपत्तीहि टळते. शंभर विणकरांचें काम एक यंत्र करतें; त्यामुळें तें यंत्र चालविण्यास जीं चारपांच माणसें लागतात, तीं सोडून बाकीचीं ९०–९५ बेकार

होतात. हिंदुस्थानांत माणूसबळ विपुल आहे. अशा स्थितींत येथें मोठीं यंत्रें आणून महायंत्रोत्पादन सुरू केलें, तर तितक्याच मोठ्या प्रमाणावर बेकारी माजेल आणि बेकारीसारखी मोठी आपत्ति कोणती असणार? तेव्हां या कारणासाठीं तरी केंद्रीकरण टाळणें अवश्य आहे. तें ग्रामोद्योगाच्या आश्रयानेंच टळेल. या ग्रामरचनेंत अगदीं लहान लहान यंत्रें वापरलीं जातील आणि मोठ्या यंत्रावर पूर्ण बहिष्कार घातला जाईल. गांधीवादाचा मुख्य विरोध यंत्राला नसून यंत्रामुळें होणाऱ्या केंद्रीकरणाला आहे. कांहीं मोठीं यंत्रें व त्यामुळें होणारें मोठ्या प्रमाणावरचें उत्पादन आणि त्यामुळें होणारें केंद्रीकरण हें अनिवार्य म्हणून गांधीवादानेंहि मान्य केलें आहे. साधारणतः संरक्षणाचीं साधनें निर्माण करणारे कारखाने, विजेसारख्या शक्ति निर्माण करणारे कारखाने, यंत्रांचे कारखाने, रसायनाचे कारखाने हे मोठ्या प्रमाणावरच चालविले पाहिजेत; पण मनुष्याच्या प्रत्यक्ष भोगवट्याच्या वस्तू मात्र विकेंद्रपद्धतीनेंच निर्मिल्या पाहिजेत. ( सर्वोदयकृत पुनर्घटनेचा आराखडा. भारतज्योति १५-१-५० ) अ. भा. ग्रामोद्योग संघाची ७।४।५० ला जी परिषद भरली होती तिनें असा ठराव संमत केला आहे कीं, यापुढें सरकारनें हळूंहळूं असें धोरण ठेवावें कीं, चरख्याला जास्तींत जास्त पाठिंबा देऊन गिरण्या बंद करावयाच्या. तेलघाण्याचा प्रसार करून तेलाचे कारखाने बंद करीत आणावयाचे. कागद, गूळ, कातड्याच्या वस्तू याहि बाबतींत हेंच धोरण अवलंबावें. हातपद्धतीनें यांचें उत्पादन वाढवीत नेऊन शेवटीं यंत्रपद्धति नष्ट करावी आणि पुढें तिला कायद्यानें बंदी करावी. कारण महायंत्रोत्पादनाची स्पर्धा सुरू झाली, कीं विकेंद्रपद्धतीनें चालणारे व्यवसाय कधींहि टिकणें शक्य नाहीं. तेव्हां अन्न, वस्त्र, कागद, गूळ, चामडी इ० प्रत्यक्ष भोगवट्याच्या वस्तू महायंत्रपद्धतीनें निर्माण करण्यास कायद्यानेंच बंदी केली पाहिजे.

## जातिभेदसमर्थन

भांडवलशाही समाजरचनेंत स्पर्धा हें अत्यंत घातक असें तत्त्व आहे. गांधीवाद स्पर्धातत्त्व सोडून सहकार्याचा अवलंब करतो आणि त्या दृष्टीनें हिंदुस्थानांतील जुनी जातिव्यवस्था ही आदर्श मानतो. जातिव्यवस्थेंतील

उच्चनीचता ही गांधीवादी पंडितांच्या मतें प्राचीन काळीं नव्हती. ती आल्यामुळें समाजाचा ऱ्हास झाला हें खरें, पण तेवढ्यामुळें जातिव्यवस्था त्याज्य ठरत नाहीं. ग्रामवादांत प्रत्येकाचा व्यवसाय त्याच्या जन्मावरूनच निश्चित होईल आणि कांहीं अपवाद वगळतां एका जातीचा धंदा दुसऱ्या जातीच्या माणसाला करतां येणार नाहीं. चांभाराला विशेष बुद्धिमत्ता असली तरी त्याला प्राध्यापक होण्याची या व्यवस्थेंत इच्छाच होणार नाहीं. कारण त्याच्या धंद्यांत त्याच्या बुद्धीला पुरेपूर अवसर मिळणारच आहे; आणि असें बंधन ठेवल्यानें आर्थिक समतोलपणा बिघडणार नाहीं. (डॉ. कुमाराप्पा. पुंजीवाद, समाजवाद, ग्रामवाद. पृ. १८९) गांधीवादाचा आनुवंशिक गुणावर विश्वास आहे, त्यामुळें पित्याचाच धंदा पुत्रानें केला तर त्यांतील कला पुत्राला सहज हस्तगत होईल असें त्याचें मत आहे. जातिव्यवस्थेचा हा आणखी एक फायदा आहे. मात्र महात्माजींनीं आंतरजातीय व वर्णीय विवाहास मान्यता दिलेली आहे. असे विवाह झाल्यावर आनुवंशिक गुण कसे टिकणार हें कळणें कठीण आहे; पण गांधीवादाची तशी श्रद्धा आहे. कोणी याला जातिव्यवस्था म्हणतील, कोणी वर्णव्यवस्था हें भारदस्त नांव देतील; पण धंदा जन्मावरून ठरावा, म्हणजे स्पर्धा नष्ट होईल, अनुवंशिक गुणांचा फायदा मिळेल आणि समाज सुखी होईल असें मात्र सर्वांचेंच मत आहे.

ग्रामवादाचा धन व सत्ता यांच्या केन्द्रीकरणाला विरोध असला, तरी भांडवलदार व जमीनदार यांना नष्ट करावें असें त्या पंथाचें मत नाहीं. या लोकांनीं आपणांस प्राप्त झालेलें धन सार्वजनिक निक्षेप म्हणून संभाळावें आणि आपल्या जरूरीपुरता त्यांतील वाटा घेऊन बाकीच्या धनाचा समाजहितासाठीं उपयोग करावा असें गांधीजींनीं सांगितलें आहे. जमीनदार, भांडवलदार यांनीं असें करण्याची बुद्धि दाखविली नाहीं तर समाजानें संघटित लोकमताच्या जोरावर त्यांना तसें करण्यास भाग पाडावें; पण त्यांना अजिबात नष्ट करूं नये. कारण त्यांचें धन हिरावून घेतलें तर ते समाजाचे कट्टे शत्रू बनतात. निक्षेप किंवा विश्वस्ततत्त्वानें तेच समाजाचे मित्र बनतील.

या तत्त्वान्वयें समाजरचना झाली कीं, प्रत्येक ग्राम हा एक स्वयंपूर्ण घटक होईल. अगदीं अक्षरशः एक ग्राम नाहीं तरी ५।१० ग्रामें (कोणाच्या मतें एक तालुका) एका गटांत येतील आणि भारताच्या राष्ट्रीय जीवनाचा हा गट म्हणजे मूलघटक होईल. हा घटक स्वयंपूर्ण असलाच पाहिजे. यानें अन्न, वस्त्र, व इतर वस्तू या आपल्या परिसरांतच निर्माण केल्या पाहिजेत आणि शिक्षण, धनव्यवस्था, शासन या दृष्टींनीं बहुतेक जीवन स्वयंपूर्ण करण्याचे प्रयत्न केले पाहिजेत.

ग्रामवादांतील या तत्त्वांवर समाजरचना झाली कीं त्या भारतीय समाजाला पोलीस, सैन्य व शस्त्रसंभार यांची गरज रहाणार नाहीं. कारण अहिंसा हें त्याचें मुख्य बल होय. दरवडेखोरांचा अहिंसकपद्धतीनें प्रतीकार करण्याचें शिक्षण घेतलेलें दल प्रत्येक ठिकाणीं सज्ज ठेवण्यांत येईल. शिवाय दरवडे पडूं लागलेच तर दरवडेखोरांच्या गांवीं आपल्या गांवांतील उत्तम माणसें पाठवावीं व आपल्या जरूरीपुरतें उत्पन्न कसें काढावें हें त्यांना शिकविण्याची व्यवस्था करावी म्हणजे पुन्हां दरवडे घालण्याची बुद्धि त्यांना होणार नाहीं. परकीय आक्रमणाचाहि विचार याचप्रमाणें करावा. मुख्य म्हणजे ग्रामवादाच्या तत्त्वावर संघटित झालेल्या समाजावर आक्रमण करावें अशी कोणच्याहि विदेशी सत्तेला इच्छाच होणार नाहीं. कारण आक्रमकांना कांहीं मिळणार नाहीं; ग्रामवासी कच्चामाल त्यांना विकणार नाहींत आणि त्यांचा माल घेणार नाहींत. तेव्हां बहुधा अशा समाजावर आक्रमणच होणार नाहीं आणि त्यांतून झालेंच तर त्याचा सत्याग्रहानें प्रतीकार करणें हेंच धोरण ठेवलें पाहिजे. याचीं कारणें दोन. एक म्हणजे ग्रामोद्योगांत जें धन निर्माण होणार त्यांतून युद्धाला अवश्य असा अफाट शस्त्रसंभार व इतर साहित्य निर्माण करणें अशक्य आहे. महायंत्रोत्पादनालाच तें सामर्थ्य आहे. हातपद्धतीला नाहीं. आणि त्यांतूनहि महायंत्रोत्पादन करण्याचें ठरविलें तर युद्धासाठीं केन्द्रीय सरकाराला राष्ट्राच्या सर्व जीवनावर, म्हणजे उद्योगधंदे, शेती, उत्पादन, खप या सर्वांवर नियंत्रण ठेवण्याचा अधिकार द्यावा लागेल. असें झालें म्हणजे केन्द्रीकरण झालेंच; आणि तें तर सर्व अनर्थांचें मूळ आहे. म्हणून ग्रामवादाचा आश्रय करून आम्ही आपलें आर्थिक जीवन परकीयांच्या लोभाला मुळींच आकर्षक

वाटणार नाहीं असें ठेविलें पाहिजे आणि आक्रमणाचा प्रतिकार नैतिक बळानें करून राष्ट्रचें रक्षण केलें पाहिजे.

ग्रामवादांतील तत्त्वांच्या आश्रयानें अशी समाजरचना झाली म्हणजे सर्व समाज सुखी होईल, व्यक्तीला आपल्या विकासाला सर्व दृष्टीनें अवसर मिळून लोकशाहीची परिणति होत जाईल व त्याचाच अनिवार्य परिणाम म्हणजे जगांतून युद्धें व साम्राज्यशाही हीं नाहीशीं होऊन अखिल मानवजात सुखी होऊन अध्यात्मबलसंपन्न होईल.

ग्रामवादाचीं हीं मूलतत्त्वें पाहिलीं, आणि कुमाराप्पा बंधु, मश्रुवाला इ. थोर समाजसेवकांचा त्यांना पाठिंबा आहे हें ध्यानीं आलें म्हणजे या भरतभूमीच्या भवितव्याविषयीं मन फार साशंक होतें. जगांत कधीं काळीं समृद्धि होईल आणि अखिल जनतेला पोटभर अन्न व अंगभर वस्त्र मिळेल अशी आशा कशाच्या जिवावर करतां येत असेल तर ती महायंत्रोत्पादनाच्या जिवावर करतां येते. त्यालाच नेमका ग्रामवादाचा विरोध आहे. जन्मनिष्ठ व्यवसाय व तज्जन्य जातिभेद यांच्या कैचींतून आपण आतां सुटलों म्हणून निःश्वास टाकण्याची वेळ येते न येते तोंच त्यांचा जीर्णोद्धार करण्याचा गांधीवादानें चंग बांधला आहे. प्रवृत्तिवादाची रग या भारतीयांच्या अंगांत जरा उमटेल व त्यांचें जीवन जरा कसदार व वरच्या पातळीचें होईल असा संभव दिसतो न दिसतो तोंच गरजा कमी करण्याचें व जगांत कोणालाहि आक्रमण करण्याइतकें आकर्षक वाटूं नये असें जीवन निर्माण करण्याचा उपदेश करणारें निवृत्तीचें तत्त्वज्ञान येथें हजर झालें आहे. मला वाटतें फ्रेंचांना संघटित पक्ष बनविणें जितकें अशक्य, जर्मनांना व्यक्तिस्वातंत्र्याची महती आकळणें जितकें असंभवनीय, तितकेंच भारतीयांना प्रवृत्ति, भौतिकनिष्ठा, ऐहिकता यांची आवड अंगीं बाणविणें अशक्य आहे. भारतीयांच्या रक्तांतला निवृत्तीचा रोग कधीं काळीं नष्ट होईल ही आशाच गांधीवाद वाचल्यानंतर नष्ट होते. आमची परलोकावर कायमची खिळलेली ती दृष्टि, आमच्या रक्तांतलें तें दारिद्र्यप्रेम आणि आमची ती पुराणप्रियता! यांतून आम्ही मुक्त होऊन नेटका प्रपंच करण्यास समर्थ होऊं असें वाटत नाहींसें होतें.

ग्रामवादासंबंधीं असे उद्‌गार कां काढावेसे वाटतात तें सविस्तर सांगणें अवश्य आहेच. पण तत्पूर्वी या ग्रामवादाचें विवेचन करतांना आपल्या प्राचीन ग्रामव्यस्थेविषयीं जी एक श्रद्धा या पंडितांनीं प्रगट केली आहे तिचा विचार केला पाहिजे. कारण प्रत्यक्ष ग्रामवादापेक्षांहि ही श्रद्धा जास्त घातक व भयावह आहे. भरतभूमींतील प्राचीन ग्रामव्यवस्था या पंडितांनीं आदर्श म्हणून पुढें ठेविली आहे. नवीन रचना अगदीं तंतोतंत त्या बरहुकूम होईल असें नाहीं. पण फरक असतील ते कालमानाप्रमाणें अवश्य असे किरकोळ स्वरूपाचे असतील; पण मूलतत्त्वें जीं अंगीकारावयाचीं तीं सर्व प्राचीन ग्रामव्यवस्थेंत होतीं याबद्दल गांधीवादांत फारसें दुमत नाहीं. आणि यामुळेंच मन निराशेनें जास्त व्याप्त होतें.

## ग्रामगौरव

पाश्चात्य भौतिक संस्कृतीचा महात्माजींना अत्यंत तिटकारा होता. व त्या संस्कृतीपासून खेडीं अलिप्त आहेत म्हणून त्यांना समाधान वाटे. आपल्या खेड्यांत हजारों वर्षें तोच नांगर, तींच शेतींचीं अवजारें व तीच शेतकऱ्याची झोपडी आहे, यांत कसलाहि बदल झाला नाहीं, म्हणून राममोहन रॉयांपासून सर्व विचारवंतांना खेद वाटे. पण गांधीजी म्हणतात कीं तेंच खरें भरतभूमीचें भूषण आहे. त्यांच्या मतें आमच्या पूर्वजांना मोठीं यंत्रें शोधण्याची ऐपत नव्हती असें नाहीं. पण या शेतीच्या नव्या यंत्रांनीं लोक गुलाम होतील व नीतिहीन होतील हें जाणून त्यांनीं ठरवून टाकिलें कीं, हातापायांच्या शक्तींनीं जेवढें काम होईल तेवढेंच करणें श्रेयस्कर होय. या त्यांच्या धोरणामुळें आमचीं खेडीं शुद्ध, नीतिमान् व अकलंकित अशीं राहिलेलीं आहेत. खरें स्वराज्य तेथेंच आहे. खरी संस्कृति तेथें नांदत आहे. असें सांगून गांधीजींनीं असा निर्णय दिला आहे कीं, आमच्या शेतकऱ्याला अजून कोणीहि शस्त्रबलानें जिंकलेलें नाहीं व कधींहि जिंकणें शक्य नाहीं. ( हिंद स्वराज्य पृ. ४८ )

ग्रामोद्धार, ग्रामोद्योग यावरचें गांधीवादी विद्वानांचें वाङ्मय पाहिलें तर एक गोष्ट स्पष्ट दिसून येते कीं या सर्वांच्या मतें आपल्याकडची पूर्वीची म्हणजे अठराव्या शतकापर्यंतची ग्रामरचना ही आदर्श होती. तींत विकेन्द्री-

करण होतें, स्पर्धा नव्हती आणि व्यक्तिविकासाला अवसर होता. आणि यामुळें खरीखुरी लोकशाही तेथें नांदत होती. ' फिलॉसफी ऑफ व्हिलेज मुव्हमेंट ' या आपल्या लहानशा पुस्तकांत कुमाराप्पा यांनीं या मताचा पुरस्कार केला आहे. अर्वाचीन काळच्या पाश्चात्य देशांतल्या सर्व लोकसत्ता त्याज्य ठरवून प्राचीन पद्धतीची लोकसत्ता आम्हांस निर्मावयाची आहे असें ते म्हणतात. हिंदुस्थानांतल्या जुन्या ग्रामव्यवस्थेचे गोडवे गाण्याची ही पद्धत सर्वत्रच रूढ झालेली आहे. केवळ गांधीवादी पंडितच ती ग्रामव्यवस्था आदर्श मानतात असें नसून सर्व पुराणाभिमानी पंडितांची तशी प्रवृत्ति आहे. रियासतकार सरदेसाई यानींहि आपल्या या जुन्या ग्रामरचनेची प्रशस्ति गाईली आहे. आणि त्याकाळीं प्रत्येक गांव हें आपल्या हद्दींत एक प्रजासत्ताक राज्य होतें असें मत दिलें आहे. जुन्या ग्रामव्यवस्थेची प्रशस्ति म्हणजे या भरतभूमीवरची फार मोठी आपत्ति आहे असें माझें मत आहे. यापुढें भारतांत जी लोकसत्ता व्हावयाची तिच्यासाठीं हा जुना आदर्श पुढें ठेवणें हें फारच घातक आहे. म्हणून या प्रशस्तीची चिकित्सा करणें अवश्य आहे.

## प्राचीन ग्राम व लोकसत्ता

या सर्व पंडितांच्या मतें या व्यवस्थेंत असा कांहीं गुण होता कीं, या भूमीवर मागल्या काळांत शेकडों आक्रमणें झालीं, राज्यक्रांत्या झाल्या, उलथापालथी झाल्या तरी येथलें शेतकरीजीवन त्या व्यवस्थेमुळें अभंगच्या अभंग राहिलें हीं केवळ वरवरचीं वादळें होतीं. तीं येत व जात; पण ही ग्रामव्यवस्था बिघडत नसे व तिच्या आश्रयानें रहाणारा शेतकरी हा अचल रहात असे. इतिहासदृष्टीनें या मताचें परीक्षण करतां हा एक फार मोठा भ्रम आहे असें दिसून येईल. रियासतकार सरदेसाई यांच्याच इतिहासाच्या आधारें हें दाखवून देतां येईल. इ. स. १००० ते १६०० या काळांत भरतभूमीवर मुसलमानांचीं अनेक राज्यें होऊन गेलीं. त्यांचा इतिहास देऊन नंतर मुसलमानी अमलाचें त्यांनीं पर्यालोचन केलें आहे. ( मुसलमानी रियासत, भाग १ ला, प्रकरण १९ वें ) त्यांत ते म्हणतात– या काळांत लाखो हिंदूंस मुसलमानांनीं बाटाविलें, त्यांचीं देवळें फोडलीं, विद्यापीठांचा विध्वंस केला; जिझिया कर न देतां आल्यानें खालच्या

वर्गांतील असंख्य लोकांना मुसलमान व्हावें लागलें. मुसलमान हिंदूंचे कायदे मानीत नसत. कुराणांतील कायदे चालवीत. आमचें राष्ट्र दिवसेंदिवस अज्ञानपंकांत मग्न होत गेलें. मुसलमानांच्या येवढ्या मोठ्या कालांत लोकसौख्यकारक कारभाराची उन्नति झाली नाहीं. एकंदरींत मुसलमानी राज्याला लष्करी जोराशिवाय चिरस्थायिकतेचें दुसरें बंधन नव्हतें. मुसलमानांच्या एकंदर कर्तबगारीचा विचार करतां त्यांच्याविषयीं अंत:करणांत खेद होतो. हिंदुस्थानांत नवीन ज्ञानवृद्धि तर दूरच, पण असलेली सुधारणा व ज्ञान यांचा झपाट्यानें ऱ्हास होत चालला होता. या भयंकर आक्रमणास तोंड देण्याचें सामर्थ्य हिंदूंत राहिलें नव्हतें. उत्तरेंत हिंदूंचें स्वत्व सर्वथैव नष्ट होऊन त्यांचें मन पूर्णपणें मुसलमानांच्या कबजांत गेलें होतें. राज्य करण्याची योग्यता हिंदूंची नाहीं अशा प्रकारचा सामान्य जनांचा ग्रह होऊन बसला होता. राज्य परकीयांनीं करावें व आम्हीं त्यांस सर्वस्वीं मदत करावी असा लोकांचा समज कायमचा बनला.

ही इतिहासप्रसिद्ध वस्तुस्थिति ध्यानांत येऊन आपण आपली ती भक्कम ग्रामव्यवस्था, तें अभंग शेतकरीजीवन व तीं प्रजासत्ताकें यांचा विचार केला पाहिजे. धर्म गेला, स्वत्व गेलें, परकीय कायदे लादले गेले, जिझिया कर देण्याची ऐपत नाहीं, आम्ही राज्य करण्यास लायक नाही ही भावना दृढमूल झाली; तरी शेतकरीजीवन अभंगच ! वरचेवर कत्तली होत, गांवें बेचिराख होत, लोकांना गुलाम म्हणून विकीत; तरी आमची ती ग्रामव्यवस्था भक्कमच राहिली. राज्य लष्करी जोरावर चाललेले, आणि या आपत्ती निवारण करण्यास आम्ही पूर्ण असमर्थ झालेले; तरी आमच्या ग्रामांत प्रजासत्ताकें नांदत होतीं; व्यक्तिविकासास अवसर होता; आणि शेतकरी समाज अजिंक्य होता ! धर्म गेला, राज्य गेले, स्त्री गेली, धन गेलें तरी शेतकरी समाज अजिंक्य होता आणि तो प्रजासत्ताकें चालवीत होता ! सरदेसाई, कुमाराप्पा यांच्या मनांत 'प्रजासत्ताकें' या शब्दाचा अर्थ तरी काय आहे ? खरोखर व्यक्तिविकास, प्रजासत्ताक, लोकशाही या शब्दांची ही शुद्ध विटंबना आहे.

माणूस एखाद्या तत्त्वज्ञानाच्या आहारीं गेला म्हणजे तो तें सिद्ध करण्या-

साठीं इतिहासाकडे पाहूं लागतो. आपण जी स्थिति निर्माण करणार तशी पूर्वीं एकदां होती हें दाखविणें त्याला अवश्य वाटूं लागतें. मार्क्सवादी, वंशवादी इ. अनेक लोकांनीं हेंच केलें आहे. गांधीवादांतील चरखा, ग्रामोद्योग, विकेन्द्रीकरण व तदधिष्ठित लोकसत्ता यांचें समर्थन करण्यासाठीं कुमाराप्पांनींही याच मार्गाचा अवलंब केला आहे. पूर्वीच्या ग्रामव्यवस्थेत विकेंद्रीकरण होतें तरी हिंदुस्थान पराभूत कां झाला असा प्रश्न केल्यास ते म्हणतात, आपण तें सोडून देऊन उद्योगधंद्यांच्या केन्द्रीकरणाचें धोरण अवलंबिल्यामुळें आपला नाश झाला. वास्तविक केन्द्रीकरण झालें १९ व्या शतकाच्या अखेरीस, आणि अगदीं खरें म्हणजे विसाव्या शतकांत, आणि तें इंग्रज आल्यावर. पण त्याच्यापूर्वीं अफगाण, तुर्क, मोंगल, पोर्तुगीज, डच, फ्रेंच या सर्वांपुढें भारतीयांनीं हार खाल्ली होती. आणि पुढें इंग्रजांनींहि त्यांना नमविलें. इंग्रज येण्याच्या आधीं विकेन्द्रीकरणच होतें. चरखा होता, स्पर्धा नव्हती. सहकार्य होतें. दुष्ट पाश्चात्य विद्येचें वर्चस्व नव्हतें. म्हणजे जी व्यवस्था आतां निर्मामावयाची आहे ती सर्व होती. तरी आक्रमण, पारतंत्र्य, उपासमार, रोगराई यांतलें कांहीं टळलें नाहीं.

आपल्या प्राचीन ग्रामव्यवस्थेविषयीं व त्या शेतकऱ्याविषयीं पंडितांनीं निर्माण केलेला भ्रम दूर झाला तर 'ग्रामवादा' चा भ्रामकपणा व घातकपणा आपल्या ध्यानांत येणें सुलभ होईल.

## अक्षय समृद्धीची आवश्यकता

पहिली गोष्ट अशी कीं अखिल भारतीय समाज हा एक समाज आहे हें एक संघटित राष्ट्र आहे, हें एक लोकसत्ताक आहे, अशा दृष्टीनें जर यापुढें आपणांस जगावयाचें असेल तर त्यासाठीं जें किमान धन अवश्य आहे तें ग्रामवादांतील अल्पयंत्रांच्या साह्यानें कधींहि निर्माण होणें शक्य नाहीं. ग्रामवादानें कांहीं क्षेत्रांत महायंत्रें मंजूर केलीं आहेत. पण मुख्यतः अन्नवस्त्रासारख्या प्रत्यक्ष भोगवस्याच्या वस्तूंना महायंत्रांचा स्पर्श होता कामा नये असा त्याचा कटाक्ष आहे. असें जर खरोखरच झालें तर या राष्ट्रावर अत्यंत भयावह अशी आपत्ति ओढवेल. आजच्या जीवनाच्या किमान गरजा या दोनशें वर्षांपूर्वीच्या समाजाच्या किमान गरजांपेक्षां शंभर

पटीनें तरी वाढल्या आहेत. आणि एक संघटित व प्रभावी लोकसत्ताक म्हणून जर आपणांस जगावयाचें असेल तर त्यांतल्या कोणच्याहि गरजा कमी करणें शक्य नाहीं. त्या किमान गरजा आहेत. गांधीवादाला ज्या गरजा कमी करावयाच्या आहेत, त्या अगदीं निराळ्या. वर उल्लेखिलेल्या गरजा गांधीवादी पंडितांनींहि मान्य केलेल्या आहेत.

अन्न व वस्त्र ही पहिली गरज. ही मागें होती; पण प्रत्येकाला अन्नवस्त्र मिळालें पाहिजे, ही जबाबदारी मागें कोणाच्याच शिरावर नव्हती. आतां समाज ती घेणार आहे; आणि प्रत्येकाला तांदूळ, गहूं, ज्वारी, बाजरी असें सकस अन्न आणि एरवीं साधें व थंडींत उबदार वस्त्र, हें पुरवावयाचें म्हणजे उत्पन्नाची अनेक पटीनें वाढ झाली पाहिजे. सर्वांना शुद्ध पाणी मिळेल ही व्यवस्था यापुढें समाजानें म्हणजेच सरकारनें केली पाहिजे. पूर्वी शेंकडा नव्वद खेडयांत ती नव्हती. अजूनहि नाहीं. ती करावयाची म्हणजे तळीं, विहिरी, बंधारे हे प्रत्येक खेडयांत अवश्य आहेत. त्याला साधन-सामग्री म्हणजेच धन लागणार. अखिल जनतेच्या आरोग्याची व्यवस्था पूर्वी कोणीच करीत नसे, ती आतां करावी लागणार. त्यासाठीं औषधें, उपकरणें, रुग्णालयें, वैद्य, परिचारिका यांची जरूर लागणार. त्यांचा पगार, व साधनांचा खर्च, समाजानें साहणें अवश्य आहे. एका पंढरपूरच्या यात्रेच्या वेळीं नुसतें फिनाईल किती ओततात एवढा हिशेब केला, तर हल्लींच्या सामाजिक जीवनाच्या प्रपंचासाठीं पूर्वींच्या कितीतरी पटीनें धन जास्त अवश्य आहे हें कळून येईल. पूर्वी सामाजिक जीवनच नव्हतें. आरंभींच्या प्रकरणांत सांगितल्याप्रमाणें त्याचें चिंतन कोणींच करीत नसे; पण लोकायत्त संघटित समाजानें हें चिंतन केलें पाहिजे आणि या जबाबदाऱ्या पतकरल्या पाहिजेत. त्या पतकरावयाच्या तर पूर्वींच्या पेक्षां अनेक पटीनें धननिर्मिति केली पाहिजे. अखिल जनतेच्या शिक्षणाची उपेक्षा करून यापुढें चालणार नाहीं. सर्व जनतेंत राजकीय प्रबुद्धता कायम ठेवावयाची तर स्वभाषा, इतिहास, भूगोल, विज्ञान, गणित, व एखादी परकी भाषा इतकें शिक्षण तरी किमान अवश्य आहे. म्हणजे इतक्या इमारती, इतके शिक्षक, इतकीं पुस्तकें व इतर उपकरणें, विद्यापीठें, परीक्षामंडळें यांचा खर्च आला. (मागें यासाठीं सध्यांच्या एकलक्षांश सुद्धां खर्च नसे.) नंतर प्रत्येक

कुटुंबाला दोन खोल्या तरी जागा देणें, आणि ती जरा सरळ भिंती व सपाट जमीन असलेली अशी देणें, अवश्य आहे. मनुष्यजातीसारखें रहावयाचें एवढ्यासाठीं ही जागा अवश्य असते. शिवाय इतकी जागा असली तरच मुलें थोडा विद्याभ्यास बरा करूं शकतील. तेव्हां इतकीं घरें पुरविण्यास पुरेसें धन हवें. सार्वजनिक प्रपंच लोकायत्त पद्धतीनें चालवावयाचा म्हणजे ग्रामपंचायती, नगरपालिका, लोकल बोर्डें, असेंब्ली, कौन्सिलें हीं अवश्य होतात. एवढ्यांसाठीं इमारती, निवडणुकांचे खर्च, त्या प्रतिनिधींचा प्रवासखर्च, त्यांना लागणाऱ्या साधनांचा व उपकरणांचा खर्च व त्यांचे पगार इतकें धन संपादिलें पाहिजे. सर्वप्रकारच्या संशोधनसंस्था या लोकायत्त जीवनाला हल्लीच्या पेक्षांहि जास्त प्रमाणावर लागणार, हें ग्रामवादालाहि मान्य आहे. वेधशाळा, रसायनशाळा, शेतीच्या, वैद्यकाच्या प्रयोगशाळा, इतिहास, भाषा यांचीं संशोधनमंदिरें यांवांचून राष्ट्रीय प्रपंच चालणार नाहीं. हा खर्च झेपेल इतकें धन समाजानें पैदा केलें पाहिजे. याशिवाय समाजाची करमणूक, त्याचा थोडा तरी किमान प्रवास, लक्षावधि बालकांची खेळण्याची व रमण्याची व्यवस्था, सार्वजनिक उद्यानें, याची जबाबदारी समाजानें घेणें अवश्य आहे. म्हणजे एवढें धन निर्माण केलें पाहिजे. हे सामाजिक जबाबदारीचे विषय झाले. याशिवाय प्रत्येक घरीं आणखी जबाबदाऱ्या असतातच. लग्नमुंजीसारखे मंगलप्रसंग, सणवार, उत्सव यांचा खर्च, कांहीं कलेची उपासना करावयाची तर खर्च; हे खर्च वैयक्तिक असले तरी त्याला अवश्य असलेलें धन कोठून तरी निर्माण झालेंच पाहिजे. आणि ती जबाबदारी, अप्रत्यक्षपणें का होईना समाजाचीच आहे.

ग्रामवादाचे, ग्रामोद्योगाचे व सर्वोदयाचे पुरस्कर्ते असा आग्रह धरतात कीं, समाजाच्या प्रत्यक्ष भोगवस्त्याच्या वस्तू माणसानें हातानेंच निर्माव्या. फारतर लहान यंत्राचें साह्य घ्यावें. येवढ्या क्षुद्र शक्तीच्या साह्यानें सध्यांच्या समाजाला अवश्य असलेलें भोगवस्त्याचें धन निर्माण होणें कदापि शक्य नाहीं. निसर्ग हा अत्यंत कृपण व स्वार्थी आहे. साध्या नांगराला व कुऱ्हाडीला तो मुळींच दाद देत नाहीं. त्याच्या आघातांनीं तो प्रसन्न होत नाहीं व झालाच तर मापटें चिपटें धान्य मानवाच्या पदरांत टाकण्याइतकाच होतो. वीज पेट्रोल, वाफ, अणु यांच्या सामर्थ्यानें चालणारीं महायंत्रें त्यानें

पाहिलीं म्हणजें तो दोरीसूत येतो व उदार हस्तानें धनधान्य देऊं लागतो. ग्रामवादांतील यंत्रावर विसंबून राहिलों तर सध्यांच्या जनतेला पुरेसें सकस अन्नहि मिळणार नाहीं; मग इतर धनाची गोष्ट कशाला ! आणि समृद्धि ही तर ग्रामवादी भारताला स्वप्नांतहि आणतां येणार नाहीं.

तरी वरील खर्चांत लष्कराचा व एकंदर संरक्षणाचा खर्च धरला नाहीं. तो खर्च ग्रामोद्योगाला म्हणजे हातशक्तीनें निर्माण होणाऱ्या धनाला मुळींच परवडणार नाहीं, हें ग्रामवादी पंडितांनींच मान्य केलें आहे; पण त्यावर त्यांचे उपायहि आहेत. एकतर आपलें जीवन इतकें साधें, गरिबीचें व अनाकर्षक ठेवावयाचें कीं, दुसऱ्याला आक्रमण करण्याचा मोहच पडूं नये आणि तरी आक्रमक आलाच तर त्याचा प्रतीकार अहिंसेनें करावयाचा. यांतील पहिला भ्रांतिजन्य व दुसरा अशक्य असा आहे. महंमद गझनी किंवा नादिरशहा हे फार तर लुटीच्या आशेनें आले असतील; पण जे साम्राज्यप्रस्थापनेसाठीं येतात ते आकर्षक जीवनाच्या लोभानें येत नाहींत. जमीन, इतर धन व गुलामासारखी राबण्यास मिळणारीं माणसें, यांसाठीं ते येतात. मोंगल यासाठींच आले. फ्रेंच, पोर्तुगीज, डच, इंग्रज यासाठींच आले. हल्लींचे आक्रमक तर केवळ भूमीसाठींच येतात. माणसांचा संहार करून आपल्या माणसांना उद्योग मिळवून द्यावा हा त्यांचा हेतु असतो. हिटलर, मुसोलिनी यांनीं हे हेतु जाहीर केले होते. इंग्रज हिंदुस्थानांत आले, ते येथील धनाची कीर्ति ऐकून आले असतील. पण ते अमेरिका, अर्जेंटिना, कॅनडा, ऑस्ट्रेलिया, आफ्रिका, इजिप्त, अरबस्तान, न्यूझीलंड या देशांत तेथील जीवन आकर्षक होतें म्हणून गेले नाहींत. तेव्हां आपण अगदीं रंडकें व सुतकी जीवन अवलंबिलें तरी आक्रमक थांबणार नाहीं. तो येणारच.

हें जें आक्रमण येणार त्याचा अहिंसेनें व सत्याग्रहानें प्रतिकार करणें कितपत शक्य आहे, याचा विचार आपण मागेंच केला आहे. प्रत्यक्ष महात्माजींनासुद्धां तें साधलें नाहीं. त्यांनीं ज्या सत्याग्रहमोहिमा केल्या, त्या सर्व निःशस्त्रप्रतिकार मोहिमा झाल्या आणि त्यांनीं जनताजागृति फक्त झाली.

शेवटी हें संग्राम सशस्त्र क्रान्तीचेंच रूप घेऊं लागले होते. याचा अर्थ असा कीं, आरंभीं जरी प्रतिकार अहिंसक असला, तरी शत्रूला पराभूत करून त्याला हद्दपार करण्यास सशस्त्र युद्धावांचून अन्य उपाय नाहीं. आणि हे सत्याग्रह-संग्राम, अहिंसेचे संग्राम, हे सुद्धां इंग्रजासारखे थोडे सौम्य, प्रारंभीं तरी कायद्याच्या आश्रयानें चालणारे राज्यकर्ते असले तर चालणार. गांधी-वादाचे एक प्रमुख पुरस्कर्ते आचार्य शं. द. जावडेकर यांनीं 'भारतीय क्रान्ति व राष्ट्रसभा' या आपल्या लहान पुस्तकांत एक मोठा समंजस विचार मांडला आहे. 'ब्रिटिश सरकार आरंभीं पुष्कळसें कायद्याच्या आश्रयानें राज्य करीत होतें. त्यामुळें त्या वेळीं राष्ट्रसभेनें जुनें सत्याग्रही तंत्र स्वीकारलें; पण पुढें सरकार रानटी झालें. दंडुक्यानें राज्य करूं लागलें. अशा स्थितींत प्रजेनें अहिंसा बाजूस ठेवून प्रतिकार केला तर तिला दोष न देतां तिचें अभिनंदन करणें प्रत्येक अहिंसावाद्याचें कर्तव्य आहे.' (पृ. १६). याचा अर्थ स्पष्ट आहे. कांहीं एका मर्यादेपलीकडे अहिंसेनें जुलमाचा प्रतीकार करणें शक्य नाहीं, असाच आचार्यांचा अभिप्राय आहे. हें प्रस्थापित सरकारविषयीं झालें. मग झंझावाताप्रमाणें आक्रमण करून येणाऱ्या पाशवी सत्तेचा प्रतीकार अहिंसेनें करूं पहाणें किती हास्यापद आहे हें सहज कळून येईल. आणि अशा रीतीनें स्वसंरक्षणासाठीं सर्व लष्करी सिद्धता अवश्य आहे असें ठरल्यावर ग्रामवादांतील अल्पयंत्रनिष्ठ उत्पादन समाजाच्या गरजा भागविण्यास अत्यंत अपुरें पडेल हें निराळें सांगण्याची गरज नाहीं. आणि हें ध्यानांत घेतल्यावर ग्रामवाद ही एक कविकल्पना म्हणून सोडून देणें प्राप्त आहे.

## विकेन्द्रीकरण

समाजवादावर ग्रामवादाचा मुख्य आक्षेप आहे, तो त्यांतील औद्योगिक केन्द्रीकरणाविषयीं. महायंत्रोत्पादन हें केंद्रीकरणावांचून अशक्य आहे. आणि आपण उद्योगाचें व धनाचें केन्द्रीकरण स्वीकारलें कीं सत्तेचें केन्द्रीकरण हें अटळ आहे असें ग्रामवादाचें म्हणणें आहे. २१ जुलै १९५० च्या भारत-ज्योतीमध्यें आचार्य कृपलानी यांनीं आपल्या 'सेव्ह स्वार्दा टु सेव्ह डेमॉक्रसी' या लेखांत हेंच प्रतिपादन केलें आहे. सत्तेचें केन्द्रीकरण म्हणजे लोकशाहीचा

अंतच होय, म्हणून लोकशाहीसाठीं विकेंद्रीकरण अवश्य आहे, असें या पक्षाचें म्हणणें आहे. या म्हणण्यांत एक फार मोठा हेत्वाभास आहे.

आज रशियामध्यें समाजवादाच्या नांवाखालीं अत्यंत अनियंत्रित अशी दंडसत्ता प्रस्थापित झालेली आहे. तिच्याकडे बोट दाखवून महायंत्रोत्पादनावर आक्षेप घेण्यांत येतो. भांडवलशाहीमध्यें जे कारखाने व जें धन कांहीं कंपन्यांच्या हातीं असतें ते कारखाने व तें धन नव्या व्यवस्थेंत सरकारच्या हातीं जाईल; पण यामुळें फरक कांहींच होत नाहीं. अल्पसंख्यांच्या हातीं सत्ता केन्द्रीत व्हावयाची ती होतेच. कारण सरकार म्हणजे तरी एक दहापांच व्यक्तींचें मंडळच होय. त्याच्या हातीं सत्ता गेली, कीं तें भांडवलदाराप्रमाणें धन व सत्ता यांच्या लोभानें प्रजेचें शोषण करणारच. यामुळें भांडवलशाही व समाजवाद यांच्यांत कांहींच फरक रहात नाहीं, असा ग्रामवादाचा आक्षेप आहे. लोकमत जेथें अजागृत आहे, असंघटित आहे, सरकारच्या निग्रहानुग्रहास असमर्थ आहे, तेथें राष्ट्रीयीकरणाचा हा परिणाम होईल हें खरें; पण अशा समाजांत लोकशाही आहे किंवा तो समाज लोकशाहीस पात्र आहे, असें कोणीच म्हणत नाहीं. पण जे समाजवाद प्रस्थापित करूं पहातात, ते लोकमत जागृत करण्याचे विश्वप्रयत्न केले पाहिजेत याच मताचे आहेत. आणि जेथें लोकमत जागृत, संघटित व प्रभावी आहे तेथें यंत्राचें, उद्योगाचें व धनाचें कितीहि केन्द्रीकरण झालें तरी सत्तेचें केन्द्रीकरण होणें शक्य नाहीं. ब्रिटनमध्यें आपले सत्ताधीश जुलमी आहेत, नालायक आहेत, कर्तृत्वशून्य आहेत असें दिसतांच तेथील जागृत जनता त्यांना तत्काळ पदच्युत करते. अशा जनतेला कारखान्यांच्या व्यवस्थापकांना सहज वेसण घालतां येईल. गांधीवादाला हें म्हणणें या ठिकाणीं मान्य नसलें तरी अन्यत्र मान्य आहे. जमीनदार व भांडवलदार यांचें धन एकदम हिरावून न घेतां त्यांना विश्वस्ताप्रमाणें त्याचा वापर करण्यास सांगावें असें ग्रामवाद म्हणतो व जागृत लोकमताच्या बळावर त्यांना तसें करण्यास भाग पाडतां येईल, असा विश्वास बाळगतो. हाच विश्वास समाजवादानें बाळगला तर वास्तविक ग्रामवादानें त्यावर आक्षेप घेऊं नये. पण ग्रामवादानें अज्ञानानें तसा घेतला आहे. पण तो अगदीं फोल आहे. रशियांत उद्योगधंदे राष्ट्राच्या म्हणजे सरकारच्या मालकीचे होतांच

तेथें अत्यंत अनियंत्रित सुलतानी सत्ता प्रस्थापित झाली. याचें कारण हेंच कीं, तेथील जनता कधींच जागृत नव्हती; तेव्हां तेथें समाजवादाचा प्रयोग झालाच नाहीं असें म्हटलें पाहिजे.

जागृत लोकमत हा लोकशाहीचा मूलाधार होय. तें गृहीत धरलें तर महायंत्रोत्पादनामुळें होणाऱ्या केंद्रीकरणाला भिण्याचें कारण नाहीं. आणि तें गृहीत धरलें नाहीं, तर ग्रामवादांतहि लोकशाही जगणें शक्य नाहीं. उद्योगधंदे अगदीं अल्परूप असले तरी, जनता प्रभावी नसेल तर, कोणताहि गावगुंड ते आपल्या ताब्यांत घेऊन समाजाचें शोषण करूं शकेल. मागल्या काळांत उद्योगधंदे अगदीं कमालीचे अल्परूप होते. पण कोणीहि येऊन प्रजेला लुबाडावें, वसुली करावी, नागवावें अशी स्थिति होती. देशमुख, देशपांडे, जहागीरदार, जमीनदार यांची सत्ता खेड्यावर अगदीं अप्रतिहत चालत असे. हे लोक म्हणजे मूर्तिमंत अनियंत्रितता होती. त्या काळीं लोकशाही होती, ग्रामाच्या लहान परिसरांत प्रजासत्ता होती हा केवळ भ्रम होय. प्रारंभीच्या प्रकरणांत याचें सविस्तर विवेचन केलेंच आहे. तेव्हां यावरून हें ध्यानीं येईल कीं, उद्योगधंद्यांच्या केंद्रीकरणावर वा विकेंद्रीकरणावर कांहीं अवलंबून नाहीं. जनता जागृत असून तिचें मत प्रभावी असेल तर वाटेल तितकें केंद्रीकरण झालें तरी ती सत्तेचें केंद्रीकरण होऊं देणार नाहीं आणि ती दुबळी, अज्ञ व असंघटित असेल तर सर्वस्वीं हातव्यवसायनिष्ठ उद्योगधंदे असले तरी सत्ता केंद्रित झाल्यावांचून रहाणार नाहीं. ब्रिटिश राज्यकर्त्यांच्या हातीं सत्ता, धन, सामर्थ्य या सर्वांचें केंद्रीकरण झालें होतें; पण महात्माजींनीं जनता जागृत करून ती सत्ता त्यांच्या हातून हिरावून घेतली. जमीनदार, भांडवलदार यांच्या हातीं त्यांचें सर्व धन व उत्पादनसाधनें तशींच ठेवूनहि त्यांचें नियंत्रण आपण जागृत लोकमताच्या प्रभावानें करूं शकूं, असा त्या पक्षाचा विश्वास आहे. असें असतांना त्यांनीं समाजवादांतील केंद्रीकरणावर आक्षेप घ्यावा, हें एक अनाकलनीय असें गूढ आहे.

महायंत्रोत्पादनानें बेकारी येते, हा आक्षेपहि असाच भ्रामक आहे. एक यंत्र शंभर माणसांचें काम करतें, तेव्हां तें वापरल्यास शंभर माणसें बेकार होतात, असा बालसुलभ हिशेब देऊन ग्रामवाद यंत्रावर आक्षेप घेऊं पहातो.

पण ही सर्व आपत्ति सध्यांच्या विस्कळित समाजांत यंत्र आल्यामुळें आलेली आहे. नव्या समाजाला जुन्यापेक्षां सहस्रपटीनें जास्त धन लागणार आहे हें ध्यानांत घेतलें आणि तो समाज योजनाबद्ध होणार आहे हें गृहीत धरलें, तर बेकारीचा विचार कोणाच्या स्वप्नांतहि येणार नाहीं. किमान गरजा भागवितांनाच समाजांत सर्वांना पुरेसें काम मिळेल. मग गरजा वाढविण्याचें समाजवादाचें तत्त्व अंगीकारल्यानंतर तर बेकारीचा प्रश्नच उरणार नाहीं. भांडवलदारी समाजव्यवस्थेंत उत्पादन हें नफ्यासाठीं करण्याचें धोरण असें. त्यामुळें बेकारीची आपत्ति अटळ होती; पण समाजवादी व्यवस्थेंत जें धन उत्पन्न होणार तें समाजाच्या भोगवट्यासाठींच होणार असल्यामुळें त्यांत मर्यादेचा प्रश्नच येणार नाहीं. सर्वांना कामधंदा पुरवितांना उत्पादन जास्त झालें, तर ती आपत्ति नसून ती संपत्ति ठरेल. कारण न्याय्य विभजन होणार असल्यामुळें प्रत्येकाच्या वांट्याला जास्त सुखसाधनें येतील. तेव्हां आजची विस्कळित बेबंद समाजव्यवस्था जमेस धरून समाजवादावर आक्षेप घेण्यांत अर्थ नाहीं. ती गृहीत धरली तर ग्रामवाद तरी बेकारी कशी घालविणार आहे ? मागें सोलापूरच्या परिषदेंत विणकरांच्या उत्पन्नाचा जो हिशेब प्रा. रंगा यांनीं दिला तो अगदींच निराशाजनक आहे. हातमाग चालविले तर कापडाच्या एक तृतीयांश व्यवसायांत दोन कोटी लोक पोट भरतात. तेच गिरण्या चालविल्या तर दोन तृतीयांश व्यवसायांत वीस लक्षांनाच काम मिळतें असा मोठा उदार हिशेब त्यांनीं सांगितला. पण त्या दोन कोटींचें उत्पन्न किती ? हे दोन कोटी लोक १६० कोटी वार कापड तयार करतात. म्हणजे प्रत्येकीं वर्षाला ८० वार कापडाची निर्मिति. एक रुपया वार कापड धरलें तर वर्षाला प्रत्येकीं उत्पन्न ८० रु. म्हणजे महिना साडेसहा रुपये ! आणि हें उत्पन्न जमेला धरून याच्या आधारें ग्रामवादी लोक निर्मितीचा आनंद, मानवाचें व्यक्तित्व, त्याचें स्वातंत्र्य, ती ग्रामीण स्वच्छंदता व निरागसता यांवर भाषणें करतात !

## ग्रामवादाचा ठिसूळ पाया

पण ग्रामवादानें आपल्या देशावर जी सर्वांत मोठी आपत्ति येणार आहे, ती निराळीच आहे. ग्रामवादांत निवृत्ति, वैराग्य व अल्पसंतुष्टता

हीं गृहीत धरलीं आहेत. हातव्यवसायाच्या जोडीला लहान यंत्रें देऊनहि ग्रामवाद समृद्धि अशी कधींच निर्माण करूं शकणार नाहीं. सर्व लोकांनीं साध्या रहाणीवर संतुष्ट राहिलें पाहिजे, असा त्याचा आग्रह आहे. भरड कापड, कागद, गवती छपराचीं घरें, लोखंडी सामानहि बोजड, प्रवासाच्या बेताच्या सोयी यांवर शेकडा शंभर लोकांनीं संतुष्ट राहिलें पाहिजे. आणि तें संक्रमण-कालापुरतें असें नव्हे. तर जन्मोजन्मीं! कारण यापेक्षां जास्त धन ग्रामवादांत कधींच निर्माण करणें शक्य नाहीं. मानवी मनोवृत्तीचा अगदीं अल्प जरी विचार केला, तरी हा निवृत्तीचा विचार किती घातकी आहे तें ध्यानांत येईल. मानवी प्रवृत्तीचा सर्व ओघ करणरूप कृतीकडे, 'अस्ती' कडे, अधिकाकडे, आहे. अकरणरूप किंवा ऋण कल्पना तिला मानवत नाहींत. 'नास्ति', 'निवृत्ति', 'ऋणप्रवृत्ति' हें मानवावर लादणें अगोदर अशक्य आहे. आणि तें लादलें तर मानव मिथ्याचारास प्रवृत्त होऊन त्याचा अधःपात होतो. भोगावें, चढावें, प्रतीकार करावा, गगनाला जावें, आक्रमावें, व्यापावें या त्याच्या प्रवृत्ति आहेत. यांना कांहीं मर्यादा घालतां येतील. कांहीं काळ जरा जास्त कठोर बंधनांत त्या ठेवतां येतील; पण समाज हा धनदिशा कायमची सोडून ऋण दिशेला जाण्याची अपेक्षां करणें अगदीं भयावह आहे. उत्तम कापड नाहीं. उत्तम घर नाहीं. सुखविलास नाहींत. कधींहि प्रतिकार नाहीं. परचक्राला तर नाहींच; पण चोर-दरवडेखोर आले तरी त्यांचा प्रतिकार न करतां त्यांच्या गांवाला संतमंडळ पाठवावयाचें व त्यांना शिक्षण देऊन संतुष्ट करावयाचें! आणि ही अपेक्षा बहुसंख्यांकडून! बहुसंख्यांकडून उच्च त्याग, सत्त्ववृत्ति, अहिंसा, असंग्रह यांची कायम अपेक्षा करीत गेल्यास ते गुण तर दिसणार नाहींतच, पण त्यांचा कमालीचा अधःपात मात्र होईल. त्याग, अप्रतीकार यांचा उपदेश करतांना विशाल मन, कमालीची उदार वृत्ति, निर्लोभता हीं गृहीत धरलेलीं असतात. बहुसंख्यांकडून हें अपेक्षिणें व्यर्थ आहे. आणि या गुणांच्या अभावीं अप्रतिकार म्हणजे भ्याडपणा व त्याग म्हणजे मनाचें दैन्य असा अर्थ होतो. ग्रामवादाचा हा परिणाम अटळ आहे. आणि समाज असा दीनदुबळा झाला, कीं जें कांहीं अल्प धन तो निर्माण करील तें अल्पसंख्य असे साहसी, आक्रमक, मदमस्त व गुंडप्रवृत्तीचे लोक बळकावून बसतील.

मग लोकशाही बारा वाटां पळून जाईल. ग्रामवादामध्यें कारस्थानी व मस्त लोकांना सध्यांच्या समाजापेक्षां अनेक पटींनें जास्त संधि मिळण्याचा संभव आहे. कारण त्या व्यवस्थेंत माणसाच्या सत्त्ववृत्ति हिशेबाबाहेर गृहीत धरलेल्या आहेत. हातशक्तीनें जो माल करावयाचा तो यंत्रशक्तीनें कोणी निर्माण करावयाचा नाहीं, असा कायदा ग्रामवाद करणार. यांतून किती पळवाटा काढणें शक्य आहे हें सहज ध्यानांत येईल. आणि कोणींहि गुप्तपणें तसा माल काढला कीं हातमालाचें वाटोळें झालेंच म्हणून समजावें. त्याचप्रमाणें ग्रामवादाचा स्वदेशीधर्महि फार बिकट आहे. दहापांच किंवा वीसपंचवीस ग्रामांचा जो गट ठरविला जाईल त्यांत निर्माण होणारा मालच प्रत्येकानें वापरला पाहिजे, असा स्वदेशीचा कायदा होणार. आतांपर्यंत ज्या आयात जकाती प्रांतांच्या किंवा देशाच्या हद्दीवर असत त्या, आतां प्रत्येक गटाच्या हद्दीवर येणार. खेड्यांतून हा बंदोबस्त चुकवून माल आणणें फारच सोपें असतें हें सर्वांना ठाऊक आहेच. शिवाय आपल्या परिसरांत दुसरा माल येणार नाहीं अशी खात्री झाल्यावर तेथील कामगार उत्तम माल काढण्याची कसोशी करणार नाहींत. आणि किंमतीहि वाढवितील, असा संभव आहे. पण ग्रामवादी पंडितांच्या मतें असें होणार नाहीं. माणसें प्रामाणिकपणें वागतील असें त्यांनीं गृहीत धरलेलें आहे. मानवी सत्त्ववृत्तीला इतका ताण दिला तर ती तत्काळ तुटून गेल्याखेरीज रहाणार नाहीं; आणि समाजव्यवस्था तिच्यावरच उभी असल्यामुळें तीहि तत्काळ कोसळून पडेल.

तेव्हां अशी भलतीच सत्त्ववृत्ति गृहीत न धरतां समाजाच्या जागरूकतेवरच सर्व भार ठेवणें अवश्य आहे. आणि तेंच समाजवादाचें तत्त्व आहे. जागृत, संघटित निग्रहानुग्रहसमर्थ असें लोकमत असल्यावांचून कोणत्याहि प्रकारची लोकशाही तगणार नाहीं. लोकसत्ता हा अखंड जागर, अहोरात्रीचा जागर आहे. त्यांत तिळमात्र कसूर झाली तर सर्वनाश आहे. मग ती लोकशाही समाजवादी असो अगर ग्रामवादी असो. मानव हा कितीहि सत्त्वस्थ असला तरी स्वार्थ, लोभ, वासना यांच्या अधीन तो होणारच हें धरून चाललें पाहिजे. त्याच्या सत्त्ववृत्तीला अवाहन करीत राहिलें पाहिजे हें खरें. आणि सध्यांपेक्षां सत्त्ववृत्तींचें प्रमाण वाढलें नाहीं तर लोकशाही

टिकणार नाहीं हेंहि खरें. पण या प्रमाणांत भलतीच वाढ होईल ही आशा धरून समाजरचना करणें घातक ठरेल. म्हणून कोणच्याहि लोकशाहीनें जाग्रत लोकमतावरच सर्व भार ठेवला पाहिजे. तें ज्या देशाला निर्मितां येईल त्याला महायंत्रोत्पादनाची व केंद्रीकरणाची भीति बाळगण्याचें कारण नाहीं.

महायंत्रोत्पादनाचा असा आग्रह धरण्याचें मुख्य कारण म्हणजे त्यांतून निर्माण होणारी समृद्धि हें होय. समृद्धि, अलोट, अपार, कल्पनातीत समृद्धि असल्यावांचून बहुजनांच्या लोकशाहीची भाषा उच्चारतां सुद्धां येणार नाहीं. आणि बहुजनांची लोकसत्ता हें तर भारताचें ध्येय आहे. तेव्हां ग्रामवाद हा त्यानें सर्वस्वी त्याज्य मानला पाहिजे.

आरंभीं म्हटलेंच आहे, कीं ग्रामवाद हें गांधीवादांतलें फार महत्त्वाचें तत्त्व आहे. कारण भारताची भावी रचना त्या तत्त्वानुसार करावी असें गांधीवादी पंडितांचें मत आहे. त्या ग्रामवादाचें येथवर विवेचन केलें. आतां त्याचा समारोप करावयाचा. महात्माजींचे पट्टशिष्य व सध्यांचे भारताचे भाग्यविधाते पंडित जवाहिरलालजी यांच्याच शब्दांत तो करणें हें अतिशय सयुक्तिक होईल. आपल्या आत्मचरित्रांत ते म्हणतात, " आणि पुन्हां एकदां गांधीजींच्या उलटसुलट धोरणाचा विचार मनांत येतो. एवढी कुशाग्रबुद्धि असून आणि दलित वर्गाविषयीं मनांत धगधगती आस्था असून मरणोन्मुख, कष्टप्रद आणि अनर्थावह अशा पद्धतीचा त्यांनीं काय म्हणून कैवार घ्यावा ? प्रगतीच्या मार्गांत खळगे खणून ठेवणाऱ्या जुन्या समाजपद्धतीच्या अवशेषांवर म्हणजे जमीनदार, तालुकदार, भांडवलदार यांच्यावर ते आपला वरदहस्त ठेवीतच आहेत, हें काय ! व्यक्तीच्या हातीं अमर्याद सत्ता व संपत्ति ठेवावयाची आणि मग तिचा उपयोग ती सर्वस्वीं जनहितासाठींच करील अशी उमद बाळगावयाची, ही निधिधारकत्वाची कल्पना बुद्धीला कितपत पटते ! प्लेटोच्या कल्पनासृष्टींतल्या राजर्षींनासुद्धां ही जबाबदारी संभाळणें जड गेलें असतें. आणि जनतेच्या दृष्टीनें विचार केला, तरी अशीं अतिमानवी माणसें तिच्या डोक्यावर बसविणें कितपत हिताचें ठरेल ! ...कांहीं काँग्रेसनेत्यांच्या छातींत औद्योगीकरण म्हटलें कीं धडकी भरते. औद्योगिक राष्ट्रांत दिसून येणाऱ्या सर्व आपत्ति यांत्रिक उत्पादनामुळें उद्भवतात, अशी त्यांची समजूत

असावी. वस्तुस्थितीसंबंधींचें हें अज्ञान मोठें विलक्षण आहे. जनतेच्या गरजा भागत नसतील, तर पुरेसें उत्पादन करण्यांत बिघडलें कोठें ? नेहमींच दुष्काळांत खिचपण्यापेक्षां मोठ्या प्रमाणावर उत्पादन करणें बरें नव्हे काय !

या व इतर अनेक कारणांमुळें आमचे शेतकीविषयक व औद्योगिक प्रश्न संकुचित अशा स्वयंपूर्णतेच्या तत्त्वानें सुटणें इष्ट अथवा संभाव्य नाहीं, असें माझें मत झालें आहे व हीं कारणें आपल्या राष्ट्रीय जीवनाच्या सर्वच पैलूंना लागूं पडतील अशीं आहेत. संदिग्ध व भावनामय शब्दांच्या पसाऱ्यांत बुडी मारून बसणें योग्य होणार नाहीं. आपण परिस्थिति पारखून आपल्यांत फेरफार केला पाहिजे; तरच इतिहासाच्या हातची शिकार होण्याऐवजीं आपणाला इतिहासाच्या पाठीवर स्वार होतां येईल. " (पृ. ५३२)

---

## प्रकरण आठवें

# भारतीय लोकसत्ता व समाजवाद.

### १

लोकसत्ता जी काय थोडीफार यशस्वी झाली, ती अमेरिका व ब्रिटन आणि पश्चिम युरोपांतील स्वित्झरलंड व हॉलंड या देशांत झाली. तें यश मिळविण्यासाठीं त्या समाजांना गेल्या चारपांच शतकांत पांच भिन्न युगांतून प्रवास करावा लागला. विद्या व बुद्धिप्रामाण्य यांचें उज्जीवन ( रेनेसान्स ), धर्मसुधारणा ( रेफर्मेशन ), समताबंधुतास्वातंत्र्य ( फ्रेंच रेव्होल्यूशन ), राष्ट्रनिष्ठा ( नॅशनॅलिझम् ) व समाजवाद ( सोशॅलिझम् ) हीं तीं युगें होत. युरोपचा अर्वाचीन इतिहास हा या भिन्न युगांचा म्हणजेच या तत्त्वज्ञानांचा इतिहास आहे. मध्ययुगीन युरोप व अर्वाचीन युरोप याच्यांतला फरक म्हणजे हाच होय. या दृष्टीनें युरोपांतील जीं राष्ट्रें अर्वाचीन झालीं, तींच जगांत उदयाला येऊन समर्थ झालीं व तेथेंच लोकशाही थोडीफार मूळ धरूं शकली. स्पेन, पोलंड, झेकोस्लोव्हाकिया आणि पूर्व युरोपांतील राशिया

व बाल्कन राष्ट्रक यांनीं या नवतत्त्वज्ञानाचा स्वीकार केला नाहीं; म्हणून तीं या विसाव्या शतकाच्या प्रारंभापर्यंत अज्ञान, दण्डसत्ता व शब्दप्रामाण्य या नरकांत खितपत पडलीं होतीं. त्यांना स्वतःचें स्वातंत्र्यहि टिकवितां आलें नाहीं; मग लोकसत्ता दूरच राहिली. यावरून हा सिद्धांत ध्यानांत येईल कीं, लोकसत्ता यशस्वी व्हावयास समाज मध्ययुगांतून निघून अर्वाचीन युगांत येणें अवश्य असतें; आणि अर्वाचीन युगांत येणें म्हणजे बुद्धिप्रामाण्य, धर्मसुधारणा, समता, राष्ट्रनिष्ठा व समाजवाद या तत्त्वज्ञानांचा अवलंब करून त्या पायावर समाजाची पुनर्घटना करणें होय. भारतीय लोकसत्तेचा गेल्या शंभर वर्षांचा जो इतिहास आपण पाहिला, त्यावरून आपणांस हें दिसून आलें आहे कीं, या शतकांतील आपल्या थोर नेत्यांनीं याच मार्गानें पावलें टाकलीं आहेत. राममोहन, रानडे, आगरकर, विवेकानंद, दादाभाई, टिळक व महात्माजी यांनीं, युरोपांत तीनचारशें वर्षें जीं तत्त्वज्ञानें रुजत होतीं व फुलत होतीं, त्यांचाच स्वीकार करून भारतीय समाजाला अर्वाचीन युगांत आणून सोडलें. आपलें हें भारतीय राष्ट्र समर्थ होऊन आपण नव्यानें प्रस्थापित केलेली लोकसत्ता यशस्वी होईल अशी आशा वाटते, याचें हेंच कारण होय. १९३० पर्यंत पश्चिम युरोपच्याच धोरणानें प्रवास करून रेनेसान्स, रेफर्मेशन, रेव्होल्यूशन व नॅशनॅलिझम या समाजरचनेच्या मूल तत्त्वांचा आपण अंगीकार केला, तीं थोडीबहुत आत्मसातहि केलीं आणि त्यानंतर पश्चिम युरोप ज्याप्रमाणें राष्ट्रनिष्ठेनंतर समाजवादाकडे निघाला आहे, त्याचप्रमाणें आपणहि त्या नव्या धर्माची दीक्षा आपल्या समाजाला देण्याचा प्रयत्न करीत आहोंत. भारतीय लोकसत्तेचा गेल्या सात प्रकरणांत आपण जो विचार केला, त्यांत वरील चार युगतत्त्वांचा आपण अभ्यास केला. आतां मार्क्सप्रणीत तत्त्वज्ञानाच्या प्रेरणेनें भारतांत ज्या समाजवादी चळवळी झाल्या व होत आहेत, त्यांचा अभ्यास करून भारतीय लोकसत्तेच्या प्रगतीच्या दृष्टीनें त्यांचें मूल्यमापन करावयाचें आहे.

## राष्ट्रवाद व समाजवाद

काँग्रेस ही प्रारंभापासून राष्ट्रवादाचाच पुरस्कार करीत आली आहे. अर्थात् गेल्या शतकाच्या अखेरीस ज्या वेळीं या देशाच्या पुनर्घटनेस तिनें

आरंभ केला, त्या वेळीं तिच्या नेत्यांना राष्ट्रवादाशिवाय दुसऱ्या कोणच्याच तत्त्वज्ञानाचा परिचय झालेला नव्हता. आणि तसा परिचय होऊन त्याचा कांहीं उपयोगहि होण्यासारखा नव्हता. तेव्हां त्यांनीं राष्ट्रनिष्ठेच्या पायावरच आपली सर्व इमारत रचण्यास प्रारंभ केला हें सयुक्तिकच झालें. भिन्न जाति, भिन्न पंथ, भिन्न धर्म हे सर्व भेद आपल्या समाजांतून मावळले पाहिजेत आणि आपण सर्व या भारतमातेचीं लेकरें आहोंत ही भावना दृढ धरून आपण तिची सेवा केली पाहिजे, असा संदेश काँग्रेसच्या प्रत्येक अधिवेशनांत दिला जात असे. जातिभेद, धर्मभेद, प्रांतभेद याप्रमाणेंच आर्थिक विषमतेमुळें पडणाऱ्या भेदांचाहि उल्लेख केला जाई व आपल्या राष्ट्रीय कार्यांत या भेदांचाहि प्रभाव दिसतां कामा नये, असा उपदेश त्या वेळचे नेते करीत असत. हिंदु व मुसलमान, स्पृश्य व अस्पृश्य, यांच्याप्रमाणेंच श्रीमंत व गरीब हाहि भेद राष्ट्रकार्यांत आपण दृष्टीआड केला पाहिजे, असें त्या वेळचे नेते कळकळीनें प्रतिपादन करीत असत; आणि पुढें ब्रिटिशांशीं लढा करण्याची भाषा सुरू झाली, त्यावेळीं ब्रिटिशांचें राज्य नष्ट करून स्वातंत्र्य मिळविण्यांत या सर्वांचें सारखेंच हित आहे असा विचार सर्वत्र रूढविला जात असे. शेतकरी व कामकरी या वर्गांचें स्वतंत्र अस्तित्व व त्यांचे भिन्न हितसंबंध लोकांच्या ध्यानांतच आले नव्हते, असा याचा अर्थ नाहीं. शेतकऱ्यांविषयीं तर असें म्हणणें कदापि शक्य नाहीं. लोकमान्य टिळकांनीं या वर्गाचें महत्त्व जाणून, काँग्रेसमध्यें हाच वर्ग प्रामुख्यानें आला पाहिजे, हें सांगून, १८९६ पासून सार्वजनिक सभेमार्फत शेतकऱ्यांच्या चळवळीस प्रारंभहि केला होता; आणि महात्माजींनीं चंपारण्य, बार्डोली हे लढे शेतकऱ्यांच्या जागृतीसाठींच केले होते. १९१८ नंतर, कारखान्यांतील कामकऱ्यांचा जो स्वतंत्र वर्ग, त्याच्या स्वतंत्र अस्तित्वाची जाणीवहि तत्कालीन नेत्यांना झालेली स्पष्टपणें दिसते. लाला लजपतराय, चित्तरंजन दास हे काँग्रेसचे नेते ऑल इंडिया ट्रेड युनियन काँग्रेसचेहि अध्यक्ष झाले होते आणि त्यांच्या स्वतंत्र चळवळीचें महत्त्वहि त्यांनीं मान्य केलें होतें. पण टिळक, गांधी, लालाजी व दास यांनीं जें कार्य केलें तें सर्व राष्ट्रीय भूमिकेवरून केलें होतें. ज्या भूमिकेवरून हिंदुमुसलमानांच्या किंवा उच्चनीच जातींच्या ऐक्याचें ते प्रतिपादन करीत, त्याच भूमिकेवरून शेतकरी व जमीनदार किंवा मजूर व

भांडवलदार यांच्या ऐक्याचा ते उपदेश करीत. ब्रिटिश हे आपले शत्रू आहेत, त्यांच्याशीं लढून आपणांस स्वातंत्र्य मिळवावयाचें आहे आणि त्यासाठीं आपसांतील सर्व प्रकारचे भेद विसरून आपण संघटना केली पाहिजे, ही त्यांची भूमिका होती. शेतकरी व कामकरी यांचीं स्वतंत्र दुःखें व स्वतंत्र हितसंबंध आहेत हें त्यांना मान्य होतें; पण जशीं अस्पृश्यांचीं किंवा अल्पसंख्यांचीं दुःखें तशींच हीं आहेत, ते आपसांतले प्रश्न आहेत, राष्ट्रीय संटघनेच्या व राष्ट्रीय लढ्याच्या आड ते येतां कामा नयेत, असें त्यांचें धोरण होतें.

१९२० सालानंतर वर सांगितलेली जी राष्ट्रवादाची भूमिका तिच्याहून अगदीं निराळें व तिच्याशीं बरेंचसें विसंगत असें एक तत्त्व उदयास येऊं लागलें व १९२८ सालापासून त्याचें स्पष्ट प्रतिपादन होऊं लागलें. शेतकरी व कामकरी या वर्गांचे हितसंबंध आणि जमीनदार व भांडवलदार यांचे हितसंबंध एक आहेत व राष्ट्रीय स्वातंत्र्याच्या लढ्यांत यश आल्यास त्या भिन्न वर्गांचें सारखेंच कल्याण होणार आहे, हा राष्ट्रवादांतील सिद्धांत या तत्त्वानें अमान्य केला. भारतांतून ब्रिटिशांचें राज्य नष्ट झालें व त्या ठिकाणीं हिंदी भांडवलदारजमीनदारांचें राज्य आलें तरी, तें ब्रिटिशांइतकेंच परकीय होय, असें हा नवा पंथ प्रतिपादूं लागला. ब्रिटिशांच्या राज्यांत शेतकरी-कामकऱ्यांची जी दैन्याची व हलाखीची अवस्था आहे, त्या वर्गावर जो अन्याय व जुलूम होत आहे, त्याची जी पिळणूक व शोषण या परकीय राज्यांत चालू आहे, तेंच शोषण, तीच पिळणूक हिंदी भांडवलदार-जमीनदारांच्या राज्यांतहि तशीच चालू राहील, त्यांत रतिमात्र फरक होणार नाहीं, असें समाजवादाचा अभ्यास केलेले तरुण लोक सांगूं लागले आणि हें नवें तत्त्वज्ञान अंगीकारून लढयाचें स्वरूप बदललें पाहिजे, असा त्यांचा आग्रह सुरू झाला. त्यांचें म्हणणें असें कीं, ब्रिटिशांशीं आपण लढा केला पाहिजे हें खरें, पण त्या लढयांत शेतकरी आणि जमीनदार-भांडवलदार यांची एक आघाडी होणें शक्य नाहीं. ब्रिटिशांइतकेच येथले जमीनदार, भांडवलदार हे देशाचे शत्रू आहेत आणि म्हणून शेतकरी व कामकरी यांची संघटना करून स्वातंत्र्याच्या लढ्याचा एक भाग म्हणूनच या धनिकवर्गाशीं आपण लढा सुरू केला पाहिजे. या एकाच लढयांत

येथले व परकीय भांडवलवाले भस्म होतील आणि तसें झालें म्हणजे मग भारताला खरेंखुरें स्वातंत्र्य मिळेल. सारांश, अखिल हिंदी लोक हा एक पक्ष व ब्रिटिश लोक हा दुसरा पक्ष, अशी राष्ट्रवादप्रणीत विभागणी न करतां हिंदी कामकरी–शेतकरीजनता हा एक पक्ष आणि ब्रिटिश व हिंदी भांडवलदार–जमीनदार हा दुसरा पक्ष, अशी मार्क्सवादप्रणीत विभागणी करून भारतीय स्वातंत्र्याचा लढा करावा, असें या नव्यानें उदयास आलेल्या तत्त्वज्ञानाचें प्रतिपादन होऊं लागलें. समाजवादी भूमिका ती हीच होय.

## रशियाचा संदेश

भारतामध्यें समाजवादी विचार व तत्त्वज्ञान प्रसृत करून त्या अन्वयें येथें चळवळी करण्यास प्रथमतः डांगे, मिरजकर, जोगळेकर, अधिकारी, निंबकर प्रभृति आज कम्युनिस्टपंथीय म्हणून प्रसिद्ध असलेल्या पुढाऱ्यांनीं प्रारंभ केला. रशियांत १९१७ अखेर कम्युनिस्ट क्रांति झाली. आणि पांचसहा भांडवली राष्ट्रांनीं केलेलें आक्रमण तोडून काढून तेथें कम्युनिस्टपक्ष विजयी झाला. या त्याच्या यशामुळें जगाचे डोळे दिपून गेले व निराश झालेल्या जगाला एक नवा संदेश मिळाला. आतांपर्यंत जगाला संदेश फक्त अमेरिका, ब्रिटन, फ्रान्स, जर्मनी या राष्ट्रांकडूनच मिळत असे आणि भारतीय जीवनाचा आतांपर्यंतचा विकास ब्रिटनमधून आलेल्या तत्त्वज्ञानाच्या साह्यानेंच झालेला होता. व्यक्तिस्वातंत्र्य, लोकशाही, राष्ट्रनिष्ठा, उदारमतवाद, अनिर्बंध आर्थिक स्पर्धा, भांडवली कारखानदारी पद्धति, पार्लमेंट, निवडणुकी हीं तत्त्वें आणि याच्याच जोडीला शास्त्र, कला, साहित्य, शिक्षण, खेळ या क्षेत्रांतील भिन्न भिन्न तत्त्वें, मतें व विचार हें सर्व भारतानें ब्रिटनमधूनच स्वीकारलें होतें. म्हणजे अर्वाचीन भारतीय जीवनाचा पिंड हा ब्रिटिश संस्कृतीवर पोसलेला होता. १९२० सालापासून हा मनु थोडा पालटूं लागला व सोव्हिएट रशियांतील तत्त्वज्ञानाचा व संस्कृतीचा भारतीय जीवनावर थोडा थोडा प्रभाव पडूं लागला. डांगे, मिरजकर या कम्युनिस्टांची प्रेरणा सोव्हिएट रशिया ही होती हें तर स्पष्टच होतें; पण या क्षेत्रांत कार्य करणाऱ्या सर्वच कार्यकर्त्यांची ती प्रेरणा होती हें कमी अधिक प्रमाणांत सर्वांनीं मान्य केलें आहे. समाजवादी विचार प्रसृत करून

ते लोकप्रिय करण्याचें मोठें कार्य पंडित जवाहरलाल नेहरू यांनीं कॉंग्रेसमध्यें राहूनच केलें. त्यांनाहि सोव्हिएट रशियानेंच स्फूर्ति दिलेली होती. १९२७ सालीं पंडितजी सोव्हिएट रशियाच्या दहाव्या वाढदिवसासाठीं मॉस्कोला गेले होते. तेथें आपल्याला समाजवादाचा संदेश मिळाला, असें त्यांनीं स्वतःच आत्मचरित्रांत लिहून ठेविलें आहे. 'माझी दृष्टि फांकून केवळ राष्ट्रवाद हा खात्रीनेंच अपुरा व संकुचित आहे असें वाटूं लागलें. राजकीय स्वातंत्र्य अवश्यमेव पाहिजे यांत शंका नाहीं, पण समाजाचें व शासनयंत्राचें स्वरूप समाजवादानुसारी बनविल्याशिवाय देशाचा अगर व्यक्तीचा फारसा उद्धार होणें अशक्य आहे, असें वाटूं लागलें. कांहीं दुःखद घटना घडत असल्या तरी सोव्हिएट रशियाबद्दल माझ्या मनांत प्रेम उत्पन्न होऊन, जगाला देण्यासारखा कांहीं तरी संदेश रशियापाशीं आहे, असें माझें मन सांगूं लागलें.' असे त्यांचे निःसंदिग्ध उद्‌गार आहेत. कम्युनिस्ट व पंडितजी यांखेरीज भारतांत समाजवादी तत्त्वज्ञान प्रसृत करून आपल्या समाजाची पुनर्घटना करण्याची ईर्षा बाळगणारा तिसरा पक्ष म्हणजे सध्यांचा समाजवादीपक्ष होय. साथी जयप्रकाश नारायण, नरेन्द्र देव हे त्याचे नेते असून अशोक मेहेता, ना. ग. गोरे, पुरुषोत्तमदास त्रिकमदास प्रभृति मोठे कार्यकर्ते त्या पक्षांत आहेत. या पक्षाची स्थापना १९३४ सालीं झाली. प्रथम हा पक्ष कॉंग्रेसमध्येंच पण एक स्वतंत्र गट म्हणून कार्य करीत होता. कॉंग्रेसलाच समाजवादी तत्त्वज्ञान स्वीकारावयास लावावयाचें, अशी त्याची ईर्षा होती; पण त्याविषयीं निराश झाल्यावर आणि कॉंग्रेसनें स्वतःच्या संघटनेंत असे गट चालू द्यावयाचे नाहींत असा ठराव केल्यावर १९४८ सालीं हा गट कॉंग्रेसमधून बाहेर पडला व स्वतंत्र पक्ष म्हणून कार्य करूं लागला.

भारतांतील समाजवादी चळवळीचा लोकशाहीच्या दृष्टीनें अभ्यास करतांना कम्युनिस्ट पक्ष, पंडित जवाहरलाल व समाजवादी पक्ष या तिघांच्या कार्याचें विवेचन आपणांस केलें पाहिजे. पण तें करण्यापूर्वी कॉंग्रेसची या नव्या प्रेरणेविषयीं काय भूमिका होती तें पाहणें अवश्य आहे. कारण त्यावांचून या पक्षांच्या कार्यांचें सम्यक् आकलन होणार नाहीं.

## महात्माजींची भूमिका

या काळांतलें कॉंग्रेसचें धोरण म्हणजे बव्हंशीं महात्माजींचें धोरण होय. १९२० सालापासून ते कॉंग्रेसचे एकमेव सूत्रधार होते आणि त्यांच्याशीं कोणी कितीहि मतभेद व्यक्त केले तरी अंतिम निर्णय त्यांच्याच मताप्रमाणें होत असे, हें सर्वश्रुत आहे. समाजवादांत जी आर्थिक समता प्रतिपादिलेली आहे ती महात्माजींना संपूर्णपणें मान्य होती. कसेल त्याची जमीन व कारखान्यांत जो कष्ट करील त्याचें धन, हें तत्त्व यंग इंडिया, हरिजन या पत्रांत वेळोवेळीं त्यांनीं प्रतिपादिलेलें आहे. प्रत्येकाला अन्न, वस्त्र, शिक्षण हें हक्कानें मिळालें पाहिजे. ज्या समाजांत हें मिळणार नाहीं तो रसातळाला जाईल, हा विचारहि त्यांनीं अनेक वेळां सांगितला आहे. सध्यांची अर्थव्यवस्था, भांडवलदारी, जमीनदारी ही समानस्वाथ्याला अत्यंत घातक असून अहिंसात्मक समाजरचनेचा आर्थिक समता हाच पाया असला पाहिजे, हा सिद्धांत त्यांच्या लेखणींतून वारंवार लिहिला गेला आहे. (हरिजन ५-१२-३६, २-१-३७, २०-५-३९, १५-७-४०, यंगइंडिया २६-११-३१, १६-४-३१). महात्माजी हा विचार लिहून थांबले असेंहि नाहीं. आपलें सर्व जीवित त्यांनीं दलित जनतेच्या उद्धारासाठीं वाहून टाकलें होतें. या महासत्यावरूनहि त्यांच्या मनांतील आर्थिक समतेच्या अंतिम ध्येयाविषयीं संदेह रहाणार नाहीं.

पण अशा तऱ्हेनें आर्थिक समतेचें तत्त्व त्यांना मान्य असलें, तरी ती प्रस्थापित करण्याचे समाजवादी मार्ग त्यांना मान्य नव्हते. जमीनदारांचें धन हिरावून घ्यावें, त्यांच्या जमिनी जप्त कराव्या, कारखानदारांचें भांडवलावरील स्वामित्व नष्ट करून तें उत्पादनसाधन जनतेनें ताब्यांत घ्यावें, संस्थानें सर्व खालसा करावीं, यांपैकीं एकहि गोष्ट त्यांना मंजूर नव्हती. धनिकांचें धन अशा तऱ्हेनें हिरावून घेणें ही हिंसा आहे असें ते म्हणत. त्यांचा मार्ग अहिंसेचा आणि हृदयपरिवर्तनाचा होता. जमीनदारभांडवलदारांनीं आपल्याजवळचें धन हें जनतेचें आहे व आपण केवळ विश्वस्त वा निधिधारक आहोंत असें समजून आपल्या अत्यल्प गरजांपुरतेंच धन स्वतः वापरून बाकीच्या धनाचा विनियोग श्रमिक

जनतेच्या कल्याणासाठीं करावा, असा ते त्यांना उपदेश करीत. त्यांनीं तसें केलें नाहीं तर सर्व समाजाचा नाश होईल व ते गुन्हेगार ठरतील, असेंहि ते त्यांना बजावीत; पण या तऱ्हेचा उपदेश कितीहि वेळां ते करीत असले आणि आपलीं हीं मतें जरी वारंवार त्यांनीं प्रगट केलीं असलीं, तरी वर्गकलहाला त्याची मुळींच मान्यता नव्हती. जमीनदारभांडवलदार यांच्याविरुद्ध कोणी वर्गकलह पेटविला तर मी आपली सर्व शक्ति खर्च करून तो बंद पाडीन, असें ते निक्षून सांगत. 'तुमच्या जमिनी कोणी अन्यायानें हिरावून घेऊं लागला तर मी तुमच्या बाजूनें लढा करीन' असें संयुक्त प्रांताच्या जमीनदारांना त्यांनीं आश्वासन दिलें होतें. (अमृतबझारपत्रिका २-८-३४) श्रीमंतांच्या-जमीनदार-भांडवलदारांच्या-सद्बुद्धीवर त्यांची श्रद्धा होती. इतरांप्रमाणेंच त्यांच्या ठायींहि राष्ट्रभक्ति असून उच्च प्रेरणांचें आवाहन त्यांच्या मनालाहि पोंचूं शकतें असा ते निर्वाळा देत. ते सर्वस्वीं स्वार्थी आहेत, असें मानणें हा त्यांना अन्याय असून त्यामुळें जनतेचेंच अहित होईल, असें त्यांचें मत होतें. आणि म्हणूनच निधिधारकत्वाच्या कल्पनेची लोकांनीं कितीहि टवाळी केली, तरी त्यांचा तिच्यावरील विश्वास अढळ होता. (अ. ब. पत्रिका २-८-३४). जमीनदार-भांडवलदार यांचें धन हिंसामय मार्गानें हिरावून घेण्यास तर महात्माजींचा विरोध होताच, पण अहिंसामय हृदयपरिवर्तनाच्या मार्गानें त्यांचें स्वामित्व नष्ट करणें हेंहि त्यांना मान्य नव्हतें. श्रीमंत वर्ग हा समाजाला अवश्य आहे, रामराज्यांतहि हे भेद रहाणारच, श्रीमंतांच्या खाजगी मालमत्तेचें रक्षण केलें पाहिजे, वैयक्तिक स्वामित्वाचें तत्त्व समाजाला मारक नसून पोषकच आहे, अशीं त्यांचीं मतें होतीं. 'धनिकवर्गच नष्ट केला तर, अमाप संपत्ति मिळविण्याचें जें कौशल्य त्याला समाज मुकेल आणि त्याची पातळी खालावेल. तेव्हां राजे, संस्थानिक, जमीनदार यांना खालसा करण्यास मी कधींहि संमति देणार नाहीं.' हें त्यांनीं अगदीं निःसंदिग्ध शब्दांत अनेक वेळां जाहीर केलें आहे. (हरिजन २५-८-४०, यंग इंडिया ८-१-२५)

श्रीमंतांचें हृदयपरिवर्तन झालें नाहीं व आपणांस मिळालेल्या धनाचे आपण केवळ विश्वस्त वा निधिधारक आहों असें समजण्याचें त्यांनीं नाकारलें तर काय करावयाचें, असा प्रश्न महात्माजींना नेहमीं विचारला

जाई. त्या वेळीं सत्याग्रह व असहकारिता या मार्गानें लढा करून त्यांना नमवावयाचें, असा मार्ग ते सांगत. पण ब्रिटिशांशीं लढा चालू असेपर्यंत या मार्गाचा अवलंब करावयाचा नाहीं, असें त्यांचें धोरण होतें. ' आजच आपण भांडवलदारांविरुद्ध कामकऱ्यांना चेतविलें तर तो कमालीचा मूर्खपणा होईल. सरकार याचा नेमका फायदा घेऊन एका वर्गाविरुद्ध दुसऱ्याला झुंजवीत ठेवील व त्यामुळें त्याची मगरमिठी जास्तच दृढ होईल.' असें आपलें धोरण असहकारितेच्या चळवळीच्या प्रारंभींच त्यांनीं जाहीर केलें होतें. ( यंगइंडिया २०-४-२१ ). ' आपण ब्रिटिश साम्राज्याशीं लढत आहों, तोंपर्यंत जमीनदारांविरुद्ध लढा निर्माण करण्याची जरूर नाहीं. या दोघांत ( ब्रिटिश व जमीनदार यांच्यांत ) अगदींच भेद नाहीं असें मानूं नये, त्यांच्यांतील भेद स्पष्ट आहे. ' हा विचार ते पुन्हां पुन्हां सांगत. ( यंगइंडिया २६-११-३१ ) आणि ब्रिटिशांविरुद्ध मोहीम चालू असेपर्यंत हृदय-परिवर्तनाचा मार्गच अवलंबावा व जमीनदाराविरुद्ध चळवळ होऊं देऊं नये, असा महात्माजींचा कटाक्ष होता. कित्येक वेळां सुरू झालेल्या किंवा होऊं घातलेल्या किसानकामगारांच्या अशा चळवळी बंद करण्याचे आदेश त्यांनीं दिले आहेत.

कॉंग्रेसनें कामगारांच्या संघटना करण्याच्या कामांत कधींहि लक्ष घातलें नाहीं यांचें कारणहि अशाच स्वरूपाचें होतें. कॉंग्रेसला भांडवलदारांच्या विरुद्ध लढा करावयाचा नव्हता आणि कामगारसंघटनांचा राजकीय क्षेत्रांत उपयोग नाहींच करावयाचा, असा महात्माजींचा निश्चय होता. एकदां ही प्रथा सुरू झाली म्हणजे या शक्तीचा वाटेल तो दुरुपयोग होणें शक्य आहे असें संघटना न करण्याचें ते कारण देत. ( यंग इंडिया २०-४-२१, शापुरजी-गांधी पत्रव्यवहार पृ. २५ ) १९१८ सालीं अहमदाबादेस एकदांच फक्त कामगारसंघटनेचा महात्माजींनीं प्रयोग केला. तो यशस्वीहि झाला होता; पण पुन्हां त्या मार्गास ते गेले नाहींत. याचें कारण वरीलप्रमाणें आहे. १९४० सालीं कायदेभंग सुरू करण्याचा विचार रामगड कॉंग्रेसमध्यें चालू होता. त्यावेळीं, कायदेभंग सुरू होतांच अखिल कामगारवर्ग संप

पुकारील, असें जयप्रकाशांनीं आश्वासन दिलें; पण त्यामुळें आनंद व समाधान वाटण्याऐवजीं महात्माजींना दुःखाचा धक्का बसला. यामुळें आपल्या सर्व योजना कोलमडून जातील आणि सर्वत्र गोंधळ व अराजक होईल असें त्यांनीं सांगितलें व जयप्रकाशांच्या या कल्पनेचा निषेध केला. (पट्टाभि खंड २ रा, पृ. १८० )

कामगारसंघटना व कामगारक्रांति, वर्गविग्रह, वैयक्तिक स्वामित्व, जमीनदारभांडवलदार यांचें स्थान व आर्थिक समता यांविषयीं महात्माजींचीं काय मतें होतीं तें वरील विवेचनावरून कळेल. पंडित जवाहरलाल सोडून काँग्रेसच्या इतर नेत्यांचीं मतें जवळजवळ अशींच होतीं. पट्टाभि, कृपलानि, मश्रूवाला यांनीं वेळोवेळीं समाजवादाला कसून विरोध केला आहे. वर्गविग्रहांत हिंसा आहे हें कारण तर ते देतातच; पण याशिवाय समाजवादाला विरोध करण्यास ते आणखी एक हत्यार उपसतात. त्यांच्या मतें आर्थिक समतेच्या प्रस्थापनेसाठीं प्राचीन वर्णाश्रमव्यवस्थेचें पुनरुज्जीवन करणें अवश्य आहे. 'विषमता नष्ट करण्यासाठीं पश्चिमेकडून— म्हणजे सोव्हिएट रशियाकडून—प्रेरणा घेण्याचें मुळींच कारण नाहीं. आपल्या वर्णाश्रमव्यवस्थेंत स्पर्धेला वाव नसल्यामुळें आर्थिक समतेसाठीं तिचाच आश्रय करणें हितावह आहे.' असें महात्माजींचें मत होतें. (अ· ब. पत्रिका ३–८–३४ ) व त्याचाच अनुवाद मश्रूवाला, पट्टाभि, डॉ. कुमाराप्पा, कृपालानी यांनीं केला आहे.

समाजवादाविषयीं महात्माजींची व काँग्रेसनेत्यांची अशा प्रकारची विचारसरणी होती, हें आपल्या देशाचें मोठें दुर्दैव होय, असें वाटतें. त्यांच्या या मतप्रणालीमुळें कामगार व किसान हे संघटित रूपानें काँग्रेसच्या कक्षेंत भर संख्येनें कधीं आले नाहींत आणि कामगारांच्या शक्तीची पुण्याई तर काँग्रेसला कधींच मिळाली नाहीं. ब्रिटिशांशीं लढा चालू आहे, तोंपर्यंत जमीनदार–भांडवलदारांशीं लढा करूं नये, हें धोरण मान्य होण्याजोगें होतें. त्यालाहि दुसरी बाजू आहेच आणि अधिक विचाराअंतीं ती खरी आहे असें वाटतें. कामगारसंघटना करून भांडवलदारांविरुद्ध मोहीम सुरू करण्याचें काँग्रेसनें धोरण ठेविलें असतें, तर कामगारांचें काँग्रेसला साह्य मिळून ब्रिटिश साम्राज्यशाहीशीं होणाऱ्या लढ्यांत तिचें सामर्थ्य वाढलेंच

असतें. हेंच किसानसंघटनांविषयींहि म्हणतां येईल. आधीं स्वातंत्र्य व मग आर्थिक समता, यापेक्षां आधीं आर्थिक समतेचा लढा व मग ब्रिटिश साम्राज्यशाहीशीं युद्ध, किंवा दोन्ही लढे साथीनेंच करणें हा मार्ग जास्त प्रभावी झाला असता. स्पृश्यास्पृश्यांतील व हिंदुमुसलमानांतील कलह याविषयीं कॉंग्रेसचें हेंच धोरण होतें. आपल्या सामाजिक विषमतेमुळें स्वातंत्र्याचें मार्गक्रमण दुष्कर होऊन बसलें आहे. स्वराज्यानंतर सामाजिक सुधारणा करूं असें म्हणणें म्हणजे स्वराज्याचा अर्थच न कळण्यासारखें आहे. स्वातंत्र्याच्या लढा व सामाजिक पुनर्घटना हीं कार्यें एकदमच हातीं घेतलीं पाहिजेत; असें महात्माजींनीं वेळोवेळीं सांगितलें आहे. (यंग इंडिया २८–६–२८) 'हिंदुमुसलमानांच्या ऐक्यावांचून, म्हणजे मुसलमानांचीं दुःखें दूर झाल्यावांचून, स्वराज्य अशक्य' हें तर त्यांचें व कॉंग्रेसचेंहि घोषवाक्य होतें. स्पृश्यास्पृश्य व हिंदुमुसलमान यांच्याविषयींच्या या धोरणाला जर कांहीं अर्थ असेल, तर किसानजमीनदार व कामगारभांडवलदार यांच्याविषयीं तेंच धोरण ठेवण्याला त्याच्या शतपट अर्थ आहे. भावी समाजरचनेंत आपल्याला मानाचें स्थान मिळेल, स्वातंत्र्यामुळें निर्माण होणाऱ्या सुखसमृद्धीचा अंश इतरांप्रमाणेंच आपल्यालाहि लाभेल, पूर्वीप्रमाणें वरिष्ठ जमातींची सत्ता व वर्चस्व आतां रहाणार नाहीं, हें आश्वासन मिळाल्यावांचून अस्पृश्यांना स्वातंत्र्यांच्या लढ्यांत भाग घेण्यास हुरूप येणार नाहीं. म्हणून आधीं ती सामाजिक सुधारणा करणें अवश्य आहे, असाच अस्पृश्यतानिवारण आधीं झालें पाहिजे या आग्रहाचा प्राकृत अर्थ आहे व तो योग्यच आहे. मग हाच अर्थ किसानकामगारांच्या बाबतींत कां लागू पडणार नाहीं? सध्यांची अर्थव्यवस्था आमूलाग्र बदलून टाकूं व जमीनदार–भांडवलदारांच्या मगरमिठींतून तुम्हांला सोडवूं, असें आश्वासन देऊन 'आधीं सामाजिक सुधारणा' याबाबतींत अस्पृश्यांना जसा प्रत्यक्ष चळवळीच्या रूपानें विसार देण्यांत आला, तसा जमीनदार–भांडवलदारां- विरुद्ध कांहीं लढे करून किसान कामगारांना कॉंग्रेसनें विसार दिला असता, तर हा सर्व समाज संघटित होऊन ब्रिटिश साम्राज्याविरुद्ध लढाई करण्यास कॉंग्रेसच्या मागें उभा राहिला असता. जेथें जमीनदारी नाहीं त्या प्रांतांतील किसान लाखांनीं कॉंग्रेसच्या मागें उभे राहिलेच होते आणि त्याच आशेनें

जमीनदारीच्या प्रांतांतले किसानहि पुष्कळसे लढ्यांत सामील झाले होते. अर्थात् यांत समाजवादी पक्षाची पुण्याई बरीच मोठी आहे; पण कामगार-शक्ति मात्र कॉंग्रेसला कधींहि वश झाली नाहीं आणि पुढें पुढें किसानांचीहि निराशा झाली; त्यामुळेंच कॉंग्रेस आज हतबल होऊन बसली आहे.

पण आधीं ब्रिटिशांविरुद्ध लढा व मग येथील धनिकांविरुद्ध, हें धोरण मतभेद म्हणून मान्य होण्याजोगें होतें. त्याचप्रमाणें, मार्क्सवादी पद्धतीनें रशियांतल्याप्रमाणें हिंसामय मार्गानें जमीनदारी–भांडवलदारीचा नाश करूं नये, सत्याग्रह व असहकार या मार्गांनीं त्यांच्याशीं लढा करावा, या तत्त्वाचाहि सर्वांनीं आनंदानें पुरस्कार केला असता; पण जमीनदारी-भांडवलदारी आणि धनिकवर्ग हा समाजाच्या स्वास्थ्याला अवश्य आहे, धनिक हेहि राष्ट्रनिष्ठ असतात म्हणून त्यांना निधिधारक व्हावयास सांगणें हाच आर्थिक समतेचा उपाय होय, जुनी वर्णाश्रमव्यवस्था पुन्हां प्रस्थापिली पाहिजे, कामगारसंघटनेचा राजकीय उपयोग करतां कामा नये, हीं जीं कॉंग्रेसनेत्यांचीं मतें तीं आपल्या राष्ट्राला फार घातक ठरलीं आहेत व ठरणार आहेत. तरुण पिढी कॉंग्रेसला सोडून जात आहे, गेली आहे याचें हेंच कारण आहे. आणि ही हानि सर्वांत मोठी आहे.

## समाजवादाचे प्रणेते–पंडितजी

पण या बाबतींतल्या कॉंग्रेसच्या विचारसरणीचा परामर्ष मी स्वतंत्रपणें द्यावा अशी जरूर नाहीं. पंडित जवाहरलाल नेहरू यांसारख्या थोर पुरुषानें हें कार्य केलें आहे. आपणांस त्यांच्या विचारांचा परिचय करून द्यावयाचाच आहे. तेव्हां तीं दोन्हीं कार्यें एकदमच साधण्यासाठीं पंडितजींच्या समाजवादी तत्त्वज्ञानाची आतां माहिती करून घेऊं.

मागें सांगितल्याप्रमाणें पंडितजींनीं रशियांतून जाऊन आल्यावर १९२८ सालापासून समाजवादी तत्त्वज्ञानाचा भारतांत प्रसार करण्याचें कार्य मोठ्या हिरिरीनें सुरू केलें आणि तें अखंड वीस वर्षें मोठ्या निष्ठेनें चालविलें. पंडितजी स्वतः समाजवादी पक्षाला कधींच मिळाले नाहींत. कॉंग्रेसनेत्यांशीं त्यांचे तीव्र मतभेद झाले, तरी त्यांनीं कधीं कॉंग्रेस सोडली नाहीं. माझ्या मतें

ही फार चांगली गोष्ट झाली. कॉँग्रेसनें समाजवाद जरी पूर्णपणें मान्य केला नाहीं, तरी तिच्या विचाराला तें वळण तत्त्वतः तरी लागलेंच. आणि मुख्य म्हणजे कॉँग्रेसच्या थोर व्यासपीठावरून पंडितजींनीं प्रचार केल्यामुळें समाजवाद भारतांत प्रसृत होण्यास फार साह्य झालें. जयप्रकाश नारायण यांचे चरित्रकार एच्. एल्. शेठ यांनीं पंडितजींच्या या ऋणाचा प्रांजलपणें निर्देश केला आहे. ते म्हणतात, ' नेहरूंनीं जयप्रकाशांचा मार्ग सुकर करून दिला. त्या काळीं नेहरू जें सांगत तें जयप्रकाशांनीं सांगितलें असतें तर त्यांचें कोणींच ऐकलें नसतें. या दृष्टीनें समाजवाद हा नेहरूंचा फार ऋणी आहे. ब्रिटिश मजूरपक्ष हा जसा सिडने वेब, जॉन स्ट्रॅची यांचा ऋणी आहे, तसाच येथला समाजवादी पक्ष नेहरूंचा ऋणी आहे. नेहरू जरी समाजवादी पक्षाला कधीं मिळाले नाहींत, तरी समाजवादी पक्षाला त्यांच्या व्यक्तिमत्वापासून अलग करणें कधींच शक्य नाहीं. त्यांचे संबंध अविभाज्य आहेत. ' ( रेड फ्युगिटिव्ह पृ. २९ ). पंडितजींच्या या क्षेत्रांतील कार्याचें महत्त्व यावरून कळून येईल.

वर सांगितल्याप्रमाणें मॉस्कोहून परत आल्यावर सोव्हिएट रशियाचा नवा संदेश ते एकनिष्ठेनें प्रसृत करूं लागले. १९२८ सप्टेंबरमध्यें ते बंगाल–विद्यार्थी–परिषदेचे अध्यक्ष होते. त्या वेळीं अध्यक्षपदावरून त्यांनीं समाजवादाचाच संदेश दिला. ' समाजवादी शासन हेंच आपलें ध्येय आहे. कांहीं लोकांना समाजवादाची भीति वाटते; पण ते अज्ञ आहेत. त्यांनीं जग पाहिलेलें नाहीं. यापुढें जगाला समाजवादावांचून दुसरा तरणोपाय नाहीं. ' असे त्यांचे उद्गार आहेत. त्याच सालीं ऑक्टोबरमध्यें झांशीला प्रांतिक परिषद झाली. तेथें त्यांनीं हाच विचार सांगितला. ' आपल्या प्रांतांतील जमीनदारी नष्ट करणें हा आपला कार्यक्रम असला पाहिजे. या जमीनदारांना भरपाई देणें सर्वस्वीं अशक्य आहे. तेव्हां अगदीं अल्प मोबदला देऊन त्यांच्या जमिनी जप्त करणें हेंच समर्थनीय आहे ' असें स्पष्टपणें त्यांनीं सांगितलें आहे. १९२९ सालीं लाहोरच्या कॉँग्रेसचे ते अध्यक्ष होते. तेव्हां त्या श्रेष्ठपदावरून त्यांनीं आपण समाजवादी असल्याचें जाहीरपणें सांगून महात्माजींच्या, जमीनदार–भांडवलदार हे निधिधारक आहेत, या कल्पनेवर कडक टीका केली. यांना निधिधारक म्हणावयाचें तर ब्रिटि-

यांना कां म्हणूं नये असा प्रश्न विचारून त्यांनीं महात्माजींच्या त्या प्रिय तत्त्वाची अवहेलनाहि केली आणि, 'स्वातंत्र्य येऊनहि, ब्रिटिशांच्या ऐवजीं हिंदी सरकार येऊन त्यानें सध्यांची मिरासदारी यथापूर्व चालू ठेविली, तर त्या तसल्या स्वातंत्र्याला काडीइतकीहि किंमत नाहीं.' असे प्रक्षोभक व अप्रिय विचार कॉंग्रेस–जनांना ऐकविले.

आत्मचरित्रांत पंडितजींनीं कॉंग्रेसची राष्ट्रवादी भूमिका व आपली समाजवादी भूमिका ठायीं ठायीं स्पष्ट करून कॉंग्रेसजनांच्या संकुचित राष्ट्रवादावर सारखी टीका केली आहे. १९२८ सालच्या सर्वपक्षीय परिषदेंत अयोध्येच्या तालुकदारीच्या व जमीनदारीच्या हक्कांना घटनेच्या मूलभूत तत्त्वांत समाविष्ट करून घेण्यास कॉंग्रेसच्या पुढाऱ्यांनीं संमति दिली. त्याचा उल्लेख करून पंडितजी म्हणतात, 'प्रगमनशील लोकांच्या सहकार्यापेक्षां कॉंग्रेस–पुढाऱ्यांना जमीनदारांचें सहकार्य इष्ट वाटत होतें.' या मतभेदामुळें त्या वेळीं सरचिटणीसपदाचा राजीनामाहि पंडितजींनीं दिला होता. कार्यकारिणीनें तो नामंजूर केला हें निराळें; पण त्यावरून हा नवा मतप्रवाह कॉंग्रेसच्या राष्ट्रवादी भूमिकेहून किती निराळा होता, तें कळून येईल. १९२८ सालीं पंजाब, मलबार, दिल्ली व संयुक्तप्रांत या चार प्रांतिक परिषदांचे पंडितजी अध्यक्ष होते; त्याचप्रमाणें मुंबई व बंगाल येथील विद्यार्थीपरिषदेचेहि ते अध्यक्ष होते. या सर्व पीठांवरून त्यांनीं राजकीय स्वातंत्र्याइतकेंच सामाजिक व आर्थिक स्वातंत्र्यहि महत्त्वाचें आहे हा विचार मांडला. ते म्हणतात, 'मुख्यतः जनतेचें लक्ष सामाजिक व आर्थिक फेरबदलाकडे वेधण्याचें काम करण्याची मला हौस वाटे. कॉंग्रेसच्या कार्यकर्त्यांत व पांढरपेशांत समाजवादी विचार फैलवावा असा माझा बेत होता. कारण राष्ट्रीय चळवळीची धुरा ते वहात होते व त्यांचा राष्ट्रवाद अत्यंत संकुचित होता' ( आत्मचरित्र–भाषांतर–ना. ग. गोरे प्रकरण २६ ). याच ठिकाणीं समाजवादी विचार भारतांत आपल्या आधीं अनेक लोकांनीं आणल्याचें मान्य करून त्यांनीं असें सांगितलें आहे कीं, 'कॉंग्रेसमध्यें मोठ्या अधिकारावर असलेला मी एक प्रमुख कॉंग्रेसवाला असल्यामुळें माझ्या समाजवादी मतांना महत्त्व मिळालें.' १९३० सालीं संयुक्त प्रांतांत करबंदीची चळवळ सुरू करावी, असा पंडितजींचा विचार होता.

गुजराथेंत किंवा महाराष्ट्रांत जेथें रयतवारी पद्धत होती, तेथें शेतकऱ्यांनीं करबंदी करणें कॉंग्रेसला मान्य होतें. कारण ती चळवळ सरकारविरुद्ध होत असे; पण संयुक्तप्रांत किंवा बंगाल येथें जमीनदारी पद्धत असल्यामुळें तेथें शेतकऱ्यांनीं करबंदी करणें म्हणजे ती चळवळ जमीनदारांविरुद्ध होणार! अर्थात् ती कॉंग्रेसला मान्य होणें शक्य नव्हतें. पंडितजी म्हणतात, 'कुळांनी खंड नाकारला कीं पाहिला धक्का तावडतोब जमीदाराला बसून वर्गकलहाच्या स्वरूपाचा प्रश्न उद्भवणार होता. कॉंग्रेस ही राष्ट्रीय संस्था होती. वर्गकलह उत्पन्न करण्याची अथवा जमीनदार-वर्गाला दुखविण्याची कॉंग्रेसच्या पुढाऱ्यांस फार भीति वाटत असे. म्हणून कायदेभंगाच्या पहिल्या सहामाहींत परिस्थिति अनुकूल असूनहि करबंदीची घोषणा करण्याचें त्यांनीं टाळलें. अशा तऱ्हेनें वर्गकलह उत्पन्न करण्याची मला भीति वाटत नव्हती. परंतु कॉंग्रेसचें स्वरूप लक्षांत घेतां वर्गकलहाला उत्तेजन देणें शक्य होणार नाहीं हें मी जाणून होतों.'

## कॉंग्रेसमधील तट

हळूहळू कॉंग्रेसचे नेते व पंडितजी यांच्यांतील मतभेदाला तीव्र व कटु असें रूप येऊं लागलें. 'माझ्या समाजवादी मतप्रचाराच्या परिणामाकडे पाहून वर्किंग कमिटींतील माझे कांहीं सहकारीसुद्धां बिथरले. गेलीं कित्येक वर्षें माझ्या मतप्रचाराकडे त्यांनीं कानाडोळा केला होता. पण आतां माझ्या कार्यामुळें वरिष्ठवर्गीय लोक दशहत खाऊं लागल्यानें माझ्या मतप्रचारांचें रूप निरुपद्रवी राहिलें नाहीं. यामुळें कॉंग्रेजनांचा मजवर रोष झाला. परंतु मी तरी काय करणार? मी ज्या कार्याचें महत्त्व अत्यंत मोठें समजत होतो तें मी अंगाबाहेर टाकावें कीं काय? कॉंग्रेससंबंधीं माझें कर्तव्य व माझी तत्त्वें यांत विरोध उत्पन्न झाल्यावर जागेचा राजीनामा देऊन बाजूस सरणें समुचित ठरलें असतें.' या उताऱ्यांतल्यासारखी राजीनामा देण्याची भाषा आत्मचरित्रांत अनेक ठिकाणीं दिसते. यावरून कॉंग्रेसचे नेते व पंडितजी यांच्यांतील भेद किती मूलगामी स्वरूपाचा होता हें कळून येईल. कॉंग्रेसच्या जुन्या मतप्रणालीचे मुख्य आधारस्तंभ म्हणजे महात्माजी. ते समाजवादाला अनुकूल झाले असते तर या भूमीचें भवितव्य सध्यांपेक्षां फारच निराळें

झालें असतें. पंडितजींना प्रारंभीं आपण महात्माजींना समाजवादी मार्गावर आणूं अशी फार आशा होती. पण गांधीजींचें ध्येय व समाजवाद्यांचें ध्येय यांच्यामध्यें मूलतः भेद आहेत ही गोष्ट लवकरच त्यांना कळून चुकली. (आत्मचरित्र पृ. २६१) हा भेद इतका कमालीचा तीव्र होता व गांधीजींचीं या बाबतींतील मतें व वर्तन इतकें विपरीत होतें कीं पंडितजींना त्यांची पराकाष्ठेची चीड येत असे. १९३३ सालीं एका वर्तमानपत्रांत गांधीजींनीं जवाहरलालजींच्या कार्याबद्दल दिलगिरी व्यक्त करणारे उद्गार काढले! आणि कॉंग्रेसच्या नांवानें पंडितजी या नव्या विचारसरणीचा प्रचार करणार नाहींत, असा त्यांच्या प्रामाणिकपणाबद्दल विश्वास प्रगट केला. इतकेंच नव्हे तर जमीनदारीपद्धति समाजरचनेंत अवश्य आहे असें सांगून तिचें समर्थनहि केलें. पंडितजी म्हणतात कीं, ‘ माझ्याबद्दलचा उल्लेख मला पसंत पडला नाहींच, पण जमीनदारी पद्धतीचें त्यांनीं जें समर्थन पुढें मांडलें होतें तें वांचून माझें डोकें बरेंच गरम झालें.’ (पृ. ४८०) शेतकरी–कामकरी यांच्याविषयींच्या महात्माजींच्या चमत्कारिक मतांचें कोडें पंडितजींना कधींच उलगडलें नाहीं. ते म्हणतात, ‘ गांधीजी म्हणजे एक कोडें आहे. विसंगतीचें एक उदाहरण आहे. पददलित माणसाविषयीं ज्याला इतकें गाढ प्रेम व आस्था वाटते त्यानें पददलित वर्ग हमखास उत्पन्न करणाऱ्या व त्याला पिसून काढणाऱ्या समाजरचनेला पाठिंबा द्यावा हें कसें? अहिंसेचा जो मोठा कैवारी त्यानेंच निर्भेळ हिंसा व दडपशाही यांवर आधारलेल्या सामाजिक व राजकीय संस्थांना मान्यता द्यावी हा काय न्याय? गांधीजी स्वतःला कधींकधीं समाजवादी म्हणवितात. पण व्यवहारांत समाजवाद या शब्दामुळें ज्या आर्थिक घटनेचा बोध होतो तो त्यांच्या व्याख्येंत बसत नाहीं. त्यांच्या मागोमाग बऱ्याच प्रमुख कॉंग्रेसकार्यकर्त्यांनींहि त्या शब्दाचा वापर करण्यास प्रारंभ केला आहे. पण त्यांच्या तोंडीं असणाऱ्या समाजवादाचा भूतदयावादाचें कडबोळें एवढाच अर्थ करतां येईल.’ (पृ. ५१९). कॉंग्रेसचे नेते व गांधीजी यांनीं जमीनदार भांडवलदार यांचें जें समर्थन चालविलें होतें त्यांचा पंडितजींना इतका संताप येत असे कीं, एकदोनदां किंचित् तोल जाऊन त्यांनीं त्यांवर टीका केली आहे. संयुक्त प्रांत, बंगाल, बिहार येथील जमीनदारी नष्ट व्हावी असें आपल्याला कधींच

वाटलें नाहीं, असें सांगून गांधीजींनीं ' अन्यायानें कोणी तुमची मालमत्ता हिसकावून घेण्याचा प्रयत्न केला तर मी तुमच्या वतीनें लढेन ' असें जमीनदारांना कानपूर येथें १९३४ सालीं आश्वासन दिलें. त्यावर पंडितजी फारच चिडून गेले. ' जमीनदारी जर इतकी आवश्यक आहे तर गांधीजी ती गुजराथेंत सुरू करतील काय ! ' असा प्रश्न त्यांनीं आत्मचरित्रांत विचारला आहे. ( पृ. ५४० ). जमीनदारीचीं दुःखें परस्पर संयुक्तप्रांत, बंगाल, बिहार येथील जनतेला भोगावीं लागत आहेत, म्हणून गांधीजींना त्यांची आंच नाहीं, हा जो या टीकेंतील भावार्थ तो जरा अन्यायाचा आहे असें वाटतें. पण त्यावरून काँग्रेसचा राष्ट्रवाद व नवीन उदयास आलेला समाजवाद यांतील मतभेदांचें स्वरूप किती कटु होतें तें कळून येईल व लोकशाहीच्या दृष्टीनें त्यांचें मूल्यमापन करणें सुलभ होईल.

आर्थिक क्रांति व वर्गकलह यांची भाषा काढली कीं तो मार्ग हिंसामय आहे असें म्हणून काँग्रेसजन त्याचा निषेध करीत व अजूनहि करतात. यावर पंडितजींनीं प्रखर टीका केली आहे. त्यांच्या मतें अहिंसेला जें अपरिवर्तनीय अशा वेदवाक्याचें स्वरूप देण्यांत आलें आहे तें अगदीं अश्लाघ्य आहे. त्यामुळें अहिंसेतील सामर्थ्य नष्ट होऊन ' अहिंसा हें ( जनतेच्या हातांतील प्रभावी शस्त्र होण्याऐवजीं ) वरिष्ठ वर्गाच्या हातांतील ब्रह्मास्त्र झालें आहे व सद्यःस्थिति सनातन रहावी म्हणून त्याचा उपयोग करण्यांत येऊं लागला आहे ' ( पृ. ५५३ ) असें सांगून ' हिंसा टळावी म्हणून हिंसेपेक्षांहि अनिष्ट अशा गोष्टींपुढें मान तुकविण्याची वृत्ति आपण धारण करतां कामा नये. ' असा इषारा त्यांनीं दिला आहे. ( आत्मचरित्र पृ. ५५७ )

काँग्रेसचा राष्ट्रवाद पंडितजींना अमान्य होता असें नाहीं. त्याची थोरवी ते जाणून होते आणि त्या तत्त्वाला अनुसरून ते काँग्रेसच्या ध्वजाखालीं लढले; पण या लढ्यांतून जें स्वातंत्र्य मिळवावयाचें तें खरेंखुरें जनतेचें स्वातंत्र्य असलें पाहिजे, अशी त्यांची मनीषा होती. काँग्रेसच्या इतर नेत्यांची मनीषा तीच होती.पण धनिकांच्या व कष्टकरी जनतेच्या हितसंबंधांचा समन्वय अशक्य आहे हें पंडितजींच्या ध्यानांत आल्यामुळें काँग्रेसचे प्रयत्न त्यांना अर्थशून्य वाटूं लागले. त्यांच्या मतें ' हा आग्रह आपाततःच असमर्थनीय

आहे. कारण कोणतीहि राजकीय संघटना परस्परविरोधी हितसंबंधांचें प्रतिनिधित्व पत्करूं म्हणेल तर तिला बिलबिलीत अर्थशून्य अशा फापटपसाऱ्याचें स्वरूप येऊन तिच्यांत कोणतेंहि वैशिष्ट्य किंवा ठळकपणा उरणार नाहीं.' (पृ. ५६४) त्यांतूनहि तीव्र होत चाललेले वर्गभेद परकीयांशीं लढा चालू असेपर्यंत मुद्दाम डिवचूं नयेत एवढेंच काँग्रेसनेत्यांचें म्हणणें असतें तर त्यांना त्याचा फारसा विषाद वाटला नसता. पण काँग्रेसजन जुन्या समाजरचनेचें समर्थन करीत होते. आणि धनिकांची मनधरणी करून त्यांच्या सर्वस्वी आहारीं चालले होते. हें पंडितजींच्या विरोधाचें खरें कारण होतें. १९३४ सालीं काँग्रेसवर्किंगकमिटीनें पुढील ठराव केला. 'खाजगी मालमत्तेच्या जप्तीविषयीं व वर्गकलहाविषयीं सध्यां स्वैरभाषा वापरण्यांत येत आहे. न्याय्य कारणाशिवाय खाजगी मालमत्ता जप्त करण्याचा अथवा वर्गकलहाचा पुरस्कार करण्याचा कराचीच्या (१९३१ च्या) ठरावाचा आशय नाहीं. त्याचप्रमाणें मालमत्तेची जप्ती व वर्गकलह या गोष्टी काँग्रेसच्या अहिंसाधर्माच्या विरुद्ध आहेत, असें वर्किंग कमिटीचें मत आहे.' या ठरावावर टीका करतांना 'मध्यवर्ती कायदे मंडळाच्या आगामी निवडणुकीच्या वेळीं धनिकांचीं मतें मिळविण्याची इच्छा मनांत बाळगणाऱ्या सनदशीर गटाच्या प्रेरणेनेंच तो ठराव करण्यांत आला हें उघड दिसत होतें' असे मर्मभेदक उद्गार पंडितजींनीं काढले आहेत. या धोरणामुळें काँग्रेसचा प्रखर ध्येयवाद सुटला, तिच्यांत स्वार्थी व संधिसाधु लोकांचें स्वागत होऊं लागलें आणि कंपूशाही स्वरूपाचा एक गट तिच्यांत तयार होऊं लागला, असें आपलें मत त्यांनीं अत्यंत खेदानें नमूद करून ठेविलें आहे. (पृ. ५६६).

समाजवादाची म्हणजे आर्थिक समतेची लोकशाहीस किती आवश्यकता असते हें ब्रिटिश लोकसत्तेचें सध्यांचें रूप पाहतां सहज कळून येईल. औद्योगिक क्रांतिनंतर भांडवलवाल्यांनीं केलेल्या संपत्तीच्या अमाप संचयामुळें ब्रिटन अगदीं एकारून गेलें होतें, आणि होडींत एकाच बाजूस जास्त भार झाल्यावर ती उलथी होऊन ज्याप्रमाणें बुडून जाते त्याप्रमाणें, ब्रिटिश भांडवलदारांनीं आपल्या संपत्तीचा वांटा जनतेला दिला नसता तर ब्रिटिश लोकसत्ता बुडाली असती. १९३१ च्या आर्थिक अरिष्टानंतर ब्रिटनवर

पुन्हां तोच प्रसंग आला होता, पण तेथील सर्वच वर्ग समंजस असल्यामुळें त्यांनीं समाजवादाची प्रस्थापना करून आपली लोकसत्ता टिकवून धरली आहे. फ्रँकलिन रूझवेल्ट अमेरिकेंत १९३२ सालीं प्रथम अध्यक्ष झाले त्यावेळीं अमेरिकेवर अशीच आपत्ति आली होती. संपत्तीचा निचरा करून रूझवेल्ट यांनीं फ्रेंच राज्यक्रांतीसारखा अमेरिकेवर येऊं पाहणारा महाभयंकर उत्पात टाळला व तेथील लोकसत्ता तारिली, असें इतिहासकार सांगतात. फ्रान्स, जर्मनी, इटली येथल्या लोकसत्ता बुडाल्या व तीं राष्ट्रेंहि पराभूत झालीं. याच्या अनेक कारणांपैकीं तेथील भांडवलदार–जमीनदारांचा कमालीचा स्वार्थ हें एक कारण निश्चित आहे. पेटां, लावल यांनीं तर मायभूमीचा विक्राच केला. समाजवाद येऊं नये हेंच या देशांतील सर्व नेत्यांचें उद्दिष्ट होतें. त्यामुळें त्यांच्या देशांत लोकसत्ता समर्थ अशी कधीं झालीच नाहीं. भारतीय जनतेनें, येथील भांडवलदार–जमीनदार या धनिकवर्गानें व येथील नेत्यांनीं इतिहासाचे हे पाठ फार काळजीपूर्वक पाहिले पाहिजेत. नाहीं तर येथील लोकसत्तेची तशीच धूळधाण होईल.

१९२० ते ४५ पर्यंत काँग्रेसचें नेतृत्व ज्यांचेकडे होतें त्यांच्या मनांत, आर्थिक विषमता ही लोकसत्तेला घातक होते, हें सत्य दृढमूल झालेलें होतें यांत शंका वाटत नाहीं. वल्लभभाई पटेल, पट्टाभि, कृपलानी, या सर्वांचा उद्घोष तसा होता. महात्माजींच्या तर जीविताची ती प्रतिज्ञाच होती. पण या सर्वांनीं आर्थिक समतेच्या प्रस्थापनेसाठीं जे मार्ग निश्चित केले ते अगदींच भ्रांत, अव्यवहारी व फलशून्य असे होते याविषयीं आज तरी दुमत होईल असें वाटत नाहीं. धनिकांचा हृदयपालट होण्याचा संभव कितपत आहे, निधिधारकत्वाचें तत्त्व ते कितपत मानतील, वर्णाश्रमधर्माचें पुनरुज्जीवन करणें व केलें तर तें फलदायी होणें कितपत शक्य आहे, याचा वाचकानींच आपल्या ठायीं शांतपणें विचार करावा. किसानकामगारसंघटना व त्या संघटनांचा राजकीय लढ्यासाठीं उपयोग करणें हेंहि किती अवश्य व हितावह आहे तें आजच्या परिस्थितीवरून कळून येईल. आज आपला देश सर्वस्वीं धनिकांच्या आहारीं गेला आहे. या वेळीं काँग्रेसच्या नेत्यांवर लोक वाटेल ते आरोप करीत आहेत. तेच धनिकांना सामील आहेत व जनतेची फसवणूक करीत आहेत, असे अत्यंत काळे आरोप त्यांच्यावर केले

जात आहेत. या नेत्यांचें उदात्त असें पूर्वचरित्र पाहिलें म्हणजे या आरोपांच्या सत्यतेविषयीं जबर शंका येते. माझ्या मतें फ्रान्स, जर्मनी येथल्याप्रमाणें भांडवलदारापुढें ते हतबल झाले असावेत आणि म्हणूनच असें वाटतें कीं, काँग्रेसनें १९२० सालापासूनच किसान-कामगार संघटनेकडे लक्ष घालून ती महाशक्ति आपल्या पाठीशीं घेतली असती तर आज तिची विकल अवस्था झाली नसती. यासाठीं राष्ट्रवादी भूमिका सर्वस्वीं सोडून देण्याची आवश्यकता नव्हती. ती दृढ धरूनच ज्याप्रमाणें स्पृश्यास्पृश्य व हिंदुमुसलमान हे कलह आधीं मिटविणें अवश्य असा काँग्रेसनें आग्रह धरला होता त्याचप्रमाणें धनिक व कष्टाळू जनता यांच्या-विषयीं धोरण ठेवलें असतें तर आजचा प्रसंग टळला असता असें वाटतें.

पंडित जवाहरलाल, जयप्रकाश नारायण व त्यांचा समाजवादी पक्ष यांच्या सतत प्रचारानें व प्रयत्नानें १९४७ पर्यंत काँग्रेसचीं पावलें कांहींशीं समाजवादाकडे पडत होतीं असें मागल्या इतिहासावरून दिसून येतें. १९२९ सालीं प्रथम काँग्रेसकमिटीनें महात्माजींना अध्यक्ष म्हणून निवडलें होतें. पण त्यांनींच आग्रह धरून पंडित जवाहरलाल यांना अध्यक्षपद देण्यास कमिटीला भाग पाडलें. त्यावेळीं पंडितजींचीं समाजवादी मतें अगदीं जगजाहीर झालीं होतीं. महात्माजींनीं आपल्या पत्रांत तसा उल्लेखहि केला आहे. तरी राष्ट्रकार्याची धुरा त्यांच्याच खांद्यावर द्यावी हा आग्रह त्यांनीं धरला व काँग्रेसनें तो मान्य केला. अध्यक्षीय भाषणांत पंडितजींनीं, 'मी स्वतः समाजवादी आहे. राजे व संस्थानिक यांच्यावर माझा काडीइतकाहि विश्वास नाहीं.' असें आरंभींच सांगून टाकलें; तरी महात्माजींचा त्यांच्यावर रोष झाला नाहीं. पुढें १९३६ सालीं पुन्हां पंडितजी अध्यक्ष झाले. त्यावेळींहि त्यांनीं पुन्हां अशींच भाषणें केलीं. आतां तर त्यांचीं जहाल मतें सर्वांच्याच परिचयाचीं झालीं होतीं. समाजवादी पक्षाची स्थापनाहि आतां झाली होती. व पंडितजी त्या पक्षाला मिळाले नसले तरी त्यांनीं कार्यकारिणींत जयप्रकाश नारायण, नरेंद्र देव, अच्युत पटवर्धन या अस्सल समाजवाद्यांना स्थान दिलें होतें. ठरावाच्या रूपानेंहि काँग्रेस कांहींशी समाजवादी होत होती. कराची काँग्रेसनें कामगारांच्या हिताचे ठराव केले व 'खनिजसंपत्ति, रेल्वे, जलमार्ग, जहाजें व सार्वजनिक

व्यापारी दळणवळण या धंद्यावर सरकारचें नियंत्रण किंवा मालकी असावी' असा थोडासा समाजवादी स्वरूपाचा एक ठरावहि मंजूर केला. १९४५ सालीं जो निवडणुकीचा जाहिरनामा कॉंग्रेसनें प्रसिद्ध केला त्यांत तर समाजवादाचीं जवळजवळ सर्व तत्त्वें मान्य करण्यांत आलीं आहेत. 'राजकीय स्वातंत्र्य हें सामाजिक व आर्थिक स्वातंत्र्यावांचून फोल आहे व तें प्रस्थापित करण्यासाठीं सर्व महत्त्वाचे उद्योगधंदे राष्ट्राच्या स्वामित्वाचे असले पाहिजेत,' अशी कॉंग्रेसनें निःसंदिग्ध घोषणा केली आहे. महात्माजींचें मतहि कांहीं वर्षांनीं थोडें बदललें होतें. २ आगष्ट १९४२ च्या हरिजनमध्यें यांनीं म्हटलें आहे कीं 'धनिकांना आपल्या कर्तव्याची जाणीव झाली तर ब्रिटिश सत्ता सहज नमेल.पण त्यांच्याविषयीं माझी निराशा झाली आहे.म्हणूनच तर मी जनताजागृतीच्या मार्गास लागलों.' १९३४सालीं समाजवादी पक्ष स्थापन झाल्यावर त्याला बाहेर हुसकून काढण्याचे अनेक कॉंग्रेसनेत्यांनीं प्रयत्न केले; पण महात्माजींनीं तो पक्ष कॉंग्रेसमध्यें रहावा असाच आपला निर्णय दिला; व त्याचें कारणहि अगदीं समर्पक असें दिलें. 'व्यक्तीच्या शरीरांत जें रुधिराभिसरणाचें महत्त्व तेंच राष्ट्राच्या शरीरांत विचाराभिसरणाचें आहे' असे त्यांचे उद्‌गार आहेत. (हरिजन १४ जुलै १९४६). १९४७ मध्यें कृपालानींनीं अध्यक्षपदाचा राजीनामा दिल्यानंतर कॉंग्रेसचें अध्यक्षपद नरेंद्रदेव किंवा जयप्रकाश यांना द्यावें असा महात्माजींचा आग्रह होता; पण कार्यकारिणीनें तो मानला नाहीं.

या सर्व घटना व कॉंग्रेसच्या नेत्यांचे हे बदलते विचारप्रवाह पाहिले, म्हणजे कॉंग्रेस दृढपणें राष्ट्रवादाला धरून बसली होती व जमीनदार-भांडवलदारांविरुद्ध लढा करण्याचें कटाक्षानें टाळीत होती याचें एकच कारण दिसतें. ब्रिटिशांशीं लढा चालू असतांना हा दुसरा लढा आपण सुरू करूं नये, हे दोन लढे आपणांस झेपणार नाहींत, असें वाटूनच कॉंग्रेस नेत्यांनीं आपली भूमिका निश्चित केली होती असें वाटतें. इतर जीं आपल्या भूमिकेचीं समर्थनें त्यांनीं पुढें केलीं होतीं त्यांचें वैयर्थ्य हळूहळू त्यांनाहि पटूं लागलें असावें असें दिसतें. आणि दुसरीहि एक गोष्ट ध्यानांत ठेविली पाहिजे. मानवाच्या घडामोडी एकाद्या प्रयोगशाळेतील प्रयोगाप्रमाणें अगदीं रेखीव मार्गानें, नियोजनपूर्वक, भावी परिणामांची अगाऊ

कल्पना येऊन अशा होत नसतात. आज तीस वर्षांनीं नंतरच्या घडामोडी पाहून त्या जमेस धरून टीकाकार टीकेला प्रवृत्त होतो. आणि त्या ज्ञानाचा आरोप तीस वर्षांपूर्वीचा माणसांवर करून त्यांना इमारत बांधणाऱ्या इंजिनियराप्रमाणें जबाबदार धरतो. मागल्या काळाकडे अशा पद्धतीनें पहाणें अशास्त्रीय व अयुक्त आहे. ठेंचा खात, चाचपडत, हातांतल्या काठीनें खाचखळग्यांचा अदमास घेतच मानवी जीवनाचा प्रवास चाललेला असतो. म्हणून ज्यांनीं आपलें सर्वस्व पणाला लावून राष्ट्रीय चळवळी केल्या त्यांच्यावर स्वार्थी हेतूंचा आरोप करण्यापूर्वीं दहा वेळां विचार करणें अवश्य असतें. वादविवादांत पंडितजींनीं कडक टीका केली व काँग्रेसजनांनीं हिरीरीनें आत्मसमर्थन केलें तरी ते दोन्ही अभिनिवेश सोडून आपण विचार करणें अवश्य आहे. तसा विचार केला तर दोन लढे एकदम झेपणार नाहींत, या विचारानें काँग्रेस राष्ट्रवादी भूमिका दृढपणें धरून बसली होती व आपल्या सामर्थ्याची वाढ होत आहे, कालाचा प्रवाह बदलत आहे, असें हळूहळू ध्यानीं येतांच तिनेंहि समाजवादाकडे पावलें टाकण्यास सुरुवात केली असें दृश्य आपणाला दिसूं लागतें. पंडित जवाहरलालजी, आचार्य नरेन्द्र देव, जयप्रकाश नारायण यांनाच त्याचें पुष्कळसें श्रेय आहे हें खरें; पण महात्माजीहि आपली भूमिका सोडण्यास तयार झाले होते, असें स्पष्ट दिसतें. आणि जमीनदारभांडवलदार यांनीं आपला उपदेश मानला नाहीं तर, 'सत्याग्रह व असहकारितां या मार्गानें मी त्यांच्याशीं लढेन' हें आपलें आश्वासन त्यांनीं खरें करून दाखविलें असतें, यांत शंका वाटत नाहीं. तसें झालें असतें तर आजचा भारताचा इतिहास फारच निराळा झाला असता. पण तसें घडलें नाहीं. त्याचें महात्माजींच्या मृत्यु हें तर एक कारण आहेच; पण इतरहि अनेक कारणें आहेत. त्या कारणांचा विचार करावयाचा म्हणजे स्वातंत्र्योत्तर भारतीय लोकशाहीचें विवेचन करणें अवश्य आहे. पण तत्पूर्वी कम्युनिस्ट व समाजवादी या पक्षांच्या कार्याचें भारतीय लोकसत्तेच्या दृष्टीनें मूल्यमापन करावयाचें आहे. स्वातंत्र्योत्तर घडामोडींचें त्यावांचून नीट आकलन होणार नाहीं. म्हणून त्यांचा परामर्ष घेऊन मग १९४७ नंतरची भारतीय जीवनाची पुनर्घटना या अत्यंत जिव्हाळ्याच्या विषयाकडे वळूं.

——

२

# मार्क्सप्रेरित दोन पक्ष

मार्क्सप्रणीत समाजवादी चळवळी या प्रामुख्यानें गिरणीकारखान्यांतील कामगारांच्या चळवळी असतात. हा कामगारवर्ग अत्यंत पुरोगामी, जागृत व संघटित असून सध्यांच्या जगांत समाजवादी क्रांति घडवून आणण्याचें सामर्थ्य फक्त त्याच वर्गाच्या अंगीं आहे आणि क्रांतीचें नेतृत्व करण्यास फक्त तोच वर्ग समर्थ आहे, असा मार्क्सवादाचा सिद्धान्त आहे. सध्यां कष्टाळू जनतेचा उल्लेख करतांना शेतकरी व कामकरी असा जोडीनें उल्लेख केला जातो. गरीब शाळाशिक्षक व कारकून यांचीहि या समाजांत कोणी गणना करतात. पण शुद्ध मार्क्सवादान्वयें नव्या समाज रचनेचा सर्व भार गिरणी-कारखान्यांतील शहरवासी कामगारवर्गावरच असतो. असा हा कामगारवर्ग हिंदुस्थानांत इ. स. १८७० च्या सुमारास निर्माण होऊं लागला. टाटा, ससून इ. भांडवलदारांचे कारखाने याच वेळीं सुरू झाले. अनेक इंग्रज कंपन्या याच वेळीं निघाल्या व त्यांच्या कारखान्यांत काम करणारा मजूर-वर्गहि तेव्हांपासूनच हिंदुस्थानांत दिसूं लागला. १८९४ सालीं हिंदुस्थानांत सुमारें ८०० कारखाने असून त्यांत साडेतीन लक्ष कामगार काम करीत होते. १९३० सालीं कारखाने ८००० असून कामगारसंख्या १५ लक्ष पर्यंत गेली होती. १९४४ सालीं एकंदर कामगार २५ लक्ष असून ते १४ हजार कारखान्यांत काम करीत होते. ही सर्व मोठ्या कारखान्यांची गणती आहे. लहान कारखान्यांतील कामगार यांत धरले तर हिंदुस्थानांतील एकंदर गिरणीकारखान्यांत काम करणारा वर्ग हा ३० ते ३५ लक्षांच्या आसपास जाईल.

प्रारंभापासून या कामगारांची स्थिति अत्यंत हलाखीची होती. त्यांचे पगार असेच असत कीं त्यांतून पोटभर अन्न, वस्त्र व इतर जीवनावश्यक वस्तु मिळणें अशक्य होतें. एकेका खोलींत आठदहा माणसें रहावयाचीं,

सकाळपासून संध्याकाळपर्यंत त्यांनीं कारखान्यांतून राबावयाचें आणि संध्याकाळीं सर्वांनीं मिळून एक ते दीड रुपयांची रक्कम घरीं आणावयाची ! यांतच अज्ञान, रोगराई, व्यसनें यांची भर पडून या कामगारांचें जीवन म्हणजे जिवंत नरकयातना होत असत. ब्रिटिश ट्रेड युनियन कॉंग्रेसचें वृत्त, व्हिटले कमिशन, आंतरराष्ट्रीय मजूर परिषदेंतील भारताचे प्रतिनिधि एस्. व्ही. परुळेकर व इंडियन टॅरिफ बोर्ड यांनीं दिलेले अहवाल, यांवरून हें स्पष्ट कळून येतें आणि त्यावरून हेंहि दिसून येतें कीं याच वेळीं पुष्कळशा कंपन्या शेकडां ४० पर्यंत नफा वाटीत असून कांहीं कंपन्या शेकडां २०० ते ३०० पर्यंतहि भागीदारांना नफा देत असत !

अशा स्थितींतहि सध्यांच्या काळांत ज्यांना आपण कामगारचळवळी व कामगार संघटना म्हणतों त्यांचा १९१८ पूर्वी म्हणजे रशियन क्रान्तीची प्रेरणा मिळेपर्यंत उदय झाला नव्हता. १८७७ सालीं नागपूरच्या एम्प्रेस मिलमध्यें पगारवाढीसाठीं संप झाल्याची नोंद आहे. १८८४ सालीं लोखंडे नांवाच्या गृहस्थानें मुंबईच्या कामगारांची एक संघटना निर्माणहि केली होती. पण तिचें रूप फार शिथिल होतें व ती पुढें टिकलीहि नाहीं. त्यानंतर कॉंग्रेसच्या प्रयत्नानें देशांत राष्ट्रीय भावनेचा प्रसार होऊं लागला. त्याच्या लाटा कामगारांपर्यंत अल्प प्रमाणांत जाऊन पोंचत असत. त्यांच्यांत कांहींशी जागृतीहि होत होती. पण ती वर्गीय भावनेची जाणीव नव्हती. कामगार ही स्वतंत्र शक्ति आहे, हाच वर्ग क्रांतीचा नेता आहे, या कल्पना तर कोणाच्याहि मनांत, स्वतः कामगाराच्याहि मनांत, उदित झाल्या नव्हत्या. त्यामुळें देशाच्या राजकारणाच्या दृष्टीनें त्यांच्या संघटनांकडे कोणी कधीं लक्ष दिलें नाहीं. देशाचा मुख्य कणा म्हणजे शेतकरी. त्यांच्या चळवळीकडेहि टिळकांखेरीज कोणी राजकीय दृष्टीनें पाहिलें नाहीं. मग ज्यांच्या अस्तित्वाची फारशी जाणीवहि कॉंग्रेसच्या नेत्यांना नव्हती त्या कामगारांच्या संघटनांचें नांव कशाला ? आणि त्यांत विपरीत असें कांहीं नव्हतें. कारण त्यावेळीं अखिल हिंदुस्थानांत कामगारांची संख्या ५।६ लाखांच्या वर गेली नव्हती. तेव्हां त्यांच्या स्वतंत्र प्रश्नांची व सामर्थ्याची जाणीव कोणास झाली नसली तर त्यांत कांहीं नवल नाहीं. टिळकांना ही जाणीव होऊन त्यांनीं कामगारांत जागृति करण्यास प्रारंभ केला होता, असा उल्लेख ' ग्रेट मेन

ऑफ इंडिया ' या पुस्तकांत त्यांच्या इंग्रज चरित्रकारानें केला आहे. ' हा पुण्याचा सनातन ब्राह्मण आपल्यांत येऊन बरोबरीनें मिसळतो, या विचारानें कामगारांना अस्मान् ठेंगणें झालें ' असें त्यानें म्हटलें आहे. मात्र याला अन्यत्र कोठेंहि पुरावा मिळत नाहीं. पण १९०२ सालचे केसरींतील ' हिंदुस्थानचें दारिद्र्य ', ' आमचे उद्योगधंदे कसे ठार झाले ! ' हे लेख पाहिले म्हणजे शेतकऱ्यांची चळवळ आठदहा वर्षें केल्यानंतर जागृतीची तीच ठिणगी कामगारांत टाकून द्यावी या विचारानें टिळक प्रवृत्त झाले असतील हें पूर्ण संभवनीय आहे. पण तसें असलें तरी ते प्रयत्न प्रत्यक्षांत अवतरले नाहींत हें खरें आहे. तेव्हां १९२०–२१ पर्यंत कामगारांमध्यें राजकीय दृष्टीनें चळवळ व संघटना झाली नव्हती; आणि कामाचे तास कमी करून घेणें, मजुरी वाढवून घेणें, इतर तक्रारी दूर करून घेणें इ. हेतूंसाठीं ज्या संघटना झाल्या त्यांनाहि पहिलें महायुद्ध संपून जाईपर्यंत विशेष जोर चढला नव्हता, असेंच म्हटलें पाहिजे.

## कम्युनिस्ट पक्षाची स्थापना

१९१८ सालीं सोव्हिएट रशियांत अभूतपूर्व अशी क्रान्ति झाली आणि तेव्हांपासून एकंदर जगाच्याच कामगारवर्गाच्या जीवितांत नवें युग सुरू झालें. रशियांत कामगारांचें राज्य स्थापन झालें व कामगारवर्ग सत्ताधीश झाला, असा त्यावेळीं सर्वत्र बोलबाला झाला. त्यामुळें या वर्गाच्या जीवनांत नव्या आशाआकांक्षांचा उदय होऊन त्याची सर्व कळाच पालटून गेली. मार्क्सवादी वाङ्मय हळूहळू भारतांत झिरपून येऊं लागलें व मुंबईच्या कांहीं तरुण कार्यकर्त्यांच्या मनांत मार्क्सच्या अलौकिक संदेशाचे ध्वनि घुमूं लागले. १९२२ ते १९२४ च्या दरम्यान श्रीपाद अमृत डांगे, ठेंगडी, घाटे, जोगळेकर, शौकत उस्मानी, झाबवाला, मुझफर अहंमद, दासगुप्ता यांनीं कम्युनिस्ट पक्षाची स्थापना केली व डांगे यांच्या संपादकत्वाखालीं १९२४ सालीं ' सोशालिस्ट ' हें पत्र चालू केलें.

मार्क्सवाद ही एक प्रखर आग आहे. ती ज्या भूमींत पसरते, तेथील प्रस्थापित राजसत्ता, धर्मसत्ता, तेथील समाजांवर वर्चस्व गाजविणाऱ्या हजारों

वर्षांच्या रूढी, त्याच्या मनावरचे सर्व प्रकारचे जुनाट संस्कार हें सर्व या आगींत जळून खाक व्हावयाचें, हा गेल्या पंचवीस वर्षांच्या इतिहासावरून स्पष्ट दिसून येणारा सिद्धांत आहे. १९२४ सालीं मार्क्सप्रणीत तत्त्वांचे हें सामर्थ्य इतक्या उत्कटत्वानें जगाच्या निदर्शनास आलें नव्हतें, पण युरोपांतील सत्ताधारी वर्गाला त्याची जाणीव झाली होती यांत शंका नाहीं. आणि या सर्व सत्ताधाऱ्यांत अत्यंत श्रेष्ठ, सावध व दक्ष असे जे ब्रिटिश लोक त्यांना तर मार्क्सवाद हा अंतर्बाह्य चांगलाच परिचित झाला होता. कारण १८५० सालापासून मार्क्स व एंगल्स यांचें सर्व कार्य त्यांच्याच भूमींतून चाललें होतें. हिंदुस्थानांतील या नव्या चळवळीचा, या नव्या आगीचा अर्थ त्यांनीं तत्काळ जाणला आणि जन्मतःच तिचा नायनाट करण्याच्या हेतूनें आपल्या सर्व सामर्थ्यानिशीं १९२४ सालापासूनच प्रयत्न सुरू केले. त्याच सालीं कानपूर-कटाचा खटला सुरू झाला आणि डांगे, शौकत उस्मानी प्रभृति कम्युनिस्ट नेत्यांना सरकारनें चार वर्षें सक्तमजुरीची शिक्षा ठोठावली.

अशा रीतीनें हिंदुस्थानांत कम्युनिस्ट चळवळीचा प्रारंभ झाला. त्याच्या आधीं वर सांगितल्याप्रमाणें मजुरांच्या फारशा संघटनाच नव्हत्या आणि १९१७–१८ च्या सुमारास ज्या संघटना अस्तित्वांत आल्या होत्या, त्यांचें स्वरूप अगदीं साधें म्हणजे कम्युनिस्टांच्या भाषेंत सुधारणावादी होतें. १९२० सालीं हिंदुस्थानांतील सुमारें २०० ट्रेड युनियन्सचे प्रतिनिधि मुंबईस एकत्र जमले व त्यांनीं अखिल भारतीय ट्रेड युनियन कॉंग्रेसची स्थापना केली. यावेळीं लजपतराय या पहिल्या अधिवेशनाचे अध्यक्ष होते व बॅ. जोसेफ बॅप्टिस्टा हे उपाध्यक्ष होते. येथून पुढें या कामगार-संघटनेचीं दरसाल अधिवेशनें भरूं लागलीं. पण वर्गविग्रह, भांडवलदाराशीं लढा, कामगारांचें अधिराज्य साम्राज्यशाहीचा पाडाव या जहाल तत्त्वांचा अवलंब अजून कामगारांनीं केला नव्हता. कामगारांची स्थिति सुधारणें, कामाचे तास कमी करणें, वेतनवाढ करणें, घरांची सोय करणें, फॅक्टरी ॲक्टसारखे कायदे करण्याची सरकारला विनंति करणें एवढीच या संघटनेच्या कार्याची व्याप्ति होती; आणि असें होतें तोंपर्यंत सरकारचाहि तिला पाठिंबा होता. नारायण मल्हार जोशी हे त्या क्षेत्रांत त्यावेळीं प्रमुख कार्यकर्ते होते. अखिल भारतांतील

कामगारसंघटना एकसूत्रांत आणणें, आंतरराष्ट्रीय कामगार-संघटनाशीं त्यांचा संबंध जोडून देणें इ. महत्त्वाचीं कामें जोशी यांनीं केलीं. चित्तरंजन दास, सुभाषचंद्र बोस हेहि एकेकदां या अखिल भारतीय ट्रेड युनियन कॉंग्रेसचे अध्यक्ष होते; पण त्यांचें धोरण वर्गसमन्वयाचें, राष्ट्रनिष्ठेचें व सरकारच्या मदतीनें कामगारांचा उद्धार घडवून आणण्याचें होतें. मार्क्स-वादाची प्रेरणा यांच्यापैकीं कोणींच दिली नव्हती. ती देण्याचें सर्व श्रेय डांगे, मिरजकर प्रभृति कम्युनिस्टपक्षीय नेत्यांनाच आहे.

सरकारनें अत्यंत हिंस्रपणें कम्युनिस्ट चळवळीवर आघात केले, तरी त्यामुळें ती दडपली गेली नाहीं. उलट त्या पक्षाच्या नेत्यांची प्रतिष्ठा या दडपशाही-मुळें वाढून कामगारवर्ग बहुसंख्येनें त्यांच्या पाठीमागें चालूं लागला. सर्व हिंदुस्थानांतील बहुसंख्य ट्रेड युनियन्स त्यांच्या कक्षेंत गेल्या आणि १९२० सालीं स्थापन झालेली अखिल भारतीय ट्रेड युनियन कॉंग्रेसहि लवकरच त्यांनीं जिंकून घेतली. व्हिटले कमिशनवर कम्युनिस्टपक्षीय नेत्यांनीं बहिष्कार घालण्याचा ठराव केला; तेव्हां तें धोरण नेमस्त पुढारी ना. म. जोशी यांना मान्य नव्हतें; पण कॉंग्रेसमध्यें ते आपलें वर्चस्व प्रस्थापूं शकत नसल्यामुळें त्यांना ट्रेडयुनियन कॉंग्रेसमधून बाहेर पडावें लागलें आणि ‘ नॅशनल फेडरेशन ऑफ लेबर ’ अशी आपल्या वर्गाची निराळी कामगार संघटना काढावी लागली. अशा रीतीनें अखिल भारतीय कामगार जगांत कम्युनिस्टांचें निरपवाद नेतृत्व प्रस्थापित होऊन वर्गविग्रह, कामगारसत्ता या धोरणानें येथल्या राजकारणाचीं पावलें पडण्याचा कांहींसा संभव निर्माण झाला.

१९२८-२९ सालीं कम्युनिस्टप्रणीत कामगार-चळवळीला अगदीं उधान आलें होतें. मागल्या सातआठ वर्षांत घडले नव्हते इतके संप या एका वर्षांत घडून आले आणि अनेक ठिकाणीं मालकवर्गाला व त्याच्यामागें उभ्या असलेल्या सरकारला कामगारांपुढें नमावें लागून त्यांच्या मागण्या मान्य कराव्या लागल्या; त्यामुळें सरकारनें दडपशाहीचा वरवंटा जोरांत फिरविण्यास सुरवात करून अनेक मार्गांनीं ही चळवळ भरडून टाकण्याचा प्रयत्न केला. सुप्रसिद्ध मीरतकटाचा खटला झाला तो याच वेळीं. निरनिराळ्या तीस कम्युनिस्ट नेत्यांना यांत सरकारनें गोविलें होतें. हा खटला तीन साडेतीन वर्षें चालून बहुतेक नेत्यांना सरकारनें १० ते १२

वर्षांच्या काळेपाण्याच्या शिक्षा दिल्या; पण पुढें आंतरराष्ट्रीय दडपणामुळें या शिक्षा बऱ्याच कमी करण्यांत आल्या. कामगारांचे नेते अशा रीतीनें तुरुंगांत गेल्यामुळें चळवळ बरीच विस्कळित झाली, पण थंडावली नाहीं. फुटीरपणें शेकडों कारखान्यांत संप होतच राहिले व कांहीं ठिकाणीं त्यांचें प्रमाण वाढलेंहि. त्यामुळें १९३४ सालीं कम्युनिस्ट पक्षच सरकारनें बेकायदा ठरवून या चळवळीवर प्रचंड आघात केला. तरी गुप्तपणें भूमिगत होऊन कम्युनिस्टांनीं आपली चळवळ चालू ठेवली होती. १९४२ सालीं त्यांनीं युद्धकार्यांत ब्रिटिशांना साह्य करावयाचें ठरविल्यामुळें त्यांच्यावरील बंदी उठली व त्यांच्या कामगारसंघांच्या संख्याहि वाढूं लागल्या; पण युद्ध-समाप्तिनंतर रशियानें ब्रिटनविरोधी धोरण अवलंबितांच येथील कम्युनिस्टांनीं पुन्हां आपलें धोरण बदललें. आणि यावेळीं त्यांनीं अत्यंत भयानक अशा घातपाती चळवळीचें धोरण स्वीकारलें. यामुळें कॉंग्रेस-सरकारनें त्यांच्या विरुद्ध हत्यार उपसून कम्युनिस्ट पक्षाची पाळेंमुळें खणून काढण्याचा निश्चय केला व तशी मोहीमहि सुरू केली. सध्यां बाह्यतः तरी हा पक्ष नामोहरम झाल्यासारखा दिसत आहे.

भारतांतील कम्युनिस्ट पक्षाच्या गेल्या ३० वर्षांच्या इतिहासाची रूपरेखा ही अशी आहे. या देशाच्या एकंदर प्रगतीच्या दृष्टीनें आणि येथल्या लोकशाहीच्या दृष्टीनें त्या इतिहासाचा व कम्युनिस्टांच्या कार्याचा विचार केला, तर मन निराशेनें व्याप्त होतें. त्याग, धैर्य, साहस या गुणांत हे लोक, किंवा निदान यांचे प्रारंभींचे नेते कमी होते असें मुळींच नाहीं. तरुण स्त्रीपुरुष जनसेवेच्या ज्या उदात्त भावनेनें प्रेरित होतात त्याच भावनेनें डांगे, मिरजकर, निंबकर व त्यांचे इतर प्रांतांतले अनेक सहकारी प्रेरित झाले असले पाहिजेत. मार्क्सचें तत्त्वज्ञान अभ्यासून त्याचा कामगारांत प्रसार करण्यासाठीं त्यांनीं जे कष्ट केले, त्यांत स्वार्थी हेतूचा मागमूस सांपडणें त्यावेळीं तरी शक्य नव्हतें. अजूनहि लढा करण्याची त्यांच्या अंगांतली रग पाहिली, तुरुंगामध्यें ज्या बेडर व साहसी वृत्तीनें ते प्रतिकार करतात तिचीं वर्णनें वाचलीं म्हणजे त्यांच्या त्या आंतरिक प्रेरणेबद्दल मोठा विस्मय व कौतुक वाटतें. आणि त्यामुळेंच मनाला अतिशय खेद होतो. त्याग, साहस, धैर्य समाजहितबुद्धि हे मानवत्वाचे अलौकिक गुण केवळ वायां जावे याचा मनाला

विषाद वाटतो. कारण भारतीय लोकसत्तेच्या दृष्टीनें कम्युनिस्टांच्या कार्याचें मूल्य माझ्या मतें जवळजवळ शून्य आहे. इतकेंच नव्हे तर त्यांचें पुष्कळसें तत्त्वज्ञान, धोरण व कृति हीं या प्रगतीला मारकच झालीं आहेत; आणि याचें प्रधान कारण म्हणजे सोव्हिएट रशियाची व मार्क्सवादाची त्यांनीं पत्करलेली गुलामगिरी हें होय.

कम्युनिस्ट तत्त्वज्ञान हें विश्वव्यापक बैठकीवर उभारलेलें आहे. राष्ट्रभेद तें जाणीत नाहीं. धर्मभेद, पंथभेद तर मुळींच नाहीं. सर्व जगांतील कामगारांची एक संघटना हें त्याचें ब्रीदवाक्य आहे. मार्क्स, एंगल्स व पुढें लेलिन स्टॅलिन यांनीं स्थापलेल्या संस्थांना फर्स्ट इंटरनॅशनल, सेकंड, थर्ड इंटर नॅशनल अशीं नांवें होतीं. धर्मभेद, राष्ट्रभेद, वंशभेद हे सर्व भांडवलदारांनीं निर्मिलेले आहेत आणि त्यांच्या पलीकडे जाऊन म्हणजे धर्म, राष्ट्र, वंश हें कांहीं न मानतां अखिल जगतांतल्या कामगारांनीं एक व्यापक संघटना उभारावी अशी कम्युनिस्ट तत्त्वज्ञानाची आज्ञा आहे. रशियन क्रांतीच्या लाटांबरोबर हेंहि तत्त्वज्ञान जगभर पसरलें व प्रत्येक देशांतील तरुण याच धोरणानें कार्य करूं लागले. प्रत्यक्षांत खरोखरच असें कांहीं घडलें असतें तर जगांतील युद्धें टळून मानवजातीचा दु:खभार हलका झाला असता यांत शंकाच नाहीं; पण थोर तत्त्वांची जी नेहमीं वासलात लागते तीच याचीहि लागली. धूर्त लोकांनीं तें स्वार्थासाठीं राबवावयाचें आणि भोळ्याभाबड्यांनीं उदात्त तत्त्वाचें आपण आचरण करीत आहोंत, या सुखद भावनेंत गुंग होऊन बळी जायचें, असाच सर्व थोर तत्त्वांचा इतिहास असतो. हिंदुस्थानांतील कम्युनिस्ट नेते दुसऱ्या वर्गात पडले आणि त्यांनीं स्वत:ला व देशहिताला सुखानें बळी दिलें.

## सोव्हियेट रशियाचें दास्य

वास्तविक १९२६ सालींच स्टॅलिननें 'राष्ट्रमर्यादित समाजवाद' 'सोशॅलिझम इन् ए सिंगल कंट्री' हें धोरण जाहीर करून आंतरराष्ट्रीयत्वाचा व जगव्यापकतेचा बळी दिला होता. तेव्हांपासून त्याचें प्रत्येक कृत्य कट्टर राष्ट्रवादी धोरणानें प्रेरित झालेलें होतें. १९३८ सालीं जगांतील कामगारांशीं दगाबाजी करून त्यानें मार्क्सवादाचा कट्टा शत्रू हिटलर

याच्याशीं तह केला. दुसऱ्या महायुद्धाच्या वेळचीं त्याचीं भाषणें राष्ट्रनिष्ठा, पूर्वपरंपरेचा अभिमान, मातृभूमीचें श्रेष्ठत्व यांनीं इतकीं अलंकृत झालेलीं आहेत कीं, क्षणभर वीर सावरकरांचींच भाषणें हा पाठ म्हणून दाखवीत आहे कीं काय, असा भास व्हावा. १९४५ सालीं जपानचा पराभव होऊन त्याचें सैन्य चीनमधून परत गेलें; त्यावेळीं चिआंग कै शेकची व माओची अशा दोन सत्ता तेथें प्रस्थापित होऊं पहात होत्या. त्यांतील कोणच्या सत्तेशीं स्टॅलिननें तह केला? मान्यता कोणच्या सत्तेस दिली? दलितांचा कैवार घेऊन उठणारी, शेतकऱ्यांचें राज्य जिनें कांहीं भागांत प्रत्यक्ष प्रस्थापित केलें होतें अशी, मार्क्सवादावर अनन्य निष्ठा ठेवणारी, जमीनदार-भांडवलदार यांचा नायनाट करणारी अशी जी माओची सत्ता तिला स्टॅलिननें मान्यता दिली नाहीं. विरोधविकासवादावरील आपल्या निबंधांत प्रस्थापित सत्ता कितीहि बलिष्ठ दिसली तरी नव्या उदयोन्मुख सत्तेलाच-ती कितीहि क्षुद्र दिसत असली तरी—खऱ्या मार्क्सवादानें पाठिंबा दिला पाहिजे असें त्यानें सांगितलें आहे. असें असून, अमेरिकेनें ज्या प्रतिगामी, सुलतानी, सैतानी, अधोगामी चिआंग कैशेकच्या सत्तेला पाठिंबा दिला, तिलाच स्वतः स्टॅलिननें साद घातली. त्यानें चिआंग कैशेकलाच मान्यता दिली. हिटलर, चिआंग कैशेक हेच स्टॅलिनचे दोस्त होते. त्यानें लांडग्याच्या जातीचेच दोस्त निवडले. मधूनमधून तोंडी लावायला इतर देशांतील कामगारपक्षरूप शेळयांना तो जवळ करतो हें खरें. त्या वेळीं तो भाषणेंहि उदात्त करतो; पण राष्ट्रीय हिताचा प्रश्न आला कीं तो हिटलर, चर्चिल, चिआंग यांच्या गटांत सामील होतो व मग सगळे मिळून शेळयांचा समाचार घेतात.

स्टॅलिनचें हें चरित्र अगदीं उघडें व जगजाहीर असें आहे. त्यांत गूढ, अनाकलनीय असें कांहीं नाहीं. १९२६ सालीं त्यानें राष्ट्रीय समाजवादाचें धोरण जाहीर करतांच जगांतील, निदान हिंदुस्थानांतील कम्युनिस्टांनीं सावध व्हावयास हवें होतें. १९३८ सालीं त्यानें हिटलरशीं सख्य केलें तेव्हां तर त्यांच्या डोळयांत चरचरीत अंजन पडावयास हवें होतें. पण आपल्या दुर्दैवानें तसें झालें नाहीं व अजूनहि कम्युनिस्टांची सोव्हिएट-निष्ठा कमी होत नाहीं. कित्येक मुसलमानांची भारतबाह्य निष्ठा जितकी घातक आहे तितकीच कम्युनिस्टांची ही भारतबाह्य निष्ठा घातक आहे व

तिला एक अर्वाचीनतेचें व अद्यावततेचें भ्रामक आवरण असल्यामुळें ती एका दृष्टीनें जास्तच घातक आहे.

## हिंस्र मार्ग

उत्पात, विध्वंस यांवांचून समाजाची प्रगति नाहीं, या मार्क्सप्रणीत विरोधविकासवादांतील दुसऱ्या एका तत्त्वावरील अंधनिष्ठेमुळें कम्युनिस्ट आणखी एका प्रकारें या भूमीचें अहित करीत आहेत. गेलीं कांहीं वर्षें त्यांनीं घातपाती चळवळीचा अवलंब करून लोकशाहीच्या मूलभूत कल्पनाच झुगारून दिल्या आहेत. वास्तविक महात्माजींनीं सत्याग्रहाचा किंवा व्यवहारतः निःशस्त्र प्रतिकाराचा मार्ग या भूमीच्या स्वातंत्र्याच्या लढ्यांत यशस्वी करून दाखविल्यानंतर कांहीं भारतीयांनीं अन्य मार्गाचा अवलंब करावा हें खरोखर दुर्दैव होय. अंतिम लढा सशस्त्र होईल कीं निःशस्त्र याविषयीं कितीहि मतभेद असले, तरी प्रारंभीचे लोकजागृतीचे लढे हे या एकाच मार्गानें यशस्वी होतील, निदान स्वकीय सरकाराविरुद्ध जो लढा करावयाचा तो आचार्य जावडेकरांनीं रूढ केलेल्या शब्दप्रणालीअन्वयें सत्याग्रही समाजवादी पद्धतीनेंच करणें अत्यंत श्रेयस्कर होय, याविषयीं कोणाचें दुमत होईल असें वाटत नाहीं. खरोखर लोकशाही समाज व लोकायत्त शासन निर्माण करूं पहाणाऱ्या राष्ट्राला महात्माजींनीं सत्याग्रह हें जें शस्त्र दिलें आहे त्याला दुसरी तोड नाहीं. लोकशाहीच्या सर्व व्यवहारांची व लोकायत्त शासन लोकांच्या नियंत्रणाखालीं सतत ठेवण्याच्या उपायांची ज्यानें स्वतःच्या मनाशीं चिकित्सा केली असेल, त्यालाच महात्माजींच्या या अलौकिक कार्याची महती यथार्थपणें कळूं शकेल. जगाच्या लोकशाहीचा इतिहास लिहितांना गांधीपूर्वयुग व गांधीउत्तरयुग असे त्या इतिहासाचे दोन भाग पाडावे लागतील इतकें सत्याग्रही समाजवादाचें महत्त्व आहे. लोकायत्त शासन बदलण्यास मतप्रचारानें बहुमत आपल्या बाजूस करून घेणें हा एकच शांततेचा उपाय आजपर्यंत जगाला माहीत होता. तो फसला तर सशस्त्र क्रांतीखेरीज दुसरा मार्ग नव्हता. पण सशस्त्र क्रांतींत लोकशाहीचा बहुधा बळी पडतो; म्हणून तो उपाय अवलंबिणें फार धोक्याचें असतें. सत्याग्रह हा मार्ग दाखवून महात्माजींनीं ही कोंडी फोडून टाकली आहे आणि

जगांतल्या लोकशाहीची चिरंतन सेवा केली आहे. पण दुर्दैवानें कम्युनिस्ट जातीचे लोक हें महासत्य आकळूं शकत नाहींत आणि रशियाहून येणाऱ्या संदेशाप्रमाणें घातपाताचा अवलंब करून भारतीय लोकसत्तेचा ते कायमचा नाश करूं पहात आहेत.

## साम्राज्यशाहीशीं लढा नाहीं.

पण एवढेंहि करून ज्या साम्राज्यशाहीच्या शत्रुत्वाचें कंकण जन्मतःच या पक्षानें हातांत बांधलें होतें, त्या ब्रिटिश साम्राज्यशाहीशीं या पक्षानें लढा चालविला असता तर भारतीय जनता अंशतः तरी त्याची ऋणी झाली असती. कारण अज्ञान, दास्य, दारिद्र्य यांत हजारो वर्षें खितपत पडलेल्या तेजोहीन, प्रतिकारशून्य जनतेला स्वतःच्या हक्कासाठीं, आपल्या बांधवांसाठीं व आपल्या स्वाभिमानासाठीं लढा करण्यास उद्युक्त करणें, तिच्या पाठीचा कणा ताठ करून मरणमारणसंग्रामाला तिला सिद्ध करणें ही लोकशाहीची आणि मानवतेची फार मोठी सेवा आहे. पण तोंडानें साम्राज्यशाहीशीं लढा हें पालुपद चालू ठेवणाऱ्या या पक्षानें स्वतंत्रपणें ब्रिटिशांशीं कधींहि लढा केला नाहीं आणि कॉंग्रेसनें जे लढे केले त्यांपैकीं एकांतहि भाग घेतला नाहीं. शेवटच्या ४२ च्या लढ्यांत तर स्वदेश, जनता व कामगार यांशीं द्रोह करून त्या साम्राज्यशाहीशींच सहकार्य केलें. आणि हें कृत्य म्हणजेच कम्युनिस्ट पक्षाच्या पुरोगामित्वाचें कमालीचें भूषण होय, असें पाम दत्ता-सारखे लेखक जगाला सांगत आहेत ! ( इंडिया टुडे–पृ. ३५३ ).

कम्युनिस्टांनीं १९२० सालानंतरच्या पंधरावीस वर्षांत कामगारवर्गांत जागृति करून गिरणी-कारखान्यांतून अनेक संप घडवून आणले; पण या लढ्यांना जोंपर्यंत राजकीय स्वरूप येत नाहीं, तोंपर्यंत हे संप म्हणजे कामगार-वर्गाच्या स्वतःच्या कामाच्या तासांच्या व मजुरीच्या तक्रारी दूर करण्याचें एक साधन ठरून त्यांना उदात्त व व्यापक प्रतिष्ठा प्राप्त होत नाहीं. राष्ट्रीय लढ्यामागलें थोर तत्त्वज्ञान, अखिल देशबांधवांच्या कल्याणासाठीं त्याग करण्याची त्याच्या मागची भूमिका, एका मानवसमूहाच्या सांस्कृतिक उंचीसाठीं आत्मार्पण करण्याची त्यामुळें मनाला मिळणारी शिकवण हें जें ब्रिटिश साम्राज्यशाहीशीं होणाऱ्या लढ्याचें वैभव तें केवळ

मजुरांच्या हितसंबंधाचे दोनचार प्रश्न सोडविण्यासाठीं केलेल्या संपांना कधींच येणार नाहीं. कामगारांच्या लढ्यांना प्रारंभ जरी संपापासून झाला, तरी साम्राज्यशाहीशीं करावयाच्या लढ्याचा एक भाग, हें त्याचें स्वरूप कधींच दृष्टीआड होतां कामा नये. कारण कामगारांचे खरे शत्रू साम्राज्यशहा हेच असतात. भांडवलदार, जमीनदार, संस्थानिक हे त्यांचे हस्तक म्हणून त्यांचें स्थान गौण असतें. आणि म्हणूनच प्रत्येक आर्थिक लढा हा राजकीय लढा असला पाहिजे हें मार्क्सवादांत आद्य तत्त्व म्हणून स्वीकारलेलें आहे. पण सोव्हिएट रशियाच्या अंकिततेमुळें येथील कम्युनिस्टांना या तत्त्वाचाहि विसर पडला आणि कामगारवर्ग ही भारताची एक मोठी शक्ति यांनीं परक्यांच्या हितासाठीं कायमची पंगु करून ठेवली. साम्राज्य-शाहीशीं मुकाबला केल्यानें अंगांत निर्माण होणारें तेज व सामर्थ्य त्यांनीं जन्माला येऊंच दिलें नाहीं.

चिनी कम्युनिस्टांना स्वतंत्र प्रज्ञा, अभिजात दृष्टि व स्वयंकर्तृत्व यांची जोड लाभल्यामुळें आपल्या राष्ट्राची त्यांनीं किती अलौकिक सेवा केली पहा. जपानी साम्राज्यशाहीशीं लढा हें आपलें ध्येय त्यांनीं कधींहि दृष्टिआड होऊं दिलें नाहीं आणि त्यासाठीं प्रथम सन्यत्‌सेनशीं तर त्यांनीं सहकार्य केलेंच, पण पुढें चिआंग कैशेकनें जपानशीं लढण्याचें मान्य करतांच १९३६ सालीं कोमिंटांगसारख्या अत्यंत प्रतिगामी व अधम अशा पक्षांशीं सुद्धां सहकार्य केलें. सियान येथें चिआंगला मांचूरियन सैन्यानें पकडलें, त्या वेळीं कम्यु-निस्टांच्या मध्यस्थीमुळेंच तो जिवंत सुटला. आणि त्याला ठार केलें तर देशांत यादवी माजून जपानी साम्राज्यशाहीशीं लढा करणें अशक्य होऊन बसेल हें जाणूनच कम्युनिस्टांनीं या आपल्या हाडवैऱ्याला जिवंत सोडून त्याच्या प्रतिष्ठेला अणुमात्र धक्का लागणार नाहीं अशी दक्षता घेतली. आणि नंतर त्याच्या हाताखालीं आपल्या सेना देऊन साम्राज्यशाहीशीं लढा चालू केला. हें सहकार्य यशस्वी व्हावें म्हणून त्यांचें अधिराज्य असलेल्या वायव्य सरहद्द प्रांतांत त्यांनीं कांहीं काळ जमीनदारांशीं चालू केलेला संग्राम स्थगित करण्याचेंहि अभिवचन दिलें आणि तें कसोशीनें पाळलें. कारण जपान हा खरा शत्रू असून जमीनदार-भांडवलदार हे त्याचे हस्तक होत, हें सत्य त्यांना चांगलें उमगलें होतें. साम्राज्यशाहीशीं लढा या तत्त्वाप्रमाणेंच राष्ट्रनिष्ठा हें

दुसरें महातत्त्वहि चिनी कम्युनिस्टांनीं दृष्टिआड होऊं दिलें नाहीं. 'परतंत्र राष्ट्राचें पहिलें कर्तव्य स्वातंत्र्यप्राप्ति हें होय, समाजवाद नव्हे. परतंत्र राष्ट्रानें कम्युनिझमची चर्चा करण्यांतसुद्धां अर्थ नाहीं, राष्ट्रीय स्वातंत्र्य हेंच त्याचें पहिलें कर्तव्य होय.' असे माओ त्से तुंगचे स्पष्ट उद्गार आहेत. (रेड स्टार ओव्हर चायना. एडगर स्नो. पृ. ४१७). चिनी कम्युनिस्ट पक्षाचें कार्यहि याचीच साक्ष देईल. १९२१ पासून १९४९ सालीं चीनवर पक्षाचें राज्य स्थापन होईपर्यंत राष्ट्रीय स्वातंत्र्य व साम्राज्यशाहीशीं लढा हे दोनच कार्यक्रम त्यांनीं डोळ्यापुढें ठेवले होते व या लढ्यासाठीं चिनी शेतकऱ्यांच्या प्रचंड सेना तयार करून राष्ट्रीय संग्रामाच्या अग्निदिव्यांतून त्यांनीं नवचीन निर्माण केला आणि याच वेळीं हजारों खेड्यांतून स्वायत्त शासनाचें शिक्षण देऊन लोकशाहीचा पाया घातला. सामान्य मानवांतील स्वाभिमान जागृत करून त्याला आक्रमणाला तोंड देण्यास, साम्राज्यशाहीशीं लढा करण्यास सिद्ध करणें हा स्वायत्त शासन पेलण्यास त्याला समर्थ करण्याचा एकच उपाय आहे, हें टिळकमहात्माजींनीं जितकें जाणलें होतें तितकेंच चिनी कम्युनिस्टांनीं जाणलें होतें असें दिसतें. राष्ट्रीय संघटना करण्यांत त्यांना यामुळेंच यश प्राप्त झालें आहे. याच सत्याचें ज्ञान हिंदुस्थानांतील कम्युनिस्टांना झालें असतें तर !

हें ज्ञान त्यांना स्वतःला तर झालें नाहींच, पण ज्या दोन विभूतींना झालें होतें, त्यांची निरर्गल निंदा करणें यांतच भूषण आहे, असें विपरीत धोरण त्यांनीं अंगीकारलें होतें. पाम दत्त नांवाच्या कम्युनिस्टाच्या मतें टिळकांच्या पक्षाला राजकीय तत्त्वज्ञानच नव्हतें ! टिळकांना नवीन सामाजिक व राजकीय दृष्टि प्राप्त झालेली नव्हती ! (इंडिया टुडे पृ. २६८). आणि गांधींची सत्यनिष्ठा, अहिंसा व इतर तत्त्वें म्हणजे जनतेची चळवळ हाणून पाडण्याचें हुकमी साधन होतें ! (उक्त ग्रंथ पृ. २९५) अशा तऱ्हेचीं बालिश मतें असल्यामुळें येथल्या कम्युनिस्टांनीं कॉंग्रेसशीं कधींहि सहकार्य केलें नाहीं. चिआंग कै शेकचें जपानी साम्राज्यशाहीशीं लढा नाहींच करावयाचा असें व्रत होतें. हा लढा करावा असें प्रतिपादन करणाऱ्या हजारों तरुणांची त्यानें कत्तल केली. अशा चिआंगला जबरदस्तीनें पकडून कम्युनिस्टांनीं त्याला मारूनमुटकून जपानशीं लढा करण्यास तयार केलें व

मग त्याच्याशीं आपला शेतकरीक्रांतीचा कार्यक्रम स्थगित करूनहि सहकार्य केलें. आणि भारतांत साम्राज्यविरोधी लढा हें एकमेव ध्येय कॉंग्रेसनें डोळ्यापुढें ठेवलेलें असतांना मार्क्सवादी पोपटपंचीचा आश्रय करून येथील कम्युनिस्टांनीं तिच्याशीं एकदांहि सहकार्य केलें नाहीं. उलट ब्रिटिश साम्राज्यशाहीशींच सहकार्य केलें. एकाच मार्क्सवादाला दोन देशांत हीं किती भिन्न फळें आलीं !

कम्युनिस्टांच्या अलीकडच्या या सर्व लीला पाहिल्या म्हणजे त्यांच्या तत्त्वज्ञाना-बद्दलच नव्हे तर हेतूच्या शुद्धतेबद्दलहि जबर शंका येऊं लागतात. आणि रशियन साम्राज्यशाहीचे हे हिंदुस्थानांतील स्वजनद्रोही हस्तक आहेत हे समाजवादी पक्षानें व कॉंग्रेसनें त्यांच्यावर केलेले आरोप खरे आहेत असें वाटूं लागतें; आणि हे आरोप खरे असतील तर भारतीय लोकसत्तेचा त्यांनीं विनाश न केला तरच नवल. त्यांचे हेतु शुद्ध असले तरी त्यांचें घातपाती धोरण, त्यांची मार्क्सवरील अंधनिष्ठा, त्यांची भ्रामक विचारसरणी—म्हणजे एकंदरींत त्यांचें तत्त्वज्ञान हें लोकशाहीला पुरेसें मारक आहे. मग त्यांत कृष्ण हेतूंची भर पडली तर कोणता अनर्थ होईल हें सांगावयास नकोच. या पक्षाचें कधीं काळीं दुर्दैवानें या भूमीवर वर्चस्व प्रस्थापित झालेंच तर झेकोस्लो-व्हाकिया, बल्गेरिया, पोलंड या देशांसारखें रशियाचें दास्य, स्वत्वहीनता व व्यक्तित्वशून्यता तिच्या कपाळीं येऊन लोकशाहीच्या उदात्त तत्त्वांचा येथून समूळ नाश झाल्याखेरीज रहाणार नाहीं.

## समाजवादी पक्ष

मार्क्सप्रणीत तत्त्वज्ञानान्वयें भारतांत चळवळ व संघटना करणारा दुसरा पक्ष म्हणजे भारतीय समाजवादी पक्ष होय. गेल्या प्रकरणांत कॉंग्रेसच्या धोरणा-विषयीं पंडित जवाहरलाल यांची जी भूमिका विशद करून सांगितली आहे, तीच जवळजवळ या पक्षाची भूमिका आहे. कॉंग्रेसचें केवळ राष्ट्रवादी धोरण या पक्षाला अमान्य आहे. शेतकरी व कामकरी यांची संघटना करून जमीनदार-भांडवलदार वर्गाविरुद्ध लढा पुकारला पाहिजे आणि तो लढा ब्रिटिशांशीं स्वातंत्र्याचा लढा चालू असतांनाच सुरू केला पाहिजे; साम्राज्य-शाहीशीं चालविलेल्या लढ्याचा तो एक भागच आहे, असें या पक्षाचें मत

होतें आणि कॉंग्रेसला तें मत मान्य नसल्यामुळें या पक्षाला आपली निराळी संघटना करावी लागली.

१९३० सालापासून जयप्रकाश नारायण, नरेन्द्र देव, अच्युत पटवर्धन, ना. ग. गोरे, कमलादेवी चट्टोपाध्याय, पुरुषोत्तमदास त्रिकमदास, साने गुरुजी इ. कॉंग्रेसमधील तरुणांना कॉंग्रेसचें जमीनदार–भांडवलदारांच्या आहारीं जाण्याचें धोरण नापसंत होऊं लागलें. अशा या तरुणांनीं कॉंग्रेसच्या छायेंतच संघटित व्हावयाचें ठरवून १९३४ सालीं कॉंग्रेस समाजवादी पक्षाची स्थापना केली. कॉंग्रेसशीं समाजवादी भूमिकेविषयीं व भांडवलदार–जमीनदार यांच्याबद्दलच्या धोरणाविषयीं जरी यांचे मतभेद असले तरी आपला खरा लढा साम्राज्यशाहीशीं आहे व भारताचें राष्ट्रीय स्वातंत्र्य हें आपलें पहिलें प्राधान्य आहे, या तत्त्वाचा या पक्षाला कम्युनिस्टां-प्रमाणें केव्हांहि विसर पडला नव्हता आणि या जाणीवेमुळेंच त्यांनीं कॉंग्रेसमधून फुटून निघावयाचें नाहीं हें निश्चित ठरवून तो आपला निश्चय स्वातंत्र्याची प्राप्ति होईपर्यंत टिकवून धरला. हा विवेक व ही जी समंजसता समाजवादी पक्षानें दाखविली ती त्यास भूषणावह आहे. ब्रिटिश साम्राज्य-शाहीशीं झगडा करणारी कॉंग्रेस ही एकमेव संस्था आहे व तिच्यामागें भारताची अखिल पुण्याई उभी आहे, या गोष्टीचा या पक्षाला विसर पडला नव्हता. पक्षाच्या स्थापनेच्या वेळीं सादर केलेल्या अहवालांतच जयप्रकाश नारायण यांनीं हें धोरण स्पष्ट करून सांगितलें आहे. 'कॉंग्रेसपासून फुटून निघणें हें अगदीं मूर्खपणाचें असून तो आपल्या शक्तीचा केवळ अपव्यय आहे. ब्रिटिशांशीं लढणारी ती एकच संस्था आहे. तिच्यांत कांहीं उणीवा असल्या तर त्या भरून काढून तिला जास्त समर्थ करणें हेंच पक्षाचें खरें कार्य आहे. ज्यांना हें मत मान्य नसेल त्यांना समाजवादी पक्षांत स्थान नाहीं.' असें अगदीं निःसंदिग्ध शब्दांत जयप्रकाश यांनीं बजावलेलें आहे. या पक्षाला भारतांत आज थोडें मानाचें स्थान आहे. जनतेचा विश्वास संपादन करण्यांत त्याला कांहींसें यश येत आहे आणि कांहीं विचारवेत्त्यांच्या मतें भारताचें भावी काळांतील हा पक्ष म्हणजे आशास्थान आहे. इतकी पुण्याई निर्माण होण्याचें प्रधान कारण म्हणजे ब्रिटिश साम्राज्यशाहीशीं झगडा करण्याची जबाबदारी या पक्षानें कधींहि टाळली नाहीं आणि त्या उद्दिष्टासाठीं मतभेद

बाजूला ठेवून काँग्रेसशीं सहकार्य करण्याचें धोरण ठेवलें, हें होय. हा पक्ष १९३४ सालीं स्थापित झाला असला तरी त्याची खरी प्राणप्रतिष्ठा १९४२ च्या लढयाच्या वेळीं झाली. त्या राष्ट्रीय संग्रामांत समाजवादी पक्षानें जें थोर कार्य केलें यामुळें त्याचें या देशांतील स्थान अढळ होऊन गेलें. त्याला एक प्रकारचा अधिकार प्राप्त झाला व समाज त्याच्याकडे आशेनें पाहूं लागला.

लोकशाहीच्या दृष्टीनें आणखी एक महत्त्वाचें कार्य या पक्षानें केलें आहे. महात्माजींच्या नेतृत्वामुळें काँग्रेसवर व एकंदर भारतीय समाजावर अध्यात्माचें वर्चस्व बसूं पहात होतें. अतींद्रिय शक्तीच्या आवाहनानें सामर्थ्य प्राप्त होतें, परमेश्वरी प्रसादानें कार्यें सफल होतात, बुद्धीपेक्षां शुद्ध भावाला महत्त्व जास्त आहे, ही घातक विचारसरणी दृढमूल होऊं पहात होती. याचें सविस्तर विवेचन गांधीवादाचें परीक्षण केलें तेव्हां केलेंच आहे. लोकशाहीला मारक व अत्यंत प्रतिगामी अशा या विचारसरणीपासून समाजवादी अगदीं अलिप्त आहेत. भाबडया अध्यात्मवादाला पायबंद घालून समाजाला बुद्धिवाद व विवेकनिष्ठा यांचें महत्त्व पटवून देण्याचें बरेंचसें कार्य पंडित जवाहरलाल यांनीं केलें आहे. पंडितजी काँग्रेसमध्यें नसते तर तिचा अंधश्रद्धावाद कोणत्या थराला गेला असता तें सांगवत नाहीं. ' काँग्रेसला एखाद्या भजनी मंडळाचें रूप येऊं पहात आहे ! ' असें आत्मचरित्रांत पंडितजींनीं म्हटलें आहे. आणि त्या वृत्तीची चीड आल्यामुळेंच त्यांनीं कसलीहि भीडभाड न ठेवतां महात्माजी व काँग्रेस यांवर कडक टीका केली आहे. 'असहकारितेच्या चळवळीला धार्मिक पुनरुज्जीवनाचें स्वरूप येऊं लागलें आहे. काँग्रेसमधील नाफेरवाले हे शब्दप्रामाण्यवादी आहेत. ( आत्मचरित्र पृ.— १०७ ) राजकारणांत गांधीजींची वृत्ति शास्त्रीय नव्हती. त्यांचा सर्व भार शीलावर, साधनशुद्धीवर आहे. बौद्धिक विकास व बौद्धिक शिक्षण ते क्षुद्र गणतात. ( पृ. ५१२ ). लोकांनीं स्वतः विचार करावा असा गांधीजींचा आग्रह नव्हता. आत्मशुद्धि व त्याग यांवर सगळा भर.(पृ ३७५) श्रद्धेनें कांहींकाळ फायदा होईल, पण लोकांना शहाणे करावयाचें असेल तर हा मार्ग योग्य आहे काय ? ही सर्व जुनी विचारसरणी आहे. जुन्या आशा, आकांक्षा, एकंदरींत जीर्ण जगाचेंच वातावरण माझ्या सहकाऱ्याभोंवतीं पसरलें आहे असें मला वाटतें. मला हवें असलेलें नवें जग अद्याप

फार दूर होतें. (पृ. ३७५)' अशा तऱ्हेचे उद्गार पंडितजींच्या आत्मचरित्रांत ठायीं ठायीं आढळतात. पंडितजींचें व्यक्तिमत्व अलौकिक असल्यामुळें व पुढें कांहीं काळानें सर्व तरुणांचीं मनें त्यांनीं आपल्याकडे खेचून घेतल्यामुळें भोळया, श्रद्धाळू अध्यात्मवादापासून भारतीय तरुण मुक्त झाले. पंडितजींचें हेंच कार्य समाजवादी पक्षानें पुढें चालू ठेवून विवेकनिष्ठा व बुद्धिवाद यांची छाप तरुण मनावर बसविण्यांत बरेंचसें यश मिळविलें आहे.

पक्षाच्या बुद्धिवादी विवेकनिष्ठेची प्रतीति त्यानें गुरुस्थानीं मानलेल्या मार्क्सवादाकडे पहाण्याच्या त्याच्या वृत्तीवरून सहज येऊं शकते. सध्यांच्या काळांत मार्क्सवाद ही एक अंधनिष्ठाच झाली आहे. तिच्या आहारीं गेलेला माणूस हेकट, दुराग्रही, एकांतिक आणि पिसाट असाच बहुधा होतो आणि लोकसत्तेचा तो कट्टा शत्रु बनतो. मार्क्सवादाचे स्वतःला अनुयायी म्हणवीत असूनहि समाजवादी लोक या वळणावर गेले नाहींत हें फार मोठें सुदैव आहे. मार्क्सवादांत क्रांतीची प्रचंड प्रेरणा आहे आणि तिचें सामर्थ्यहि अगदीं अतुल असें आहे. पण मार्क्सचीं कांहीं तत्त्वें अशीं आहेत कीं तीं माणसाला प्रज्ञाहत बनवितात. समाजवादी पक्षानें सावध राहून मार्क्सवादांतील क्रांतीची प्रेरणा तेवढी घेऊन दुसरी आपत्ति टाळण्यांत बरेंच यश मिळविलें आहे असें वाटतें. कामगारवर्गाचें नेतृत्व, विरोधविकासवाद, राष्ट्रनिष्ठा, शासनसंस्थेचें भवितव्य इ. मार्क्सप्रणीत सिद्धान्तांचें या पक्षांतील अशोक मेहता, आचार्य जावडेकर, कर्णिक, लोहिया, लिमये यांनीं चालविलेलें परीक्षण पाहिलें म्हणजे यांनीं मार्क्सची गुलामगिरी पत्करलेली नाहीं हें स्पष्टपणें दिसून येतें. जयप्रकाश नारायण यांचें गेल्या पंधरा वर्षांतलें लेखन वाचून हाच प्रत्यय येतो. मार्क्सवादांतील अगदीं मूलभूत सिद्धान्तहि त्यांनीं अंधपणें स्वीकारलेले दिसत नाहींत. रशियन क्रांति, गांधीवाद, राष्ट्रनिष्ठा याकडे चिकित्सक दृष्टीनें पहाण्याच्या त्यांच्या वृत्तीमुळें लोकशाहीला अनुकूल अशी विवेकदृष्टि समाजांत निर्माण करण्यांत त्यांना यश येईल असा भरंवसा वाटूं लागतो.

याच चिकित्सक दृष्टीमुळें मार्क्सवादांतील अत्याचारी क्रांतिवाद या पक्षानें स्वीकारलेला नाहीं. सशस्त्र क्रांतीला तत्त्वतःच या पक्षाचा विरोध

आहे असें नाहीं; पण हिंदुस्थानांतील सध्यांच्या परिस्थितींत शांततामय सत्याग्रहाचाच अवलंब करणें श्रेयस्कर होय, असें या पक्षानें निश्चित ठरविलें आहे. ( जयप्रकाश नारायण. डेमोक्रॅटिक सोशलिझम– पृ. ९ ) रक्तपाती क्रांतिवाद हा मार्क्सवादाचा आत्माच आहे. असें असूनहि या पक्षानें सत्याग्रहावर निष्ठा ठेवावी हें या देशाचें सुदैव आहे. वर एके ठिकाणीं सांगितल्याप्रमाणें 'सत्याग्रह' ही महात्माजींची लोकशाहीच्या तत्त्वाला एक अलौकिक अशी देणगी आहे. सशस्त्र क्रांतीनें सरकार बदलणें हें लोकशाहीला संमत नाहीं. तो लोकशाहीचा अंतच होय. पण केवळ निवडणुकीच्या मार्गानें दर वेळीं प्रत्येक देशांत जुलमी, मदांध व धनादि साधनांमुळें समर्थ असलेलें सरकार पदच्युत करतां येईल असें नाहीं. अशा स्थितींत सत्याग्रह हा एकमेव मार्ग आहे. त्याचा अवलंब करावयाचा, या धोरणाला या पक्षानें स्वतःला बांधून घेतलें आहे. लोकायत्त देशांतील दोन पक्षांतील झगड्यांत या साधनाचा कसा उपयोग करतां येतो, हें जर या पक्षानें पुढील काळांत दाखवून दिलें, तर लोकशाही त्याची फार ऋणी होईल.

आणखी एक महत्त्वाचा उपक्रम या पक्षानें अलीकडे सुरू केला आहे. भारताची पुनर्घटना करून त्यांतील खेड्यांत सामूहिक जीवन निर्माण करावें व लोकसत्ता हा जो सामुदायिक जीवनाचा परमोच्च विकास त्याचा पाया घालावा असा हा उपक्रम आहे. 'देश के लिये एक घंटा' अशी ते तरुणांना साद घालीत आहेत. आणि अशा सुविद्य तरुणांची सेवकसेना खेड्यांत नेऊन तेथें पाटबंधारे घालणें, रस्ते करणें, नाले खणणें, सामुदायिक शेती करणें, सहकारी संस्था उभारणें इ. कार्यें खेडुतांच्या सहकार्यानें करावयाचीं असा हा कार्यक्रम आहे. महाराष्ट्रांत सानेगुरुजीसेवापथकानें गेल्या कांहीं वर्षांत या तऱ्हेनें कांहीं कार्य केलें आहे. आणि बिहार, उत्तर प्रदेश येथें स्वतः पक्षाच्याच नेतृत्वानें प्रचंड प्रमाणावर ही चळवळ चालू झाली आहे. ( साधना–सेवापथक विशेषांक ११ जून १९५१. भारतज्योति १० जून १९५१ 'दी पीपल ऑन् दि मार्च'–मधु लिमये ) ही चळवळ आज बाल्यावस्थेंत असली तरी तिला फार मोठा अर्थ आहे व म्हणूनच फार मोठें भवितव्य आहे. चिनी कम्युनिस्टांनीं ज्या तऱ्हेनें ही चळवळ चालविली

त्या तऱ्हेनें पण शांततेच्या मार्गानें येथें ती चालविण्यांत आली, तर शेतकऱ्यांत सामाजिक प्रबुद्धता निर्माण होईल, सामुदायिक जीवनाचा पाया घातला जाईल, उत्पादनाचा निकडीचा प्रश्न बराचसा सुटेल आणि जनता समर्थ होऊन राजकारणांतील इतर सर्व प्रश्न सुटण्याच्या मार्गाला लागतील. सुविद्य तरुण यांत किती संख्येनें सामील होतात त्यावर त्या भूमीचें भवितव्य अवलंबून राहील. याच ग्राम–पुनर्घटनेच्या कार्यक्रमाचा अवलंब करून चीनमध्यें कम्युनिस्ट पक्षानें अगदीं अक्षरशः धुळींतून नवें विश्व निर्माण केलें आहे. येथील समाजवादी पक्षाचीं पावलें त्याच दिशेनें पडत आहेत. ही वाटचाल किती वेगानें होते हें त्याग, चिकाटी, निष्ठा, नेत्यांचें संघटनाकौशल्य व सुशिक्षित मध्यमवर्गीयांची राष्ट्रनिष्ठा यांवर अवलंबून आहे.

समाजवादी पक्षाच्या कार्याविषयीं कांहीं विवेचन वर केलें, पण या पक्षाचें मूल्यमापन करतांना एक गोष्ट सांगावीशी वाटते ती ही कीं, त्याचें महत्त्व त्यानें आतांपर्यंत केलेल्या कार्यामुळें वाटत नसून त्या कार्यामुळें त्याच्या भविष्यकालीन कर्तृत्वाविषयीं जी आशा निर्माण होते तिच्यामुळें वाटतें. कारण प्रत्यक्ष कार्य या दृष्टीनें पाहिलें तर सिद्ध असें फारच थोडें झालेलें आहे. गेल्या सोळा वर्षांत तत्त्वांची निश्चिति, मार्गाची आंखणी, साधनांची जमवाजमव, मनुष्यबळाचा संग्रह, पुण्याईची निर्मिति हा पायाभरणीचाच कार्यक्रम चालू आहे. अजून पक्षाच्या जमेला इतिहासांत नमूद करून ठेवण्याजोगें कांहीं नाहीं. ४२ चा लढा हा त्याच्या नांवें जमा आहे; पण त्या लढ्याच्या यशामागची सर्व पुण्याई कॉंग्रेसची होती. यामुळें तें स्वतंत्र कर्तृत्व होऊं शकत नाहीं. पण आपल्या पराक्रमासंबंधीं या पक्षाच्या नेत्यांच्या मनांतहि भ्रामक कल्पना नाहींत असें दिसतें. जयप्रकाश नारायण यांनीं १९४८ सालीं नाशिकला भरलेल्या अधिवेशनाच्या वेळीं जो अहवाल सादर केला त्यांत पक्षाच्या कार्याचा आढावा घेतला आहे. अन्यत्रहि अशा तऱ्हेचें सिंहावलोकन पक्षाच्या इतर नेत्यांनीं केले आहे. त्या सर्वांवरून हेंच ध्यानांत येईल कीं आपण एक मोठी शक्ति निर्माण करीत आहोंत, एवढीच नम्र व शालीन कल्पना या पक्षानें स्वतःच्या कर्तृत्वाविषयीं ठेवली आहे. पण ती कल्पना मात्र अत्यंत अर्थगर्भ अशी आहे. पांचदहा वर्षांत देशाच्या जीवनाला वळण लावण्याचें सामर्थ्य हा पक्ष स्वतःच्या ठायीं निर्माण करील

अशीं चिन्हें मध्यंतरीं दिसत होतीं. कामगारसंघटना, कृषकसंघटना व विद्यार्थीसंघटना या तीनहि क्षेत्रांत पक्षाचें कार्य अखंडपणें अजूनहि प्रगत होत आहे. अनेक स्थानिक क्षेत्रांतील संग्रामांत पक्षाच्या नेतृत्वानें चाललेल्या संग्रामांना भावी काळाच्या दृष्टीनें अर्थ आहे असें वाटतें. भारताच्या प्रत्येक प्रांतांतील कानाकोपऱ्यांत आपली हांक पोंचवून पक्षाला अखिल भारतीय स्वरूप देण्यांत इतर कोणच्याहि नव्या पक्षाला जें यश आलें नाहीं, तें समाजवादी पक्षाला कदाचित् येईलहि. या सर्व लक्षणांवरून स्वार्थ, अनीति, अधमपणा यांनीं भ्रष्ट झालेलें; क्षुद्र अहंकार, मत्सर व कलहवृत्ति यांनीं छिन्नभिन्न झालेलें; आणि दारिद्र्य, उपासमार व शोषण यांनीं हीनदीन झालेलें भारतीय जीवन हा पक्ष पुन्हां संघटित व समृद्ध करूं शकेल अशी एखादे वेळीं आशा वाटते.

मार्क्सवाद जन्माला येऊन आज शंभरएक वर्षें झालीं. तेवढ्या अवधींत मार्क्सच्या प्रेरणा जगाच्या कानाकोपऱ्यापर्यंत जाऊन पोंचल्या आहेत आणि त्याच बलशाली प्रेरणांच्या पुण्याईनें रशिया व चीन या दोन राष्ट्रांनीं आपला कायाकल्प करून घेतला आहे. गेल्या अनेक शतकांत जें सामर्थ्य व बल या राष्ट्रांना प्राप्त झालें नव्हतें, तें एका पाव शतकाच्या आंतच निर्माण करण्यांत तेथील कम्युनिस्ट पक्षांना यश आलें आहे. मार्क्सचा असा प्रभाव भरतभूमींत पडला नाहीं; पण त्याचें कारण मात्र फार निराळें आहे. मार्क्सवाद येथें येण्यापूर्वीच टिळक व महात्माजी यांच्या कर्तृत्वानें या भूमींत क्रांतीचें तत्त्वज्ञान प्रसृत होऊन गेलें होतें. येथें रशिया व चीन येथल्याप्रमाणें जुनाट, अंध, क्रूर व मदांध अशी सरंजामदारी सत्ताच अधिष्ठित असती, तर येथेंहि मार्क्सवाद आगीसारखा पसरला असता. पण मार्क्स जन्माला येण्याच्या आधीपासूनच भरतभूमींत राममोहनांसारख्या पुण्यपुरुषांनीं सामाजिक पुनर्घटनेचें कार्य चालू केलें होतें व पुढें टिळक व महात्माजी यांनीं तें परिणतीस पोचविलें होतें. मात्र असें करतांना त्यांनीं लोकशाही, व्यक्तिस्वातंत्र्य, समता या मार्गांचा अवलंब केला. त्यामुळें या देशाचें नवें रूप वरील देशांपेक्षां अगदीं निराळें झालें. येथील जनतेची मनोभूमि मार्क्सवादाला मुळींच

अनुकूल राहिली नाहीं आणि म्हणून ती प्रेरणा येथें प्रभावी होऊं शकली नाहीं.

हें जें झालें तें भारताच्या हिताचें झालें कीं अहिताचें ! हा प्रश्न फार गहन आहे. कम्युनिस्टांशीं वाद चालू असतांना अनेक वेळां 'टिळकांनीं मार्क्स वाचला होता काय !' असा प्रश्न विचारलेला मीं ऐकला आहे. टिळकांनीं बहुधा मार्क्सवादाचा अभ्यास केला नसावा असें मला वाटतें; पण टिळक मार्क्सवादी नव्हते हें या भूमीचें भाग्य होय असें मी मानतों. कारण त्यामुळेंच त्यांनीं येथें विशुद्ध लोकशाहीची परंपरा निर्माण केली आणि एक अभूतपूर्व अशी क्रांति या देशांत घडवून आणली. महात्माजींनीं तेंच व्रत पुढें चालविलें आणि या देशांत मार्क्सवादाचें आगमन दुष्कर करून टाकलें. पण आज या लोकशाहीच्या भवितव्याविषयीं मनाला दारुण शंका येऊन मोठा संभ्रम निर्माण होतो. लोकशाही ही संयम, विवेक, त्याग, नीति या कठोर व्रतांची अपेक्षा बहुसंख्य लोकांकडून करीत असते आणि आज अत्यंत अल्पसंख्य लोक तरी या कसोटीस उतरतील कीं नाहीं याची शंका आहे; आणि हें जर सत्य असेल तर लोकसत्ता लांबच राहिली, आमचें राष्ट्रीय स्वातंत्र्य तरी टिकेल कीं नाहीं, अशी भीति मनांत उद्भवते. या भयानें मन व्याकुळ असतां त्या दुबळ्या अवस्थेंत असा विचार येतो कीं, आम्हींहि मार्क्सवादाचा आश्रय केला असता तर बरें झालें असतें. लोकशाही नाहीं; पण निदान रशिया व चीन यांच्याप्रमाणें, कठोर दण्डसत्तांकित कां होईना पण एक समर्थ व समृद्ध असें राष्ट्र तरी भरतभूमींत निर्माण झालें असतें. आज आमची लोकसत्ता अयशस्वी झाली—आणि तो संभव फार आहे—तर येथें लोकशाही नाहीं व स्वातंत्र्यहि नाहीं अशी स्थिति होऊन बसेल आणि टिळक व महात्माजी या महाविभूतींची शिकवण पचविण्याची ताकद पुढील पिढ्यांना नव्हती म्हणून भरतभूमीचा नाश झाला, असा इतिहास निर्वाळा देईल. भावी इतिहासकारांचीं हीं वाक्यें मनःचक्षूंपुढें येऊन क्षणभर मनांत येतें कीं, मार्क्सवादाचा आश्रय करून निदान रशिया—चीनप्रमाणें एक बलिष्ठ समाज तरी आम्ही निर्मिला असता. अर्थात् हें सर्व निराशेच्या दुबळ्या मनःस्थितींत असतांना. जागृत व सावध अवस्थेंत असतांना, रशियाची

उग्र, मदांध दण्डसत्ता, तेथील अंध शब्दप्रामाण्य, तेथील मानवतेचें अत्यंत हीन झालेलें मूल्य, तेथील व्यक्तिस्वातंत्र्याचा नाश, तेथील कम्युनिस्ट साम्राज्यशाही, यांचा विचार मनांत येऊन टिळक-महात्माजींना विसरणें ही केवळ आत्महत्या आहे याविषयीं खात्री पटते. पण आम्ही त्यांचा वारसा सांगण्यास नालायक ठरलों तर इतिहास मात्र वरील प्रकारचा निर्वाळा दिल्याखेरीज रहाणार नाहीं. तेव्हां यापुढें भारताच्या भवितव्याला दोन भिन्न प्रकारांनीं वळण लागणें शक्य आहे. विवेक, संयम, त्याग, नीति हीं कठोर व्रतें आम्हीं आचरलीं तर लोकशाही यशस्वी करून टिळक-महात्माजी यांची परंपरा पुढें चालविल्याचें श्रेय आम्हांला मिळेल; पण या गुणांचा विकास येथील जनतेनें केला नाहीं तर? 'टिळक महात्माजी येथें झाले; पण त्यांना भरतभूमींत वारस लाभले नाहींत, केवळ वंशज लाभले. उग्र, क्रूर, शब्दप्रामाण्याधिष्ठित, व्यक्तिस्वातंत्र्यहीन अशा मार्क्सप्रणीत दण्डसत्तेचीच यांची लायकी होती; पण भलत्याच विभूतींशीं नातें जोडण्याच्या मोहानें यांनीं लोकसत्ताहि घालविली व दण्डसत्ताहि घालविली आणि स्वतःवर अराजक व पारतंत्र्य मात्र ओढवून घेतलें.'—असा अभिप्राय इतिहासकार आमच्याबद्दल लिहून ठेवतील !

स्वातंत्र्यानंतरच्या गेल्या पांचसहा वर्षांत लोकशाहीला अवश्य अशा त्या बहुमोल सद्‌गुणांची जोपासना आपण कितपत केली तें आतां पहावयाचें आहे.



# ‘ भारतीय जीवनाची पुनर्घटना ’

## प्रास्ताविक

१५ ऑगस्ट १९४७ या शुभदिनीं भरतभूमि स्वतंत्र झाली आणि स्वतःचा ललाटलेख स्वतःच लिहिण्याची, शेंकडों वर्षांत न मिळालेली, अपूर्व संधि तिच्या नागरिकांना प्राप्त झाली. त्याच्या आधींच्या शंभर वर्षांत होऊन गेलेल्या राममोहन, रानडे, टिळक, आगरकर, महात्माजी, सुभाषचंद्र या थोर विभूतींनीं भारतीयांना हा ललाटलेख लिहिण्यास शिकविण्यासाठीं कोणचे परिश्रम केले, कोणती तपश्चर्या केली, आणि वारसा म्हणून कोणचें धन मागें ठेविलें, याचें विवेचन मागील प्रकरणांतून केलें. आतां पूर्वसूरींनीं शिकविलेली ही अद्भुत लेखनकला गेल्या सहा वर्षांत आम्हीं भारतीयांनीं कितपत हस्तगत केली आहे, त्याचा विचार करावयाचा आहे.

भारतीय लोकसत्तेचा प्रयोग हा जगाच्या इतिहासांतील एक अलौकिक, अभूतपूर्व व पराकाष्ठेचा दुःसाध्य असा प्रयोग आहे, हें आरंभींच्या प्रकरणांत सांगितलेंच आहे. इतक्या विस्तीर्ण भूप्रदेशावर, इतकी अफाट लोकसंख्या असलेल्या समाजांत जगांत अजूनपर्यंतच्या इतिहासांत कोठेंहि लोकसत्ता प्रस्थापित झालेली नाहीं. एवढ्या मोठ्या प्रमाणावर होत असलेला हा पहिलाच प्रयोग आहे. त्यांतूनहि हा प्रयोग करणारे जे भारतीय नागरिक त्यांना पूर्वपरंपरेचा कांहीं आधार व पाठबळ असतें तर गोष्ट निराळी होती. पण तसेंहि नाहीं. इंग्रज येण्यापूर्वींच्या दोन हजार वर्षांचा काळांत लोकसत्ता या शब्दाचा या भूमींत कोणी उच्चार तरी केला असेल कीं नाहीं याचीच शंका आहे. मग तिच्या प्रस्थापनेसाठीं अवश्य तो मनोवृत्तीचा पालट हा लांबच राहिला. पहिल्या हजार वर्षांत लोकसत्ता नसली तरी निदान या भूमींत स्वातंत्र्य तरी नांदत होतें. दुसऱ्या हजार वर्षांत तें धनहि येथून हरपलें आणि पारतंत्र्य, दास्य व त्याच्या अनुषंगानें येणाऱ्या अज्ञान, दारिद्र्य, कलह, अंधधर्म, अविवेक इत्यादि अनेक रोगांनीं भारतीय जनता जर्जर

होऊन गेली. येथल्या बहुतेक प्रांतांत ही दुरवस्था इंग्रज येईपर्यंत कायम होती. अशा तऱ्हेच्या लोकायत्त शासनाची अल्पहि कल्पना व अनुभव नसलेल्या समाजांत शंभर एक वर्षांत जी काय मनःक्रान्ति झाली असेल तेवढीच जमेस धरून लोकसत्ता प्रस्थापित करण्याचें व ती यशस्वी करून दाखविण्याचें अत्यंत दुर्घट कार्य भारतीयांनीं शिरावर घेतलें आहे. त्यांनीं प्रारंभिलेल्या या महान् प्रयोगांत त्यांना कितपत यश आलें, त्याचें मोजमाप आतां करावयाचें आहे.

एका दृष्टीनें या प्रयोगांतील भारतीयांचें यशापयश म्हणजे भारतीय राष्ट्रसभेचें यशापयश होय, असें म्हणण्यास हरकत नाहीं. भरतभूमि स्वतंत्र झाली त्यावेळीं येथें अत्यंत प्रबळ अशी ही एकच संघटना होती आणि बहुसंख्य जनतेचा तिला मनःपूर्वक पाठिंबा होता. राष्ट्रसभेच्या कर्तृत्वावर आणि चारित्र्यावर भारतीयांची दृढ अशी श्रद्धा होती. तिच्या नेतृत्वाखालीं वाटेल ती झुंज करण्यास ते सिद्ध होते. व नव्या राज्यकारभारांत कोणत्याहि क्षेत्रांत तिच्याशीं संपूर्ण सहकार्य करण्याची त्यांची तयारी होती. याचा अर्थ असा कीं, लोकशाहीला अवश्य असें समाजाचें संघटित सामर्थ्य राष्ट्रसभेला प्राप्त झालें होतें. नवीनच प्रस्थापित झालेल्या लोकसत्तेला, ब्रिटन व अमेरिका हे दोन देश सोडले तर, जगांतल्या कोणच्याहि देशांत अशा तऱ्हेचें जनतेच्या अविभक्त सामर्थ्याचें पाठबळ मिळालेलें नाहीं. हा चमत्कार भरतभूमींतच घडलेला आहे. आणि तो टिळक व महात्माजी यांनीं घडवून आणलेला आहे हें मागें सांगितलेंच आहे. तेव्हां इतरांना सर्वथा दुष्प्राप्य असें जनतेच्या पुण्याईचें सामर्थ्य राष्ट्रसभेच्या मागें उभें होतें. म्हणून या लोकशासनाच्या प्रयोगांत जें कांहीं यशापयश आलें असेल त्यावर सर्वस्वी तिचेंच स्वामित्व आहे, असें म्हटलें तर एका दृष्टीनें तें सयुक्तिकच आहे.

पण हें सर्व एका दृष्टीनें, आणि ती दृष्टि माझ्या मतें गौण होय. कारण राष्ट्रसभा किंवा तिनें निर्माण केलेलें अधिकारी-मंडळ लक्षावधि सामान्यजनांच्या साह्यानेंच कारभार हाकीत आहे. ते अधिकारी जनतेंतून निर्माण झालेले आहेत. आणि प्रत्येक क्षणीं ते जें कांहीं बरेंवाईट कृत्य करतात तें म्हणजे जनतेच्या कार्यक्षमतेचा आविष्कार असतो. एखाद्या

झाडाचीं फळें सडलेलीं असलीं किंवा उत्तम, मधुर, रसपूर्ण असलीं तर त्याचें श्रेय त्या झाडाचीं मुळें, खोड, फांद्या, पानें, फुलोरा, या सर्वांना असतें. कारण त्या फळांचें प्रत्येक क्षणाचें जीवन वरीलपैकीं प्रत्येक घटकावर अवलंबून रहातें. लोकायत्त राज्यकारभाराची स्थिति अशीच असते. अर्थात् याचा अर्थ असा नव्हे कीं, फळांचा आणि वृक्षांचा पृथक्‌पणें विचार करूं नये. अभिप्राय एवढाच आहे कीं, फळाचा निषेध करतांना किंवा गौरव करतांना, आपण आपणाहून सर्वस्वीं भिन्न अशा एका पदार्थाचा निषेध वा गौरव करीत आहोंत, अशी भूमिका वृक्षानें घेणें युक्त नाहीं. आपल्याच जीवनाचें हें अपरिहार्य फल आहे ही जाणीव वृक्षानें कधींहि मनाआड होऊं देतां कामा नये. सध्यां काँग्रेसच्या राज्यकारभारावर टीका करीत असतांना या तत्त्वाचें अवधान बाळगलें जातें असें वाटत नाहीं. राजकारणाच्या आखाड्यांत सत्तेच्या स्पर्धेसाठीं उतरलेले लोक असें करतील यांत नवल नाहीं. पण ज्यांना या स्पर्धेच्या क्षेत्रांत पाऊल टाकावयाचें नाहीं ते लोकहि, काँग्रेस ही कोणी आभाळांतून पडलेली संस्था आहे, तिच्या राज्यकारभारांतील यशापयशाशीं आपला कांहीं संबंध पोंचत नाहीं, अशा वृत्तीनें टीका करतात ! लोकायत्त शासनाच्या दृष्टीनें ही वृत्ति घातुक आहे. पण या विषयाचा तपशिलानें जो विचार करावयाचा तो आपण पुढें करूं. प्रथमतः गेल्या सहा वर्षांतल्या आपल्या कर्तृत्वाचें मोजमाप घेणें अवश्य आहे. म्हणून त्या विषयाकडे आतां वळूं.

काँग्रेसच्या सहा वर्षांच्या राजवटींत लोकशाहीच्या दृष्टीनें भारताची प्रगति झाली कीं परागति झाली, याविषयींचें जें मूल्यमापन आतां करावयाचें आहे, त्याचे विवेचनाच्या सोयीसाठीं चार भाग केले आहेत. राजकीय पुनर्घटना, आर्थिक पुनर्घटना, सामाजिक पुनर्घटना व मानव पुनर्घटना या चार दृष्टींनीं काँग्रेसच्या कर्तृत्वाचें परीक्षण करावयाचें आहे. भारतीय जीवनाच्या या चारहि अंगांची पुनर्घटना झाल्यावांचून येथें लोकशाही यशस्वी होणें शक्य नाहीं याबद्दल फारसें दुमत होणार नाहीं. हजार दोन हजार वर्षें भारतीय समाजानें जीवनाच्या क्षेत्रांत अंगीकारलेलीं तत्त्वें लोकशाहीस सर्वस्वीं विघातक अशीं होतीं. वतनदारी, मिरासदारी, जमीनदारी, सरदारी, सरंजामदारी; चातुर्वण्य, जातिव्यवस्था, अस्पृश्यता;

शब्दप्रामाण्य, प्रपंचाची असारता, व तज्जन्य निवृत्तिधर्म आणि दैववाद; अनियंत्रित राजसत्ता, सरदार सत्ता, व्यक्तिनिष्ठ जीवन, अखिल सामाजिक वा अखिल राष्ट्रीय प्रपंचाच्या चिंतनाचा अभाव—हा भारतीय जीवनाच्या पायाभूत तत्त्वज्ञानाचा सारार्थ आहे. यांतलें कोणचेंहि तत्त्व लोकसत्तेस अनुकूल वा पोषक नाहीं. इतकेंच नव्हे तर तें निश्चयानें विघातक आहे. गेल्या शंभर वर्षांत जे प्रयत्न झाले ते मुख्यतः हें तत्त्वज्ञान पालटून टाकण्याचे झाले. हातीं सत्ता नसल्यामुळें त्या तत्त्वान्वयें पुनर्घटना करणें कोणासच शक्य नव्हतें. १९४७ सालीं ती सत्ता—स्वतःचा ललाटलेख स्वतः लिहिण्याचें साधन—आपल्याला प्राप्त झाली. अर्थात् ही सत्ता येतांक्षणींच गेल्या शंभर वर्षांत चिंतन करून सिद्ध केलेल्या नव्या तत्त्वज्ञानान्वयें समाजाची पुनर्घटना करण्याचा प्रयत्न सत्ताधारी करतील हीच कोणाहि भारतीयांची अपेक्षा असणार. ती अपेक्षा कॉंग्रेसच्या सत्ताधारी सरकारनें कितपत पुरी केली तें आतां पहावयाचें आहे.

समाजाच्या पुनर्घटनेच्या प्रयत्नांचें परीक्षण करतांना जीवनाच्या वर सांगितलेल्या चारहि अंगांत कोणच्या पुनर्घटनेची अपेक्षा होती व आहे, कोणच्या नव्या तत्त्वज्ञानान्वयें ही पुनर्घटना होणें लोकशाहीच्या दृष्टीनें इष्ट आहे याची आपल्याला स्थूल मानानें कल्पना असणें अवश्य आहे. म्हणून राजकीय पुनर्घटना, आर्थिक पुनर्घटना, सामाजिक पुनर्घटना व मानवपुनर्घटना या शब्दांतील विवक्षा प्रथम स्पष्ट करतों.

लोकसत्ता याचा राजकीय लोकसत्ता असा प्राधान्यानें अर्थ आहे. देशांतील शासनावर म्हणजेच राजकीय कारभारावर लोकांचें नियंत्रण किती आहे, राजकीय सत्ताधरांना पदाधिष्ठित वा पदच्युत करण्याचें सामर्थ्य लोकांना कितपत आहे तें पाहूनच त्या देशांत लोकसत्ता आहे कीं नाहीं हें निश्चित करावें लागतें. तेव्हां राजकीय पुनर्घटनेचा आपणांस प्रथम विचार केला पाहिजे. या क्षेत्रांतले प्रश्न सर्वश्रुतच आहेत. कॉंग्रेसनें भारतीय लोकराज्याची जी घटना केली आहे ती मानवाच्या मूलभूत हक्काची ग्वाही कितपत देते, अधिकारी वर्ग त्या हक्कांचें संरक्षण कितपत करतो, त्यानें तें व्यवस्थित केलें नाहीं तर न्यायालयें त्यास जाब विचारण्यास समर्थ आहेत कीं नाहींत, आणि या सर्वांनाच जाब विचारणारी जी जनता तिला

संघटन, भाषण, मुद्रण यांचें कितपत स्वातंत्र्य आहे या प्रश्नांच्या उत्तरावर भारतीय समाजाच्या राजकीय जीवनाची पुनर्घटना कशी झाली याचें उत्तर अवलंबून राहील.

आर्थिक दृष्टीनें पहातां येथें पूर्वी संस्थानिक, जमीनदार व भांडवलदार यांचें वर्चस्व होतें व त्यामुळें भारतीय समाजांत पराकाष्ठेची विषमता होती. या एकारलेल्या संपत्तीचा निचरा करून काँग्रेसनें आर्थिक समता कांहीं अंशीं तरी आणण्यासाठीं कोणचे प्रयत्न केले, आणि त्यामुळें दुसऱ्या टोकाचे जे शेतकरी व कामकरी वर्ग त्यांच्या जीवनांत सुखाची भर कितपत पडली, याचा विचार प्रथम झाला पाहिजे. राज्यकारभाराच्या यशाचा हा फार मोठा निकष आहे. त्याचप्रमाणें या देशांत अन्नधान्याचा जो तुटवडा आहे तो नाहींसा करण्यासाठीं येथली भूमि सुपीक व समृद्ध करण्याचे सरकारनें कोणते प्रयत्न केले, शास्त्रीय शेतीची पद्धत आणली काय, पाटबंधारे बांधले काय, सहकारी वा सामुदायिक शेतीचे प्रयोग केले काय, इ. अनेक प्रश्न विचारांत घेतले पाहिजेत. समृद्ध जीवनावांचून लोकशाही यशस्वी होणें अशक्य आहे हें मागें अनेकवार सांगितलें आहे. त्या दृष्टीनें अन्नधान्याखेरीज इतर जीवनावश्यक धनाचें उत्पादन किती वाढलें, त्यामुळें महागाई किती कमी झाली, चलनवाढीस आळा बसला काय, नियंत्रणें कोणच्या हेतूनें बसविलीं, त्यांचा परिणाम काय झाला, या सर्वांचा हिशोब झाला पाहिजे. आणि सर्वांच्या शेवटीं, काँग्रेसच्या नेत्यांनीं जें आर्थिक धोरण व तत्त्वज्ञान स्वीकारलेलें आहे तें मूलतःच कितपत समर्थनीय आहे, याचीहि चिकित्सा आपणांस केली पाहिजे.

सामाजिक संघटनेच्या दृष्टीनेंहि असेच अनेक प्रश्न निर्माण होतात. आर्थिक विषमतेमुळें समाजाच्या भिन्न गटांत दूरीभाव निर्माण होऊन त्याच्या जशा अनेक चिरफळ्या झालेल्या असतात, त्याचप्रमाणें सामाजिक व धार्मिक भेदामुळेंहि समाज भंगलेला असतो. आणि समाजाची ही भग्नावस्था लोकशाहीला आर्थिक विषमतेइतकीच विघातक असते. म्हणून सामाजिक दृष्टीनेंहि समाजाची पुनर्घटना करणें अवश्य असतें. भारतीय समाजांत हिंदु व मुसलमान या समाजांचे भिन्न धर्म, भिन्न संस्कृति व भिन्न आकांक्षा हें पहिलें भेदकारण आहे. अस्पृश्यता हें जवळजवळ तितकेंच मोठें असें दुसरें

भेदकारण आहे. मागासलेल्या व रानटी जाति यांची पराकाष्ठेची सांस्कृतिक हीनता हें तिसरें कारण आहे. सवर्ण हिंदुसमाजांतहि, ब्राह्मण-ब्राह्मणेतर, कायस्थकायस्थेतर, उच्चवर्णीयहीनवर्णीय असे अनेक भेद आहेत. यापैकीं एक वा अनेक कारणांनीं दूर असलेल्या व्यक्ति आतां थोडेंसें तरी अंतर कापून परस्परांच्या जवळ आल्या काय, असा लोकशाहीचा प्रश्न आहे. धर्म, जन्म व संस्कृति यांनीं भिन्न असलेले समाजघटक, आपण सर्व भारताचे नागरिक आहों या उच्च भूमिकेवर येऊन, परस्परांच्या जवळ यावे यासाठीं कॉंग्रेसनें या चार वर्षांत कोणते प्रयत्न केले व त्यांना कितपत यश आलें, हा सामाजिक पुनर्घटनेच्या दृष्टीनें मुख्य प्रश्न आहे.

सर्वांत महत्त्वाचा प्रश्न मानवाच्या पुनर्घटनेचा आहे. व्यक्ति या दृष्टीनें मनुष्य कितपत उन्नत झाला आहे, त्याग, सार्वजनिक हितबुद्धि, ध्येयनिष्ठा, सामाजिक जबाबदारीची जाणीव, कार्यक्षमता, प्रजासत्ताकाची सर्व प्रकारची जबाबदारी अंगावर घेण्याइतकी गुणसंपन्नता—म्हणजेच योजकता, दूरदृष्टि, सहकार्यवृत्ति, व्यापक आकलन, कार्यकुशलता, दक्षता, तळमळ इ. गुणांची परिपुष्टि, त्याच्या ठायीं कितपत झाली आहे, यावर लोकसत्ताक शासनाचें भवितव्य अवलंबून आहे. या गुणांच्या अभावीं आर्थिक क्षेत्रांतल्या कोणत्याहि योजना यशस्वी होणार नाहींत; समाजसंघटना होणार नाहीं; आणि राजकीय क्षेत्रांत कितीहि मूलभूत हक्क मिळाले असले तरी ते असून नसल्यासारखेच होणार. कारण जें कांहीं नवीन घडवावयाचें तें हा मानवच घडविणार असल्यामुळें, भारतीय लोकसत्तेचें खरें धन तें आहे. हें धन कॉंग्रेसनें किती प्रमाणांत प्राप्त करून घेतलें हा प्रश्न म्हणजे सर्व प्रश्नांचें सारभूत तात्पर्य आहे.

भारतीय लोकसत्ताकाच्या गेल्या चार वर्षांतील कारभाराचें इतक्या बहुविध दृष्टींनीं परीक्षण केलें, तरच लोकसत्तेच्या दृष्टीनें आपली प्रगति होत आहे कीं परागति होत आहे, हें कळून येईल. लोकसत्ता ही केवळ राजकीय क्षेत्रांतल्या कारभारापुरती मर्यादित नसते, तर जीवनाचें प्रत्येक अंगोपांग तिनें व्यापलेलें असतें, हें मागल्या अनेक प्रकरणांतील विवेचना-वरून वाचकांच्या ध्यानांत आलेंच असेल. आणि हें जर खरें आहे, तर

जीवनाचीं सर्व अंगोपांगें तपासून पाहिल्यावांचून लोकसत्तेचें यशापयश अजमावितां येणार नाहीं किंवा पुढील काळांतील निश्चित आंखणीहि करतां येणार नाहीं. म्हणून त्या अत्यंत महत्त्वाच्या परीक्षणास आतां प्रारंभ करूं.

---

# प्रकरण नववें

# राजकीय पुनर्घटना

## लोकजागृति व लोकसंघटना

या भूमीला स्वातंत्र्य प्राप्त झाल्यानंतर येथील लोकसत्ता सुदृढ करण्यासाठीं भारतीय जीवनाची सर्वांगीण पुनर्घटना करण्याचें कॉंग्रेसनें व जनतेनें जे प्रयत्न चालविले आहेत, त्यांच्या यशापयशाचें मूल्यमापन आपण करीत आहोंत. लोकशाहीच्या विकासासाठीं राजकीय, आर्थिक, सामाजिक इ. सर्व अंगांची पुनर्घटना होणें म्हणजे एका परीनें या सनातन भूमीचा पुनर्जन्मच होणें अवश्य आहे. या सर्व अंगांना आपापल्या दृष्टीनें महत्त्व असलें तरी त्या सर्वांत राजकीय पुनर्घटना ही अधिक महत्त्वाची आहे, याबद्दल फारसें दुमत होणार नाहीं. आर्थिक समतेवांचून राजकीय क्षेत्रांतील समतेला वा स्वातंत्र्याला फारसा अर्थ नाहीं हें कितीहि खरें असलें तरी, राजकीय क्षेत्रांतील जनतेची प्रबुद्धता, त्या क्षेत्रांतील समता व स्वातंत्र्य हा लोकशाहीचा आत्मा आहे, हा विचार आपण कधींहि दृष्टिआड होऊं देतां कामा नये. मार्क्सवादाच्या व सोव्हिएट रशियाच्या प्रचारामुळें आज लोकशाहीसंबंधीं अनेक प्रकारचे भ्रम निर्माण होत आहेत. राजकीय स्वातंत्र्याचा बळी देऊनहि आर्थिक समता प्रस्थापित करावी, असें रशियाचें धोरण आहे आणि हीच खरी लोकसत्ता होय, अशी अत्यंत विपरीत कल्पनाहि प्रसृत करून रशिया धूळफेंक करूं पहात आहे. या सर्व गोंधळांत एक विचार आपण दृढपणें पकडून ठेवला पाहिजे. तो हा कीं, राजकीय स्वातंत्र्यांतूनच इतर स्वातंत्र्यें व समता निर्माण होत असतात व त्याच्या

बळावरच तीं टिकून राहूं शकतात. त्याच्या अभावीं इतर क्षेत्रांत समता व स्वातंत्र्य हीं निर्माण होणेंच शक्य नाहीं व झालीं तरी तीं अत्यंत अल्पायुषी ठरतात, हें सोव्हिएट रशियाच्या इतिहासावरून दिसून आलेंच आहे.

## आधीं राजकीय समता

सुदैवानें आपल्या राज्यकर्त्यांच्या मनांत या मूलतत्त्वाविषयीं लवमात्र संदेह नाहीं. अमेरिकन पत्रपंडित नॉर्मन कझिन्स व पंडित जवाहरलाल नेहरू यांची जी मुलाखत झाली, तिच्यावरून ही गोष्ट स्पष्ट होईल. पुढील अवतरण पहा.

नॉर्मन कझिन्स–सामाजिक, आर्थिक व राजकीय अशी त्रिविध समता लोकसत्तेच्या अंतरांत समाविष्ट असते. त्यांतील राजकीय समता हें इतर दोन समता प्राप्त करून घेण्याचें साधन होय, हें आपणांस मान्य आहे काय ? राजकीय समता नसेल तर इतर हक्क प्राप्त करून घेण्याचें साधन हातीं नाहीं, असें होतें. विरोधी मताच्या अधिकाराचें जो समाज रक्षण करीत नाहीं, त्याला सामाजिक वा आर्थिक समतेची आशा धरतां येणार नाहीं हें आपणांस मान्य होईल अशी मला खात्री वाटते.

पंडित जवाहरलाल–होय. राजकीय स्वातंत्र्य किंवा राजकीय समता हाच इतर समतेचा पाया आहे. कमालीची आर्थिक विषमता असेल तर राजकीय समता ही अर्थशून्य होईल हें खरें. तरी राजकीय समता हा इतर समतांचा सर्वाधार आहे यांत वाद नाहीं. ( भारतज्योति २५–४–५१ )

## कॉंग्रेसचें महान् कार्य–लोकजागृति

स्वातंत्र्यपूर्व काळांत कॉंग्रेसनें ब्रिटिश सरकारशीं जो लढा केला, तो या तत्त्वाचा अवलंब करूनच केला होता. तो सर्व लढा 'राजकीय स्वातंत्र्याचा लढा' या एकाच नांवानें संबोधण्यास हरकत नाहीं. हें राजकीय स्वातंत्र्य म्हणजे केवळ भारताचें राष्ट्रीय स्वातंत्र्य नसून भारतांतील प्रत्येक नागरिकाचें स्वातंत्र्य होतें. म्हणजे राष्ट्राच्या स्वातंत्र्याच्या लढ्याबरोबरच कॉंग्रेसनें व्यक्तिस्वातंत्र्याचाहि लढा चालविला होता. आणि त्यांतच कॉंग्रेसचें सामर्थ्य

होतें. रशिया, इटली, जर्मनी, पोलंड या देशांत गेल्या शतकांत लढे झाले पण ते राष्ट्रीय स्वातंत्र्याचे लढे होते; व्यक्तिस्वातंत्र्याचे नव्हते. म्हणूनच त्या देशांत लोकसामर्थ्याचा विकास झाला नाहीं. आणि स्वातंत्र्यानंतर तेथें सर्वत्र दंडसत्ता प्रस्थापित झाली. भरतभूमीनें प्रारंभापासूनच राष्ट्रस्वातंत्र्य व व्यक्तिस्वातंत्र्य–म्हणजेच राजकीय समता–यांत अभेद मानून, व्यक्तिस्वातंत्र्य हें सर्व सामर्थ्याचें उगमस्थान आहे हें जाणून, चळवळीस प्रारंभ केला. प्रथमपासूनच व्यक्तीच्या राजकीय स्वातंत्र्याची कॉंग्रेसनें ही जोपासना केली यासाठीं भरतभूमि तिची सदैव ऋणी राहील. १८८१ सालापासून येथें लोकशक्ति निर्माण करण्याचें जें ध्येय लो. टिळकांनीं डोळ्यापुढें ठेवलें होतें, तें यामुळें सफल झालें. आणि या भूमीला लोकसत्तेचा प्रयोग यशस्वी होण्याची जी थोडीफार आशा वाटते ती यामुळेंच. स्वातन्त्र्यपूर्वकाळच्या पुण्याईचा हिशेब असा आहे.

अत्यंत आनंदाची व अभिमानाची गोष्ट अशी कीं, स्वातन्त्र्यानंतरच्या काळांतहि सत्ताधिष्ठित कॉंग्रेस सरकारनें भारतांतील नागरिकांच्या ठायीं व्यक्तिमत्वाची जागृति करून राजकीय समतेची प्रस्थापना करण्याचें धोरणच पुढें चालविलें आहे. यासाठीं कॉंग्रेसला द्यावे तेवढे धन्यवाद थोडेच आहेत.

## सरंजामी सत्तेचा नाश.

स्वातंत्र्यप्राप्ति होतांच राजकीय प्रबुद्धतेच्या प्रगतीच्या दृष्टीनें कॉंग्रेसनें जें पहिलें महत्कृत्य केलें तें म्हणजे भारतांतील संस्थानांचें विसर्जन हें होय. ब्रिटिश अंमलाखालची प्रजा स्वातंत्र्यापूर्वीच ‘नागरिक’ या सन्माननीय पदवीस जाऊन पोचली होती. व्यक्तित्वाचा तेजस्वी अहंकार तिच्या ठायीं आधींच पुष्ट झाला होता; पण संस्थानांत त्या वेळीं सर्वत्र अंधार होता. तेथें मध्ययुगांतील कमालीची बेजबाबदार, अनियंत्रित व उन्मत्त अशीच सत्ता चालू राहिली होती. आणि त्यामुळें संस्थानांतील मानव हा लाचार, तेजोहीन व मनःसामर्थ्यहीन असा राहिला होता. सरदार वल्लभभाई पटेल यांनीं त्या मध्ययुगीन सरंजामी सत्तेचा नाश करून मानवतेपासून ढळलेली भारताची एकतृतीयांश प्रजा पुन्हां ‘मानव’ या महत्पदास आणून पोचविली. व्यक्तिस्वातंत्र्य, विचारउच्चारस्वातंत्र्य, विरोधस्वातंत्र्य, या मनुष्याच्या

जन्मसिद्ध हक्कांचा त्यांनीं एवढया प्रचंड समाजाला लाभ करून दिला. गेल्या शंभरसवाशें वर्षांत ब्रिटिश अंमलाखालीं असलेल्या प्रांतांतून राममोहन, म. फुले, रानडे, विष्णुशास्त्री, टिळक, आगरकर, विवेकानंद, लजपतराय, मोतीलाल, जवाहरलाल, सुभाषचंद्र, पटेल बंधु, महात्मा गांधी, जगदीशचंद्र, चंद्रशेखर रमण यासारख्या थोर पुरुषांची प्रचंड परंपरा निर्माण झाली. पण त्याच अवधींत संस्थानीं अंमलाखालच्या पांचसहा कोटी प्रजेंतून या परंपरेंत शोभण्याजोगा एकहि पुरुष निर्माण झाला नाहीं. यावरून ही प्रजा राजकीय स्वातंत्र्याच्या अभावीं कशी सडत चालली होती हें दिसून येईल. आणि त्यावरूनच संस्थानी सत्तेचा नाश करून एवढया मोठया प्रजेला काँग्रेसनें राजकीय समतेचा लाभ करून दिला ही तिची सेवा केवढी मोठी आहे याचीहि कल्पना येईल.

## दलित जनतेचें मानवत्व

संस्थानी प्रजेप्रमाणेंच मानवतेच्या पदवीपासून च्युत झालेल्या अशा तीन जमाती हिंदुस्थानांत होत्या. अस्पृश्य जाति, गुन्हेगार जाति व आदिवासी जन, या त्या तीन जमाती होत. काँग्रेसनें कसलाही भेदाभेद न ठेवतां या कोट्यवधि मानवांना मानवतेचे मूलभूत हक्क देऊन टाकले. अस्पृश्यांची कहाणी सर्वांना ठाऊकच आहे. तिचा विस्तार करण्याचें कारण नाहीं. गुन्हेगार जमाती ही खास ब्रिटिशांची निर्मिति होती. मांग, रामोशी, कंजर या कांहीं ब्रिटिशांच्या पूर्वी गुन्हेगार ठरलेल्या जाति नव्हत्या. त्यांतल्या कांहीं जाति तर लढाऊ जाति होत्या. बेकार झाल्यामुळें त्या चोऱ्यामाऱ्या करूं लागल्या. आणि राज्यकारभार सुलभ व्हावा म्हणून ब्रिटिशांनीं त्यांच्यावर गुन्हेगार असा कायमचा शिक्का मारून त्यांच्यांतील बहुसंख्य लोकांना गुन्हेगार वसाहतींत डांबून टाकलें. हा घोर अन्याय काँग्रेसनें तत्काळ दूर करून या भूमीवरचा एक फार मोठा कलंक धुवून काढला. आदिवासींचें नागरिकत्व हा तर अभूतपूर्व असा एक प्रयोग आहे. वेदकालापासून गिरिकन्दरांत रहाणारे लोक आतां प्रथमच भारताचे नागरिक होत आहेत. त्यांची संख्या जवळ जवळ तीन कोटी आहे. असुर या नांवाचीच एक चारपांच हजारांची जमात त्यांत आहे. नाग, संताळ, गोंड

या जमाती प्रसिद्धच आहेत. अस्पृश्य, गुन्हेगार व आदिवासी मिळून नऊ दहा कोटी तरी लोकसंख्या होईल. एवढया लोकांना शतकानुशतकें मानवतेचे सामान्य हक्क सुद्धां नव्हते. आर्य म्हणविणाऱ्या व सर्व विश्व आर्य करून टाकण्याची प्रतिज्ञा करणाऱ्या हिंदु लोकांनीं यांची फारशी पूसतपास कधीं केली नव्हती. ही जबाबदारी आपली आहे असें हिंदुसमाजानें कधीं मानलेंच नाहीं. सत्ता हातीं येतांच काँग्रेसनें या प्रचंड मानवसमूहाला नरकाच्या खोल गर्तेतून उचलून मानवतेच्या सन्मान्य भूमीवर आणून उभें केलें. अशा तऱ्हेचें जगाच्या इतिहासांतलें हें पहिलेंच कृत्य असेल असें वाटतें.

## भारताची घटना

राजकीय पुनर्घटनेच्या दृष्टीनें काँग्रेसचें दुसरें महत्कृत्य म्हणजे भारताची घटना सिद्ध करून तिचा प्रत्यक्ष अंमल चालू करणें हें होय. या घटनेनें भारताच्या इतिहासांत एका नव्या युगास प्रारंभ झाला आहे. सोळा लक्ष चौरस मैलांच्या खंडप्राय भूमींतील पस्तीस कोटी जनता धर्म, जाति, भाषा, लिंग इ. अनेक प्रकारच्या विषमता विसरून आतां समभूमीवर आली आणि तिनें एक स्वयंशासन निर्माण करून आपण होऊन ती एकशासनाखालीं नियंत्रित झाली. सर्व दृष्टींनीं ही गोष्ट अभूतपूर्व अशी आहे. युगानुयुगें राजा, सरंजामदार, ब्राह्मण येथपासून जमीनदार, जहागीरदार, देशमुख, देशपांडे, पाटील, कुलकर्णी यांच्यापर्यंत प्रत्येकापुढें दीनपणें लाचारीनें वांकून त्यांच्या कृपाप्रसादानें जगण्यांत धन्यता मानणारी अशी ही प्रजा होती. आज काँग्रेसनें तिला व्यक्तिस्वातंत्र्य, भाषण-मुद्रण-संघटना-स्वातंत्र्य असे मूलभूत हक्क प्राप्त करून देऊन मानवत्वाचें उच्चतम भूषण प्राप्त करून दिलें आहे. व्यक्तिस्वातंत्र्य हें मानवाच्या सर्व उत्कर्षांचें साधन आहे. सर्व प्रकारचें वैभव प्राप्त करून देणारा हा चिंतामणि आहे. हा मणी भारतीय जनतेच्या हातीं देऊन काँग्रेसनें तिच्या जीवनांत आजपर्यंत कधींच अवतीर्ण न झालेलें असें एक नवीन व उज्ज्वल युग प्रवर्तित केलें आहे. त्यांतून पुढें कोणचें भवितव्य निर्माण होईल हा प्रश्न वादग्रस्त असला, तरी शतकानुशतकें चालत आलेलें विषमतेचें,

सरंजामदारींचें युग नष्ट करून कॉंग्रेसनें, अखिल जनतेला एक नवें स्वाधीनतेचें युग निर्माण करून देऊन, आपला उत्कर्ष आपण करून घेण्याची दुर्लभ संधि उपलब्ध करून दिली आहे यांत शंका नाहीं. नव्या घटनेचा हा खरा अर्थ आहे. राजकीय समता ती हीच. आणि राजकीय पुनर्घटनेच्या दृष्टीनें कॉंग्रेसनें केलेली ही सेवा अश्रुतपूर्व अशीच आहे.

भारताच्या नव्या घटनेवर अनेकांनीं अनेक प्रकारें आक्षेप घेतले आहेत. मूलभूत हक्क एका हातानें देऊन दुसऱ्या हातानें काढून घेतले आहेत, केंद्रसत्ता अत्यंत प्रबळ करून ठेविली आहे, इ. प्रकारचे अनेक आक्षेप आहेत. घटनेंतील कलमांचे शब्द घेऊन त्यांची चिकित्सा आपण केली तर, हे सर्व आक्षेप खरे आहेत, असा निर्णय देणें कायदेपंडितांना फारसें अवघड आहे असें नाहीं. पण या घटनेकडे जरा निराळ्या दृष्टीनें पहावें असें माझें मत आहे. अमेरिकेच्या वरिष्ठ न्यायालयाचे पहिले न्यायाधीश मार्शल यांच्या उदाहरणावरून ही निराळी दृष्टि कोणची हें ध्यानांत येईल. त्यांचा एक चरित्रकार लिहितो, 'अगदीं पहिल्याच अधिवेशनाच्या वेळीं त्या श्रेष्ठ न्यायासनावर आरूढ होतांना आपल्यापुढें असलेल्या नवनिर्मितीच्या कार्याच्या महत्त्वाची मार्शल यांना पूर्ण जाणीव होती. कारण घटनेंत जें सामर्थ्य निर्माण व्हावयाचें तें तत्त्ववेत्ता न्यायाधीश तिच्यावर जें भाष्य करील त्यामुळें निर्माण होत असतें. घटनेच्या लिखित शब्दांत जिवंत तत्त्वज्ञान भरून टाकणें हें या भाष्यकाराचें कार्य आहे.' यावरून हें ध्यानांत येईल कीं घटनेंतील हें किंवा तें कलम कसें आहे हा विचार गौण असून, तिचा व्यवहार करणारा मानव कसा आहे, हा विचार प्रधान आहे. आणि या दृष्टीनें विचार करतां, कॉंग्रेसनें न्यायालयांना घटनेवर भाष्य करण्याचा जो अधिकार दिला आहे आणि नंतरच्या काळांत त्या न्यायालयांचा जो बहुतेक ठिकाणीं मान ठेविला आहे त्यावरून ही राजकीय स्वातंत्र्याच्या दृष्टीनें फार मोठी प्रगति आहे हें मान्य करावें लागेल. न्यायपीठांच्या बाबतींत कांहीं ठिकाणीं अत्यंत गैर व निंद्य प्रकार झाले हें खरें. पण रशियन न्यायाधीशांना तेथील सरकारकडून वरचेवर येणारे आदेश पाहिले व तुलनेनें विचार केला म्हणजे कॉंग्रेसनें लोकशाही परंपरा

निर्माण करण्याचें ब्रीद निष्ठेनें चालविलें आहे याविषयीं फारसें दुमत होणार नाहीं.

## निवडणुकींतील निर्मळ भूमिका

पण कॉंग्रेसची वृत्ति काय आहे याची खरी कसोटी भारतांतील पहिल्याच सार्वत्रिक निवडणुकींच्या वेळीं लागली. घटनेनें दिलेलें भाषण-मुद्रण-संघटन-स्वातंत्र्य सरकार या प्रसंगीं जनतेला किती लाभूं देतें व ज्या निवडणुकींत स्वतःवर सत्ताच्युत होण्याचा संभव आहे त्या सरळ मार्गानें होऊं देतें कीं नाहीं यावरून त्याची लोकशाही तत्त्वावरची निष्ठा परीक्षितां येते; आणि या निकषावर घांसली असतां कॉंग्रेसची निष्ठा बावन्नकशी ठरली आहे हें तिच्या शत्रूंनींहि मान्य केलें आहे.

निवडणुकीच्या दोनचार महिन्यांत केन्द्रीय व प्रांतिक सरकारवर विरोधी पक्षांनीं टीकेचा नुसता भडिमार चालविला होता. सूक्तासूक्त सर्व आरोप त्यांच्यावर केले, वाटेल तीं भाषणें केलीं. तरी हातीं असलेल्या कायद्यांचा या टीका बंद पाडण्यासाठीं चुकूनसुद्धां सरकारनें उपयोग केला नाहीं. इतकेंच नव्हे तर, कारावासांत असलेल्या कम्युनिस्टांना मुक्त करून खुला सामना भरविण्यास मुभा दिली व आपल्या हातानें आपल्या पराभवाची वाट मोकळी करून दिली. मुद्रण—स्वातंत्र्याप्रमाणेंच जनतेच्या संघटन—स्वातंत्र्यावरहि कॉंग्रेसनें कोठें गदा आणली नाहीं. वाटेल तशी पक्षसंघटना करण्यास सर्वांना सर्वत्र अवसर दिला होता. जवळजवळ एकशेवीस पक्ष निवडणुका लढवीत होते, यावरूनच ही गोष्ट स्पष्ट होईल. प्रत्यक्ष निवडणुकांच्या व्यवहारांतहि सरकारनें आपली भूमिका बव्हंशीं निर्मळ राखली आहे. कांहीं अपप्रकार झाले; नाहीं असें नाहीं. पण सर्व व्यवहार शेवटीं मानवाच्या हातूनच व्हावयाचे असतात आणि मानव हा अपूर्ण प्राणी आहे हें लक्षांत घेतां, कॉंग्रेसच्या लोकशाहीवरील निष्ठेला उणीव आली असें म्हणण्याजोगें तिच्या हातून कांहीं घडलें आहे, असें म्हणतां येणार नाहीं. मद्रास, त्रावणकोर, कोचीन, राजस्थान, पेप्सू, ओरीसा या राज्यांत कॉंग्रेसनें पराभव स्वीकारलेला आहे, आणि इतर प्रांतांत मुरारजीसारखे मोहरे पराभूत झालेले आहेत. यावरून सरकारनें या कामांत कोठें हस्तक्षेप केला आहे असें त्याच्या शत्रूलाहि

म्हणतां येणार नाहीं. १७ कोटी मतदार ज्यांत आहेत अशा समाजाच्या लोकशाहीचा हा पहिला प्रयोग होता. अशा प्रचंड प्रमाणावर जगांत आजपर्यंत लोकशाहीचा प्रयोग कोठेंहि व केव्हांहि झालेला नाहीं. अशा या प्रयोगाकडे सर्व जगाचें लक्ष लागलें होतें. पुढील सत्तेच्या दृष्टीनें काँग्रेसच्या यशापयशाचा विचार आपणांस पुढें करावयाचा आहेच. पण निवडणुकांचा व्यवहार काँग्रेसनें अत्यंत दक्षतेनें, कार्यक्षमतेनें व निर्मळपणें घडविला, या तिच्या परम उज्ज्वल व विलोभनीय यशाचा वांटा तिच्या पदरांत टाकल्यावांचून आपणांस पुढें जातां येणार नाहीं. राजकीय समतेच्या व व्यक्तिस्वातंत्र्याच्या प्रगतीच्या दृष्टीनें काँग्रेसनें केलेलें हें तिसरें महत्कृत्य आहे. सहा कोटी संस्थानी प्रजा, सहा कोटी अस्पृश्य व जवळ जवळ चारपांच कोटी गुन्हेगार व आदिवासी, अशा सोळासतरा कोटींच्या मानवसमूहाला मानवतेचे मूलभूत हक्क देणें, अशा लोकांनींच जो समाज बहुतांशीं घडला आहे त्याला पूर्ण लोकायत्त अशी घटना सिद्ध करून देणें आणि सत्ता हातीं असूनहि, आपली पदच्युति डोळ्याला दिसत असूनहि निवडणुकांत कोणत्याहि वाममार्गांचा अवलंब न करतां, कोठेंहि हस्तक्षेप न करतां, पूर्ण समभूमीवरून हा सामना घडविण्याची कोशीस करणें ही काँग्रेसची त्रिविध लोकसेवा भारताच्या भावी इतिहासकाराला अभिमानानें व कृतज्ञतेनें नमूद करावी लागेल. काँग्रेसला तिचें हें श्रेय अर्पण करून राजकीय पुनर्घटनेच्या उत्तरभागाचें विवेचन आपण हातीं घेऊं.

## लोकसंघटना

कोणच्याहि समाजाच्या राजकीय पुनर्घटनेचीं दोन अंगें असतात. प्रत्येक मनुष्याच्या ठायींचें व्यक्तित्व जागृत करणें हें पहिलें अंग, आणि अशा या जागृत समाजाची संघटना करून सामर्थ्य निर्माण करणें हें दुसरें अंग होय. कोणच्याहि जुलमी, अन्यायी, मदांध अशा परकीय वा स्वकीय सत्तेचा प्रतिकार करून शेवटीं तिला पदच्युत करणारी जी 'लोकशक्ति' ती, हीं दोन्ही अंगें परिपुष्ट झालीं, तरच निर्माण होते. ही लोकशक्ति हा

लोकसत्तेचा आत्मा होय. तिच्या अभावीं कोणचीहि लोकसत्ता यशस्वी होणें शक्य नाहीं. लोकजागृति व लोकसंघटना यांतील पहिल्या अंगाची जोपासना कॉंग्रेसनें समाधानकारकपणें केली आहे हें आपण येथवर पाहिलें. आतां जागृत व्यक्तित्व संघटित करण्याच्या दृष्टीनें कॉंग्रेसच्या यशाचें मापन करावयाचें आहे.

लोकमत जागृत करणें हें एकपट अवघड असलें तर तें संघटित करून त्यांतून 'शक्ति' निर्माण करणें हें शतपट अवघड आहे. कृषिखात्यांतील एक जुने अधिकारी नेहमीं म्हणत कीं, 'जेथें पूर्वी धान्याचें एक कणिस निर्माण होत होतें तेथें आपल्या कष्टानें दोन कणसें निर्माण करणारा शेतकरी हा जगाचा उपकारकर्ता आहे.' आपल्यापरी हें वचन खरेंच आहे. पण त्याहिपेक्षां जास्त खरें असें एक वचन आहे. जेथें पूर्वी एक एक अशीं फुटीरपणें माणसें कार्य करीत होतीं त्या ठायीं, दंडसत्तेचा आश्रय न करतां, दोन व्यक्तित्वजागृत माणसांना सहकार्यानें एकत्र काम करण्यास उद्युक्त करणारा माणूस हा जगाचा सर्वात मोठा उपकारकर्ता होय. व्यक्तित्व जागृत होतांच मानवांच्या सर्व गुणांचा विकास होऊं लागतो हें खरें. तत्त्वज्ञान, कला, साहित्य, धर्म इ. क्षेत्रांत मानवाची व्यक्तिस्वातंत्र्यामुळें अत्यंत वेगानें प्रगति होऊं लागते. पण या लोकजागृतीबरोबरच लोकसंघटनेची विद्या हस्तगत करतां आली नाहीं, तर समाज भेदजर्जर होतो, छिन्नभिन्न होतो, त्याचीं अनंत शकलें होतात, आणि सर्व सांस्कृतिक मंदिराचा पाया म्हणजे जें आत्मरक्षणाचें सामर्थ्य तेंच त्याला निर्माण करतां येत नाहीं. आणि मग सांस्कृतिक दृष्टीनें प्रगत पण भेदामुळें दुर्बल झालेल्या या समाजावर कमी संस्कृत पण संघटित समाज आक्रमण करून त्याचा नाश करतात. मग त्याचें स्वातंत्र्य व त्याची संस्कृति यांच्यासह त्याच्या व्यक्तित्वधनाचाहि नाश होतो. ग्रीसचा इतिहास याचीच साक्ष देत आहे. तेथें बुद्धिनिष्ठा, विचारस्वातंत्र्य हीं जागृत होतांच विद्याकलांची पुष्कळ प्रगति झाली. आणि जेव्हां जेव्हां या जागृत व प्रगतिमान् समाजांत संघटना निर्माण होई, तेव्हां तेव्हां आपल्यापेक्षां दसपटीनें मोठ्या आक्रमकासहि तो धूळ चारीत असे. पण हें फार काळ टिकलें नाहीं. आणि लवकरच शतधा भिन्न होऊन हा समाज लयास गेला. रोमचा प्रारंभींचा इतिहास असाच आहे. व्यक्तित्व

जागृत होतांच त्या समाजाच्या चिरफळ्या होऊं लागल्या. त्यावेळीं त्यांतील कांहीं पराक्रमी पुरुषांनीं दंडसत्तेचा आश्रय करून आपलें साम्राज्य स्थापन केलें. रोमन साम्राज्याचा विस्तार झाला, त्याचें वैभव वाढीस लागलें, ह्याचें श्रेय लोकायत्त समाजाच्या सामर्थ्याला नसून सामर्थ्यसंपन्न पुरुषांनीं निर्माण केलेल्या दंडायत्त संघटनेला आहे. लोकशाहीचीं तत्त्वें रोमन समाजांत पसरतांच तेथें इतके कलह माजूं लागलें कीं, तेथील समाजधुरीणांनीं साम्राज्यस्थापनेचें धोरण स्वीकारलें नसतें तर, ग्रीकाप्रमाणेंच रोमचाहि नाश झाला असता. ग्रीक व रोमन हे समाज लयास गेल्यानंतर अनेक शतकें व्यक्तित्वजागृतीचा हा कठिण प्रयोग कोणींच केला नाहीं. तो पुन्हां सतराव्या शतकांत ब्रिटननें सुरू केला. आणि जागृतिबरोबरच संघटनेसाठीं अवश्य असणाऱ्या गुणांचीहि त्या राष्ट्रानें जोपासना करण्याचें धोरण स्वीकारल्यामुळें त्याचा प्रयोग यशस्वी होऊन त्याच्या ठायीं कल्पनातीत सामर्थ्य निर्माण झालें व कांहीं काळ सर्व जगाचें नेतृत्व त्याला करतां आलें. ब्रिटनच्या मागून त्याच राष्ट्राची शाखा असलेल्या अमेरिकेनें हा प्रयोग यशस्वी करून दाखविला. पण दोघांचा मिळून प्रयोग एकच. म्हणजे जागृत व्यक्तित्वाची संघटना करून त्यांतून सामर्थ्य निर्माण करण्यांत जगाच्या इतिहासांत आतांपर्यंत एकाच—फक्त एकाच समाजाला—अँग्लो-सॅक्सन समाजाला यश आलेलें आहे. त्यानंतर युरोप व लॅटिन अमेरिका येथील अनेक देश, रशिया, चीन हे देश, यांतील जवळ जवळ प्रत्येकानें हा प्रयोग करून पाहिला; पण स्वित्झरलँड, स्कॅंडिनेव्हियन देश यासारखे लहान अपवाद सोडले तर त्यांत कोणालाहि यश आलें नाहीं. व्यक्तित्वजागृति म्हणजे चिरफळ्या, भेद, शकलें हाच सिद्धांत प्रत्येकानें सिद्ध करून दाखविला. शेवटीं त्यांतील कांहींनीं दंण्डसत्तेचा आश्रय करून आपल्या संघटना अभंग राखिल्या. व तेंहि ज्यांना जमलें नाहीं ते देश दुबळे बनून परक्यांच्या आहारीं गेले, व स्वातंत्र्यही गमावून बसले.

तेव्हां व्यक्तित्वजागृति हें एक फार कठिण व्रत आहे. जागृत व्यक्तित्व संघटित ठेवण्याची विद्या जर समाजानें प्रथमपासूनच अभ्यासिली नाहीं तर तो समाज दुबळा होऊन त्याचा सर्वनाश होण्याचा संभव असतो. स्वातंत्र्यपूर्व काळांत लोकमान्य टिळक व महात्मा गांधी यांनीं लोकायत्त

शासनाचें हें महत्त्व जाणून लोकजागृतीबरोबरच लोकसंघटना निर्माण करून ती दृढ व अभंग राखण्याचें धोरण ठेविलें होतें. त्यासाठीं वाटेल ती किंमत देण्यास ते महापुरुष सदैव सिद्ध असत. काँग्रेससंघटना अभंग रहात असेल तर, सुरतेचें अपयश, कारण नसतांहि, स्वतःच्या शिरीं घेण्याचें टिळकांनीं मान्य केलें होतें, हें मागें सांगितलेंच आहे. पुढेंहि अनेक वेळां काँग्रेसनिष्ठा व स्वतःचीं मतें यांत संघर्ष आला तेव्हां त्यांनीं स्वमताचा आग्रह बाजूस ठेवून काँग्रेसनिष्ठेला वंदन केलें. महात्माजींचेंहि हेंच धोरण होतें. स्वराज्यपक्षाचीं मतें त्याना मान्य नव्हतीं. तरी, त्यानें फुटून जाऊं नये म्हणून, आपला आग्रह सोडून त्यांनीं त्या पक्षाला काँग्रेसमध्यें जागा करून दिली. पुढें समाजवादी पक्षाबद्दलहि त्यांनीं हेंच धोरण ठेवलें होतें. आणि अशा रीतीनें काँग्रेसचीं शकलें न होऊं देण्याविषयीं या दोन महापुरुषांनीं अखंड दक्षता बाळगिली होती. त्यांच्यानंतर पंडित जवाहरलाल यांनीं काँग्रेस सरकारची घडण करतांना देशांतील सर्व पक्षांना एकसूत्रांत गोवण्याचा फार मोठा प्रयत्न केला. डॉ. आंबेडकर, श्यामाप्रसाद मुकर्जी हे काँग्रेसचे अगदीं कट्टे वैरी. पण मंत्रिमंडळांत त्यांना जागा देऊन देशाची संघटना अभंग राखण्यासाठीं पंडितजींनीं अत्यंत संयम करून तें जुनें वैर दृष्टीआड केलें, आणि भारतीय जनतेची एक अभंग फळी निर्माण केली. टिळक, गांधीजी व पंडितजी हे थोर नेते राष्ट्राची संघटना अभंग राखण्यासाठीं वाटेल ती किंमत देण्यास सिद्ध असत. याचें कारण एकच दिसतें. लोकसंघटना भंगली तर सर्वनाश आहे हें त्यांनीं जाणलें होतें. संघटनेस अवश्य ते गुण आपण जोपासले नाहींत तर व्यक्तिस्वातंत्र्याला, राष्ट्रीय स्वातंत्र्याला—कशालाच अर्थ नाहीं हें जगाच्या इतिहासांत त्यांना पदोपदीं दिसत होतें. अमेरिकेसारख्या एका प्रबल लोकसत्ताकाचा जनक वॉशिंग्टन यानें अगदीं प्रारंभीं आपल्या राष्ट्राला हेंच महातत्त्व शिकविलें होतें. ‘ लोक स्वतंत्र झाले असें केव्हां म्हणावें ? समाजकल्याणासाठीं आपल्या वैयक्तिक स्वार्थांना व हक्कांना आपण होऊन मुरड घालण्याची सद्बुद्धि ते दाखवितील तेव्हां. तोंपर्यंत त्यांना स्वतंत्र म्हणतांच येत नाहीं.’ असें वॉशिंग्टन नित्य सांगत असे. मागें उल्लेखिलेले अमेरिकन वरिष्ठ न्यायालयाचे पहिले न्यायाधीश मार्शल यांचेहि याविषयींचे उद्‌गार प्रसिद्ध आहेत.

'परकीय दास्यांतून मुक्त होण्याच्या प्रचंड घोषणा करीत असतांना अमेरिकन लोक एका दुसऱ्या दास्याच्या आहारीं जात होते. दुही, फूट, विघटना यांचें तें दास्य होतें. या दास्यांतून अराजक व दौर्बल्य निर्माण होऊन समाजाचा नाश होतो'.

इतिहासाची पुनरावृत्ति होते असें म्हणतात. मानवी स्वभाव सर्वत्र सारखा असतो, त्याच लोभमोहाला तो सर्वत्र बळी पडतो, तेच रागद्वेष त्याच्यावर सर्वत्र वर्चस्व गाजवितात, तीच मनाची क्षुद्रता, तोच अविवेक, तीच विपरीत बुद्धि यांच्या आहारीं तो जातो आणि भिन्न भिन्न काळीं व स्थळीं तोच इतिहास निर्माण करतो. भारतांत कोठल्या इतिहासाची पुनरावृत्ति होणार, असा प्रश्न आहे. त्याचें उत्तर आपल्याला शोधावयाचें आहे.

महात्माजी गेल्याबरोबर कॉंग्रेसनें आपलें विशाल राष्ट्रव्यापी रूप टाकून दिलें. कॉंग्रेसच्या कक्षेंत यापुढें भिन्न मतांच्या लोकांना जागा नाहीं असा तिच्या सूत्रधारांनीं दण्डक घालून टाकिला. टिळक व महात्माजी यांचें धोरण नेमकें याच्या उलट होतें हें आपण पाहिलेंच आहे. समाजवादी पक्षानें कॉंग्रेसमध्येंच स्वतंत्र गट केला असूनहि महात्माजींनीं त्याला कॉंग्रेसमध्यें राहवून घेतलें; इतकेंच नव्हे, तर जयप्रकाश नारायण किंवा आचार्य नरेंद्र देव यांपैकीं कोणाला तरी कॉंग्रेसचें अध्यक्षपद द्यावें असें सुचविलें होतें; पण महात्माजींच्या मागून जे कॉंग्रेसचे सूत्रधार झाले त्यांना हें व्यापक धोरण मानवलें नाहीं. त्यांनीं भिन्नमतवादी लोकांना कॉंग्रेसमध्यें रहाणें अशक्य करून टाकिलें आणि त्यामुळें अखिल भारतव्यापक अशी एकही संघटना या देशांत राहिली नाहीं. विघटनेला येथून प्रारंभ झाला.

पण एवढेंच होऊन कॉंग्रेसची विघटना थांबली असती तर ती फार मोठी आपत्ति ठरली नसती; पण कॉंग्रेसचें सत्त्व आतां लोपत चाललें होतें. सत्तारूढ झाल्याबरोबर कॉंग्रेसच्या नेत्यांच्या, अधिकाऱ्यांच्या व सदस्यांच्या स्वार्थी वासना व अधोगामी वृत्ति अत्यंत प्रबळ झाल्या आणि पूर्वसूरींनीं रक्ताचें खतपाणी घालून जोपासलेल्या या संघटनेला प्रत्येक प्रांतांत तडे जाऊं लागले. आणि आज या प्राचीन सनातन भूमीच्या सर्वनाशाचें भयानक दृश्य विचारवंतांच्या डोळ्यांपुढें उभें राहूं लागलें आहे.

## विघटना

राजकीय पुनर्घटनेचा उत्तर भाग जो लोकसंघटना, त्याबाबतींत कॉंग्रेस अपयशी ठरणार आणि जगांतल्या इतर लोकसत्ता ज्या मार्गानें गेल्या त्याच मार्गानें भारताची लोकसत्ताहि जाणार, अशी एक अत्यंत दारुण भीति सध्यां मनाला ग्रस्त करीत आहे. कॉंग्रेसचे नेते इतके चारित्र्यभ्रष्ट होतील व स्वार्थ, धनमोह, वैयक्तिक हेवेदावे, सत्ताभिलाष असल्या कारणामुळें प्रांतोप्रांतीं या संघटनेंत तट पडतील, भारताच्या स्वातंत्र्यार्थ पन्नास वर्षें संग्राम करणाऱ्या या संस्थेच्या या कारणांमुळें चिरफळया होतील, हें कोणाच्या स्वप्नांतहि आलें नसेल; पण हें सत्य डोळयांसमोर घडत आहे. त्यामुळें त्यावर विश्वास ठेवण्याखेरीज गत्यंतर नाहीं.

कॉंग्रेसच्या या विघटनेला मद्रास प्रांतांत प्रथम सुरवात झाली. टी. प्रकाशम् हे आन्ध्र प्रांतांतील कॉंग्रेसचे नेते असून १९४७ मध्यें प्रथम मद्रासचे पंतप्रधान होते. पुढें पदच्युत झाल्यानंतर त्यांनीं नवीन आलेल्या मंत्रीमंडळावर जे आरोप केले ते इतके भयंकर आहेत कीं कोणाहि भारतीयाला ते वाचून धक्काच बसावा. त्यांच्या मतें, अमुक एक पाप या नव्या मंत्रिमंडळानें करावयाचें ठेवलें होतें असें नाहीं. धान्यवाटपाचें काम एका सहकारी संस्थेकडे द्यावयाचें ठरलें होतें. तें तसें न देतां मंत्रिमंडळानें आपल्या ओळखीच्या व्यापाऱ्यांकडे दिलें. न्यायालयांत चाललेले पुष्कळ खटले काढून घेण्याचे हुकूम दिले. मद्रास हायकोर्टाच्या कामांत हस्तक्षेप करून मुख्य न्यायाधीशांचा अवमान केला. त्यामुळें त्यांनीं राजीनामा दिला. सीमेंट, सूत, पोलाद यांच्या आयात निर्यातीचे परवाने आपल्या सग्यासोयऱ्यांना दिले. मद्रासचे अर्थमंत्री ज्या सुदर्शन कंपनीचे डायरेक्टर होते त्या कंपनीला दहा लाखाचे कर्ज दिलें. मंत्री झाल्यावर अर्थमंत्र्यांनीं त्या कंपनीचे आपले शेअर बायकोच्या नांवानें बदलून घेतले; पण विशेष असें कीं त्या कंपनीचा धंदा अजूनहि सुरू झालेला नाहीं. दुसऱ्या एका मंत्र्यानें बंगोलरच्या एका कंपनीला डिझेल बसेस घेण्यासाठीं १२ लाख रु. कर्ज म्हणून दिले. अशी कंपनी अस्तित्वांतच नव्हती व नाहीं. टी. प्रकाशम् यांनीं कॉंग्रेसच्या नियंत्यांकडे सर्व गोष्टी कळवून रीतसर चवकशी

व्हावी असा अर्ज दिला; पण त्यांनीं आंतल्या आंत चवकशी करून, विशेष कांहीं घडलें नाहीं असा निर्णय दिला व तें प्रकरण मिटवून टाकलें. त्यामुळें टी. प्रकाशम् हे कॉंग्रेसमधून फुटून निघाले व त्यांनीं 'डेमोक्रॅटिक फ्रंट' या नांवाचा स्वतंत्र पक्ष काढला. टी. प्रकाशम् व त्यांचा पक्ष यांनीं सत्ताधारी पक्षावर जे आरोप केले ते खरे कीं खोटे हा प्रश्न येथें गौण आहे. ते खोटे असतील तर त्यांच्या पक्षानें सत्तेच्या अभिलाषानें दुसऱ्या पक्षावर दुष्ट बुद्धीनें निंद्य आरोप केले असा त्याचा अर्थ होईल; पण कॉंग्रेसच्या एकाच पक्षांत फळ्या निर्माण झाल्या, कॉंग्रेसची विघटना होऊं लागली, हें सत्य बदलत नाहीं. एक फळी धनमोहाला बळी पडली, कीं दुसरी सत्तामोहाला बळी पडली, एवढाच काय तो प्रश्न. जागृतीनंतर संघटना अभंग राखण्याची विद्या आम्हांला वश नाहीं, हा निर्णय अटळच आहे.

उत्तरप्रदेश, पंजाब, बंगाल या राज्यांची हीच कहाणी आहे. उत्तर-प्रदेशांतील पन्नास कॉंग्रेसजनांनीं वरिष्ठ नेत्यांकडे अर्ज करून, जमीनदारी नष्ट करण्याच्या प्रकरणांत मंत्र्यांनीं लाखों रुपये खाल्ले, असे आरोप केले. बंगालच्या मंत्रिमंडळाविरुद्ध तेथील कॉंग्रेसजनांनीं असाच अर्ज करून एकंदर सतरा आरोप त्यावर केले. पंडित जवाहरलाल नेहरू यांनीं या आरोपांची चवकशी करून, या सतरा आरोपांपैकीं बारा आरोपांना मंत्रिमंडळानें समाधानकारक उत्तरें दिलीं, असें जाहीर केलें. पण म्हणून काय झालें? राहिलेल्या पांच आरोपांचें काय? कापडाचा काळा बाजार केला म्हणून एका व्यापाऱ्यावर खटला झाला होता. बंगालच्या पंतप्रधानांनीं मध्यें पडून तो काढून घेतला. एका कंपनीविरुद्ध ॲन्टीकरप्शन खात्यानेंच पुरावा दिला होता. तोहि खटला सरकारनें काढून घेतला. मिठाचे परवाने आपल्या सग्यासोयऱ्यांना दिले. वेस्ट बेंगॉल प्रॉव्हिन्शियल कोऑपरेटिव्ह इंडस्ट्रियल प्रोक्युअरमेंट ॲन्ड डिस्ट्रिब्यूशन सोसायटी—या संस्थेच्या कारभारांत द्रव्या-पहार व अव्यवस्था आहे असें आढळूनहि तिच्यावर खटला केला नाहीं. राहिलेले पांच आरोप आहेत ते असले आहेत. आणि त्यासाठीं विरुद्ध पक्षानें दिलेला पुरावा मोठा विक्षोभक आहे, असें पंडितजींनींच म्हटलें आहे. या प्रकरणीं नेहमींप्रमाणेंच अवश्य त्या फायली हरवणें, नष्ट होणें, पळवून नेणें

होहि प्रकार झाले. आणि असें असूनहि याची जाहीर चवकशी झाली नाहीं. भारताच्या प्रत्येक प्रांतांत कॉंग्रेसची अशीच विघटना चालू आहे. या थोर संघटनेची अभंग, एकसंघ अशी फळी, मुंबई हा अपवाद वजा जातां, कोठेंच राहिलेली नाहीं. बिहारमध्यें श्रीकृष्णसिंह व अनुग्रहनारायणसिंह, पंजाबमध्यें साचार व भार्गव, मध्यभारतांत लीलाधर जोशी व विजयवर्गीय, राजस्थानांत हिरालाल शास्त्री व जयनारायण व्यास अशीं द्वंद्वें व तदंतर्गत क्षुद्र कलह सर्वत्र चालू होते व आहेत. आणि अत्यंत खेदजनक गोष्ट ही कीं हे कलह तत्त्वासाठीं नसून क्षुद्र स्वार्थासाठीं आहेत.

भारतवर्षामध्यें अखिल राष्ट्रव्यापी, जनमनावर वर्चस्व गाजविणारी आणि अखिल भूमीची चिंता वहाणारी अशी कॉंग्रेस ही एकच संघटना आहे. स्वातंत्र्याच्या पहिल्या सलामींतच तिचीं अशीं हीं अनंत शकलें झालेलीं पाहून या भूमीच्या भवितव्याविषयीं विचारवंतांना अतिशय निराशा वाटूं लागते.

## जागरूक सारथी

पण या अंधाऱ्या निराशेंत अजूनहि आशेचा एक किरण उजळतो आहे असें वाटतें. कॉंग्रेसचे जे अग्रश्रेणींतले नेते आहेत, त्यांना या विघटनेची पूर्णपणें जाणीव असून वेळोवेळीं आपल्या अनुयायांचा त्यांनीं अत्यंत कडक शब्दांत निषेध केला आहे. अध्यक्ष राजेंद्रप्रसाद, पंडित जवाहरलाल नेहरु, वल्लभभाई पटेल, राजर्षि तंडन, पट्टाभि सीतारामय्या, यांचे या विघटनेला आळा घालण्याचे प्रयत्न अहर्निश चालूं आहेत. प्रत्येक सभेंत, बैठकींत खाजगी किंवा प्रगट रीतीनें ते कॉंग्रेसच्या सभासदांना आपल्या संस्थेला जडलेल्या या रोगाची जाणीव देत आहेत. त्याची चिकित्सा करून आपलें निदान त्यांना सुनावीत आहेत व अधोगामी वृत्तीला पायबंद बसला नाहीं तर आपला समूळ नाश झाल्यावांचून रहाणार नाहीं, असें त्यांना अगदीं निःसंदिग्ध शब्दांत बजावीत आहेत. अर्थात् आज चारपांच वर्षें ही कानउघाडणी चालूं असूनहि तिचा कसलाहि परिणाम कॉंग्रेससदस्यांवर झालेला नाहीं हें उघड आहे. पण वेगानें

प्रलयाकडे निघालेल्या या महायंत्राचा सारथी तरी सावध आहे, एवढी समाधानाची गोष्ट आहे यांत शंका नाहीं.

२७ ऑगस्ट १९४९ रोजीं कानपूर प्रांतिक कॉंग्रेसच्या बैठकींत भाषण करतांना पंडित जवाहरलालजींनीं पुढीलप्रमाणें कडक टीका केली. 'गेलीं दोन वर्षें कॉंग्रेसचें कार्य ज्या पद्धतीनें चालूं आहे ती तिला फारशी भूषणावह नाहीं. ज्या संघटनेनें भारतांत राज्यक्रांति घडवून आणली ती संघटना हीच काय, असा या देशांतले व बाहेरचे लोक विस्मित होऊन प्रश्न विचारीत आहेत. आतां आपल्या सत्त्वपरीक्षेची खरी वेळ आहे. आपण सध्यां आपल्या पूर्वपुण्याईवर जगत आहों. पण असें किती दिवस चालणार! त्याग व सेवा हें आपलें पूर्वींचें बळ होतें. तें व्रत आपण पुढें चालविलें नाहीं तर लोक आपली जुनी पुण्याई विसरून आपणांस पाठमोरे होतील.' ३० जानेवारी १९५१ रोजीं अहंमदाबादला अखिल भारतीय कॉंग्रेस-समितीपुढें त्यांनीं अगदीं तळमळून पुढीलप्रमाणें उद्‌गार काढले; 'आतां कॉंग्रेसचा आत्माच नष्ट होण्याची वेळ आली आहे. त्याच्या जपणुकीसाठीं आपल्याला निकराचा झगडा केला पाहिजे. आपलें सर्व लक्ष जडदेहाच्या कल्याणाकडे असून आत्म्याची आपणांस विस्मृति झाली आहे. कॉंग्रेस आंतून कुजूं लागली आहे. या संस्थेला कसली तरी दुर्धर व्याधि जडली आहे.' दिल्ली स्टेट कॉन्फरन्सपुढें बोलतांना ( ८–४–५१ ) तर ते फारच निराश झालेले दिसतात. 'आपण महात्माजींची शिकवणूक विसरलों असून क्षुद्र विषयावर भांडत बसलों आहों. आपल्या हातून कसलेंहि कार्य घडत नाहीं. या देशाचा इतिहासच असा आहे कीं, त्यानें प्रत्येक वेळीं आपल्या विजयाचें पराभूतींत–विनाशांत रूपांतर केलें आहे.'

कैलासवासी सरदार वल्लभभाई पटेल यांचे उद्‌गार याहिपेक्षां जास्त स्पष्ट व जास्त कठोर आहेत. 'आज कॉंग्रेसजनांना प्रथम स्वार्थ दिसतो. आपण सर्वांनीं त्याग करून आपलें सामर्थ्य पूर्वीं वाढविलें, पण आतां त्या त्यागाची भरपाई करावयाची संधि आली आहे, असें कॉंग्रेस-सदस्यांना वाटत असावेंसें वाटतें. आपली नैतिक पातळी अगदीं खालीं गेली असून भोंवतालच्या हीन वातावरणाचा संसर्ग कॉंग्रेसलाहि बाधलेला दिसतो.'

( म्हैसूर २५-४-४९ ) मद्रास, बंगाल, संयुक्तप्रांत या राज्यांत सरदारजींनीं कॉंग्रेसच्या शुद्धीसाठीं सारखे दौरे केले. लखनौहून परत जातांना त्यांनीं पुढील प्रमाणें पत्रक काढलें होतें. (१०-१-५०) ' तुमच्या प्रांतांतील चिरफळ्या व गटबाजी पाहून मला अत्यंत दुःख झालें. तुमच्यांतील मतभेद तात्त्विक स्वरूपाचे नसून स्वार्थविषयक आहेत व ते कॉंग्रेसला अत्यंत विघातक आहेत. प्रत्येक प्रांतांत अधःपाताची जणुं शर्यतच लागली आहे. तुम्ही हीन स्वार्थापायीं भांडत बसता व आपसांत गट निर्माण करता. कॉंग्रेस कार्यकारिणीनें अनेक वेळां निषेध केला तरी ते तुम्ही मोडत नाहीं; यामुळें कॉंग्रेसचें नांव कलंकित होत आहे. व्यक्तिहितापेक्षां कॉंग्रेसचें हित श्रेष्ठ आहे हें ज्यांना मानवत नसेल त्यांनीं कॉंग्रेसमधून चालते व्हावें.' बार्डोली, जोधपूर, मद्रास येथें याच शब्दांत सरदारजींनीं कॉंग्रेस सदस्यांची निर्भत्सना केली आहे. ' बाहेरच्या आक्रमणाची भीति मला वाटत नाहीं. आपला नाश झाला तर तो अंतःकलहानेंच होईल. आतां जर आपण अपयशी ठरलों तर तो दोष सर्वस्वीं आपला आहे. खरोखर या दुफळ्या पाहून आपल्याला स्वातंत्र्य मिळालेंच कसें, याचें मला आश्चर्य वाटतें.' ( मद्रास २३-२-४९ ) ' गेल्या तीन वर्षांतलें आपलें वर्तन अत्यंत लज्जास्पद असें आहे. वैयक्तिक हेवेदावे, मत्सर व सत्तास्पर्धा अशीच चालू राहिली तर, गांधीजींनी जें अमृत प्राप्त करून दिलें आहे त्याचें लवकरच विष होऊन जाईल.'

१९४९ सालीं कॉंग्रेसचे त्यावेळचे अध्यक्ष पट्टाभी सीतारामय्या यांनीं कॉंग्रेसजनांच्या मार्गदर्शनासाठीं पुढील सूचनापत्रक काढलें होतें. ( १८-१-४९ ) ' कॉंग्रेसच्या प्रतिनिधींनीं आयात-निर्यात दुकानांचे परवाने स्वतःसाठीं वा मित्रांसाठीं घेऊ नयेत. न्यायप्रविष्ट खटल्यांत न्यायाधीशांना भीड घालूं नये. असें अनेक वेळां झाल्याचें ऐकतों. ट्रॅन्सपोर्ट कमिटी, क्लॉथ लायसेन्स बोर्ड यावरच्या अधिकाऱ्यांनीं आपल्या अधिकाराचा दुरुपयोग केलेला आहे. स्वातंत्र्यापूर्वी आपली संघटना अभेद्य होती; पण त्यानंतर पक्षांत उपपक्ष, त्यांत पुन्हां गट, अशा फळ्या झाल्या आहेत. एका गटाचा माणूस मंत्री झाला कीं दुसरा गट त्याच्याविरुद्ध फळी उभारतो. सिनेमाची जागा, दुकानची जागा, आयात निर्यात परवाने—एवढें

कारण विरुद्ध गट करण्यास पुरेसें होतें.' १७-९-५० च्या भारतज्योती-मध्यें पट्टाभींनीं 'दि ट्रूथ मस्ट बी नोन' या नांवाचा लेख लिहून काँग्रेसच्या सदस्यांची अनीति, क्षुद्र वृत्ति, व नग्न स्वार्थ हीं अगदीं प्रांजलपणें जनतेपुढें मांडलीं आहेत. आंध्र प्रांतांतील काँग्रेस कमिट्यांच्या अंतर्गत निवडणुकांविषयीं लिहितांना ते म्हणतात, 'अनीतीलाहि कांहीं सीमा असते, पण आंध्रमधील घटनांनीं अनीतीच्या सर्व ज्ञात मर्यादा ओलांडल्या आहेत.'

काँग्रेसची विघटना कोणत्या थरास जाऊन पोंचली आहे याची या हकीकतीवरून व काँग्रेसश्रेष्ठींच्या टीकेवरून कल्पना येईल. यावरून एका अत्यंत दुःखद निर्णयाप्रत आपण येऊन पोंचतों. लोकजागृतीची विद्या आपण हस्तगत केली असली आणि त्या दृष्टीनें आपण यशस्वी झालों असलों तरी व्यक्तित्वजागृत अशा लोकांची संघटना करण्याची विद्या अजून आपल्याला वश झालेली नाहीं. राजकीय पुनर्घटनेचें हें दुसरें अंग अजून अत्यंत विकल असेंच आहे. तें पुष्ट होऊन त्यांत प्राणशक्तीचा संचार होईपर्यंत, पहिलें अंग कितीहि परिपुष्ट झालें असलें तरी, राष्ट्रीय उन्नतीचें कार्य, लोकसत्तेच्या दृढीकरणाचें ध्येय साध्य होण्याची यत्किंचितहि आशा धरतां येणार नाहीं हें अगदीं उघड आहे.

## सर्व समाजच रोगग्रस्त

पण यावेळीं भारताच्या नागरिकांनीं अत्यंत सावधगिरीनें विचार करणें अवश्य आहे. काँग्रेसजनांची स्वार्थपरायणता, क्षुद्रवृत्ति व हीन आचरण पाहून मन उद्वेगून व भडकून जाणें अगदीं सहाजिक आहे. पण लोकशाहीचा प्रत्यक्ष आचार ज्यांना करावयाचा आहे त्यांनीं अशा मनः-स्थितीच्या कधींच आहारीं जातां कामा नये. नाहीं तर एका बाजूची स्वार्थी, हीन व संकुचित वृत्ति व दुसऱ्या बाजूचा अविवेक, संताप व माथेफिरूपणा यांची युति होऊन येथें वाटेल ती अनर्थपरंपरा कोसळेल. इतर देशांत हेंच झालें आहे. तें आपल्या या भूमींत न होऊं देण्याची जितकी काँग्रेसची जबाबदारी आहे तितकीच भारताच्या नागरिकांचीहि आहे. म्हणून विवेकानें विचार करण्यास त्यांनीं सिद्ध झालें पाहिजे.

मनाची तशी सिद्धता त्यांनीं करतांच त्यांच्या पहिली गोष्ट ही ध्यानीं येईल कीं, कॉंग्रेसला विघटनेची ही जी व्याधि, हा जो रोग जडला आहे, तो केवळ कॉंग्रेसचा रोग नसून आपल्या अखिल समाजाचा रोग आहे. मार्क्सवादी प्रेरणेनें या देशांत आज तीस वर्षें कार्य चालू आहे. त्या प्रेरणेनें कार्य करणाऱ्या लोकांचे किती पक्ष व उपपक्ष झाले आहेत, त्याचा जनतेनें एकदां विचार करावा; म्हणजे आहे या संघटनांत जास्तींत जास्त दृढ अशी कॉंग्रेस हीच संघटना आहे, हें तिच्या ध्यानांत येईल. कम्युनिस्ट, सोशॅलिस्ट, रॉयिस्ट, बहुजनसमाजवादी, नवजीवनवादी असे मार्क्सप्रेरित लोकांचे अनेक पक्ष आहेत. आणि त्या प्रत्येकांत पुन्हां अनेक गट आहेत. यांनीं निर्माण केलेल्या कामगार संघटनांच्या अशाच चिरफळ्या चालू आहेत. मार्क्सच्या मतें सर्वांत पुरोगामी असलेली ही शक्ति कधींच संघटित होऊं शकली नाहीं; इतकेंच नव्हे, तर राष्ट्रीय स्वातंत्र्याच्या लढ्यांत सहभागी होण्याइतकी राजकीय प्रबुद्धताहि या शक्तीला कधीं प्राप्त झाली नाहीं. गेल्या निवडणुकांत या पक्षांनी, कॉंग्रेस भांडवलवाल्यांच्या आहारीं गेली असा प्रचार करांत असतांना, स्वतः भांडवलवाल्यांशीं कशी लगट केली हेंहि भारताच्या नागरिकांनीं ध्यानीं घ्यावें. भाई डांगे यांनीं, आम्ही भांडवलाचें राष्ट्रीयीकरण करणार नाहीं, अशी घोषणाच करून टाकली. बहुजनसमाजवादी लोकांनीं, व्यापारी हा कष्टकरी वर्ग आहे, असा निर्वाळा दिला व दोन लाखापर्यंत धन असलेल्या श्रीमंतांना गरीब जनतेंत सामील करून टाकलें. कॉंग्रेसजन सत्तारूढ झाल्यावर तरी धनवश झाले. इतर पक्षांनीं आधींच आपली शरणागति जाहीर करून टाकली आहे. हिंदुत्वाच्या प्रेरणेनें कार्य करणाऱ्या लोकांची स्थिति कांहीं निराळी नाहीं. त्यांनाहि अखिल भारतांत एक आघाडी निर्माण करतां आली नाहीं. हिंदुसभा, रामराज्य-परिषद्, जनसंघ अशा त्यांच्या चिरफळ्या झालेल्या आहेतच. जमीनदार-भांडवलदार यांच्याविषयीं त्यांची वृत्ति काय आहे हें करपात्री महाराजांच्या भाषणावरून सहज कळून येईल. त्यांचें धन त्यांना पूर्वजन्मींच्या पुण्याईमुळें मिळालेलें असून तें जप्त करणें हें पाप आहे, असें हे महाराज भाषणांतून सांगतात! हें दोन गटांचें वृत्त झालें. तिसरा गट कॉंग्रेस सोडून जाणाऱ्या समाजवाद्यांचा व तत्सम इतरांचा. कॉंग्रेसमधील स्वार्थ, अनीति, क्षुद्रवृत्ति,

यांना कटाळून ज्यांनीं कॉंग्रेस सोडली त्यांना कॉंग्रेसविरोधी आघाडी उभारण्यांत किती यश आलें हें मश्हूर आहे. वास्तविक ध्येयनिष्ठा, उच्च नीति, महात्माजींचें सेवाव्रत या उदात्त घोषणा करीत हे लोक बाहेर पडले होते. त्यांना तर अखिल भारतव्यापी एकसंध संघटना करण्यास कांहींच अडचणी यावयास नको होत्या. कारण त्यांची प्रेरणा अत्यंत उदात्त होती. पण प्रत्यक्षांत दृश्य असें दिसलें कीं, त्यांच्यांत विघटनावृत्ति सर्वांत जास्त आहे. याचा अर्थ असा कीं तेहि स्वार्थ, सत्ताभिलाष, क्षुद्रवृत्ति यांतून वर निघूं शकत नाहींत. कॉंग्रेसेतर पक्षांची ही स्थिति पाहिली म्हणजे, विघटना हा केवळ कॉंग्रेसचाच रोग नसून आपला सर्व समाजच त्या दुर्धर रोगानें ग्रस्त झालेला आहे, हें ध्यानांत येईल.

## कॉंग्रेसमध्यें शिरावें

स्वार्थ, क्षुद्रवृत्ति, अनीति ही व्याधि केवळ कॉंग्रेसचीच आहे असें नसून आपण सर्वच तिच्या आधीन आहोंत, हें जर भारतीय नागरिकांच्या ध्यानीं आलें, तर त्यांना पुढील विचार स्वीकारण्यास फारशी अडचण पडणार नाहीं असें वाटतें. लोकसत्ताक राज्यपद्धतीचें पहिलें तत्त्व असें कीं, त्या पद्धतींत कोणचा तरी एक पक्ष निर्विवाद बहुमताच्या बलानें संपन्न असला पाहिजे. असें असल्यावांचून राज्ययंत्रच चालूं शकणार नाहीं आणि राज्ययंत्र दुबळें झालें, कीं नागरिकांवर कोणचे अनर्थ कोसळतात तें आतां नव्यानें सांगण्याची जरूर आहे असें नाहीं. तेव्हां, लोकसत्ताक पद्धतीचें हें पहिलें तत्त्व लक्षांत ठेवून, भारतीय जनतेनें सध्यांच्या काळांत कॉंग्रेस या संघटनेलाच जास्तींत जास्त पाठिंबा देणें, यावांचून गत्यंतर नाहीं. कॉंगेसजनांची अधोगामी वृत्ति वर वर्णन करून पुन्हां त्या संघटनेलाच पाठिंबा द्यावा असें मत मांडणें हें अनेकांना अत्यंत विपरीत भासेल. पण जगांतील व्यवहारांत उतरल्यावर तुलनात्मक व तारतम्याच्या दृष्टीनें पाहूनच निर्णय करावा लागतो. आपली आकांक्षा कितीहि मोठी असली तरी वस्तुस्थितीकडे पाहूनच व्यवहारांत पाऊल टाकावें लागतें हें आपण विसरतां कामा नये. विघटनेच्या रोगानें आपल्या सर्व समाजाला व्यापलें नसतें, कॉंग्रेस नीतिभ्रष्ट झाली असतांना इतर कोठला तरी पक्ष निःस्वार्थी, सेवातत्पर व अभंग असा असता, तर

त्याच्या हातीं राज्यसूत्रें देणेंच आपलें कर्तव्य ठरलें असतें. पण दुर्दैवानें तसा एकहि पक्ष नाहीं. अशा स्थितींत मोठ्या प्रकाशसंपन्न अशा विद्युद्दीपाच्या अभावीं जी कोणची लहानशी पणती आपल्याजवळ आहे तिच्या दोन्ही बाजूला हात धरून तिच्या मंद ज्योतीचा जितका संभाळ करतां येईल तितका करणें हेंच आपलें कर्तव्य आहे, हा विचार शांतपणानें मनन केल्यास पटूं शकेल असें वाटतें. त्या ज्योतीला काजळी आलेली पाहून ती मालवून टाकावी असा विचार संतापाच्या भरांत येणें साहजिक आहे आणि अनेकांनीं तो बोलून दाखविलाहि आहे; पण तो शुद्ध आततायीपणा होईल. लोकशाहीला अवश्य असणाऱ्या विवेकाचें तें लक्षण ठरणार नाहीं. कारण आज या ज्योतीचा संभाळ केला तर भविष्यकाळीं केव्हांतरी विद्युद्दीप प्राप्त होण्याचा संभव आहे. पण ही पणती आज मालवून टाकली तर येथें सर्वत्र अराजकाचा अंधार पसरून त्यांत वाटचाल करतांना आपण कोणच्या कड्यावरून कोसळून पडूं, हें सांगणें फार कठीण आहे.

अत्यंत सुदैवाची गोष्ट अशी कीं, हें तत्त्व मनोमन जाणूनच भारतीय जनतेनें मागल्या निवडणुकांत मतदान केलें असें दिसतें. कॉंग्रेसची पुण्याई लुप्त होते असें दिसत होतें. आणि मनाला फारच निराशा वाटत होती. अशा वेळीं ही दुसरीच एक पुण्याई या भूमीच्या संरक्षणासाठीं उभी राहिली असें दिसतें. बहुसंख्यांचा एक पक्ष या देशांत काय वाटेल तें झालें तरी तगविलाच पाहिजे, असा निश्चय करून तो अमलांत आणण्याइतकें सामुदायिक चिंतन व इतकी राजकीय प्रबुद्धता या भूमींतील अत्यंत मागासलेल्या समाजांत निर्माण झाली असेल, असें कोणाच्या स्वप्नांतहि आलें नव्हतें. पण गेल्या शतकांतील थोर पूर्वसूरींचें कार्य, टिळक, महात्माजी यांचा मनापुढील आदर्श, पंडितजी, राजेन्द्रबाबू, सरदारजी यांची शिकवण यांचा परिपाक होऊन म्हणा, किंवा कोणच्याहि दुसऱ्या कारणानें म्हणा, भारतीय जनतेनें पुष्कळशा प्रांतांत कॉंग्रेसला बहुमताचा पाठिंबा देऊन या देशावरचा एक घोर अनर्थ टाळला आहे. कांहीं प्रांतांत कॉंग्रेस सत्ताच्युत झाली हेंहि एक प्रकारें हितावह झालें असें वाटतें. लोकसत्ताक शासन हें सत्ता चालविण्याइतकें बलसंपन्न असावें, पण जनतेला उपमर्दून टाकण्याइतकें बल त्याच्या ठायीं संचित होतां कामा नये, असा लोकसत्ताक शासनशास्त्रांतील

एक सिद्धांत आहे. जनतेनें कॉँग्रेसला याचीहि जाणीव दिली हें मोठें सुलक्षण आहे असें वाटतें. कॉँग्रेसला आपला कौल देतांना मद्रास, त्रावणकोर, कोचीन, हैद्राबाद या प्रांतांत जनतेनें आपलें मनोगत स्पष्टपणें प्रगट केलें आहे. जो लोकसेवा करील त्यालाच मी सत्ताधिष्ठित करीन, असा निर्णायक जबाब तिनें दिला आहे. यापुढें केवळ पूर्वपुण्याईवर तुम्हांला जगतां येणार नाहीं, असें पंडितजींच्याप्रमाणेंच जनतेनेंहि कॉँग्रेसजनांना स्पष्टपणें बजाविलें आहे. आणि सत्ताधारी मदांध होऊन स्वार्थपरायण होतील तर त्यांना पदच्युत करण्याचें म्हणजे देशाच्या निग्रहानुग्रहाचें सामर्थ्य आपल्या अंगीं आहे, हें तिनें निर्विवाद रीतीनें प्रत्ययास आणून दिलें आहे.

या अकल्पितपणें उदयास आलेल्या महाशक्तीचा भारतीय तरुणांनीं आपल्या राष्ट्राच्या राजकीय पुनर्घटनेच्या दृष्टीनें जास्तींत जास्त उपयोग करून घेण्यासाठीं प्रयत्नांची पराकाष्ठा केली पाहिजे. दोनचार राज्यांचे अपवाद वजा केले तर, जनतेनें भारतांत कॉँग्रेसला पुन्हां सत्ताधिष्ठित केलें आहे. अशा प्रसंगीं, ही शंभर वर्षांच्या तपश्चर्येनें निर्माण झालेली पुण्याई नष्ट होऊं द्यावयाची नसेल तर, येथील तरुणांनीं पंडितजींच्या हांकेला साद देऊन कॉँग्रेसमध्यें शिरावें. या दोन चार वर्षांत कॉँग्रेसचा जो अधःपात झाला त्यावरून, तिचें हेंच मूळरूप आहे, असें न मानतां, ही तिची विकृति आहे आणि तिची प्रकृति त्याग, लोकसेवा, ध्येयनिष्ठा यांनींच घडली आहे, हें त्यांनीं ध्यानीं घ्यावें. आणि देशांत जी नवशक्ति निर्माण होत आहे तिच्या साह्यानें लोकसेवा करीत करीत आपल्या च्यारित्र्याच्या बळानें एका पिढीच्या कालावधींत या विराट संस्थेचें संपूर्ण शुद्धीकरण करून तिचें महासामर्थ्य तिला पुनः प्राप्त करून देण्याची महत्त्वाकांक्षा धरावी. मानवी कर्तृत्वाच्या दृष्टीनें आपला देश अत्यंत गरीब आहे. अशा स्थितींत, शंभर वर्षांच्या दीर्घ प्रयत्नानें निर्माण झालेला पुण्यौघ तसाच डावलून दुसरी पुण्याई निर्माण करण्याचा प्रयत्न करणें, हें आपणांस परवडणार नाहीं. दोन कर्तृत्वशाली संघटना पोसण्याइतकें मानवी कर्तृत्वाचें सामर्थ्य या भूमींत निर्माण होण्यास अजून पुष्कळ कालावधि लागेल. तोंपर्यंत आधींच निर्माण झालेल्या या जलौघाला अनेक ठिकाणीं निर्माण होत असलेल्या जनशक्तीच्या प्रवाहाची जोड देऊन परिपूरित करून टाकणें हाच एक उन्नतीचा मार्ग होय.

## प्रकरण दहावें.

# कृषिपुनर्घटना

### समृद्धि व लोकसत्ता

राजकीय पुनर्घटनेनंतरचा अत्यंत महत्त्वाचा प्रश्न म्हणजे आर्थिक पुनर्घटनेचा. मागें ग्रामवादाचा विचार करतांना व अन्यत्रहि अनेक वेळां एक विचार वाचकांच्या मनावर पुन:पुन्हां ठसविण्याचा मीं प्रयत्न केला आहे. तो हा कीं समृद्धीवांचून, संपन्नतेवांचून लोकशाहीला कसलाहि अर्थ नाहीं. एका माणसाच्या जीवनाला अवश्य त्या सर्व वस्तू म्हणजे एक शेर धन असें आपण समजूं. अशा हिशेबानें जेथें शंभर माणसें आहेत तेथें शंभर शेर किंवा जरा अधिकच धन नसेल तर त्या देशांत लोकशाही टिकणें कालत्रयीं शक्य नाहीं. तेथें त्यांतल्या त्यांत जे बाहुबलानें, बुद्धिबलानें, संघटनाबलानें श्रेष्ठ असतील ते इतरांना नमवून त्यांचें धन लुबाडून घेऊन आपला शेर पुरा करून घेतल्यावांचून रहाणार नाहींत. आणि इतरांनीं त्या धनावर पुन्हां वारसा सांगू नये म्हणून नाना प्रकारच्या युक्त्या योजून तत्त्व-शास्त्रें निर्मून व शेवटीं पाशवी बलाचा आश्रय करून त्यांना कायमचें दास्यांत लोटल्यावांचून थांबणार नाहींत.अशा देशांत लोकसत्ता आलीच तर ती अत्यंत अल्पसंख्य लोकांची सत्ता असते. ग्रीस, रोम, २५ वर्षांपूर्वीचें ब्रिटन, अमेरिका, येथल्या लोकसत्ता याच प्रकारच्या होत्या. त्यांतहि ब्रिटनला साम्राज्यामुळें व अमेरिकेला नैसर्गिक संपत्तीची अनुकूलता असल्यामुळें त्या देशांत लोक-शाहीच्या कक्षा बऱ्याच विस्तृत करणें शक्य झालें. इतर देशांत लोकसत्ता तर दूरच राहिली पण कोणच्याहि प्रकारची उच्च मानवी संस्कृति ही बहुसंख्य लोकांना पायातळीं गाडल्यावांचून अजूनपर्यंत कोणालाहि निर्माण करतां आलेली नाहीं. आणि याचें कारण एकच. जितकीं माणसें तितके शेर धन निर्माण करण्यांत अजून कोणाला यश आलेलें नाहीं. तितकी धनसमृद्धि निर्माण केल्यावरहि, म्हणजे सर्वांना अन्न, वस्त्र, घर हीं देण्याइतकें धन देशांत उत्पन्न होऊं लागल्यावरहि, धनाचे मालक त्याचें न्याय्य व सम

विभजन करण्यास नाखूश असतात. ब्रिटन, अमेरिका, फ्रान्स या देशांचा गेल्या शतकाचा इतिहास यांतून निर्माण झालेल्या संघर्षांनींच भरला आहे. पण तो पुढचा प्रश्न आहे. सर्वांना प्राथमिक गरजा भागविण्यापुरतें धन देण्याइतकी समृद्धि जेथें असेल तेथला हा प्रश्न आहे. पण असे देश थोडे. जगांत बहुतेक देशांत अजून सर्वांना पुरेसें देण्याइतकें धन निर्माण कसें करावें हाच प्रश्न आहे. हिंदुस्थान त्यांपैकींच एक देश आहे. म्हणून तो प्रश्न सोडविल्यावांचून आपली लोकसत्ता स्थिर व समर्थ होण्याची आशा बाळगतां येणार नाहीं ही आपण मनाशीं खूणगांठ बांधून ठेविली पाहिजे.

गेल्या शतकांतील बहुतेक सर्व पाश्चात्य विचारवंतांच्या तोंडून आपण एकच घोषवाक्य ऐकत आलो आहोंत. तें हें कीं आर्थिक लोकसत्तेवांचून राजकीय लोकसत्तेला मुळींच अर्थ नाहीं. जनतेला राजकीय हक्क कितीहि मिळाले तरी जोपर्यंत आर्थिक दृष्टीनें लोक स्वावलंबी होत नाहींत, त्यांच्या मानेवरील धनिकांचे पाश जोपर्यंत ढिले होत नाहींत तोपर्यंत हे हक्क केवळ दिखाऊ व फसवे ठरतात. हें मत आतां सर्वमान्य झालें आहे आणि स्वानुभवानें तें सामान्य जनतेलाहि पटलें आहे. म्हणजे आतां जनता जागृत झाली आहे. मागल्या काळांत जनता जागृत नव्हती, आपल्या हक्कांची तिला जाणीव नव्हती. आणि मानवत्वाच्या मूलभूत हक्कासाठीं लढा करावा हा विचार तर ग्रीस, रोम हे अपवाद वगळतां कोणच्याहि देशांतील जनतेच्या स्वप्नांतही आलेला नव्हता. त्यामुळें त्या काळीं महाजनांची लोकसत्ता स्थापणें किंवा ती नसेल तर या वर्गाचें समृद्ध जीवन इतरांना दारिद्र्यांत ठेवून चालविणें याची शक्यता होती. आतां जगांतल्या कोणच्याहि देशांत तें शक्य नाहीं. आतां जनता आर्थिक लोकसत्तेसाठीं लढा केल्यावांचून कोठेंच स्वस्थ बसणार नाहीं. आणि जनतेची आर्थिक धनावर सत्ता ही समृद्धिवांचून कशी शक्य आहे ! तेव्हां समृद्धिवांचून लोकसत्ता ही मागल्या काळांत कांहींशी शक्य झाली असली तरी यापुढच्या काळांत ती क्षणमात्र टिकणार नाहीं हें भारतीयांनीं ध्यानांत ठेवलें पाहिजे.

आणि भारतांत समृद्धि आणावयाची तर येथें आपल्या आर्थिक जीवनाची सर्व दृष्टींनीं पुनर्घटना होणें अवश्य आहे. त्या पुनर्घटनेचाच

आतां विचार करावयाचा आहे. आपल्या आर्थिक पुनर्घटनेचीं दोन अंगें आहेत. एक कृषिपुनर्घटना व दुसरें औद्योगिक पुनर्घटना. दोन्हींचें महत्त्व जवळ जवळ सारखेंच आहे. पण भारत सध्यां तरी कृषिप्रधान असल्यामुळें आणि कृषिवरच औद्योगिक उत्कर्ष बराचसा अवलंबून असल्यामुळें कृषि-पुनर्घटनेचें महत्त्व आपल्या देशांत जरा जास्त आहे. म्हणून आर्थिक पुनर्घटनेच्या त्या अंगाचा विचार प्रथम करूं.

## दरिद्री सुवर्णभूमि

आपण आपल्या भूमीला आज अनेक शतकें सुवर्णभूमि असें संबोधित आलों आहों. स्वातंत्र्य आल्यानंतर पहिला जबरदस्त धक्का आपल्याला कोणीं दिला असेल तर या सुवर्णभूमीच्या अन्नविषयक दारिद्र्यानें. येथें इतर धनांची तर वाण आहेच; पण अगदीं प्राथमिक गरजेचें जें धन म्हणजे अन्न तेंहि या भूमींत दुर्मिळ आहे. ही अत्यंत कटु घटना, आपली जबाबदारी आपल्या शिरावर येतांच, प्रथम आपल्यापुढें उभी राहिली. १९४७ सालापासून आपण दरसाल २५ ते ३५ लक्ष टन धान्य बाहेरून आणीत आहोंत आणि त्यासाठीं ८० ते १५० कोटींपर्यंत रुपये दरसाल मोजीत आहोंत. पुढें कांहीं हिशेब दिले आहेत त्यावरून आपल्या दारिद्र्याची कल्पना अधिकच स्पष्ट होईल. भारतांत एकूण जमीन ८१ कोटी एकर आहे. यांतील ४० कोटी एकर जमीन शेतीला योग्य आहे. त्यापैकीं प्रत्यक्ष शेतीखालीं २४ कोटी एकर जमीन आहे. सुमारें ६ कोटी एकर अन्य कामासाठीं ठेवलेली असून जवळ जवळ १० कोटी एकर पडीत आहे. नव्या खानेसुमारीप्रमाणें भारताची लोकसंख्या ३५ कोटी ६८ लक्ष असून त्यापैकीं २४ कोटी ९० लक्ष लोक शेतीवर अवलंबून आहेत. म्हणजे २४ कोटी एकर जमिनींवर २५ कोटी लोक निर्वाहासाठीं अवलंबून आहेत. सरळ हिशेबानें आपल्याकडे माणशी एक एकर जमीन वांट्याला येते; पण इतकी सम वाटणी कधींच कोठें झालेली नसते. कोणाजवळ लाखो एकर असतात, कोणी अगदीं कंगाल असतात. भारतांत अगदीं भूमिहीन असे म्हणजे केवळ शेतमजुरीवर निर्वाह करणारे सुमारें ८ कोटी लोक आहेत. आपल्या जमिनीपैकीं ८२ टक्के कोरडवाहू म्हणजे केवळ

पावसाच्या पाण्यावर अवलंबून आहे. अशा जमिनीवर केवळ गुजराण करावयाची तर माणशी ५ एकर जमीन हवी. हिंदुस्थानांत पांच एकराहून कमी जमीन असणाऱ्यांचें प्रमाण शे. ७० ते ८० इतकें आहे. वर सांगितल्याप्रमाणें ८ कोटी लोकांना मुळींच जमीन नाहीं आणि १४।१५ कोटी लोकांना निर्वाहापुरतीसुद्धां नाहीं. म्हणजे इतके लोक आज अन्न-वस्त्राला महाग आहेत. कांहीं विशिष्ट प्रदेशाची पहाणी करून जे आंकडे तज्ज्ञांच्या हातीं आले ते पाहिल्यावर वरील कल्पना आणखी स्पष्ट होईल. बिहारमधील चौकशी समितीनें आपल्या अहवालांत असें सांगितलें आहे कीं, शेतकऱ्याच्या कुटुंबाचा निर्वाहखर्च वर्षाला ६१५ रु. आहे. त्यांतील अन्न खर्चच ५२० रु. येतो. आणि बिहारमधील शेतकरीकुटुंबाचें वार्षिक उत्पन्न ४४४ रु. आहे. सर्वोदय समितीनें रत्नागिरी जिल्ह्याची पहाणी केली. तीवरून असें ध्यानांत आलें कीं शें. ८० शेतकरी कुटुंबांना प्रत्येकीं फक्त ३ एकर जमीन आहे. शे. ५९ कुटुंबें कर्जबाजारी आहेत. शें. ६६ कुटुंबांजवळ गाय किंवा म्हैस नाहीं आणि शे. २३ कुटुंबांजवळ तर शेतीला अवश्य तो बैलहि नाहीं.

इतर देशांशीं तुलना केली तर आपलें हें दारिद्र्य किती भयंकर आहे याची जास्त चांगली कल्पना येईल. प्रत्येक जमीन कसणाऱ्या शेतकऱ्याला आपल्याकडे सरासरी दोन ते तीन एकर जमीन आहे. अमेरिकेंत हें प्रमाण दर माणशी १४८ एकर आहे. डेन्मार्कमध्यें ४०, स्वीडनमध्यें २५ आणि जमीन जेथें अगदीं कमी त्या ब्रिटनमध्यें सुद्धां हें प्रमाण दर शेतकऱ्यास २० एकर असें आहे. वरील देशांत शेती शास्त्रीय पद्धतीनें होत असल्यामुळें तेथें दर एकरी उत्पन्न अनेक पटीनें जास्त असतें ही गोष्ट पुन्हां निराळीच. यामुळें आपल्या आहारांतील सत्त्वांशाचें प्रमाण काय असेल याची सहज कल्पना येईल. आपल्याकडे आहारांत प्रोटीन्सचे प्रमाण ८·७ इतकेंच आहे, तर अमेरिकेंत ते ६१·४ व स्वीडनमध्यें ६२·६ आहे. आयर्लंड देश आपल्यासारखाच गरीब आहे असें म्हणतात; तेथेंहि हें प्रमाण ४६·७ आहे. अमेरिकेंत दर माणशीं दरसाल ११० शेर दूध मिळतें. डेन्मार्कमध्यें १६४ शेर व स्वीडनमध्यें सरासरीनें २६३ शेर

दूध मिळतें; आणि श्रीकृष्णाच्या या भूमींत शेतकऱ्यांपैकीं शे. ७० लोकांना दुधाचें दर्शन घडणेंहि कठीण होऊन बसलें आहे.

## दारिद्र्य आणि व्यक्तित्व

आपण हें निश्चित ध्यानांत ठेविलें पाहिजे कीं ज्याच्या घरांत हक्काचें अन्न व वस्त्र नाहीं त्या मनुष्याचें मन नेहमीं हीन, दीन, पंगु असेंच रहाणार. व्यक्तीच्या अहंकाराचें पोषण, त्याच्या 'स्व' चा विकास, त्याच्या व्यक्तिमत्वाचा उत्कर्ष हा लोकशाही समाजरचनेचा आत्मा होय. हें जर खरें असेल तर दारिद्र्यांत या आत्म्याचा पोष कधींहि होणार नाहीं व म्हणून दरिद्री देशांत लोकसत्ता यशस्वी होणें कधींहि शक्य नाहीं हें कोणालाहि सहज पटेल. धार्मिक, सामाजिक व राजकीय अशा तीन प्रकारच्या गुलामगिरीविरुद्ध लोकसत्तेच्या अभिमान्यांना झगडा करावा लागतो. कारण या गुलामगिरीमुळें माणसाचें मन अगदीं पंगु, अगदीं दुबळें झालेलें असतें; पण या सर्वांहूनहि दारिद्र्यानें येणारी मानसिक पंगुता मनुष्याच्या अहंकाराला व त्यामुळेंच त्याच्या कर्तृत्वाला जास्त बाधक असते. आपल्या देशांत शे. ७०।८० लोक अशा विकल मानसिक अवस्थेंत आहेत. लोकशाही यशस्वी करण्यासाठीं बहुसंख्य लोकांचें कर्तृत्व उदयास येणें अवश्य आहे. तसें झालें तरच हा अवाढव्य कारभार पेलणें शक्य होईल. पण माणसाची अन्नवस्त्राची भ्रांत मिटल्यावांचून त्याच्या कर्तृत्वाचा उदय होत नाहीं. म्हणून तो राष्ट्रीय प्रपंचाची जबाबदारी वहाण्यास मनानें व शरीरानें असमर्थ होतो. तेव्हां आपल्याला आपली लोकसत्ता यशस्वी करावयाची असेल तर प्रथम आपण या दारिद्र्यांतून मुक्तता करून घेतली पाहिजे. १९५० सालीं सीलोनमध्यें भाषण करतांना पंडितजींनीं हाच भावार्थ स्पष्ट करून सांगितला आहे. ते म्हणाले, " हिंदुस्थानापुढें आज मुख्य समस्या आहे ती म्हणजे जनतेची आर्थिक स्थिति कशी सुधारावी ही होय. लोकांना राजकीय स्वातंत्र्य न देणारी लोकसत्ता जितकी अयशस्वी तितकीच दारिद्र्य नष्ट न करणारी लोकसत्ताहि अयशस्वी होय असें मी समजतों. राजकीय स्वातंत्र्य ही महनीय गोष्ट आहे हें खरेंच आहे; पण या स्वातंत्र्याच्या अभ्यंतरांत सामाजिक व आर्थिक स्वातंत्र्य समाविष्ट झालेलें आहे. खेड्यांत

रहाणाऱ्या कोट्यवधि हिंदी जनतेचें दारिद्य नष्ट करण्याचें एक साधन याच दृष्टीनें मी स्वातंत्र्याकडे पहात आलों आहे." उत्तरप्रदेश काँग्रेस-कमिटीपुढें भाषण करतांना त्यांनीं भारतांतील जमिनीच्या वाटपाच्या प्रश्नावरच लक्ष केंद्रित केलें होतें. 'आपल्यापुढील मुख्य प्रश्न म्हणजे जमिनीचा प्रश्न होय. हा प्रश्न सुटला तर इतर प्रश्न आपोआप सुटतील. तो सुटला नाहीं तर आपला सर्वनाश होईल. काँग्रेसनें हा प्रश्न सोडविला तरच तिचें पुनरुज्जीवन होईल. आत्मोद्धाराचें तिच्या हातीं हें फार मोठें साधन आहे.' (भाषण-२७-८-४९) अमेरिकेंतील पत्रपंडित नॉर्मन कझिन्स याशीं पंडितजींची मुलाखत झाली. त्यावेळीं त्यांनीं या प्रश्नाचें स्वरूप आणखी स्पष्ट केलें आहे. (२२-४-५१) 'आमचा देश कृषिप्रधान आहे. आम्ही शेतकरी आहों. आणि कृषिपुनर्घटना हें आमचें पहिलें ध्येय आहे. येथली जमीनदारी व सरंजामदारी स्वरूपाची व्यवस्था नष्ट करून तेथें सहकारी व्यवस्था निर्माण करणें हें त्या कृषिनपुर्घटनेचें स्वरूप राहील. या जमीनदारीमुळेंच आमची सर्व प्रगति खुंटली आहे. आमच्या प्रगतीच्या मार्गांतली ती मोठी धोंड आहे.'

भारताची लोकसत्ता स्थिर व दृढ करण्यास सर्वांच्याच मतें अत्यंत अवश्य अशी जी कृषिपुनर्घटना ती घडविण्याच्या दृष्टीनें आपल्या देशांत सध्यां कोणचे प्रयत्न चालू आहेत तें आतां पहावयाचें आहे.

वर दिलेल्या पंडित जवाहिरलाल नेहरूंच्याच मताप्रमाणें जमीनदारी ही या पुनर्घटनेच्या मार्गांतली सर्वांत मोठी धोंड आहे. शेतकऱ्याचें जोपर्यंत जमिनीवर स्वामित्व नाहीं, आणि केल्या कष्टाचें फल पूर्णपणें आपल्यालाच मिळेल अशी जोपर्यंत त्याला आशा नाहीं, तोपर्यंत त्याच्या हातून शेतीसाठीं खरी मेहनत होणें शक्य नाहीं; अंगमेहनत तो करीलहि पण शेतींत सुधारणा करणें, नव्या पद्धतीचा अवलंब करणें, त्यासंबंधीं योजना आखून त्या पार पाडण्यासाठीं आपलें सर्वस्व खर्ची टाकणें हें त्याला शक्य नाहीं. त्याच्याजवळ एवढें कार्य करण्याजोगें मानसिक सामर्थ्य नाहीं, त्याला लागणारें भांडवल नाहीं आणि हें साधण्यासाठीं लागणारा उत्साह नाहीं. जमीन त्याची झाली तर सर्व अडचणी दूर होऊन हळूहळू हीं सामर्थ्यें

त्याला प्राप्त होतील व तो सुबत्ता निर्माण करूं शकेल. हें ध्यानीं घेऊनच सत्ता हातीं येतांच जमीनदारी नष्ट करण्याचा कॉंग्रेसनें निश्चय केला व प्रांतोप्रांतींचीं सरकारें त्या मार्गानें पाऊल टाकूं लागलीं.

## जमीनदारीचा नाश?

हिंदुस्थानांत उत्तरप्रदेश, बिहार, मध्यप्रदेश, आसाम, बंगाल, ओरीसा व मद्रास या प्रांतांत जमीनदारांच्या विषमतेचें स्वरूप अत्यंत उग्र असें आहे. आणि याच प्रांतांत जमीनदारी नष्ट करण्याचा कायदा तेथील कॉंग्रेस-सरकारांनीं आतां संमत करून घेतला आहे. पंजाब, राजस्थान, सौराष्ट्र, मध्यभारत येथेंहि जमीनदारी पद्धत आहेच. आणि अन्यत्रहि खोती, गिरासदारी, मालगुजारी अशा भिन्न नांवांनीं जमीनदारीच नांदत आहे. पण या इतर प्रांतांत अजून जमीनदारीचा कायदा झालेला नाही. तरी मुंबई प्रांतांतील कुळकायद्यासारखे कायदे करून शेतकऱ्याला थोडी सुस्थिति आणून देण्याचे प्रयत्न कॉंग्रेसनें चालविले आहेतच. यांत जमीनदारी नष्ट करण्याचा कायदा हा जमिनीची विषमता नष्ट करण्याचा सर्वांत मोठा प्रयत्न होय. तेव्हां त्याचें स्वरूप आणि फल काय आहे तें प्रथम पाहूं. जमीनदारीच्या कायद्याविषयीं पहिली गोष्ट अशी कीं जमीनदारांकडून ज्या जमिनी सरकार घेणार त्या त्यांना नुकसान भरपाई देऊन घेणार आहे. भारताच्या घटनेंतील ३१ व्या कलमान्वयें भरपाई न देतां जमिनी हिरावून घेण्याचा अधिकार कोणत्याच सरकारला नाहीं. तेव्हां जमीनदारांना भरपाई दिलीच पाहिजे. अशी स्थिति असल्यामुळें नजीकच्या भविष्य काळांत या कायद्याचा तितकासा उपयोग होणें कठिण आहे. रिझर्व बँकेनें आपल्या १६।७।५० च्या बुलेटिन मध्यें याविषयींचा हिशेब दिला आहे. जमीनदारांकडून या तऱ्हेनें एकंदर १७ कोटी एकर जमीन सोडवा-वयाची आहे. आणि यासाठीं ठरलेल्या हिशेबानें ४१४ कोटी रुपये लागणार आहेत. एकटया उत्तरप्रदेश सरकारला यासाठीं १८० कोटी रु. खर्च करावे लागतील. आणि लहानशा बिहार सरकारला १५०कोटी रु. उभे करणें भाग आहे. हा हिशेब देऊन बँकेनें म्हटलें आहे कीं सध्यांच्या स्थितींत कोणत्याच प्रांतसरकारला हें शक्य नाहीं. उत्तर प्रदेशाच्या कायद्यामध्यें असें

कलम आहे कीं जमीनदारांना भरपाई म्हणून जी रक्कम द्यावयाची ती शेतकऱ्याकडूनच १० वर्षांचा खंड वसूल करून घेऊन त्यामार्गें उभारावी. हें कितपत शक्य आहे याचा विचार फारसा अवघड नाहीं. असा पैसा शेतकऱ्याजवळ असता तर जमिनीचा प्रश्न निर्माणच झाला नसता. त्यांतूनहि अशी जी थोडी फार रक्कम उभी रहाणार ती त्यांतल्या त्यांत वरच्या दर्जाच्या शेतकऱ्याकडूनच येणार. ज्या गरीब शेतकऱ्याला जमीन हवी आहे त्याला ती रक्कम कधींच देतां येणार नाहीं. आणि त्यानें ती उभी केली तर तो ती कर्ज काढूनच करणार. म्हणजे पुन्हां जमीन जाणारच. एवढ्या अवधींत तिकडे वाटेल ते अनर्थ घडत आहेत. अनेक जमीनदार जमिनीचें जेवढें वाटोळें करून ठेवणें शक्य आहे तेवढें करीत आहेत. झाडें जंगलें तोडीत आहेत. जमिनीची खराबी करीत आहेत. आणि उत्तर प्रदेशांतील कॉंग्रेसच्या सभासदांनीं वल्लभभाई पटेलांच्याकडे केलेल्या अर्जांत नमूद केल्याप्रमाणें या प्रकाराकडे कॉंग्रेससरकार दुर्लक्ष करीत आहे. एवंच जमीनदारी नष्ट करण्याच्या कायद्यांतील जें नुकसान भरपाईचें कलम आहे त्यामुळें हा कायदा सद्यःफलदायी होणें शक्य नाहीं असें दिसतें.

## योजना !

जमीनदारी नष्ट करण्याप्रमाणेंच आहे या स्थितींत जमिनीचें उत्पादन वाढविण्याचा प्रयत्न करणें हा दुसरा उपाय होय. त्याहि बाबतींत हातीं सत्ता येतांच सरकारनें प्रयत्न सुरू केले आहेत. या क्षेत्रांतील पंचवार्षिक योजनेपूर्वीची महत्त्वाची योजना म्हणजे 'अधिक धान्य पिकवा' ही मोहीम होय. या मोहिमेला सरकारी निरीक्षकांच्या मतान्वयें पाहिलें तरी मुळींच यश आलें नाहीं. उलट कित्येक ठिकाणीं नेहमींपेक्षांहि धान्यनिर्मिति कमीच झाली. केन्द्रसरकाराप्रमाणें प्रांतीय सरकारांनींहि या बाबतींत योजना आंखल्या होत्या व चालूंहि केल्या होत्या. मध्यभारतांत ५२ कोटींची शेतीसुधारणेची योजना आंखलेली आहे. पडीत जमिनींतून १०० एकराचा एक याप्रमाणें ५००० मळे तयार करावयाचे. प्रत्येक मळयावर ३० कुटुंबांची सोय करून त्यांच्याकडून सहकारी पद्धतीनें शेती करावयाची. या योजनेनें दीड लक्ष कुटुंबांची सोय होऊन पांच लक्ष टन धान्याची वाढ होणार आहे.

उत्तर प्रदेशांत अशीच १० लक्ष एकरांत शेती करण्याची योजना आंखलेली आहे. मध्यप्रदेशांत तर १९४९ सालींच १ लक्ष पडीत जमीन लागवडीखालीं आणण्याची योजना आंखलेली आहे. आणि १०००० मोठे ट्रॅक्टर आणून पुढील सात वर्षांत ६० लक्ष एकरांत लागवड करण्याचा सरकारचा निश्चय झालेला आहे. (टाइम्स ऑफ इंडिया २६-२-४९)

या सर्व योजनांचें फल काय मिळालें व काय मिळणार आहे तें आपण जाणीतच आहों. पण त्याविषयीं कांहीं विवेचन करण्यापूर्वी याविषयांतील तज्ज्ञांनीं वेळोवेळीं या योजनांविषयीं काय अभिप्राय व्यक्त केले आहेत ते आधीं पाहूं.

## आत्महीन यंत्र

बहुतेक सर्व टीकाकारांचा मुख्य आक्षेप असा कीं या योजना अमलांत आणणारें सरकार हें एक आत्महीन यंत्र झालें आहे. या सर्व यंत्रांत चैतन्य राहिलेलें नाहीं. आणि म्हणून त्यापासून फलनिष्पत्ति कांहीं होत नाहीं. प्रा. दांतवाला यांच्या विवेचनावरून यांतील भावार्थ स्पष्ट होईल. रिझर्व बँकेचा ग्रामीण अर्थविभाग व मुंबई विद्यापीठांतील स्कूल ऑफ एकॉनॉमिक्स व सोशिऑलजी या संस्थेचा कृषिविभाग यांच्या मार्फत 'अधिक धान्य पिकवा' मोहिमेविषयीं धारवाड जिल्ह्यांत कांहीं पहाणी झाली. त्या इतिवृत्तांत दांतवाला म्हणतात कीं, या निरीक्षकांचें स्वच्छ असें मत झालें कीं, सरकारी अधिकाऱ्यांचें लक्ष कार्यसिद्धीपेक्षां ठरीव रक्कम ठरीव यांत्रिक भाडोत्री पद्धतीनें खर्च करून आपल्या नांवापुढे काम केल्याचें नमूद करून ठेवण्याकडे जास्त असतें. सरकारनें विहिरी खणण्यासाठीं पैसा मंजूर केला होता. आतां या विहिरींची कोठें कितपत जरूर आहे, जुन्या विहिरी किती आहेत, त्यांची डागडुजी करून काम होईल का, इ. सर्व प्रश्न विचारांत घेऊन हा खर्च करावयास हवा होता. पण तशी दक्षता कोणींच घेत नव्हतें. एका गांवीं जुन्या दहा विहिरी मोडकळलेल्या अशा होत्या. त्या एक दशांश खर्चात नीट झाल्या असत्या. पण तसा कोणी विचारच केला नाहीं. आणि विहिरीवरची रक्कम खर्चून टाकण्यांत आली. खतासाठीं मंजूर केलेल्या रकमेचें हेंच

झालें. त्या गांवीं शेणाचें खत किती होईल, खाडे खणून काय काय होईल, असा हिशेब हे अधिकारी करीतच नव्हते. या यंत्रणेत आत्मा नाहीं या म्हणण्याचा अर्थ हा. आपल्या नांवावर जास्तींत जास्त काम केल्याची नोंद व्हावी यासाठीं धडपड. या कामांतून फलनिष्पत्ति काय झाली हें पहाण्याची जबाबदारी कोणीच घेत नव्हतें. श्री. गोरावाला यांनीं 'वर्शिप ऑफ इंबग' या आपल्या लेखांत हीच तक्रार केली आहे. ते म्हणतात कीं, सरकारी अधिकारी ऑफिसांत कागदावर योजना आखतात आणि त्याप्रमाणें काम होत जाणारच असें समजतात. शेतकऱ्यांना तगाई म्हणून रकमा कर्जाऊ दिल्या तर पुष्कळवेळां ते तो पैसा लग्नांत किंवा शर्यतींत उधळून टाकतात. खतें दिलीं तर जास्त भावानें विकून टाकतात. बियाणें दिलें तर तेंच खाऊन टाकतात. आणि लोखंडाचे किंवा इतर यंत्रसामग्रीचे परवाने दिले तर काळ्याबाजारानें ते विकून पैसा करतात. पण यांकडे नजर ठेवून या सरकारी मदतीचा शेतीकडेच उपयोग होईल असें लक्ष ठेवणारा अधिकारी कोणी नाहीं. मग अधिक धान्य पिकणार कसें! उत्तर प्रदेशांतील एक मंत्री डॉ. संपूर्णानंद यांनीं ट्रिब्यून (अंबाला) या पत्रांत लेख लिहून कॉंग्रेससरकारवर हीच टीका केली आहे. आजच्या संघटनेंत खरा कॅग्रेसकार्यकर्ता कोठेंच दिसत नाहीं. आपलें काम झाल्यावर आपण त्याला लाथ मारली व आपण राजवाड्यांत शिरलों. हा प्रकार असाच चालला तर यांतून कम्यूनिझम किंवा फॅसिझम हेच निर्माण होणार. (ट्रिब्यून–१५–८–५०) संपूर्णानंदांचा भावार्थ हा कीं आपल्या कारभारामागें ध्येयवादी, कार्यदक्ष मनुष्य उभा नाहीं. सर्व भाडोत्री कारभार आहे. भारताचे अध्यक्ष राजेन्द्रबाबू यांनींहि सध्यांच्या कारभारावर हाच अभिप्राय दिला आहे. ते म्हणतात 'नुसती जमीनदारी नष्ट करून काय होणार! पूर्वी खंडवसुली जमीनदारांचे मुनीम करीत. आतां सरकारी नोकर करतील. एवढाच फरक झाला. शेतकऱ्याच्या स्थितींत यामुळें कांहींच सुधारणा झाली नाहीं. आपल्याला जर खरी कार्यसिद्धि हवी असेल तर सरकारी तांबडीफीतवृत्ति आपण सोडली पाहिजे. आपल्या कार्याचें यश जनतेंतील स्वतंत्र तज्ज्ञांकडून मापून घेतलें पाहिजे. आणि कार्यदक्ष, प्रामाणिक व निष्णात कार्यकर्ते जोडले पाहिजेत; (ऑल इंडिया ॲग्रिकल्चरल एकॉनॉमिक कॉनफरन्सपुढील भाषण–ता. २–जाने–५०)

पंडित जवाहिरलालजींच्या तर प्रत्येक भाषणाचा हाच सूर असतो. 'काँग्रेसचें जडयंत्र बनत आहे. तिच्यांत आत्मा नाहीं. आणि या दोषामुळेंच सर्व योजना निष्फल होत आहेत.' सरकारी नियोजनामागें सर्वव्यापी दृष्टीचा, सावध व ध्येयवादी कर्ता अधिकारी असणें अवश्य आहे. पाटबंधारे, खतें, सहकारी शेतीची व्यवस्था, सावकार नियंत्रण कायदा, कर्जनिवारणकायदा, अन्नधान्याच्या किंमतींचें नियंत्रण या सर्वांचा एकमेकांवर व राष्ट्रीय जीवनावर एकंदर परिणाम काय होत आहे याचा विचार करणारी व्यक्ति सध्यां कोणी नाहीं. सरकारी अधिकारी कमी दर्जाचे आहेत असें नाहीं. तर जो तो एकेका सुट्या अवयवाचा मालक आहे. सर्व शरीराची जबाबदारी वहाणारा आत्मा तेथें नाहीं. त्यामुळें प्रत्यक्षांत परिणाम कसे होतात तें पहा. पाटबंधारे तयार होऊन पाण्याखालीं जमीन आली कीं तिची किंमत चढते. तिला भाव येतो. मग गरीब शेतकरी ती विकून टाकतो. किंवा याविषयीं लक्ष ठेवून श्रीमंत शेतकरी आधींच ती विकत घेतो. म्हणजे पुन्हां नव्या देणगीचा उपयोग श्रीमंतांनाच व्हावयाचा. जागरूक पहारा हवा तो यासाठीं. कांहीं ठिकाणीं कालवे चालू झाले कीं श्रीमंत शेतकरी एक होतात. आणि पाटाचें पाणी अगदीं कमी भावानें मागतात. न द्यावें तर ते बहिष्कार घालतात. मग सरकारचें नुकसान होतें. कारण केलेला कालवा उचलून दुसरीकडे नेतां येत नाहीं. अशा वेळीं गरीब शेतकऱ्यांची संघटना करून त्या श्रीमंत शेतकऱ्यांवर बहिष्कार टाकण्याची योजना आंखणारी संस्था अवश्य असली पाहिजे. नाहींतर पुन्हां गरीब हा तसाच दरिद्री रहातो व त्याच्यासाठीं केलेल्या योजनेनें श्रीमंतांच्या संपत्तींत भर पडते.

पंचवार्षिक योजनेपूर्वीच्या योजनांविषयीं हें झालें. पंचवार्षिक योजना व त्या योजनेमधील सुप्रसिद्ध ग्रामविकासयोजना यांच्यावरहि अर्थशास्त्रवेत्ते व इतर पंडित यांनीं साधारण अशाच प्रकारची टीका केली आहे. सरकारचें आर्थिक धोरण मिश्र स्वरूपाचें आहे; सरकार कोठें नियंत्रणाचा पुरस्कार करतें व कोठें अनिर्बंध स्वातंत्र्य देतें; त्यामुळें धड कांहींच साधत नाहीं असा मुख्य आक्षेप आहे. नियोजन करावयाचें तर तें एका क्षेत्रांत करणें शक्य नसतें सर्वच अर्थव्यवस्था सरकारनें आपल्या हातीं घेतली पाहिजे. शेती

व उद्योगधंदे हीं परस्परांशीं अत्यंत निगडित आहेत तेव्हां एका क्षेत्रांत नियंत्रण व दुसऱ्यांत स्वातंत्र्य याला कांहींच अर्थ नाहीं, अशी टीका प्रा. धनंजयराव गाडगीळ यांनीं अनेक वेळां केली आहे. ग्रामविकास योजनेचा कारभार सर्वत्र ढिलाईनें व बेजबाबदारपणें चालला असून खर्चाच्या मानानें त्यापासून लभ्यांश नाहीं अशी सर्वत्र जोरांत हाकाटी चालू आहे. ठाणे जिल्ह्यांतील कर्जत येथील योजनेवर खुद्द अर्थमंत्री चिंतामणराव देशमुख यांनीं कडक शेरे मारलेले सर्वश्रुतच आहेत. कर्जत येथील काम अत्यंत मंदपणें चालू असून अधिकारी अगदीं हलगर्जीपणा करीत आहेत, त्यांच्यांत कसलीहि आस्था नाहीं, कसलाहि उत्साह नाहीं, असें अर्थमंत्री सांगून गेले. (सकाळ ९।१।५३) ग्रामविकास योजना पुष्कळशा अमेरिकेच्या आर्थिक साह्यावर अवलंबून आहेत व त्यामुळें अमेरिकेचे आर्थिक पाश आपल्यावर आवळले जातील अशी भीतिहि कांहीं पंडितांनीं व्यक्त केली आहे. पंचवार्षिक योजनेंत खर्चाचा जो आकार धरला आहे त्यांत परकीय साह्यावर आणि सरकार जी बचत करणार आहे तीवर फारच भर दिलेला आहे. या दोहींचा मुळींच भरवसा नाहीं, हे दोन धिरे केव्हां दगा देतील त्याचा नेम नाहीं, अशी शंका तर सर्वच लोकांनीं व्यक्त केली आहे. पंचवार्षिक योजनेला आरंभ होऊन आतां तीन वर्षें होत आलीं. सरकारी अधिकारी पुष्कळ वेळां ती बरीच यशस्वी होत आहे असा निर्वाळा देतात. पण प्रत्यक्षांत पहातां त्याच काळांत देशांत बेकारी वाढू लागली आहे. वास्तविक या योजनेमुळें कांहीं सुबत्ता वाढली असली तर बेकारी वाढावयास नको होती. आणि सुबत्ता वाढूनहि बेकारी आली असली तर जास्त उत्पन्न झालेलें धन हें श्रीमंतांच्या खिशांत गेलें, गरिबांना त्यांतला एक छदामहि मिळाला नाहीं असा त्याचा निश्चित अर्थ आहे. खरोखर मंदी आणि बेकारी यांनीं आपल्या योजनांवर व सर्व कर्तृत्वावर जितकी कठोर टीका केली आहे व त्यांचें स्वरूप जितकें उघडें केलें आहे तितकें कोणच्याहि सरकारविरोधी पंडिताच्या लेखणीनें केलें नसेल. इतर टीकेला कांहीं उत्तर तरी आहे. पण ही टीका अगदीं निरुत्तर करून टाकणारी, अगदीं मर्माचा भेद करणारी अशी आहे.

आपल्या देशाच्या उत्पादनांत वाढ करून समृद्धि निर्माण करण्यासाठीं व तिच्या आधारानें आपली लोकसत्ता स्थिर व सुदृढ करण्यासाठीं आपल्या सरकारनें कोणचे उपाय अवलंबिले, कोणच्या योजना आंखल्या व त्यांविषयीं आपल्या देशांतल्या पंडितांनीं काय अभिप्राय प्रकट केले तें येथवर सांगून झालें. आतां थोड्या निराळ्या दृष्टीनें या सर्वांचा परामर्श घ्यावयाचा आहे.

## तुलनात्मक पहाणी

अगदीं आरंभींच्या प्रकरणापासून एक विचार वाचकांच्या मनावर ठसविण्याचा मी प्रयत्न करीत आहें. भारतीय लोकसत्तेचें मूल्यमापन करतांना आपण फारच सावधगिरी बाळगली पाहिजे. सध्यां या लोकसत्तेचा जो कारभार चालू आहे त्यांतील सावळागोंधळ, लांचलुचपत, बेजबाबदारी, केविलवाणें अज्ञान, अधम स्वार्थीपणा, उन्मत्तपणा आणि या सर्वांमुळें निर्माण झालेलें दारिद्र्य, बेकारी, मंदी, विघटना, दौर्बल्य यांकडे पाहिलें म्हणजे मन निराश होतें आणि भारतीय लोकसत्तेबद्दल आपण वाटेल ते उद्गार काढूं लागतों, वाटेल ती टीका करूं लागतों. असें होणें साहजिक आहे. पण याचवेळीं विवेकी दृष्टीची, तुलनात्मक अभ्यासाची, व्यापक आलोकाची व अंतर्मुख वृत्तीची फार आवश्यकता आहे. लोकशाही हें ध्येय अत्यंत दुःसाध्य आहे, या प्रकारच्या राज्यपद्धतींत यश मिळविणें हें महा कठिण कर्म आहे, आतांपर्यंतच्या जगाच्या इतिहासांत लोकसत्तेंतील यश हा अपवाद आहे, नियम नाहीं, ब्रिटन अमेरिका हीं मोठीं व स्वीडन नार्वे, स्वित्झरलंड हीं लहान राष्ट्रें वगळलीं तर इतरत्र आपल्यापेक्षां शतपटीनें बेताल परिस्थिति दिसते, हा विचार आपण कधींहि मनाआड होऊं देऊं नये. आपल्या लोकसत्तेचा विचार करतांना नव्यानें उदयास आलेल्या राष्ट्रांचा–रशिया, चीन, जपान, तुर्कस्थान यांचा सतत विचार करावा. इराण, इंडोनेशिया, अरब राष्ट्रें व मेक्सिको, ब्राझील, अर्जेंटिना, चिली, पेरू इ. लॅटिन अमेरिकेंतील राष्ट्रें येथें लोकशाहीचा काय खेळखंडोबा चालला आहे तें मनापुढें आणावें आणि मग भारतीय लोकसत्तेकडे पहावें. दुसराहि एक विचार सारखा ध्यानांत ठेवावा. तो हा कीं, सध्यांचें अपयश हें कोणा एका पक्षाच्या दोषामुळें, त्या पक्षांतील विशिष्ट तत्त्वज्ञानामुळें,

धोरणामुळें, किंवा त्यांतील माणसांच्या हीन वृत्तीमुळें येत नसून आपल्या सर्व समाजांतील मूलभूत मानवी मनोधर्मांतले जे दोष, जीं वैगुण्यें, जी हीनता, तीच या अपयशाला कारणीभूत झालेली आहे व होत आहे. 'आमच्या हातीं कारभार द्या, आम्ही उत्तम शासन चालवून दाखवतों.' अशा कांहीं क्षुद्र माणसांच्या वल्गना आहेत. पण काँग्रेस पदच्युत झाली तर अमका पक्ष तेथें येऊन आपली लोकसत्ता यशस्वी करून दाखवील अशी कोणाच्याहि मनांत आशा नाहीं. भारतीय जनतेनें हें मनोमन जाणलें आहे कीं, अमुक एक पक्ष, अमकी एक संघटना सत्तारूढ झाली तर या देशांच्या राजकारणाला किंवा अर्थकारणाला निराळें वळण लागेल असें वाटण्याजोगी परिस्थिति भारतांत मुळींच नाहीं. याचा अर्थ हा कीं, लोकशाहीचा जो श्रेष्ठ धर्म त्याच्या परिपालनासाठीं, त्याच्या आचरणासाठीं लागणारे जे उच्च गुण, जें महासत्त्व, तेंच आपल्याठायीं आज नाहीं. म्हणून त्याची जोपासना केल्यावांचून ही लोकसत्ता कोणालाहि यशस्वी करून दाखवितां येणार नाहीं हें आपण विसरतां कामा नये.

याशिवाय सध्यांच्या कालाकडे जरा अलिप्ततेच्या, इतिहासवेत्त्याच्या दृष्टीनें पहाण्याचा प्रयत्न करणें हेंहि अवश्य आहे. इतिहासांतल्या घडामोडींचा आपण विचार करतों, एखाद्या क्रान्तीविषयीं, प्रचंड चळवळींविषयीं, महत्त्वाच्या ऐतिहासिक घटनेविषयीं आपण विचार करतों तेव्हां पंचवीस, पन्नास, किंवा शंभर वर्षांचा कालखंड घेऊनच आपण अभ्यास करतों. अनुमानें काढण्यास, निर्णय करण्यास एवढा कालखंड अवश्य आहे, हें त्यावेळीं आपणांस सहज पटतें. तीच दृष्टि आपल्या लोकसत्तेचा विचार करतांना असली पाहिजे. स्वातंत्र्य मिळाल्याला अजून दहा वर्षेंसुद्धां पुरीं झालेलीं नाहींत. एवढ्या अल्प काळच्या प्रयोगावरून काय ठरणार! ज्याला चटके बसतात, ज्याला भयंकर घटना घडलेल्या डोळ्यांनीं पहाव्या लागतात, ज्याच्या भोवतीं नित्य उद्वेगजनक प्रकार घडत असतात त्याला हा अल्पकाळ फारच मोठा भासावा हें साहजिक आहे. पण म्हणूनच राष्ट्राच्या भवितव्याचा विचार करतांना ही दृष्टि वर्ज्य मानली पाहिजे. एकंदर जगांतल्या इतिहासकालीन घडामोडींचा जसा आपण व्यापक

बैठकीवरून विचार करतों तसाच आपल्या लोकसत्तेचाहि करण्यास आपण शिकल पाहिजे.

## व्यवहार असाच असतो

तसा विचार आपण करूं लागलों तर मग सध्यांच्या परिस्थितींतहि बरेच आशेचे किरण आपल्याला दिसूं लागतील. आपल्या देशांतील उत्पादन वाढणें, येथें समृद्धि निर्माण होणें हें बऱ्याच अंशीं येथील पाटबंधाऱ्यांच्या योजनांवर अवलंबून आहे. त्यांमुळें जमिनीला पाणी मिळेल आणि उद्योगधंद्यांना वीज मिळेल. तशा योजना आपल्या सरकारनें पुष्कळच आंखल्या आहेत आणि त्यांतील बऱ्याचशा चालू होऊन कांहीं प्रत्यक्ष फलहि देऊं लागल्या आहेत. भाकरानानगल योजना, दामोदर व्हॅली योजना, हिराकूड योजना, तुंगभद्रा योजना, लोअर भवानी, मयूराक्षी, काक्रापारा, मुचकुंद, कोयना, चंबळा, कोसी, कृष्णा इ. अनेक पाटबंधाऱ्यांच्या योजना आंखलेल्या आहेत व त्यांतील तीनचतुर्थांशांच्या कामाला प्रारंभहि झाला आहे. एवढ्या पुऱ्या झाल्या तर पन्नाससाठ लाख एकर जमीन भिजेल व सगळ्या हिंदुस्थानच्या कारखानदारीला वीज पुरेल. आतां या योजना पुऱ्या तरी होतील कीं नाहीं हीच शंका सध्यां सर्वांच्या मनांत येत आहे. ती येणें व त्यामुळें लोकांनीं कठोर टीका करणें हें स्वाभाविक व सयुक्तिकहि आहे. पण ती टीका करीत असतांना मनांत हा विचार ठेवावा कीं, नेमलेल्या वेळांत व नेमलेल्या हिशेबांत या पुऱ्या होणार नाहींत इतकाच त्यांचा अर्थ आहे. पांचच्याऐवजीं पंचवीस वर्षे लागतील. शंभरच्या ऐवजी दोनशें कोटी रुपये खर्च येईल; आणि असें झाल्यामुळें यांतील निम्म्या योजना कदाचित् तशाच पडून रहातील. पण पुढील पंचवीस वर्षांत अंदाधुंदी, बजबजपुरी, लांचलुचपत, हलगर्जीपणा, बेपर्वाई, या सर्वांतून यांतील निम्मा योजना जरी यशस्वी झाल्या तरी आपल्या लोकसत्तेचा पाया दृढ होईल व ती यशाच्या मार्गाला लागेल. इतिहासांत जीं जीं महाकार्यें यशस्वी झालीं त्यांच्यावरचीं कालानें टाकलेलीं आवरणें आपण काढून पाहिलीं तर त्या यशामागें हे सर्व प्रकार असेच घडत होते असें आपणांस दिसून येईल. मोठमोठया लढाया जिंकल्या जातात तेव्हां

पराभूत राष्ट्रांच्या कारभारांतच असले हीन प्रकार घडत असतात असें नाहीं. विजयी राष्ट्रांच्या कारभारांतहि सर्व तऱ्हेच्या हीन वृत्तींचें प्रदर्शन झालेलें असतें. तुलनेनें पहातां तें कमी असतें एवढेंच. पण इतिहासांत त्यांचे विजय तेवढे नोंदले जातात. आणि बाकी सर्वांवर पडदा पडतो. अत्यंत नांवारूपाला आलेल्या, अत्यंत यशस्वी म्हणून गाजलेल्या संस्थांच्या इतिहासांतहि हेंच घडत असतें. वर सांगितलेल्या दोषांतून मुक्त अशी संस्था, अशी घटना, असें यशस्वी कार्य जगांत एकहि नसेल. नीति व अनीति, धर्म व अधर्म यांचा सामना होऊन जेव्हां जेव्हां धर्माचें पारडें थोडें जड होतें तेव्हां यश मिळतें आणि अवश्य तेवढ्याहि धर्मवृत्ति जेव्हां निर्माण होत नाहींत तेव्हां अपयश येतें. येथें धर्म हा शब्द सार्वजनिक जीवनांतल्या दक्षता, कर्तृत्व, जबाबदारी, सचोटी, दूरदृष्टि, कार्याचा आटोप इ. गुणांचा समुच्चय या अर्थी वापरला आहे. असो. तर तात्पर्यार्थ हा कीं या धर्माची पुण्याई आपण आपल्या सार्वजनिक जीवनांत किती प्रमाणांत निर्माण करतों यावर आपल्या लोकसत्तेचें भवितव्य अवलंबून आहे, ही खूणगांठ आपण मनाशीं बांधली पाहिजे. आणि सध्यांच्या एकंदर कारभाराविषयीं टीका करतांना त्या रोखानें आपण चाललों, त्यांतून हा फलितार्थ निघाला तरच आपल्याला यश येण्याची आशा बाळगतां येईल. नाहींतर अविवेकी टीका केली, तुलनात्मक दृष्टि ठेविली नाहीं, आणि हें सर्व अपयश सरकारचें, कॉंग्रेसचें आणि एकंदरींत आपल्याखेरीज बाकी सर्वांचें आहे असेंच मानीत राहिलों तर येणार असलेलें यश, आपल्याला, आपल्या या वृत्तीमुळेंहि सोडून जाईल.

सुदैवानें आपल्या राज्यकर्त्यांना, आणि विशेषतः आपले कर्णधार पंडित जवाहिरलाल यांना वस्तुस्थितीविषयीं कसलाहि भ्रम नाहीं. मधूनमधून उत्तेजनासाठीं आपण पुष्कळच यशस्वी होत आहों, असें ते म्हणत असले तरी कॉंग्रेसचा कारभार व सरकारी कारभार यांवर त्यांनीं इतकी कठोर व भेदक टीका वेळोवेळीं केली आहे व अजूनहि ते करीत आहेत कीं, तितकी कॅांग्रेसच्या शत्रूंनींहि केली नसेल. ' राजकीय पुनर्घटना ' या प्रकरणांत याविषयींचे त्यांचे व वल्लभभाई पटेल, राजेन्द्रबाबू यांचे अत्यंत कठोर उद्गार अवतरून दिलेच आहेत. पंचवार्षिक योजना व इतर योजनांच्या बाबतींतहि ते असेच

सावध आहेत, हें दिसून येईल. परवां १३ व १४ डिसेंबरला कलकत्त्याला त्यांचीं दोन भाषणें झालीं. त्यांत 'पंचवार्षिक योजना ही पूर्ण निर्दोष नाहीं, तिच्यांत पुष्कळ उणीवा आहेत याची जाणीव आम्हांला आहे, प्रमाद—सुधारणा, प्रमाद—सुधारणा याच मार्गानें आम्ही जात आहों', असें प्रत्येक वेळीं पंडितजींनीं सांगितलें आहे. मागें प्रांतिक विकास योजनावर डॉ. ग्यानचंद यांनीं जो अहवाल लिहिला त्याला प्रस्तावना जोडून 'सरकारी कारभारांत डॉ. ग्यायचंद यांनीं दाखविलेले दोष त्यांच्या कल्पनेपेक्षां कितीतरी पटीनें जास्त आहेत.' असें लिहून त्यांच्या टीकेला पंडितजींनीं दुजोराच दिला आहे. अर्थमंत्री चिंतामणराव देशमुख यांनीं कर्जत योजनेवर केलेली टीका वर दिलीच आहे. तेव्हां चालू योजना व एकंदर सरकारी कारभार याविषयीं सरकारी अधिकारी आणि जनता व तिच्या बाजूनें लेखणी उचलणारे पंडित यांच्या भूमिका मुळांतच भिन्न आहेत असें समजण्याचें कारण नाहीं. अधिकारावर असणाऱ्या, प्रत्यक्ष कारभार हांकणाऱ्या व्यक्तीच्या बोलण्याला ज्या वाजवी मर्यादा पडतात तेवढ्यामुळें टीकेंत काय फरक होत असेल तेवढाच. हें सर्व ध्यानांत घेऊनच आपण आपलें धोरण निश्चित केलें पाहिजे.

## सार्वत्रिक उत्थान

पंडितजींच्या भाषणांतील एकदोन सूचक उद्गारांवरून त्यांची या योजनाकडे पहाण्याची दृष्टि कोणची आहे तें कळून येईल. ते म्हणतात कीं, 'पंचवार्षिक योजना ही एक योजना म्हणून तिच्याकडे न पहातां हा देशापुढील प्रश्न सोडविण्याचा एक मार्ग, या दृष्टीनें पहा. ही योजना सदोष असली तरी पुढील निर्दोष पंचवार्षिक योजनेचा पाया तरी हिच्यामुळें खास घातला जाईल.' यादृष्टीनें आपण पाहूं लागलों तर या योजनेचा एक निराळाच फलितार्थ आपणास दिसूं लागेल. आज सर्व भारतांत हजारों ग्रामांतून, नगरांतून सरकारनें आंखलेल्या योजनांच्या साह्यासाठीं, आणि त्यांहूनहि विशेष म्हणजे तशी कांहीं योजना नसतांना स्वतंत्रपणें स्वतःच्याच प्रेरणेनें, शेकडों लोक संघटित होऊन, आपला गांव संघटित करून, त्याच्या विकासाची योजना आखीत आहेत आणि स्वतःच्या हिंमतीवर व जबाब-

दारीवर त्या पार पाडीत आहेत. १९४६ सालीं कॉंग्रेसनें सत्ता हातीं घेतली तेव्हांपासून योजनांचें युग भारतांत सुरू झालें. आणि सरकारनें ज्या योजना आंखल्या त्या तज्ज्ञांच्या मतें अशास्त्रीय असल्या, त्या हिशोबाप्रमाणें चालत नसल्या, अंदाजाबाहेर त्यांत खर्च होत असला, तेथील अधिकाऱ्यांच्या नालायकीमुळें, भाडोत्रीपणामुळें, निर्जीव कारभारामुळें त्या यशस्वी होत नसल्या तरी आपल्या देशांत योजनाबद्ध जीवनाचें त्यांमुळें वातावरण निर्माण होत आहे; युगानुयुगें घोरत पडलेला समाज जागा होऊन या मार्गानें जावयाचें ठरवून, स्वयंस्फूर्तीनें संघटित होऊन, आपल्या आपण योजना आंखून, स्वतःच्या जबाबदारीवर त्या यशस्वी करून दाखवीत आहे; हें पाहिलें म्हणजे प्रांतविकासयोजना किंवा पंचवार्षिक योजना मुळींच अयशस्वी झाल्या नाहींत असेंच कोणालाहि म्हणावेंसें वाटेल. त्यांनीं नव्या युगाला जन्म दिला आहे; खेडोपाडीं संघटित, सहकारी जीवनाचे, शेतीच्या विकासाचे, शास्त्रीय कल्पनांचे पडसाद घुमवून नव्या प्रेरणा दिल्या आहेत; आणि त्यांतच या योजनांचें खरें यश आहे. पूर्वीच्या काळीं कांहीं लोकांना हीन धातूचें सोनें करण्याचा नाद असे. त्यांचे त्यासाठीं नानाप्रकारचे प्रयत्न चालू असत. कापूर, अभ्रक, नवसागर, पारा असल्या अनेक द्रव्यांचा ते उपयोग करून पहात. नाना रसांचे नाना प्रयोग करीत. या त्यांच्या प्रयत्नांतून त्याना हवी असलेली हीनाचें सोनें करण्याची विद्या त्यांना हस्तगत करतां आली नाहीं; पण त्यांच्या त्याच प्रयत्नांतून रसायनशास्त्र निर्माण झालें आणि त्यानें प्रत्यक्ष सोन्याचा नसला तरी संपत्तीचा महापूर देशांत निर्माण केला. सरकारनें आंखलेल्या योजनांमुळें त्यांनीं मनापुढें ठेवलेलीं उद्दिष्टें जरी पूर्णपणें सिद्ध होत नसलीं, तरी सर्व भारतांत जनतेला त्यांनीं जी नियोजनाची प्रेरणा दिली आहे, तिच्यामुळें त्या उद्दिष्टापेक्षां जास्त असें बहुमोल ध्येय सिद्ध होत आहे.

पुढील उदाहरणांवरून या नव्या प्रेरणांची कांहींशी कल्पना येईल. दिल्लीपासून १४ मैलांवर भावलपूर नांवाचें गांव आहे. तेथें पसतीस कुटुंबांनीं ४०० एकर पडीत जमीन घेऊन सर्व कारभार सहकारी तत्त्वावर चालविला आहे. जमीनहि त्यांनीं समाईक मालकीचीच ठेवली आहे. शेतीचा व

गांवांतला सर्व कारभार तेथें याच पद्धतीनें चालला आहे. आज तेथें संपूर्ण-पणें नवी सृष्टि निर्माण झाली आहे. फरीदाबादचा प्रयोग याहिपेक्षां मोठा आहे. तेथें ५०००० लोकांनीं आपलें जीवन योजनाबद्ध करण्यांत यश मिळविलें आहे. शेतीसाठीं २५ सहकारी मंडळें स्थापून त्यांनीं उत्कृष्ट समृद्धि निर्माण केली आहे. मालक व मजूर हा भाव त्यांनीं तेथें निर्माणच होऊं दिला नाहीं. श्रीमती कमलादेवी चट्टोपाध्याय यांनीं इंडियन को-ऑपरेटिव्ह युनियन या नांवाची संस्था काढली आहे. तिच्या मार्फत वरील दोन्ही प्रयोग झालेले आहेत. सरकारनें त्यांना प्रथम साह्य तर केलें नाहींच; पण तीव्र विरोध केला. कारण सरकारी यंत्रणेंत कांहीं कारणामुळें या योजना बसत नव्हत्या; पण त्या सर्वांला तोंड देऊन लोकांनीं सिद्धि वश केली. पेप्सू प्रदेशांत पारवाखेडे या गांवीं पश्चिम पाकिस्तानांतून आलेल्या ३१ कुटुंबांनीं ५६५ एकर जमीन घेऊन असाच नवा संसार उभा केला आहे. या सर्व नव्या वसाहतींत नव्या आर्थिक जीवनाच्या अनुषंगानें नवें सामाजिक जीवनहि निर्माण होत आहे. या कोणच्याहि वसाहतींत अस्पृश्यता, जातिभेद किंवा तत्सम जुनाट रूढि पाळल्या जात नाहींत. जुगार, दारू या व्यसनांचा त्यांनीं नायनाट केला आहे. हुंड्याची चाल रद्द केली आहे. आणखीहि अनेक सामाजिक सुधारणा करून त्यांनीं जीवनांत सर्वांगीण क्रान्ति घडविली आहे.

महाराष्ट्रांत असें नवजीवन उभारलें जात असल्याच्या वार्ता हल्लीं नित्य वाचावयास मिळतात. खानदेशांत धुळ्याजवळ मोराणें या गांवीं दशरथ पाटील यांनीं या तऱ्हेचा एक उत्कृष्ट प्रयोग केला आहे. दुष्काळाच्या आपत्तीला तोंड देण्यासाठीं त्यांनीं गांवाजवळचा नकाण्याचा कोरडा पडत असलेला तलाव सरकारकडून शेतीसाठीं घेतला व त्यांतील पन्नास एकरांची सहकारी पद्धतीनें मशागत करून त्यांत पिकें उभीं केलीं. जमिनीची साफसफाई, नांगरट, पेरणी सर्व कामें सगळ्या गांवानें समाईकीनें केलीं. ५ रुपयाचा एक असे २०० भाग काढून भांडवलाच्या रूपानें प्रारंभींचा खर्च करण्यांत आला. पिकाची रखवाली सगळा गांव याच पद्धतीनें करीत होता; यामुळें चोरीमारीचा, पीक कापलें जाण्याचा संभवच नाहींसा झाला. स्वातंत्र्यानंतरच्या गेल्या पांचसहा वर्षांत पिकें कापण्याचे,

चारण्याचे, लुटून नेण्याचे व इतरहि असे चोरी–दरवडे–लुटालुटीचे प्रकार सारखे घडूं लागले आहेत. प्रत्येक गांवानें या प्रकारानें संघटित जीवन निर्माण केलें तर त्यांतून धनधान्यसमृद्धि तर निर्माण होईलच; पण त्याचबरोबर इतकें सामर्थ्य निर्माण होईल कीं, चोरदरवडेखोरांचा बंदोबस्त होऊन पुढेंमागें आपल्यावर परकीय आक्रमण आलें तर त्यालाहि यशस्वीपणें तोंड देतां येईल. या दृष्टीनें पहातां ही नव्या जीवनाची प्रेरणा किती महत्त्वाची आहे, हें ध्यानांत येईल.

कोल्हापूरजवळच्या मिणचे गांवची हकीगत याच प्रकारची आहे. तेथील कार्यकर्त्यांनीं आपल्या कर्तबगारीनें गांवची संघटना करून तेथील जीवनाची समूळ पुनर्घटना केली आहे. तेच खेडुत, तेंच गांव, तीच साधनसामुग्री; पण योजनाबद्धतेचें, स्वावलंबनाचें देशभर जें वातावरण निर्माण होत आहे त्यांतून प्रेरणा मिळतांच गांवांत रस्ते झाले, शाळा उभी राहिली, शेती सुधारली, आणि गांवांत स्वच्छता, आरोग्य व समभाव नांदूं लागला. पुण्याचे सुप्रसिद्ध चित्रकार गोंधळेकर यांनीं कांहीं मित्रांच्या साह्यानें 'नवा गांव' नांवाची संस्था स्थापन केली आहे. वाल्हे या गांवीं नुकतेंच त्यांनीं तेथील वस्तूंचें एक प्रदर्शन भरविलें. त्यामुळें गांवकऱ्यांच्या सहकारी वृत्तीला चालना मिळून आतां सहकारी पद्धतीनें गांवाजवळ बंधारा बांधण्याची जवळजवळ लाखदीडलाखाची योजना ते आंखीत आहेत. सिंहगडच्या पायथ्याशीं असलेल्या खानापूर गांवीं डॉ. मोडक यांच्या नेतृत्वाखालीं गांवकऱ्यांनीं आज दहाबारा वर्षें सहकारी पद्धतीनें श्रम करून रस्ते, देवालयें, शाळा अशीं जवळजवळ पन्नास हजार रुपयांचीं कामें केलीं आहेत.

सानेगुरुजी सेवापथकानें अशा प्रकारच्या कार्यास स्वत:ला वाहून घेतलें आहे. गेल्या तीनचार वर्षांत महाराष्ट्रांतील जवळ जवळ प्रत्येक जिल्ह्यांत पथकानें ग्रामपुनर्घटनेचें कार्य सुरु केलें आहे. बेळगांव जिल्ह्यांतील आतलगे, रत्नागिरींतील परुळे, गुलबर्ग्यांतील आळंद, खानदेशांतील कलसाडी, नाशीक जिल्ह्यांतील जातेगांव, ठाणें जिल्ह्यांतील नेरळ अशा गांवीं पथकानें केन्द्रें उघडून तेथें शहरांतील विद्यार्थी व त्या गांवचे गांवकरी यांच्या

साह्यानें रस्ते बांधणें, विहिरींतळीं खोदणें, घरांचे संडास खणणें, शाळा बांधणें अशीं कामें घडवून आणलीं. या प्रयत्नांत नवसमाजनिर्मिति हेंच पथकाचें ध्येय आहे. या कार्याचें शिक्षण देण्यासाठीं दरसाल पथक अनेक ठिकाणीं शिबिरें उघडून तेथें विद्यार्थ्यांच्या मनावर या नव्या तत्त्वज्ञानाचे संस्कार करण्याची कोशीस करतें. या विद्यार्थ्यांतून पुढील पिढीचे कार्यकर्ते निर्माण झाले, तर कृषिपुनर्घटनेच्या कार्याला त्यांचें फार मोठें साह्य होईल. आज उणीव आहे ती अशा कार्यकर्त्यांचीच आहे. एस्. एम्. जोशी, भाऊसाहेब रानडे, नानासाहेब डेंगळे यांच्या प्रयत्नानें ही उणीव भरून निघेल अशी आशा वाटते.

आणखी एक उदाहरण देऊन योजनायुगाचें हें स्पष्टीकरण पुरें करतों. तें उदारण म्हणजे सांवरगांवचें. मध्यप्रदेशांतील बुलढाणा जिल्ह्यांत हें गांव आहे. संतोषराव पाटील हे येथले प्रमुख कार्यकर्ते असून बाबासाहेब पाटील, त्र्यंबकराव पाटील, व पुंडलिकराव पाटील हे त्यांचे साह्यकारी आहेत. यांनीं आपल्या गांवचा स्वावलंबनानें कायाकल्प करण्याचें ठरविल्याला आज एक तपाच्यावर काळ लोटला आहे. आणि तेवढ्या अवधींत त्यांनीं खरोखरच आपल्या गांवची कळा अंतर्बाह्य बदलून टाकली आहे. आजचीं आपलीं खेडीं म्हणजे हेवेदावे, परस्परविरोधी गट, अरेरावाची गुंडगिरी, दारिद्र्य, अज्ञान, रोगराई आणि वैफल्य यांचें मूर्तिमंत वसतिस्थान, अशी स्थिति आहे. सावरगांव त्याला अपवाद नव्हतें. पण या कार्यकर्त्यांनीं ही सर्व अवकळा नष्ट करून तेथें नवजीवन निर्माण केलें आहे. गांवांत त्यांनीं प्रथम साक्षरतेचे वर्ग सुरु करून अज्ञानाविरुद्ध मोहीम काढली. आरोग्याची आघाडी उघडून गांवांतून रोगराई नष्ट केली. १९४६ सालच्या कॉलऱ्याच्या सांथींत या गांवचा एकहि बळी पडला नाहीं, हें त्या आघाडीच्या यशाचें उत्तम निदर्शक आहे. गांवांत एक अभेद्य संघटना निर्माण करून तिच्या साह्यानें त्यांनीं रस्ते बांधून काढले, मंदिरें उभारलीं, गांवांत अनेक ओटे बांधून तेथें झाडें लावून छाया केली, गांवच्या विहिरी बांधून काढल्या आणि विशेष म्हणजे-गांवाला एक वाचनालय करून दिलें. ८ ऑगस्ट १९५३च्या साधनेंत रा. विनायक आठल्ये यांनीं सावरगांवचें हें वर्णन दिलें आहे. तें देतांना त्यांनीं लेखाला जो मथळा दिला आहे तो फार उद्बोधक आहे.

'सात लाखांतील एकाची कहाणी!' असा तो मथळा आहे. हिंदुस्थानात सात लाख खेडीं आहेत. त्या सर्वांत सावरगांवाप्रमाणें स्वयंस्फूर्ति निर्माण व्हावी ही आशा त्यांत ध्वनित केली आहे.

माझ्या मतें सरकारनें ज्या अनेक योजना आंखून कार्याला आरंभ केला आहे, त्यांच्या योगानें हा संदेश खेडोपाडीं पोंचविण्याचें कार्य होत आहे. हें जें अप्रत्यक्ष कार्य होत आहे, तेंच या योजनांचें खरें फल होय. भारताला अमेरिकन तज्ज्ञांचें जें साह्य मिळत आहे त्याच्यासाठीं त्या तज्ज्ञांची एक समिति नेमलेली आहे. तिचे प्रमुख क्लिफर्ड विल्सन यांनीं सरकारनें सुरू केलेल्या 'कम्युनिटी प्रॉजेक्टस्' योजनेविषयीं जो अभिप्राय दिला आहे, त्याचा हाच भावार्थ आहे. "या योजनांमुळें ग्रामीण जनतेला जी स्वावलंबनाची व स्वयंकर्तृत्वाची प्रेरणा मिळाली आहे ती प्रेरणा म्हणजे त्या योजनांचें एक मोठें फल आहे. सरकारच्या हांकेला जनतेनें ही जी प्रतिसाद दिली ती भारताला अत्यंत अभिमानास्पद आहे. या कम्युनिटी प्रॉजेक्टमुळें, दृढनिश्चय असला कीं पर्वतहि हलवितां येतात, हा सिद्धान्त नव्यानें एकदां सिद्ध झाला." (कुरुक्षेत्र मासिक—२–१०–१९५३) असें हें पर्वत हलविण्याचें कार्य भारतांत सर्वत्र सुरू झालें आहे असें यासंबंधींचीं जीं अनेक वृत्तें प्रसिद्ध होत आहेत त्यांवरून दिसून येत आहे. कौन्सिल ऑफ स्टेट्सूचे उपाध्यक्ष कृष्णमूर्तिराव यांनीं गेल्या पांच महिन्यांत म्हैसूर, कोल्हापूर, कर्जत, भोपाळ, झांशी, रांची, अलिपूर इ. ग्रामविकास केन्द्रांना भेटी दिल्या. इतरत्रहि अनेक ठिकाणीं ते हिंडून आले. या दौऱ्यांत त्यांना असें दिसून आलें कीं भारतांत एक नवीन उत्थान निर्माण होत आहे. या योजनांविषयीं लोकांत खूपच उत्साह निर्माण झाला आहे. त्यांची प्रारंभींची भीतीची, संशयाची व असहकाराची वृत्ति आतां नाहींशी होऊन ते आतां पूर्ण सहकार्य करीत आहेत आणि या योजना यशस्वी करून दाखविण्यासाठीं त्यांच्यांत अहमहमिका लागली आहे. यामुळें हजारों पाटबंधाऱ्यांचीं कामें स्वयंस्फूर्तीनें सुरू केलीं गेलीं आहेत. शाळा उभारल्या गेल्या आहेत, रस्ते बांधले गेले आहेत. झाडें लावली जात आहेत, खताचे खड्डे, घराचे संडास लोक तयार करीत आहेत. बीबियाणें, खतें जमवून पडीत जमिनी लागवडीस आणीत आहेत. त्यासाठीं विहिरी खणीत

आहेत. नद्यांवर पंप बसवून पाणी खेचीत आहेत. आतां या कार्यांत कसलेच व्याघात येत नाहींत असें नाहीं. अनेक व्याघात येत आहेत. कोठें पैसा नाहीं, कोठें आपसांतील कलह आहेत. कोठें कॉंग्रेसजन मानासाठीं अडून बसले आहेत. हें सर्व कॉंग्रेसचें प्रदर्शन चालूं आहे म्हणून कोठें इतर पक्ष नाराज आहेत. पण असें सर्व असूनहि या सर्व अडचणी उल्लंघून सर्वत्र लोक पुढें पाऊल टाकीत आहेत. आणि त्यामुळें या योजना पुष्कळशा यशस्वी होतील अशी आशा निर्माण झाली आहे. (टाइम्स ऑफ इंडिया २६ जानेवारी १९५४) याप्रमाणें खेड्याखेड्यांत सहकारी जीवनाचा मंत्र जाऊन पोंचला, या नव्या कार्याविषयींच्या उत्साहामुळें गांवकऱ्यांना आपसांतील कलह, वैमनस्यें, हाडवैरें विसरण्याइतका विवेक साधतां आला, संघटनेचें सामर्थ्य निर्माण होऊन जमीन जास्त फलदायी होऊं लागली, त्याच सामर्थ्याच्या जोरावर गांवांतील गुंडांच्या उपद्व्यापांना आळा बसला आणि अखिल भारताच्या लोकसत्ताकाचें आपण एक घटक आहों, ही जाणीव यापुढें खेड्याखेड्यांत निर्माण झाली तर यांतील प्रत्येक खेडें म्हणजे भारताच्या लोकसत्तेच्या रक्षणार्थ उभा असलेला एक किल्लाच ठरेल आणि मग समृद्धि व सामर्थ्य निर्माण करणें हें जें आपलें सध्यांचें ध्येय आहे तें साध्य होईल. पंचवार्षिक योजना म्हणजे प्रत्यक्ष योजना नसून ती एक प्रेरणा आहे, ही योजना सदोष असली तरी पुढील निर्दोष योजनेचा तो पाया आहे, असें जें पंडितजी म्हणतात तें त्यांचें म्हणणेंहि त्यामुळें सार्थ होईल.

## भूदान यज्ञ

योजनाबद्ध सहकारी जीवन हें जसें कृषिपुनर्घटनेस अवश्य आहे त्याचप्रमाणें जमिनीची समवांटणी हीहि अवश्य आहे. भारताच्या पुढें असलेली ही अत्यंत बिकट समस्या सोडविण्याचें कार्य विनोबाजींनीं शिरावर घेतलें आहे. त्यांच्या भूदान यज्ञाच्या मार्गानें जमीनदारीचा नाश करून जमिनीचें फेरवांटप करण्याचें कार्य पूर्ण लोकशाही मार्गानें साध्य होईल अशी आशा आतां सर्वांना वाटूं लागली आहे. विनोबाजींच्या भूदान-यज्ञाच्या ज्या वार्ता कानीं येत आहेत त्या ऐकून मानवजातीविषयींचें

आपलें मत बदललें पाहिजे असें वाटूं लागतें. इतक्या शांतपणें केवळ युक्तिवादानें, केवळ विनवणीच्या दोन शब्दांनीं एखाद्या देशांत संपत्तीची झालेली विषम वांटणी नष्ट करतां येईल, आपल्याजवळचें जमिनीसारखें अमोल धन आपल्या बांधवांना देऊन टाकण्याइतकें मानवाचें मत-परिवर्तन असल्या सौम्य साधनांनीं होईल, यावर कोणाचाहि कधींहि विश्वास बसला नसता; आणि अजूनहि एकादे वेळीं, विश्वास ठेवूं नये, हें सारें स्वप्न असण्याचा संभव आहे, असें मनाला क्षणभर वाटतें; पण विनोबाजींनीं आपल्या तीन तपांच्या पुण्याईनें तें स्वप्न साकार करून दाखविलें आहे. आतां या भूदानाच्या चळवळीला इतकें महत्त्व प्राप्त झालें आहे कीं, कम्युनिस्ट व तत्समपंथीय सोडले तर भारतांतील सर्व पक्षोपपक्ष तिनें जिंकले आहेत. सत्ताधारी कॉंग्रेसपक्षाचाहि तिला विरोध नाहीं. वास्तविक पक्षाचें हीन राजकारण त्याप्रकारचें असतें. जनतेचें कल्याण खरें, पण तें आपल्या पक्षाकडून झालें तरच तें राजकीय पक्षांना हवें असतें. दुसऱ्या पक्षानें जनतेचें कल्याण केलें तर तो पक्ष निवडून येऊन सत्तारूढ होण्याचा संभव निर्माण होतो म्हणून परपक्षानें कल्याणकारी असा कार्यक्रम जरी आरंभिला तरी राजकारणांतले पक्ष त्याला विरोध करतात. भारताचें सुदैव असें कीं, असल्या हीन राजकारणाचा ज्याला सात जन्मांत संपर्क झालेला नाहीं असा थोर पुरुष कॉंग्रेसच्या नेतृपदीं सध्यां आहे. पंडित जवाहिरलालजींनीं मुक्त-कंठानें भूदानयज्ञाची स्तुति करून त्याला पाठिंबा देण्याचा कॉंग्रेसला आदेश दिला आहे. इतकेंच नव्हे तर सध्यां सर्वांत जास्त महत्त्वाची हीच चळवळ आहे असाहि अभिप्राय त्यांनीं दिला आहे. ‘ मी भूदानयज्ञाला सर्वांत जास्त महत्त्व देतों. हें आंदोलन कोठल्याहि एका पक्षाचें नाहीं. आणि आपल्या पक्षीय संबंधाचा विचार न करतां सर्वांनीं या कामांत भाग घेतला पाहिजे. हें एक महान् क्रांतिकारी आंदोलन आहे व त्यामुळें देशाचें मोठें हित साधलें जात आहे याबद्दल मला यत्किंचितहि शंका नाहीं. आचार्यविनोबांचें आंदोलन म्हणजे भारतांतील मुख्य जो जमिनीचा प्रश्न त्याची उकल करण्याचा एक असाधारण मार्ग आहे यांत शंका नाहीं. ’ असे त्यांचे उद्गार आहेत. ( साधना १२-९-५३ ) पंचवार्षिक योजनेच्या कर्त्यांनींहि भूदान-यज्ञाला मान्यता देऊन कायद्यापेक्षां या मार्गानें जमीन वाटपांचा प्रश्न

लवकर सुटेल, म्हणून प्रत्येक राज्यसरकारनें आपल्या ग्रामीण विकासाच्या कार्यांत भूदानाचा अंतर्भाव करावा, अशी शिफारस केली आहे. हें आंदोलन नैतिक दृष्टया अतिशय थोर आहे. त्याला संपूर्ण पाठिंबा दिला पाहिजे, असा आपला अभिप्रायहि त्यांनीं नमूद करून ठेवला आहे. ( पंचवार्षिक योजना प्रकरण १२ व १३ ).

सुमारें अडीच वर्षांपूर्वी तेलंगणाच्या भूमींत या भूदान-यज्ञाला प्रारंभ झाला. कम्युनिस्टांनीं तेथें घातपात, खून, जाळपोळ, लूट या हिंसेच्या मार्गानें जमिनीची वांटणी करण्याचा प्रयत्न चालविला होता. अशा रीतीनें त्यांनीं १० हजार एकर जमीन मिळवून तिचें वांटप केलें होतें. त्या वेळीं विनोबांनीं तेलंगणांत पायीं यात्रा केली आणि तेव्हांच भूदानयज्ञाच्या कल्पनेचें त्यांना स्फुरण होऊन त्यांनीं तें आंदोलन सुरू केलें. तीन वर्षांत जाळपोळ, खून या दहशतीच्या मार्गानें कम्युनिस्टांनीं वर सांगितल्याप्रमाणें १० हजार एकर जमीन मिळविली, तर अत्यंत शांततेच्या, पूर्ण अहिंसेच्या मार्गानें विनोबांनीं अडीच वर्षांत २४ लक्ष एकर जमीन मिळविली आहे. त्यांतील तेरा लक्षांचें एका बिहार प्रांतांतच दान मिळालें आहे. उत्तर प्रदेशांत त्याच्या खालोखाल म्हणजे सुमारें पांच लक्ष एकर मिळाले आहेत. १९५७ पूर्वी पांच कोटी एकरांचें दान मिळवून हिंदुस्थानांतील जमिनीचा प्रश्न कायमचा सोडवून टाकावयाचा असा विनोबाजींचा संकल्प आहे. आणि आतांपर्यंत जें दान मिळालें आहे तेंच अद्भुत शक्तीच्या किंवा चमत्काराच्या कक्षेंत टाकण्याजोगें असल्यामुळें पुढचा महासंकल्पहि कदाचित् सिद्धीस जाईल अशी आशा वाटूं लागते.

हें आंदोलन लहानमोठया प्रमाणावर आतां भारताच्या सर्व प्रदेशांत सुरूं झालें असून त्यामुळें देशांत एक निराळें वातावरण निर्माण होऊं लागलें आहे. बंगाल, कर्नाटक, म्हैसूर, आसाम, गुजराथ या प्रांतांतून अजून म्हणण्याजोगें दान मिळालेलें नाहीं. महाराष्ट्र, सौराष्ट्र, आंध्र, केरळ यांचीहि भागीदारी बेताचीच आहे; पण तेथेंहि या लाटा जाऊन पोंचल्या आहेत. शंकरराव देव, अण्णासाहेब सहस्रबुद्धे, दादा धर्माधिकारी यांसारख्या कार्यकर्त्यांनीं या कार्याला वाहून घेतलें आहे. जयप्रकाशजी-

सारख्यांनासुद्धां त्याचें महत्त्व पटून त्यांनीं आपलें पूर्वींचें पक्षीय राजकारण सोडून सध्यां तन, मन, धन या कार्याला अर्पण केल्यामुळें येथें दुसरी एक शक्ति येऊन मिळाली असें स्पष्ट दिसतें. अशा रीतीनें थोड्याच दिवसांत भारतांतल्या साऱ्या शक्ति जर या कार्यावर केंद्रित होतील तर तो यज्ञ चालू असतांना त्यांतून आणखी शक्ति निर्माण होतील, आणि मग एकहि गोळी न झाडतां, कशाचाहि विध्वंस न करतां, इतकेंच नव्हे तर कठोर शब्दाचाहि वापर न करतां जगांतली एक अभूतपूर्व क्रांति या भूमींत घडून येईल असें स्वप्न आज दिसूं लागलें आहे.

## उदात्त संस्कार

या भूदान-यज्ञावरहि अनेक पंडितांनीं आक्षेप घेतले आहेत. यांत जमिनीचे तुकडे फार होतील, त्यामुळें उत्पादन घटेल, सामुदायिक शेती हें आपलें ध्येय असतांना आज प्रत्येक शेतकऱ्याला स्वतंत्र मालकीची जमीन करून दिली तर पुन्हां व्यवस्था बदलतांना जड जाईल, अशा तऱ्हेचे आक्षेप यावर घेतले जातात. त्या आक्षेपांना जयप्रकाश नारायण, शंकरराव देव, स्वत: विनोबाजी यांनीं उत्तरें दिलीं आहेत. बहुतेक सर्व आक्षेप अर्थशास्त्रीय दृष्ट्याहि निराधार आहेत हें त्यांनीं दाखविलेंच आहे; पण याहिपेक्षां या सर्व आक्षेपकांना, भूदान यज्ञाचे पुरस्कर्ते मानवाच्या मनः-क्रांतीच्या दृष्टीनें या यज्ञाकडे त्यांनीं पहावें, अशी जी विनंति करतात, तिला फार महत्त्व आहे. पंडित जवाहरलाल यांनीं पंचवार्षिक योजनेसंबंधीं जें उत्तर दिलें तसेंच कांहींसें हें उत्तर आहे. या यज्ञांतून निर्माण होणारे आर्थिक प्रश्न कमी महत्त्वाचे आहेत असा याचा मुळींच अर्थ नाहीं. सांपत्तिक दृष्ट्या पुढें मागें भारताची यानें हानी होणार असेल तर आपणांस त्रिवार विचार केला पाहिजे त्यांत शंकाच नाहीं. पण तितकी हानी यामुळें मुळींच होणार नाहीं हें अनेकांनीं दाखवून दिलें आहे. हें ठरल्यानंतर मग कांहीं किरकोळ हानि होणार असेल किंवा हानि मोठी असून ती तात्कालिक असेल तर भूदान-यज्ञानें भारतांच्या जीवनांत जी सर्वांगीण आमूलाग्र क्रांति होणार आहे, होत आहे, तिच्याकडे दृष्टि ठेवून त्या हानीकडे दुर्लक्ष करण्यास मुळींच हरकत नाहीं. आपले बांधव दारिद्र्यांत असतांना आपण

शेकडों एकर जमीन स्वतःजवळ ठेवणें हें पाप आहे, त्यांच्या प्रपंचाची तरतूद करण्यासाठीं आपण आपला धनलोभ सोडला पाहिजे, हा विचार लाख एकरांच्या मालकापासून चारपांच एकरांच्या मालकापर्यंत हजारो भारतीयांच्या मनांत दृढ करून टाकणें आणि लोभावर जय मिळवून जमिनीसारखें धन त्यांना सोडावयास लावणें याला खरोखरच मानवी इतिहासांत तुलना नाहीं. राष्ट्रधर्म, समाजधर्म, मानवधर्म या सगळ्यांचे उदात्त संस्कार या एका पुण्यप्रद विचारांत व कृतींत सामावलेले आहेत. मानव बाह्यतः लोभी, स्वार्थी, तमोगुणी दिसला तरी अंतरांत तो सत्त्वगुणी आहे, हा विचार यापूर्वी अनेक महात्म्यांनीं सांगितलेला आहे. पण इतक्या मोठ्या प्रमाणांनीं तो सिद्ध करून दाखविणारे विनोबाजी हेच पहिले पुरुष आहेत. ब्रिटनच्या इतिहासांत सामान्य माणसांनीं राष्ट्राच्या आपत्तीच्या काळीं धनलोभ सोडून राष्ट्राला साह्य केल्याचीं अनेक उदाहरणें घडलीं आहेत. अनेकांनीं कर्जरोखे सरकारला परत केले, अनेकांनीं व्याजाचे दर आपण होऊन कमी करून घेतले, कामगारांनीं पगारवाढ नको म्हणून सांगितलें, जास्त तास काम करण्यास त्यांनीं मान्यता दिली, अशीं वृत्तें ब्रिटन-मधून नित्य येत असत आणि त्यांची ही राष्ट्रनिष्ठा पाहून नंतर आपल्या देशाकडे पहातां लज्जेनें मान खालीं घालावी असें आतांपर्यंत वाटत असे. पण भारतीय जनताहि, येथले धनिक, येथले गरीब, सर्व राष्ट्रधर्माच्या या आवाहनाला तितक्याच निष्ठेनें साद घालतात असें विनोबांनीं दाखवून दिलें आहे; किंबहुना भारतांतील ही घटना इतर देशांतल्या कोणच्याहि निःस्वार्थी, त्यागमय घटनांपेक्षां शतपटीनें मोठी आहे असेंहि म्हणण्यास हरकत नाहीं. सर्व देशामध्यें कसलीहि दण्डसत्ता न वापरतां आर्थिक क्रान्ति घडविण्याइतका मानवाचा विवेक जागृत झाल्याचें उदाहरण जगाच्या इतिहासांत अजून घडलेलें नाहीं. ही मानवाची उंची ज्या भूदान-यज्ञामुळें वाढत आहे त्यासाठीं वाटेल तें मोल देण्यास हरकत नाहीं असेंच कोणाहि विचारवंताचें मत होईल.

## भुदानानें समाजवादी क्रान्ति

समाजवादी पक्षाच्या मतानें तर त्यांना इष्ट असलेली समाजवादी क्रान्ति या भूदान आंदोलनांतून घडून येणार आहे. ‘ भूदान-यज्ञ आणि समाज-

वादी क्रान्ति ' या आपल्या लेखांत ( साधना १३ जून ५३ ) आचार्य जावडेकरांनीं आपला तसा स्पष्ट अभिप्राय नमूद केलेला आहे. स्वामित्वाची भावना नष्ट करून सर्व धन व धनसाधनें समाजाच्या मालकीचीं करणें हा समाजवादी तत्त्वज्ञानाचा गाभा आहे. विनोबांनीं नेमकें हेंच उद्दिष्ट डोळ्यापुढें ठेवलेलें आहे. २८ मे १९५३ च्या भूदानयज्ञ-पत्रिकेंत विनोबा म्हणतात, ' जमिनीवर कोणाचाच स्वामित्वाचा हक्क रहातां कामा नये हें मी समाजाला शिकवूं इच्छितों. श्रीमंत जसे आपल्याला जमिनींचे मालक समजतात तसे गरीबहि समजतात. या दोघांनाहि स्वामित्वाच्या भावनेंतून मी मुक्त करूं पहातों. ' विनोबा श्रीमंतांकडून जसें दान मागतात तसें गरिबांकडूनहि मागतात; यांतील हें रहस्य आहे. त्याचें विवेचन करतांना आचार्य जावडेकर म्हणतात, ' रशियांत प्रथम श्रीमंतांच्या जमिनी घेण्यांत आल्या. त्यानंतर सामुदायिक शेतीच्या प्रयोगास आरंभ झाला. तेव्हां गरीब शेतकऱ्यांच्या स्वामित्व-भावनेशीं सरकारला झगडावें लागलें. आणि मग स्टॅलिनला दण्ड-सत्ता वापरावी लागली. त्यादृष्टीनें पहातां मोठ्या आणि छोट्याहि जमीन-मालकांच्या विचारांत, स्वामित्वासंबंधींची क्रान्ति घडवून आणणें किती महत्त्वाचें आहे व किती बिकट आहे याची कल्पना येऊं शकेल. आचार्य विनोबा ही क्रान्ति करीत आहेत. समाजवादी पक्षाला अभिप्रेत असलेली वर्गहीन समाजरचना या आंदोलनांतूनच पुढें निर्माण होईल.' असा जावडेकरांनीं आपला विश्वास याच लेखांत प्रगट केला आहे.

## मन्वंतर

हें आर्थिक क्रान्तिविषयीं झालें. पण भूदानयज्ञाचा येवढाच अर्थ नाहीं. वर म्हटलें आहे त्याप्रमाणें या यज्ञामुळें त्या त्या प्रदेशांच्या जनतेच्या जीवनांत समूळ क्रान्ति होत आहे. ' भूदान यज्ञाच्या क्रान्तिगर्भातून एक सर्वांगीण क्रान्ति उदयाला येईल, असें मला दिसत आहे ' असें जयप्रकाश नारायण चांदिल येथील भाषणांत म्हणाले. विनोबाजींच्या बरोबर जे अनेक स्त्रीपुरुष कार्यकर्ते फिरत आहेत, त्यांनी अशींच वर्णनें केलीं आहेत. बिहार-मध्यें व उत्तर हिंदुस्थानांतील बऱ्याच प्रदेशांत अजून बुरख्याची चाल कडक रीतीनें पाळतात. जातिभेद, अस्पृश्यता या दुष्ट रूढि पुष्कळ ठिकाणीं

जशाच्या तशा आहेत. हें सर्व हीण या यज्ञांत आतां जळून खाक होत आहे. क्रान्ति ही जीवनाच्या एकाच अंगापुरती मर्यादित रहात नाहीं. ती लवकरच सर्व जीवन व्यापते. भूदानयज्ञांत तोच अनुभव येत आहे. विनोबाजी हें सर्व बुद्धिपुरःसर घडवीत आहेत. सकृत्‌दर्शनीं त्यांचीं भाषणें सनातनी वृत्तीचीं वाटतात. अत्यंत सौम्य, परंपरानिष्ठ अशीं वाटतात. पण त्यांत अत्यंत स्फोटक अशीं क्रान्तिबीजें भरलेलीं असतात. " कांहींजण म्हणतात कीं हें कलियुग आहे. पण याच युगांत गांधीजी झाले. त्रेता व द्वापर युगांत रामकृष्ण झाले, तसेच कंस व रावणहि झाले. तेव्हां युगाच्या गोष्टी बोलूं नयेत. हें कलियुग नाहीं. युग आम्ही बनविणार आहों. मी तर म्हणतों कीं सत्ययुग जवळ आलें आहे." "आम्ही स्वतः थंडींत कुडकुडत असतां दगडाच्या मूर्तीला कपडे घालायचे, तिच्याकरतां घर करायचें, हें नाटक तुम्ही कुठपर्यंत करणार आहां ? " ' कोणी म्हणतात, मंगळ, शनि यांचा आपल्यावर परिणाम होतो. मी म्हटलें आपण चेतन आहों. मंगळ अचेतन आहे. तेव्हां आपलाच परिणाम मंगळावर होईल. ' ' परिस्थितीला आम्ही घडवूं शकतों; परिस्थितींतून आम्ही निर्माण होतो हें चूक आहे.' ' गरीब जनता सर्व अन्याय सहन करते हें तमोगुणाचें लक्षण आहे. ' या त्यांच्या वेळोवेळच्या उद्गारांवरून त्यांची वाणी सौम्य असली तरी तिच्यांतील आशय किती क्रान्तिकारक आहे, याची कल्पना येईल. या सर्वांवरून भूदानयज्ञामध्यें आर्थिक विषमता व अन्याय यांच्याप्रमाणेंच सामाजिक आणि धार्मिक विषमता व अन्याय यांचीहि आहुती दिली जाईल असा विश्वास वाटतो.

भारतांत कृषीच्या पुनर्घटनेसाठीं कोणकोणते प्रयत्न चालू आहेत तें येथवर सांगितले. आरंभीं सांगितल्याप्रमाणें या कार्याचीं दोन अंगें आहेत. जमिनीची सम वांटणी घडवून आणणें हें एक आणि अनेक प्रकारच्या साधनांनीं उत्पादनाची वाढ करणें हें दुसरें. दोन्ही अंगांनीं सरकारच्या प्रेरणेनें व लोकांच्या स्वयंप्रेरणेनें असे प्रयत्न चालू आहेत. जमीनदारीचा नाश करावा म्हणून सरकारनें कायदा केला आहे, आणि विनोबाजींनीं भूदान-यज्ञाचें आंदोलन सुरू केलें आहे. अधिक उत्पादनासाठीं पंचवार्षिक योजना व ग्रामविकासयोजना सरकारनें आंखल्या आहेत आणि अनेक ठिकाणीं गांवोंगांवचे कार्यकर्ते आपल्या गांवाची सहकारी पद्धतीनें संघटना

घडवून उत्पादन वाढविण्याचे प्रयत्न करीत आहेत. हे प्रयत्न व त्याच्या मागल्या प्रेरणा व त्यांचीं फलितें आपण पाहिलीं तर वाचकांच्या हें ध्यानांत येईल कीं, आजचा हा क्षण असा आहे कीं या वेळीं प्रत्येकानें आपल्या या पुनर्घटनेच्या प्रयत्नासाठीं आपल्याला जें कांहीं करतां येण्याजोगें आहे त्याची पराकाष्ठा केली पाहिजे. सरकारला नांवें ठेवून, कॉंग्रेसच्या सभासदांच्या हीन प्रवृत्तीकडे बोट दाखवून कोणीहि यावेळीं आपल्या शिरावरची जबाबदारी टाळतां कामा नये. सरकार व कॉंग्रेस त्या स्वरूपाची असली तर आपल्या माथ्यावरची जबाबदारी कमी न होतां ती उलट दुप्पट होते हें प्रत्येकानें जाणलें पाहिजे. याचेंच नांव लोकसत्ता. सुदैवानें सरकारी व लोकप्रेरित असे दोन्ही प्रयत्न येथें चालू आहेत. त्यांत ज्याला शक्य त्यानें सहभागी झालें पाहिजे. परवां मद्रासजवळील मीनांबकम् या गांवीं नव्या महाविद्यालयाचें उद्घाटन करतांना आपले उपाध्यक्ष सर्वपल्ली राधाकृष्णन् म्हणाले कीं, ' सध्यां महाविद्यालयामध्येंच-कॉलेजमध्येंच नव्या राष्ट्राची घडण होत आहे. ' भारताच्या या थोर तत्त्ववेत्त्याचे बोल सार्थ करावे असें तरुणांना वाटत असेल तर त्यांनीं हें ध्यानांत ठेवावें. वरीलपैकीं कोठल्यातरी योजनांत सहभागी होऊन त्यांनीं अत्यंत दृढ निश्चयानें त्या तडीस नेण्याची कसोशी केली पाहिजे. एक पाटबंधारा देशांत उभा राहिला तर तेवढी लोकसत्ता जवळ आली, असा हिशेब त्यांनीं मनाशीं ठेवावा. एक एकर शेती पाण्यानें भिजण्याची व्यवस्था करणें किंवा एक किलोवॅट वीज निर्माण करणें हें आज मूर्तिमंत पुण्य आहे. आणि त्याचें फल इहलोकींच मिळणार आहे. एका गांवाची संघटना करणें या पुण्याला तर तुलनाच नाहीं. गांव हा आपल्या लोकसत्तेचा आद्य घटक आहे. तो दृढ झाला तर लोकसत्ता स्थिर होईल. म्हणून ब्रिटिशांशीं लढा करणें हें जसें इतके दिवस आपण परमोच्च ध्येय मानीत होतों तसेंच या तऱ्हेची संघटना हें आपलें परमोच्च ध्येय आतां मानलें पाहिजे.

सध्यांच्या सरकारी योजनांवर सगळ्यांत जास्त व कठोर टीका करण्याचा अधिकार विनोबांचा आहे; पण त्यांनींच सहकार्याची भूमिका घेतली आहे. जमीनीच्या वांटपाचा कायदा करून घेण्याकडे तुम्ही आपलें शक्तिसर्वस्व कां खर्च करीत नाहीं, असें त्यांना कोणीं विचारलें; तेव्हां ' त्या कायद्याचीच मी

पूर्वतयारी करीत आहें. ' असें त्यांनीं उत्तर दिलें. लोकायत्त शासनाचें सर्व सार या वाक्यांत सांठविलें आहे. सध्यां सरकारनें जमीनदारीच्या नाशाचा कायदा केला आहे. इतरहि अनेक लोककल्याणाचे कायदे केले आहेत; पण त्यांचा अंमल करण्याचें सामर्थ्य सरकारजवळ नाहीं. जनशक्ति जागृत झाली तर तें सामर्थ्य त्याच्या ठायीं येईल. लोकांचें जमिनीच्या वाटपासाठीं मतपरिवर्तन घडवून आणून ती लोकशक्ति मी निर्माण करीत आहें असें विनोबा म्हणतात. याचा अर्थ असा कीं, सरकारी कायदा पांगळा झाला असला, सरकारी योजना अपयशी होत असल्या तर तो आपला, लोकांचा दोष आहे व तें अपश्रेय आपलेंच आहे असें ते मानतात. लोकसत्तेच्या यशाचें हेंच रहस्य आहे.

## जनशक्तीची आवश्यकता

अनेक पंडितांनीं उद्योगधंद्यांच्या राष्ट्रीयीकरणाविषयीं जें लिहिलें आहे तेंच जमीनदारीलाहि लागू आहे. हें सर्व धन समाजाच्या मालकीचें करून टाकण्यास नुसता कायदा कधींच समर्थ होणार नाहीं. त्याच्या मागें प्रचंड लोकशक्ति उभी पाहिजे. 'रिफ्लेक्शनस् ऑन दि रेव्होल्यूशन ऑफ अवर ओन टाइम' या आपल्या ग्रंथांत ब्रिटनमधील मजूरपक्षाचे तत्त्ववेत्ते प्रा. लास्की यांनीं ब्रिटिश जनतेला काय इषारा दिला होता तें पहा. हा ग्रंथ त्यांनीं दुसरें महायुद्ध चालू असतांना १९४२-४३ सालीं लिहिला. युद्ध-समाप्तीनंतर निवडणुकी व्हावयाच्या होत्या. त्यांत मजूरपक्ष निवडून येऊन अधिकारारूढ झाला तर उद्योगधंद्यांचें राष्ट्रीयीकरण आम्ही करूं, असें आश्वासन जाहीरनाम्यांत त्या पक्षानें दिलें होतें. त्याविषयीं लिहितांना लास्की म्हणाले कीं, ' या निवडणुकींत जनतेनें आम्हांला प्रचंड बहुमतानें, तीनचतुर्थांपेक्षां जास्त मतांनीं निवडून दिलें तरच हें राष्ट्रीयीकरण आम्ही करूं. एरवीं ५१।५२ आमच्या बाजूस व ४९।४८ दुसऱ्या पक्षाला अशी जर मतांची विभागणी झाली, तर कसल्याहि सुधारणा आम्हीं करणार नाहीं. राष्ट्रीयीकरण ही अगदीं मूलगामी सुधारणा आहे. ही क्रान्ति आहे. ती सर्व जनतेच्या पाठिंब्यानेंच करतां येईल. तो मिळत नसेल तर येथें ती सुधारणा करूं लागतांच यादवी होईल व मग लोकसत्तेचा बळी पडेल.

त्यापेक्षां राष्ट्रीयीकरण लांबणीवर पडलें तरी चालेल.' प्रा. लास्की यांचे हे विचार अत्यंत उद्‌बोधक आहेत. ब्रिटनमध्यें तीनचार शतकांच्या परंपरेनंतरहि एवढें प्रचंड परिवर्तन साध्या कायद्यानें करणें शक्य नाहीं, त्याला लोकशक्तीचा फार मोठा पाठिंबा पाहिजे, असें त्यांनीं सांगितलें आहे. सध्या आपण चीनचें उदाहरण देऊं पाहतों. वाचकांनीं हें ध्यानांत ठेवावें कीं, तेथें उद्योगधंद्यांचें राष्ट्रीयीकरण व जमीनदारीचा नाश झालेला नाहीं; इतकेंच नव्हे तर तें धोरण सध्यां चीनच्या कम्युनिस्ट पक्षानें सोडून दिलें आहे. रशियाप्रमाणें आम्ही भांडवलदारांना नष्ट करणार नाहीं, असेंच त्यांनीं जाहीर केलें आहे. जमीनदारीविषयीं तेंच आहे. साधनेच्या १५ऑगस्ट १९५२च्या अंकांत एका अर्थशास्त्रज्ञानें ही माहिती याच हेतूनें दिली आहे. हे अर्थशास्त्रज्ञ म्हणतात, 'नवचीनचा दाखला डावे म्हणविणारे गट वारंवार देतात; पण शेतीच्या प्रश्नावर नवचीननें किती मवाळ धोरण स्वीकारलें आहे याचा फारच थोड्यांनीं अभ्यास केलेला असतो. ३० जून १९५० रोजीं चीनमध्यें जो शेतीविषयीं कायदा झाला त्यांतील खालील मुद्दे लक्षांत घेण्याजोगे आहेत. (१) जमिनीची मालकी सरकारनें हातीं घेतलेली नाहीं. रयतवारी पद्धत येथें प्रचलित करण्यांत येत आहे. (२) ज्या जमिनी बड्या बागाइतदारांच्या आहेत व ज्या ते मजूर लावून करतात त्या त्यांच्याकडेच राहतील. खंडानें जमीन देण्यास कायद्याचा प्रतिबंध नाहीं—म्हणजे 'कसेल त्याची जमीन' हें तत्त्व चीननें स्वीकारलेलें नाहीं. (३) पळून गेलेल्या जमीनदारांपैकीं जे परत येऊन शेती करावयास तयार असतील त्यांना इतरांप्रमाणें शेती करण्याचा हक्क आहे. चीनमधील हें धोरण इतकें नेमस्त व व्यवहारी आहे कीं, भारतामध्यें याच धोरणाचा पुरस्कार करण्याचें ठरविलें तर 'प्रतिगामी' 'भांडवलशाही' अशीं शेलकीं विशेषणें लावून त्याची रेवडी उडविण्यांत येईल. चीनच्या तुलनेनें काँग्रेसपक्षाचा शेतीविषयक कार्यक्रमहि पुढारलेला आहे.' ही सर्व माहिती देऊन अर्थशास्त्रज्ञांनीं पुढील अभिप्राय दिला आहे. या सर्व प्रश्नांचा व्यवहारी दृष्टीनें शास्त्रशुद्ध विचार केला तरच जमिनीची बिकट समस्या सुटण्याची कांहीं आशा आहे. घोषणा व प्रक्षोभक कार्यक्रम अंदाधुंदी

निर्माण करूं शकतील; पण नवीन समाजरचना करावयाची असेल तर त्या गोष्टी अप्रस्तुत आहेत.

## चीनमधील स्वर्ग

चीनमध्यें इतक्यांतच सर्वत्र सुबत्ता व समृद्धि नांदूं लागली आहे, अशा वार्ता सगळीकडून येत आहेत. आपल्याकडले विद्वान् लोक, कलाकार लोक तेथें जाऊन येऊन त्या वार्तांना पुष्टीच देतात. वाचकांनीं हें ध्यानांत ठेवावें कीं, चीनमध्यें अजून अल्लाउद्दीनाचा दिवा सांपडलेला नाहीं. ३० डिसेंबर १९५३ च्या टाइम्स ऑफ इंडियामध्यें ‘ चायना फेसेस हार्ड फॅक्टस् ’ हा लेख आलेला आहे. तो वाचला तर तेथील समृद्धि, सहकार्य व त्यामुळें निर्माण झालेला स्वर्ग यांवर चांगला प्रकाश पडेल. त्यांतील माहिती चीनमधील ‘ पीपल्स् डेली ’ या पत्राच्या आधारें दिलेली आहे. त्यांतील माहितीचा तात्पर्यार्थ असा—चीनमध्यें अन्नआघाडीवर कठिण परिस्थिति आली आहे. अर्थमंत्री पो यि पो यांनीं १९५३ च्या फेब्रुवारी मध्यें, चीनचें आयव्यय पत्र जमत नाहीं, जमाखर्चाची तोंडमिळवणी होत नाहीं, असें जाहीर केलें. दुष्काळामुळें अपेक्षित पीक आलें नाहीं आणि कारखानदारींत अपेक्षित उत्पादन होत नाहीं. सरकारी कारखान्यांतहि अपेक्षेप्रमाणें उत्पादन आलेलें नाहीं. अवर्षण, पूर, टोळधाड यांनीं यांगत्सीच्या दाक्षिणेस दहा लाख एकर जमीन दुष्काळी झाली आहे. चीन-पुढचा मुख्य प्रश्न कर्तबगार नेत्याची उणीव, जबाबदारीच्या जाणीवेचा अभाव आणि तंत्रविशारदाची वाण हा आहे. त्यामुळें उपकरणांची नासधूस, अपघात, धनाचा अपव्यय, उधळपट्टी हे परिणाम होत आहेत. माल विकत घेणें, ताब्यांत ठेवणें व त्याचा वापर करणें याची कसलीच पद्धत ठरलेली नाहीं. त्यामुळें खर्चाला मर्यादा नाहीं, सामानाचा हिशेब नाहीं. आणि विध्वंस, अपव्यय हें अपरिहार्य होऊन बसलें आहे. ’ आपण आपल्या लोकसत्तेचा तुलनेनें अभ्यास करावा असें जें या ग्रंथांत पदोपदीं सांगितलें आहे, त्याचा अभिप्राय आतां वाचकांना स्पष्ट होईल, अशी आशा आहे. पुढें औद्योगिक पुनर्घटनेचा विचार करतांना त्या प्रकरणांत चीनमधील नंदनवनाविषयींचा भ्रम नाहींसा होईल अशी आणखी थोडीशी माहिती

दिलेली आहे. तीहि या प्रश्नाचा विचार करतांना वाचकांनीं जमेस धरावी. त्याचप्रमाणें रशिया व चीन येथें अन्नधान्याचा तुटवडा असून, कडक नियंत्रण व रेशनिंग हे उपाय तेथें जारी केले जात आहेत या नुकत्याच आलेल्या बातम्यांकडेहि ( टाइम्म ऑफ इंडिया. ६-१-५४ व ७-१-५४ ) त्यांनीं लक्ष द्यावें.

चीन व रशिया येथील प्रगतीशीं आपल्या देशांतल्या मंद्गतीशीं तुलना करतांना आणखी एक विचार मनापुढें सतत ठेवला पाहिजे. एकतर तेथील समृद्धीच्या, प्रगतीच्या, नंदनवनाच्या बातम्या स्वीकारतांना त्यांत बाद घालूनच त्या स्वीकारल्या पाहिजेत. पण पुष्कळ लोकांना हें पटत नाहीं. चीन-रशियामध्यें खरीखुरी समृद्धि निर्माण झाली आहे, अशी त्यांना खात्री वाटते. आपल्याकडचे अनेक विद्वान्, अनेक कलाकार व अनेक अर्थवेत्ते यांनीं दिलेल्या पुराव्यावर अविश्वास दाखविणें त्यांना युक्त वाटत नाहीं. पण क्षणभर चीन-रशियाच्या संपन्नतेच्या वार्ता खऱ्या धरल्या तरी वर सांगितल्याप्रमाणें आपण हें मनापुढें सतत ठेविलें पाहिजे कीं, ते देश दण्डसत्तेच्या मार्गानें चालले आहेत आणि आपण लोकसत्तेच्या मार्गानें चाललों आहोंत. यामुळें सध्यांच्या पेक्षां गति वाढविणें हें अशक्य आहे. पण यामध्यें आपलें कांहीं अहित होत आहे असा मात्र समज वाचकांनीं करून घेऊं नये. लोकसत्तेची जोपासना आपण करीत आहोंत याचा अर्थ असा कीं 'व्यक्तित्व' या सर्वांत श्रेष्ठ धनाची आपण जोपासना करीत आहों. मानवाचा सर्व क्षेत्रांत विकास व्हावयाचा तो या धनाच्या जोरावरच होणार. सुबत्ता निर्माण झाली तर ती यांतूनच होणार. दंडसत्तेनें क्वचित् द्रुतगतीनें सुबत्ता निर्माण होईलहि; पण ती जनतेच्या पदरांत कितपत पडेल याची शंका आहे. जे अल्पसंख्य दंडसत्ताधार लोक असतात ते उत्पन्न झालेल्या धनांचा वाटा सर्व जनतेला देतील, धनाची समवांटणी करतील ही आशा करणें व्यर्थ आहे. हेंच तर जगांतलें मोठें दुःख आहे आणि लोकसत्ता हा त्या दुःखांवर उपाय म्हणून निर्माण झाला आहे. आज चीन व रशिया येथें लोकांत व्यक्तित्वजागृति झालेली नाहीं. ती उद्यां होऊं लागली म्हणजे तेथें प्रचंड प्रक्षोभ निर्माण होतील आणि मग भारतापुढचे

आजचे सर्व प्रश्न दत्त म्हणून तेथील लोकांपुढें उभे राहतील. सुदैवानें, आपण आधींपासूनच त्यांच्या सोडवणुकीच्या मार्गाला लागलों आहों; तेव्हां याहि बाबतींत आपण शांतपणें आणि विवेकानें आपल्या सरकारच्या, कॉँग्रेसच्या व लोकांच्या प्रगतीचें मूल्यमापन केलें पाहिजे.

## तटस्थता घातक ठरेल

गेल्या प्रकरणांत राजकीय पुनर्घटनेचें विवेचन करतांना जो विचार सांगितला, तोच आतां येथें जरा जास्त विशद केला आहे. आणि पुढें औद्योगिक पुनर्घटनेचें परीक्षण करतांना त्याकडेच वाचकांचें लक्ष मी वेधणार आहें. सध्यां आपल्या देशाच्या उत्कर्षाचे जे प्रयत्न चालू आहेत, त्यांत कितीहि दोष असले, उणीवा असल्या, त्यांतील अधम प्रकारामुळें आपल्याला कितीहि उद्वेग आलेला असला तरी अलिप्त. त्रयस्थ अशा टीकाकाराच्या भूमिकेवरून आपण त्यांकडे पाहूं नये. हे दोष दुसऱ्या कोणाचे तरी आहेत, कॉँग्रेसचे, सरकारचे किंवा इतर कोणा पक्षाचे आहेत, आपला त्यांशीं संबंध नाहीं, आपण त्यांचे जागीं असतों तर कांहीं निराळेंच करून दाखविलें असतें असा वृथा अहंकार आपण मनांत बाळगूं नये. तर आपलें सर्व बळ खर्च करून त्यांत प्रथम सहभागी व्हावें, ही आपलीच जबाबदारी आहे हें जाणून त्यांत सामील व्हावें आणि मग काय टीका करावयाची ती करावी. हा देश माझा आहे, त्याचे जे गुणदोष ते माझे गुणदोष, व त्याचा जो उत्कर्षापकर्ष तोच माझा उत्कर्षापकर्ष ही भूमिका ज्यांनीं स्वीकारावयाची त्यांनींच जर त्रयस्थाची भूमिका स्वीकारली तर हा देश आपला म्हणावयास परकीय लोक नेहमीं सिद्ध आहेतच.

---

# प्रकरण अकरावें

# औद्योगिक पुनर्घटना

लोकसत्ता ही समृद्धि, विपुलता, धनधान्याची सुबत्ता यांवर अवलंबून असते, दरिद्री देशांत लोकसत्ता परिणत होऊं शकत नाहीं, इतकेंच नव्हे तर

तिचें बाह्यरूप सुद्धां फार काल टिकून राहूं शकत नाहीं, हा विचार मागें अनेक वेळां सांगितला आहे. तो जर आपल्या मनावर चांगला बिंबला असेल तर भारतांत औद्योगिक पुनर्घटनेची किती आवश्यकता आहे, हें निराळें विशद करून सांगण्याची गरज नाहीं. अन्न, वस्त्र, घर व शिक्षण या प्रत्येक व्यक्तीच्या प्राथमिक गरजा भागविणें हें लोकायत्त सरकारचें कर्तव्य आहे, हें तत्त्व आतां जगांत दृढमूल झालें आहे. एवढ्याच कामासाठीं आज जें धन आपणास उपलब्ध होतें त्याची कमींतकमी शंभर पटीनें तरी वाढ होणें अवश्य आहे. मग याहून वरच्या संस्कृतीसाठीं लागणारें जें धन त्याचा विचार केला तर, भारतांत सर्व प्रकारच्या धनाची वृद्धि होणें किती आवश्यक आहे, हें सहज ध्यानांत येईल. शास्त्रज्ञानाचा विकास, महायंत्रोत्पादन आणि अमाप भांडवल या त्रिविध साधनांनीं भारताची औद्योगिक पुनर्घटना करून उत्पादनाची कमालीची वाढ केल्यावांचून येथील लोकसत्ता स्थिर व बलशाली होण्याची आशा कधींच धरतां येणार नाहीं.

ही जी उत्पादनाची वाढ व त्यासाठीं आवश्यक असलेली औद्योगिक पुनर्घटना तिच्यासाठीं कॉंग्रेस सरकारनें काय प्रयत्न केले, भांडवलदारकारखानदार यांचें त्याला कितपत साह्य व सहकार्य मिळालें, कॉंग्रेसच्या प्रयत्नांना यश कितपत आलें, आर्थिक क्षेत्रांत कॉंग्रेसनें कोणत्या तत्त्वांचा अवलंब केला आहे, त्याविषयीं भारतांतील अर्थवेत्त्यांची व इतर पंडितांचीं काय मतें आहेत, इत्यादि महत्त्वाच्या प्रश्नाचा आतां विचार करावयाचा आहे.

भारताच्या धनाची वाढ करणें, उत्पादन अनेक पटीनें वाढवून या देशांत समृद्धि निर्माण करणें, ही जबाबदारी प्रथमतः येथील भांडवलदार, कारखानदार व व्यापारी या वर्गावर आहे. कॉंग्रेसची ही जबाबदारी नाहीं असें नाहीं. देशाचें शासन कॉंग्रेसनें शिरावर घेतल्यामुळें प्रत्येक क्षेत्रांतल्या विकासाची, पुनर्रचनेची व प्रगतीची जबाबदारी कॉंग्रेसवर आहे त्यांत वादच नाहीं. पण जनतेच्या सहकार्यावांचून लोकायत्त सरकार कांहींच करूं शकणार नाहीं हें तितकेंच खरें आहे. आणि औद्योगिक क्षेत्रांत भांडवलदार वर्ग आज अनेक वर्षें जबाबदारीनें सूत्रचालन करीत असल्यामुळें या क्षेत्रांतील जबाबदारी त्या वर्गावर बऱ्याच अंशानें पडते, हें कोणी अमान्य करील असें

वाटत नाहीं. तेव्हां भारतांतला भांडवलदार–कारखानदार–व्यापारी हा जो महासमर्थ, कर्तबगार, व सर्वप्रकारच्या साधनांनीं संपन्न असलेला असा वर्ग त्यानें भारताच्या लोकसत्तेच्या दृष्टीनें स्वतंत्रपणें व सरकारशीं सहकार्य करण्याच्या मार्गानें प्रगतीला कितपत हातभार लाविला याचा विचार प्रथम केला पाहिजे.

## भांडवलदारांची कहाणी

दुर्दैवानें ही कथा अत्यंत शोचनीय व उद्वेगजनक अशी आहे. या वर्गाच्या ठायीं ध्येयनिष्ठा तर नाहींच, पण पाश्चात्य देशांतील अगदीं स्वार्थी अशा धनिकांनींसुद्धां उत्पादनवाढीची जी एक प्रचंड आकांक्षा धरली व प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष रीतीनें मानवी संस्कृतीच्या प्रगतीस जिच्यामुळें हातभार लाविला, ती स्वार्थमूलक पण कांहींशी सुसंस्कृत आकांक्षासुद्धां या वर्गाच्या ठायीं नाहीं. बहुसंख्य मानव हा स्वार्थलोलुपच असतो आणि तो केव्हांहि तसाच रहाणार. पण या स्वार्थाच्या प्रेरणांनाच जरा उजळ रूप मिळालें तरी त्या मानवी प्रगतीला साह्यभूत होतात. पण या देशांतल्या धनिकांनीं आपल्या स्वार्थाला तेवढाहि उजाळा दिला नाहीं. त्यामुळें भारताच्या औद्योगिक पुनर्घटनेविषयीं विचारवंतांच्या मनांत फार निराशा पसरून राहिलेली आहे. या प्रकरणाची सम्यक् कल्पना येण्यासाठीं भांडवलदार, कारखानदार, व्यापारी या वर्गाचें गेल्या कांहीं वर्षांचें चरित्र आपण पाहूं.

## कापड

अहमदाबादच्या कापडाच्या गिरण्यांचा हिशेब पुढें दिला आहे. थोड्या-फार फरकानें हिंदुस्थानांतील सर्वच कापडगिरण्यांना तो लागूं पडेल याविषयीं अर्थशास्त्रवेत्त्यांत दुमत होणार नाहीं. १९३९ सालीं अहमदाबादच्या प्रत्येक गिरणीस सरासरी २·५ लक्ष रुपये ठोक फायदा होत असे. त्या सालीं युद्ध सुरू झालें आणि ही आपली पर्वणी आहे हें धनपतींनीं जाणलें. १९४२ सालीं ११ लाख व १९४३ सालीं प्रत्येकीं ४० लाख रुपये फायदा त्यांनीं वसूल केला. पुढें नियंत्रण बसलें. तरी त्या काळांतहि प्रत्येक गिरणीस सरासरी १७ लाख रु. फायदा होत होता. १९४७ सालीं, कापसाचे भाव

व मजुरीचे दर वाढले या सबबीवर, कारखानदारांनीं 'विनियंत्रण करा' असा सरकारकडे आग्रह धरला. सर्व अर्थशास्त्रवेत्त्यांचा विनियंत्रणास विरोध होता. पण बहुतेक सर्व कॉंग्रेसश्रेष्ठींनीं विनियंत्रणाचाच पुरस्कार केला. नियंत्रणें काढण्यांत आलीं! आम्ही किंमती वाढविणार नाहीं, असें कारखानदारांनीं आश्वासन दिलें होतें. पण विनियंत्रण होतांच तें त्यांनीं वाऱ्यावर उधळून दिलें, आणि कापडाच्या किंमती २०० ते ३०० टक्क्यांनीं वाढविल्या. यामुळें सरकारनें पुन्हां नियंत्रण बसविलें. पण दुर्दैव असें कीं यावेळीं सरकारनें नियंत्रित म्हणून मान्य केलेल्या किंमती पहिल्या किंमती-पेक्षां जास्त होत्या. यावेळीं उत्पादनखर्च वाढला होता हें खरें. पण तो चौपट वाढला होता. पण फायदा मात्र उघड रीतीनें दसपटीच्या पलीकडे गेला होता. काळया अंधाऱ्या रीतीनें त्याची कोणची पट झाली असेल याची कल्पनाच केलेली बरी. १९३९ सालीं अहमदाबादच्या सर्व गिरण्यांना मिळून नक्त फायदा ४९ लक्ष रुपये झाला. १९४३ सालीं नक्त फायद्याचा आंकडा २०८६ लक्ष रुपयांवर गेला. १९४८ सालीं सुद्धां १२९२ लाख रुपये फायदा होताच. तरी ओरड चालू होती. १९३९ सालीं मॅनेजिंग एजंटांना ३४ लक्ष रुपये कमिशन मिळालें. १९४८ सालीं २४३ लक्ष रुपये कमिशन म्हणून त्यांनीं घेतलें. याच काळांत, कामगारांचें उत्पन्न वाढण्याऐवजीं कमी झालें हें प्रसिद्धच आहे. १९३९ सालीं अन्नधान्याच्या स्वरूपांत त्यांचें उत्पन्न २८७.५ होतें तें १९४८ सालीं २४० वर आलें. दिसायला पगार वाढले होते. पण वस्तुस्थिति अशी होती. १९४७ सालीं कॉंग्रेसच्या कामगार संघटनेचे नेते खंडूभाई देसाई यानीं 'युद्धकालीन कापडकारखाने' या नावाचें एक पत्रक काढलें होतें. त्यांत सर्व हिशेब देऊन शेवटीं असें लिहिलें होतें कीं, या काळांत जनतेनें कारखानदारांना इतका पैसा दिला कीं, भारतांतील ४२० गिरण्यांच्या मूळ भांडवलासकट सगळया खर्चांची भरपाई करूनहि तो वर उरेल. तेव्हां कसलीहि नुकसान-भरपाई न देतां या सर्व गिरण्या राष्ट्राच्या मालकीच्या केल्या तरी त्यांत कोणताहि अन्याय होणार नाहीं. (भारतज्योति ३ डिसेंबर १९५०)

## साखर

कापडाची कहाणी कटु असली तर साखरेची कहाणी कटुतर आहे. गोखले इन्स्टिटयूट ऑफ इकॉनामिक्स व पॉलिटिक्स पुणें. येथील प्रा. नी. वि. सोवनी यांनीं नवभारत सप्टेंबर १९५० च्या अंकात ती सविस्तर दिली आहे. १९३२ सालीं हिंदुस्थान सरकारनें साखरेच्या धंद्यास संरक्षण दिलें. त्यामुळें पुढील चार वर्षांत साखर-कारखान्यांची संख्या १३५वर गेली. आणि उत्पन्न १·५ लक्ष टनावरून जवळ जवळ १० लाख टनांवर गेलें. या कारखान्यांपैकीं बहुसंख्य कारखाने बिहार व उत्तरप्रदेश या प्रांतांत होते. यावेळीं आपसांतील स्पर्धेमुळें भाव कमी होते. १९३७ सालीं साखर-कारखानदारसंघाची स्थापना झाली. आणि सरकारनें कायदा करून कारखानदारांना संघाचें सदस्यत्व सक्तीचें केलें. अशी मजबुती होतांच संघानें बाजारांत माल कमी ठेवून भाव चढे ठेविण्याचें धोरण अवलंबिलें; आणि त्या स्वस्ताईच्या काळांतहि भाव ६ रुपये मणावरून १२ रुपये मणावर नेले. हें कपट पाहून सरकारनें कारखानदारांवरची सदस्यत्वाची सक्ती रद्द केली. त्यामुळें फिरून स्पर्धा सुरु होऊन भाव पडूं लागले. तेव्हां कारखानदारांनीं पुन्हां सरकारला शरण जाऊन सदस्यत्व सक्तीचें करण्याची याचना केली आणि सरकारच्या पुढील अटी मान्य केल्या. ( १ ) भाव सरकार ठरवील ( २ ) बाजारांत साखर किती आणावयाची तेंहि सरकार ठरवील. व ( ३ ) साखर नियंत्रणमंडळाचा मुख्य अधिकारी सरकारी राहील. या अटींप्रमाणें १९४७ पर्यंत काम चाललें होतें. त्या सालीं वर सांगितल्याप्रमाणें विनियंत्रण झालें. त्यावेळीं वास्तविक सरकारशीं झालेला वरील करार रद्द झाला नव्हता. पण साखरसंघानें तो झुगारून दिला. आणि कापडकारखानदारांप्रमाणें अमर्याद नफा खाण्याचें धोरण आरंभिलें. विनियंत्रण झालें त्याच्या आधीं साखरेचा भाव २२–१४–० पर्यंत गेलाच होता. विनियंत्रणानंतर तो एकदम ३५–७–० पर्यंत गेला. त्यावेळीं २४ रुपये भावांतच आम्हांला भरपूर नफा मिळतो, असें बेलापूर शुगर सिंडिकेटचे अध्यक्ष सर जोसेफ के यांनीं, म्हणजे एका कारखानदारानेंच जाहीर केलें होतें. तरी सरकारनें भाव ३५ रुपये मान्य केला पण संघानें

तेंहि बंधन पाळलें नाहीं. आणि मग पुढील दोन वर्षांत या साखर-कारखानदारसंघानें ज्या लीला केल्या त्या प्रसिद्धच आहेत. जुने साखरसाठे नव्या भावानें विकले. अनेक वेळां कमी साखर मोकळी करून कृत्रिम टंचाई निर्माण केली. पाकिस्तानांत साखर पाठविली. अर्थात् देशाबाहेर साखर पाठविणें सरकारी अधिकाऱ्यांच्या साह्यावांचून शक्य नव्हतें. तें साह्यहि संघानें मिळविलें. संघाला रेल्वेच्या वाघिणी सरकारी अधिकाऱ्यांनींच पुरविल्या. साखर मोकळी करण्यास सरकारी नियंत्रकाची परवानगी लागते. ती त्यानें दिली नाहीं तर औद्योगिक खात्याच्या चिटणिसाकडे संघ धांव घेई. आणि आश्चर्य असें कीं ती परवानगी तेथें मिळे. अधिकाऱ्यांनीं जाब विचारला तर संघाचे अध्यक्ष वाटेल तशीं उर्मट उत्तरें देत. एकदां तर 'सरकारचा व आमचा करार झालेला मला माहीत नाहीं' असें उत्तर त्यांनीं दिलें! अशा रीतीनें कोट्यवधि रुपये नफा खाऊन पुन्हां, 'पाकिस्तानांत साखर पाठविली ती नुकसान सोसून पाठविली आहे. हिंदी जनतेसाठीं आम्हीं हा त्याग केला आहे.' अशीं पत्रकेंहि संघानें काढलीं. आणि हें सर्व घडत असतांना सरकार याला केव्हांहि पायबंद घालूं शकलें नाहीं!

## प्राप्तीवरील कर

इनकम् टॅक्स् इनव्हेस्टिगेशन कमिशनचा अहवाल पाहिला तर धनिक-वर्गाच्या चरित्रावर आणखी एका अंगानें प्रकाश पडेल. जनतेला पिळून पैसा मिळवावयाचा आणि न्याय्य असे सरकारी करहि चुकवावयाचे अशी हे लोक लक्ष्मीची दुहेरी आराधना करतात. लक्ष्मी त्यांच्यावर अगदीं प्रसन्न असते, याचें हेंच कारण आहे. या अहवालान्वयें ( बॉंबे क्रॉनिकल १८।९।४९ ) मुंबई राज्यांत दरसाल ८० कोटी रु. कर चुकविला जातो. मुंबई, अहमदाबाद व सोलापूर येथें कर चुकविण्याचें प्रमाण जास्त आहे. आणि सर्वांत जास्त प्रमाण कापडक्षेत्रांत आहे. शेंकडा पन्नास उत्पन्न प्रकट केलेंच जात नाहीं. कांहीं धनिकांनीं तर कित्येक वर्षांत आपलें उत्पन्न मुळींच सांगितलेलें नाहीं. ते आपले पैसे बँकेंत ठेवण्याऐवजीं सेफ व्हॉल्टमध्यें ठेवतात. कांहीं मिल मॅनेजिंग एजन्सींनीं तर युद्धकाळांत दरसाल दोन दोन

कोटी रुपये काळया बाजारानें मिळविलेले आहेत. तसें छपाविलेलें उत्पन्न आजच्या ( अहवालाच्या ) घटकेला २५० कोटी रुपयांपर्यंत असावें. गेल्या दोनतीन वर्षांत धनिकवर्गाचें लक्ष्मीच्या दुहेरी उपासनेचें धोरण मुळींच बदललेलें नसून जास्तच दृढ झालें आहे हें सांगावयास नकोच.

## औषध कीं विष ?

कारखानदार व व्यापारी यांची आणखी एक कहाणी सांगतों. ती वाचल्यावर आपण कटु, कटुतर व कटुतम अशा कहाण्या ऐकत चाललों आहोंत हें ध्यानांत येऊन आपल्या समाजाचा आर्थिक पाया कसा ढांसळत आहे व तो सांवरून तेथें समभूमि निर्माण करणें किती कठीण आहे, हें ध्यानांत येईल. ही तिसरी कहाणी औषधाच्या धंद्याविषयीं आहे. आणि म्हणूनच ती कटुतम आहे. साखर मिळाली नाहीं तर प्राण जात नाहीं. कापड मिळालें नाहीं तर तो जाईल, पण त्यांवर कांहीं उपाय निघतो; पण पेनिसिलीन किंवा स्ट्रेप्टोमायसीन या औषधाच्या ऐवजीं फसगतीनें दुसरींच औषधें अंगांत टोंचलीं गेलीं तर ! जनतेची अशी फसगत करण्याचा उद्योग या देशांत सध्यां फार मोठया प्रमाणांत चालू आहे. औषध तयार झाल्यावर त्याची गुणावहता तपासणें व त्याला मंजुरी देणें हें काम मुंबईच्या हाफ्किन्स इन्स्टिटयूटचें आहे. तेथील अधिकाऱ्यांनीं आपल्या इतिवृत्तांत पुढील माहिती दिली आहे. १९४९ सालीं ३४० औषधें तपासलीं. त्यांतील १३८ म्हणजे शे. ४९ औषधें हीन प्रतीचीं व भेसळीचीं होतीं. १९५० सालीं ९२४ औषधांपैकीं सुमारें ३७० म्हणजे शे. ३९ औषधें हीन सांपडलीं. १९५१ च्या सप्टेंबरपर्यंत ७०५ पैकीं ३०० म्हणजे शे. ४४ औषधें हीन होतीं. हीं सर्व हीन औषधें बाजारांत अस्सल म्हणून विकलीं जातात. आणि हा धंदा अत्यंत मोठया प्रमाणावर चालू आहे. असोसिएटेड चेंबर्स ऑफ कॉमर्स या संस्थेची वार्षिक सभा परवां कलकत्त्यास झाली त्या वेळीं अध्यक्षांनीं हें जाहीरपणें निवेदन करून सरकारचें तिकडे लक्ष वेधलें आहे. पेनिसिलीन, स्ट्रेप्टोमायसीन यासारखीं २६ औषधें भेसळीनें विकलीं गेल्याचें उघडकीस आलें आहे. या औषधांनीं क्षय बरा व्हावयाचा असतो, रक्त शुद्ध व्हावयाचें असतें. तें कितपत साधेल हें यावरून

कळेल. याविषयीं टीका करतांना टाइम्स ऑफ इंडियाचे संपादक म्हणतात कीं, " परवां राजकुमारी अमृत कौर यांचें जें याविषयीं भाषण झालें त्यावरून ' औषधविक्री कायदा ' पास करून घेतला कीं, आपलें कर्तव्य संपलें, असा सरकारचा समज असावा असें दिसतें !" ( टाइम्स १८।१२। १९५१ ) भारतांतील बहुसंख्य प्रदेशांत हा कायदा दुर्लक्षिला जातो. मुंबई राज्यांत तपासणीची कांहीं व्यवस्था आहे. पण ६००० कारखाने तपासण्यास सात इन्स्पेक्टर आहेत. आणि त्यांना १ लक्ष १५ हजार चौरस मैलांच्या टापूत हिंडावें लागतें ! शिवाय या गुन्ह्यांत कोणी आरोपी सांपडलाच तर त्याला एक वर्ष तुरुंग किंवा ५०० रु. दंड एवढीच शिक्षा आहे ! यानें किती प्रतिबंध होईल याचा अदमास येईलच. पण याबरोबर हाहि विचार वांचकांनीं करून ठेवावा कीं, सरकारनें कसोशी करावयाची असें ठरविलें तरी तें कितपत शक्य होईल ! इनस्पेक्टर्स, पोलीस, शास्त्रज्ञ, न्यायालयें यांचा खर्च किती वाढेल? तो सध्यां परवडेल काय? आणि इतकेंहि करून आळा किती बसेल ? ही आभाळ फाटल्यासारखी स्थिति आहे. कोणचेंहि सरकार आलें तरी तें तेथें टाके घालूं शकेल काय ! या प्रश्नाचा राष्ट्रीय भूमिकेवरून विचार करणें अवश्य आहे, हें यावरून जनतेच्या ध्यानीं येईल असें वाटतें.

कापड, साखर व औषधें या विशिष्ट उद्योगक्षेत्रांतील कटु कथा वर दिल्या आहेत. पण तेवढ्याच क्षेत्रांत सामाजिक धनाचा असा अन्याय्य अपहार चालतो असें नाहीं. उद्योगधंद्याचें असें एकहि क्षेत्र नाहीं कीं जें यांतून मुक्त आहे. धनाच्या काळ्या सामर्थ्याला एक उजळ बाजू असते. ब्रिटिश भांडवलदार हिंदुस्थानांत अनेक कारखाने काढीत. तेहि जनतेला पिळून काढीत नसत असें नाहीं. पण आपली कारखानदारी ते उत्तम पायावर उभारीत. भांडवल वाढवीत व माल चोख देत. येथील उद्योगपती स्वतःच्या धंद्यांतल्या नीतीशींहि एकनिष्ठ रहात नाहींत. ते माल वाईट काढतात; सरकारकडून मक्तेदारी मिळवून तो वाटेल तसा खपवितात; नफा हिशेबीं दाखवीत नाहींत; आणि सर्वांत खेदजनक गोष्ट म्हणजे जमा झालेला नफा पुन्हां भांडवलांत घालून उत्पादन वाढविण्याचें धोरण ठेवीत नाहींत. तो काळ्या मार्गानें गुंतविला असतां जास्त फायदा होतो,

म्हणून तो तिकडे लोटण्यांत येतो. म्हणजे उद्योगपतींना पोसलें तर निदान देशांत उत्पादन तरी वाढेल, हीहि आशा भारतांत राहिलेली नाहीं.

या देशांत लोकसत्ता यशस्वी व्हावयाची तर येथें विपुल उत्पादन व त्याचें कांहीं-अंशीं तरी समविभजन होणें अवश्य आहे. सर्व औद्योगिक पुनर्घटनेचें हें तात्पर्य आहे. अमेरिका, ब्रिटन या देशांत उत्पादनाचा प्रश्न सुटलेला आहे. तेथील कारखानदारांनीं त्याबाबतींत परासीमा गांठली आहे. तेथील शास्त्यांच्यापुढें, नेत्यांच्यापुढें समविभजनाचाच फक्त प्रश्न आहे. भारतामध्यें मुख्य प्रश्न उत्पादनाचा आहे. या उत्पादनाची प्राधान्यानें ज्या वर्गावर जबाबदारी पडते त्या वर्गाचें चरित्र आपण येथवर पाहिलें. त्यावरून येथील लोकसत्तेच्या प्रगतीला त्याच्याकडून अणुमात्र साह्य होणार नाहीं हें अगदीं निश्चित दिसून येतें. आतां यांतून जी बिकट समस्या निर्माण होते तिला कॉंग्रेसनें कसें तोंड दिलें याचा विचार आपणांस करावयाचा आहे.

## अर्थकोविदांची टीका.

याबाबतींत स्वतंत्रपणें कांहीं मीमांसा करण्याच्या आधीं, या देशांतील अर्थशास्त्रवेत्त्यांनीं सरकारी धोरणाविषयीं कोणची टीका केली आहे, तें पाहूं. ती जमेस घेतल्यानंतर स्वतंत्रपणें कांहीं ठरविणें सोईचें होईल. अर्थपंडितांनीं आर्थिक क्षेत्रांतील कॉंग्रेसच्या धोरणांवर अत्यंत कडक टीका केली आहे. कॉंग्रेस सत्तारूढ झाल्यानंतर तिचे नेते धनमोहवश झाले, त्यांनीं भांडवली सामर्थ्याशीं झुंज करण्याचें नाकारलें, इतकेंच नव्हे तर त्यांच्यापुढें संपूर्ण शरणागति पत्करली, सत्तामदानें कॉंग्रेसचे डोळे फिरून गेले व गरीब जनतेचा तिला विसर पडला, ती धनिकांच्याच फक्त कल्याणाची आतां चिंता करीत असून त्यांनीं जनतेची जी लूट चालविली आहे तिच्यांत ती भागीदार झाली आहे, अशा तऱ्हेच्या टीकेचा कॉंग्रेसवर अनेक अर्थ-कोविदांनीं भाडिमार चालविला आहे. कॉंग्रेसमधील अनेक कार्यकर्त्यांचाहि तसाच अभिप्राय आहे. टी. टी. कृष्णम्माचारी हे कॉंग्रेसपक्षाचे असून संसदेचे सभासद आहेत. ‘ चार वर्षांचा आढावा ’ या आपल्या लेखांत

त्यांनीं कॉंग्रेसच्या भांडवलवशतेची ही गोष्ट अत्यंत खेदानें नमूद करून ठेविली आहे. ते म्हणतात, 'कॉंग्रेसची अर्थक्षेत्रांतील मतें सदा चंचल असून तिच्यांतील उजवा पक्ष भांडवलदारांच्या आहारीं गेला आहे. कॉंग्रेसला पूर्णपणें नमवून तिला आपल्या लगामीं लावण्याचा भांडवलदारांचा हेतु असावा. आणि या देशाची प्रगति सर्वस्वीं खुंटवून टाकण्याइतकें कॉंग्रेसमधील उजव्या पक्षावर भांडवलदारांचें वर्चस्व पडल्याचें आज दिसत आहे.' (भारतज्योति २६।११।५०) प्रा. धनंजयराव गाडगीळ यांनीं याच प्रकारची टीका केली आहे. 'कापडाच्या उत्पादनांत जितका गैरशिस्तपणा व अप्रामाणिकपणा आज चालू आहे तितका इतरत्र क्वचितच सांपडेल. सध्यां धंद्याचें नियंत्रण व मालाचे भाव यांची शेंडी सरकारनें उत्पादकांचेच हातीं ठेविली आहे. या कारखानदारांविरुद्ध जाण्याची सरकारची छाती नाहीं. आपण तोट्यांत येत आहों अशी ते ओरड करतात. उत्पादन थांबवूं म्हणून धमक्या देतात. पण यासाठीं त्यांना शिव्याशाप देण्यांत अर्थ नाहीं. संप करणारे भांडवलवाले स्वधर्मानेंच चालत आहेत. पण खाजगी व्यवहाराधिष्ठित अर्थव्यवस्था व आर्थिक समता यांची सांगड घालूं पहाणारे स्वतःची व जनतेची फसवणूक करीत आहेत. आर्थिक विषमतेला आळा घालणें अशक्य आहे असें नाहीं. पण त्यासाठीं भांडवलदारांचा नफा मर्यादित करून किंमतीवर कडक नियंत्रण घातलें पाहिजे. आणि उत्पन्नावर कर लादून त्याचें वाटप केलें पाहिजे. पण आपलें सरकार यापैकीं कोणत्याच मार्गाचा अवलंब करण्यास तयार नाहीं. सरकारला तशी इच्छा नाहीं किंवा शक्ति नाहीं.' (आर्थिक घडामोडी १९३० ते ५०. 'आपलें आर्थिक धोरण व राजकीय भवितव्य'–गाडगीळ–संकलित रूपानें भावार्थ).

कॉंग्रेस सरकारच्या भांडवलधार्जिण्या वृत्तीविषयीं टाइम्स ऑफ इंडियानें वेळोवेळीं अशीच तीव्र निर्भत्सना केलेली आहे. १९४९ सालीं मद्रास सरकारनें शास्त्रीय पद्धतीनें शेतीची सुधारणा करण्याच्या हेतूनें ॲग्रिकल्चरल बिल असेंब्लींत मांडलें होतें. ब्रिटनमधील १९४७ च्या 'ॲग्रिकल्चरल ॲक्टाप्रमाणें तें किसान वर्गाला अत्यंत हितावह झालें असतें. पण धनिक वर्गानें भयंकर ओरड केल्यामुळें सरकारनें तें मागें टाकलें. (टाइम्स ऑफ इंडिया, १४–१२–४९).

## राष्ट्रीयीकरण

उद्योगधंद्यांच्या राष्ट्रीयीकरणाविषयीं सरकारचें जें धोरण आहे त्याविषयीं अर्थशास्त्रवेत्यांच्या टीकेचीहि जरूर नाहीं. राष्ट्रीयीकरण आम्हांला शक्य नाहीं व आम्ही तें मनांतहि आणीत नाहीं असें सरकारनेंच अनेक वेळां जाहीर केलें आहे. सर्व प्रमुख उद्योगधंद्यांचें राष्ट्रीयीकरण करूं, असें आश्वासन काँग्रेसनें आपल्या निवडणुकीच्या जाहीरनाम्यांत दिलें होतें. पण आतां सत्तारूढ झाल्यानंतर 'राष्ट्रीयीकरण' आम्ही करणार नाहीं, असें भांडवलदारकारखानदारांना सारखें आश्वासन देऊन सरकार या बिथरलेल्या वर्गांचा अनुनय करीत आहे. उद्योगमंत्री डॉ. शामाप्रसाद मुकर्जी यांनीं 'अजून दहा वर्षें तरी सरकार राष्ट्रीयीकरण करणार नाहीं' असें अधिकारपदावरून जाहीर केलें. त्याच वेळीं 'नुसती दहा वर्षेंच नव्हे, तर कित्येक वर्षें आमचें हेंच धोरण राहील' असें पंडितजींनीं सांगितलें. मद्रास चेंबर ऑफ कॉमर्सपुढें बोलतांना सरदार पटेल यांनीं, 'भारत सरकारला राष्ट्रीयीकरण करण्याची इच्छा नाहीं व तेवढी कार्यक्षमताहि आमच्या अंगीं नाहीं' असें स्वच्छ सांगून टाकलें. ( टाइम्स ऑफ इंडिया २३-२-४९ )

राष्ट्रीयीकरण केलें नाहीं तरी औद्योगिक पुनर्घटनेकडे सरकारनें लक्ष पुरविलेंच पाहिजे. पण या बाबतींत सरकार पुरेसें लक्षच देत नाहीं अशी अर्थकोविदांची तक्रार आहे.अलाहाबादचे प्रो.जैन,डॉ.ग्यानचंद,प्रा.गाडगीळ, या सर्वांनीं ही टीका केली आहे.--'औद्योगीकरणाच्या क्षेत्रांत कसलीहि योजना नाहीं, घेतलेलीं कामें सरकार मध्येंच सोडून देतें, आणि इतर खात्यांच्या दशांश सुद्धां पैसा औद्योगीकरणासाठीं मंजूर करीत नाहीं' असें सांगून प्रो. जैन म्हणतात कीं औद्योगीकरणाची सर्व आशा नष्ट झाली आहे. ( अंबाला -ट्रिब्यून १५-८-५० ) पंचवार्षिक योजनेवर पंडितांचा हाच आक्षेप आहे. शेती, शिक्षण, आरोग्य इ. क्षेत्रांतील जबाबदारी सरकारनें घेतली आहे. पण औद्योगिक विकासाची सर्व जबाबदारी भांडवलदार कारखानदार यांच्यावर सोपविली आहे. याविषयीं लिहितांना प्रा. धनंजयराव गाडगीळ लिहितात, 'उद्योगविकासाच्या योजना सरकारनें भांडवलदारांशीं विचारविनिमय करून ठरविल्या आहेत. तेव्हां त्यांचें स्वरूप काय असणार हें

दिसतेंच आहे. यंत्रोद्योगाचा विकास अपेक्षेप्रमाणें होईल याची हमी कांहींच नाहीं. सरकारचें या विकासयोजनांवर नियंत्रणहि नाहीं. उद्योगपतींनीं राष्ट्राकडे लक्ष दिलें पाहिजे, जनतेची लुबाडणूक करतां कामा नये, अशा तऱ्हेचा नुसता उपदेश केला आहे.' (केसरी २१–१०–५१) कारखानदारवर्गाची उत्पादनवाढीविषयीं काय वृत्ति आहे हें सांगण्यास दुसऱ्या कोणा पंडिताची जरूर नाहीं. स्वतः पंडितजींनींच तें प्रकटपणें सांगितलें आहे. पुण्याच्या नॅशनल केमिकल लॅबॉरेटरीचें उद्घाटन करतांना ते म्हणाले कीं–'आमचे कारखानदार उद्योगविकासासाठीं शास्त्रीय ज्ञानाचा उपयोग करीत नाहींत. त्यांना फक्त पैसा हवा आहे' (टाइम्स ४–१–५०) असें असूनहि औद्योगिक विकासाची जबाबदारी पंचवार्षिक योजनेंत त्यांच्यावर सोपविलेली आहे; यावरूनच सरकार औद्योगिक पुनर्घटनेकडे लक्ष पुरवीत नाहीं, त्याची हेळसांड करतें, असा अर्थवेत्त्यांनीं आरोप केला आहे.

अर्थपंडितांनीं केलेल्या टीकेचा तात्पर्यार्थ असा आहे: स्वातंत्र्यप्राप्तीनंतर प्रस्थापित झालेलें आपलें भारतीय सरकार पूर्णपणें भांडवलाच्या आहारीं गेलेलें आहे. त्याला स्वातंत्र्य कसलेंहि राहिलेलें नाहीं. औद्योगिक पुनर्घटना करावयाची तर या उद्योगपतींच्या स्वार्थाला मर्यादा घालणें अवश्य आहे. सरकारला तें करावयाचें नसल्यामुळें तें या पुनर्घटनेकडे जाणूनबुजून दुर्लक्ष करीत आहे. सत्तारूढ होण्यापूर्वी उद्योगधंद्यांचें राष्ट्रीयीकरण करण्याचें आश्वासन काँग्रेसनें दिलें होतें. जनतेला दिलेल्या त्या आश्वासनाचा सरकारनें भंग केला आहे आणि आतां तर आम्ही राष्ट्रीयीकरण करणार नाहीं असें सरकार उद्योगपतींनाच आश्वासन देत आहे. सरकारची ही वृत्ति जोंपर्यंत अशीच राहील तोंपर्यंत औद्योगिक पुनर्घटनेची भारताला मुळींच आशा धरतां येणार नाहीं.

वरील टीकेंत या देशांतल्या थोर अर्थपंडितांनीं वस्तुस्थितीचें जें निदर्शन केलें आहे त्याविषयीं वाद करण्यास कोठेंच जागा नाहीं. गेल्या पांचसहा वर्षांत सरकार भांडवलदारांचा सारखा अनुनय करीत आहे, त्यांच्या धमक्यांपुढें नमत आहे, त्यांच्यावर कसलींहि बंधनें वा नियंत्रणें जारी करीत नाहीं, अर्थसंकल्प करतांना, योजना आखतांना त्यांच्या स्वार्थाला

धक्का लावावयाचा नाहीं अशी दक्षता घेत आहे आणि त्यामुळें आपल्या औद्योगिक विकासाचें पाऊल मागेंच येत आहे, ही गोष्ट वादातीत आहे. राष्ट्रीयीकरणाविषयींचें आपलें धोरण तर सरकारनें निःसंदिग्ध शब्दांत जाहीर केलें आहे. सरकारच्या आर्थिक धोरणाचा परिणाम म्हणून गरीब जनता दिवसेंदिवस जास्त दीनदरिद्री होत आहे. धनिकांची संपत्ति वाढत असून आर्थिक विषमता पराकोटीस पोचला आहे, हें सिद्ध करण्यासहि अर्थशास्त्राच्या ज्ञानाची जरूर राहिलेली नाहीं. तेव्हां अर्थपंडितांनीं सांगितल्याप्रमाणें वस्तुस्थिति आहे, घटना तशा घडत आहेत, हें सत्य आहे.

प्रश्न आहे तो या घटनांच्या मीमांसेविषयीं व तिच्यावरून निघणाऱ्या निष्कर्षाविषयीं. वर उल्लेखिलेले अर्थवेत्ते, समाजवादी, साम्यवादी इ. विरोधी पक्ष आणि जनतेच्या कळकळीनें प्रेरित झालेले इतर कार्यकर्ते यांनीं, कॉंग्रेस ही भ्रष्ट झाली आहे, तिच्या नेत्यांच्या ठायीं भांडवल-नियंत्रणाची इच्छा नाहीं, गरीब जनतेविषयींचें तिचें प्रेम संपुष्टांत आलें आहे, उद्योगपतींच्या पुढें तिनें जाणूनबुजून शरणागति पत्करली आहे, हे व अशा अर्थाचे आरोप केले आहेत. विरोधी पक्ष टीका करतात तेव्हां त्यांचा भावार्थ असा असतो कीं कॉंग्रेसचे नेते धनिकांचे साथीदार झालेले आहेत आणि अंगीं सामर्थ्य असूनहि ते औद्योगिक पुनर्घटनेला हात घालीत नाहींत व अशा तऱ्हेनें जनताद्रोह करीत आहेत. आम्हांला सत्ता प्राप्त झाली तर आम्ही भांडवलदार, कारखानदार, व्यापारी या वर्गाला सहज पराभूत करूं आणि उद्योगधंद्यांचा विकास करून देशांतील आर्थिक विषमता समूळ नष्ट करूं.

अर्थपंडितांनीं व कार्यकर्त्यांनीं ही जी मीमांसा केली आहे तिचा, व विशेषतः विरोधी पक्षांनीं जी भूमिका मांडली आहे तिचा आतां आपणांस परामर्श घ्यावयाचा आहे. कॉंग्रेसवर केलेले सर्व आरोप मान्य केल्यावरहि आपण शांतपणें असा विचार केला पाहिजे कीं, आहे या स्थितींत दुसऱ्या कोणाला यापेक्षां जास्त कांहीं करणें शक्य झालें असतें काय ! उद्योग-पतींवर नियंत्रण घालणें, त्यांच्याविरुद्ध जनतेची अभंग फळी उभारणें, आपल्या संघटनेंत धनबळानें कोणी फूट करूं लागला तर त्यापासून तिचें

रक्षण करणें, आणि एकंदर अर्थक्षेत्र सर्वस्वीं कैचींत ठेवून त्यांत वाटेल ती उलथापालथ घडवून आणून जनतेला कल्याणकारक अशी अर्थव्यवस्था निर्माण करणें, हें कार्य इतकें सुलभ आहे काय, याचा आपण शांतपणें विचार केला पाहिजे.

## शक्याशक्यता

हा विचार करतांना पहिली व अत्यंत महत्त्वाची गोष्ट आपण अशी ध्यानांत ठेविली पाहिजे कीं भांडवलाच्या सामर्थ्यास आळा घालण्यांत, या प्रबळ अशा शक्तीला वेसण घालून तिला राष्ट्रकार्याच्या रथाला जुंपण्यांत जगांत अजून ब्रिटनखेरीज कोणालाहि यश आलेलें नाहीं. एकोणिसाव्या शतकाच्या आरंभाला ब्रिटनमध्यें व त्या शतकाच्या मध्यानंतर अमेरिका, जर्मनी, फ्रान्स, इटली, रशिया, चीन या देशांत औद्योगिक क्रांति होऊन भांडवलदार कारखानदार वर्गाचें प्रभुत्व प्रस्थापित होऊं लागलें आणि जनतेच्या नेत्यांना त्याची जाणीव होतांच, भांडवलदारविरुद्ध कष्टकरी जनता असा हा संग्राम तेव्हांपासून सुरू झाला. या संग्रामांत भांडवली सामर्थ्य सर्वस्वीं पराभूत असें कोठेंहि झालेलें नाहीं, हा विचार आपण केव्हांहि दृष्टीआड करूं नये. या सामर्थ्यावर नियंत्रण घालून आर्थिक समता प्रस्थापित करण्यांत बऱ्याच अंशीं फक्त ब्रिटन यशस्वी झालेलें आहे. पण इटली, फ्रान्स यांसारखीं कांहीं राष्ट्रें या अंतःकलहामुळें कायमचीं दुबळीं झालीं आहेत पोलंड, झेकोस्लोव्हाकिया यांसारखीं कांहीं राष्ट्रें दुबळीं होऊन स्वातंत्र्यालाहि आंचवलीं आहेत. जर्मनी हा मध्यंतरी बलसंपन्न झाला होता. पण तो दण्डसत्तेचा अवलंब करून ! आणि तरी सुद्धां भांडवलाच्या अघोरी वासनांमुळें शेवटीं त्याची वाताहातच झाली. अमेरिकेंत लोकमत अत्यंत जागृत आहे. आणि तेथील कामगारांच्या संघटनाहि अतिशय प्रबळ आहेत. असें असूनहि परवां चार वर्षांपूर्वी तेथील धनिक वर्गानें आपल्या सामर्थ्याच्या जोरावर लोकसभेंत कामगारांच्या संघटनांच्या विरुद्ध कायदे संमत करून घेतले. सध्यां सत्तारूढ असलेल्या डेमोक्रॅटिक पक्षाला भांडवलदारवर्गानें किती पोखरून टाकलें आहे व आपल्या किती लगामी लावलें आहे हें पहाणें आपल्या पुनर्घटनेच्या दृष्टीनें उद्बोधक ठरेल. दोन वर्षांपूर्वी अध्यक्ष ट्रूमन

यांनीं न्यायमूर्ति मर्फी यांना पाचारण करून, आपल्या पक्षांतील घाण धुवून काढण्याची विनंति केली. आपले अधिकारी, आपले सल्लागार, वरिष्ठकनिष्ठ नोकर, अगदीं जवळचे चिटणीस हे सर्व धनवश होऊन वाटेल तो काळा व्यवहार करीत आहेत आणि, त्याला वेळींच आळा घातला नाहीं तर, आपला पक्ष छिन्नभिन्न होऊन जाईल, अशी भीति ट्रूमन यांना वाटूं लागली होती हें याचें कारण आहे. डेमोक्रॅटिक पक्ष असा रोगग्रस्त झाला आहे व त्याचें शुद्धीकरण करण्याचें घाटत होतें, या बातमीमुळें, अमेरिकेंतील रिपब्लिकन पक्ष कांहीं निराळा आहे असें मानण्याचें मुळींच कारण नाहीं. त्याचें शरीर डेमोक्रॅटिक पक्षापेक्षांहि जास्त रोगग्रस्त आहे. अमेरिकेसारख्या जागृत देशांत आज दीडशे वर्षांच्या स्थिरशासनानंतरहि भांडवलदारवर्ग आपलें प्रभुत्व पुन्हां पुन्हां प्रस्थापित करूं शकतो. हा विचार भारतीय जनतेनें सदैव डोळ्यापुढें ठेवून, हा संग्राम अत्यंत कठीण आहे, यांत एखादा पक्ष घसरला तर लगेच त्याच्यावर गहजब करणें अत्यंत अविवेकी-पणाचें होईल, हें ध्यानांत घेतलें पाहिजे.

## चीनची कथा

अमेरिकेची गोष्ट वर सांगितली. रशिया व चीन येथील सुरस व अद्-भूत कथा सांगून कॉंग्रेस सरकारची तेथील सत्ताधाऱ्यांशीं तुलना करण्याची सध्यां चाल पडत आहे. रशियानें भांडवलदार व जमीनदार नष्ट केले. पण त्यासाठीं केवढी घोर हत्या त्यानें केली ! आणि एवढेंहि करून फळ काय ? तर पूर्वीपेक्षांहि तेथला समाज ध्रुवभिन्न झाला. तेथील सत्ताधारी हे पूर्वीच्या भांडवलदारापेक्षां जास्त निर्घृण, जास्त उन्मत्त, जास्त समर्थ व लक्ष पटीनें जास्त स्वार्थलोलुप झाले आणि जगांत आजपर्यंत फक्त पशूंच्याच वांट्याला येणारे–गुलामांच्याहि नव्हे–केवळ पशूंच्याच वांट्याला येणारे मजूरवाडे दोन कोटी लोकांच्या नशिबीं आले ! चीनचें उदाहरण उत्तेजक आहे. पण अजून तेथे औद्योगीकरण व्हावयाचें आहे. भांडवल जमावयाचें आहे आणि मुख्य म्हणजे काळाच्या अत्यंत कठोर परीक्षेला माओच्या पक्षाला बसावयाचें आहे. या परीक्षेच्या तयारींत तो आहे तोंच तेथून परवां एक चमत्कारिक वृत्त आलें आहे तें सांगतों. चीनच्या कम्युनिस्ट पक्षांतील उत्तर-

चीन विभागाचे चिटणीस पो यि पो यांचें पांचशें कम्युनिस्ट कार्यकर्त्यांपुढें भाषण झालें. त्यांत त्यांनीं, चिनी कम्युनिस्ट पक्ष धनवंतांच्या कसा आहारीं चालला आहे, त्याची कथा सांगितली. ते म्हणतात, ' या धनलालसेपासून चीनमधील लोकशासन, लोकसेना व लोकसंघटना—कोणींहि मुक्त नाहीं. कांहीं कम्युनिस्ट कार्यकर्ते अत्यंत भ्रष्ट झाले असून त्यांनीं डाकूगिरी करून राष्ट्रीय संपत्तीचा अपहार चालविला आहे. देशाच्या औद्योगिक पुनर्घटनेला त्यांचीं कृत्यें अत्यंत विघातक आहेत. यामुळे चीनची कष्टकरी जनता असंतुष्ट होऊन आपल्यापासून दूर जात आहे. चीनच्या सर्व विभागांत ही अनीति व अधमपणा चालूं असल्याचीं कम्युनिस्ट अधिकाऱ्यांचींच पत्रें आलीं आहेत. कम्युनिस्ट पक्षाचे अनेक सदस्य भांडवलदारांचे गुलाम झाले असून ते हळूंहळूं चिआंगच्या प्रतिगामी सत्तेकडे झुकत आहेत. खोटे हिशेब ठेवणें, अफरातफर करणें यांत निष्णात असलेले कार्यकर्ते धारेवर धरले जात नाहींत, इतकेंच नव्हे तर, कुशल व चतुर म्हणून त्यांना धन्यवाद मिळतात. या अधोगामी, भ्रष्ट व अत्यंत हीन नीतीविरुद्ध, या भांडवली वर्चस्वाविरुद्ध, आपण निकरानें मोहीम सुरू केली पाहिजे. ' ( भा. ज्यो. ६–१–५२ )

## अनेक आघाड्यांवरील संग्राम

कॉंग्रेसच्या कार्याचें व तिनें धनिकांशीं केलेल्या संग्रामांतील यशापयशाचें मूल्यमापन करतांना देशोदेशींच्या जनतेनें केलेल्या संग्रामांची वर दिलेली हकीकत आपण सारखी मनापुढें ठेवावी. तसें केल्यानें अंतिम निष्कर्ष काढतांना आपण कोणची सावधगिरी बाळगिली पाहिजे, हें ध्यानांत येईल. आणखीहि एक विचार आपण दृष्टीआड करतां कामा नये. कॉंग्रेस सत्तारूढ झाली त्या वेळीं या देशांत विरोधी शक्ति किती होत्या याचा एकदां आपण हिशेब करून पहावा. जवळ जवळ पांचशें संस्थानिक या देशांत होते आणि बंडाळ्या माजवून या देशांत उत्पात घडवून आणणें त्यांना सहज शक्य होतें. मध्यंतरी सौराष्ट्रांतील अत्यंत क्षुद्र गिरासदार व वतनदार यांनीं काय धुमाकूळ घातला हें पाहिल्यावर सत्ताधारी नेत्यांना या बाजूनें धोका गृहीत धरणें प्राप्त होतें याविषयीं दुमत होणार नाहीं.

पाकनिष्ठ मुसलमान ही दुसरी विरोधी आघाडी होती. निजामानें तर सार्वभौमत्वाचेंच तत्त्व पुकारलें होतें. याच मुसलमानांच्या मतानें व सामर्थ्यानें पाकिस्तान जन्मास आलें होतें. हिंदुस्थानहि गिळंकृत करावयाचें अशा मुसलमानांच्या घोषणा चालू होत्या. तेव्हां या आघाडीवर मुकाबला करावा लागेल हें धरून चालणें अवश्य होतें. पाकिस्तानांत हिंदूंच्या कत्तली सुरू झाल्या होत्या. आणि निर्वासितांची या देशांत लाखांनीं आवक सुरू झाली होती. यांत कोठें ठिणगी पडून युद्ध सुरू होतें कीं काय, अशी भीति होती. आणि ती वगळली तरी स्वतंत्रपणेंहि निर्वासितांचा प्रश्न युद्धासारखाच कठीण होता. म्हणजे ती एक आणखी आघाडी होती. याशिवाय आणखी प्रश्न रोज उपस्थित होत होते. शिखांना शिखिस्तान हवें होतें, द्रविडांना द्राविडीस्थान हवें होतें आणि या सर्वांहून भयंकर म्हणजे महात्माजींचा खून झाला होता व त्यांतून कोणते उत्पात होतात याचा अदमास लागणें शक्य नव्हतें. अशा स्थितींत या सर्व आघाड्या संभाळून भांडवलदारांच्या अत्यंत बलाढ्य अशा आघाडीला आव्हान देणें कोणच्या पक्षाला कितपत शक्य झालें असतें, याचा भारतीयांनीं विचार करणें अवश्य आहे. या सर्व शक्ति, या सर्व आघाड्या नीट हाताळल्या गेल्या नसत्या, तर येथें दंगेधोपे, बंडाळ्या, अत्याचार, उत्पात यांना ऊत आला असता. येथें एकच रणधुमाळी माजली असती आणि तींतून अराजक निर्माण होऊन या देशाचीं शकलें शकलें झालीं असतीं. हें सर्व जाणून कॉंग्रेसनें, भांडवली शक्तीला प्रारंभींच डिवचावयाचें नाहीं, जरूर तर तिच्यापुढें शरणागतीहि पत्करावयाची, असें ठरविलें असलें तर, त्यांत बाह्यतः दिसावयाला वचनभंग, कर्तव्यच्युति किंवा तत्त्वभ्रष्टता दिसत असली तरी, तो एक मुत्सद्देगिरीचा डाव होता, असेंच भावी इतिहासकारांना म्हणावें लागेल.

त्यांतूनहि कॉंग्रेसची स्वतःची आघाडी बळकट असती, तर झाली यापेक्षां जास्त प्रगति निःसंशय दिसली असती; पण या आघाडीला प्रत्येक प्रांतांत किती खिंडारें पडलीं आहेत हें मागील प्रकरणांत आपण पाहिलेंच आहे. प्रत्येक प्रांतांतील कॉंग्रेसपक्ष दुही, गटबाजी, अंतःकलह, मत्सर, यांनीं छिन्नभिन्न झालेला आहे. स्थिर शासन एकहि प्रांतांत राहूं शकत नाहीं आणि राजेन्द्रबाबू, नेहरू यांनीं कितीहि निर्भर्त्सना केली, उपदेश

केला तरी त्याची कोणी दखल घेत नाहीं. अशा स्थितींत संग्राम पुकारावयाचा तो कोणाच्या बळावर ? येथील जनता ही लोकशक्ति निर्माण करण्यास कितपत समर्थ आहे हें आपण मागें पाहिलेंच आहे. पस्तीस कोटी लोकांपैकीं जवळजवळ सोळा कोटी लोक शतकानुशतकें माणुसकीच्याहि खालच्या तळावर होते. यांच्यांतून भांडवलदारी सामर्थ्याशीं झुंज घेण्यास अवश्य ती लोकशक्ति निर्माण होण्यास अजून फार अवकाश आहे. या पस्तीस कोटी लोकांतून कॉंग्रेस नांवाचें एक संघटित सामर्थ्य निर्माण झालें आहे, हाच मुळीं जगाच्या इतिहासांतला एक अद्‌भुत चमत्कार आहे. जुनीं शेकडों वर्षांची परंपरा अगदीं निराळी असतांना स्वातंत्र्यप्राप्तीनंतर लगेच निवडणुकी अगदीं खुल्या ठेवून लोकसभेच्या जागांपैकीं जवळजवळ तीनचतुर्थांश जागा जिंकण्याइतका संघटित पक्ष भारतासारख्या विस्तीर्ण देशांत निर्माण होतो, हेंच, तुलनेनें पहातां, एक महदाश्चर्य आहे; अशा तुलनेनें म्हणजे जगाच्या व्यावहारिक दृष्टीनेंच आपण कॉंग्रेसच्या यशापयशाकडे पहाण्यास शिकलें पाहिजे. आपल्या मनांतल्या आकांक्षांशीं तोलून पहाण्याची वृत्ति आपण सोडून दिली पाहिजे.

## जनशक्तीचें पाठबळ ?

ती दृष्टि सोडून व्यवहारी, इतिहासप्रणीत, तुलनात्मक दृष्टीनें आपण विचार करूं लागलों तर आपल्याला हें कळून येईल कीं, भांडवली सत्तेशीं करावयाचा संग्राम हा अखिल जनतेच्या बळावरच करतां येतो. पूर्वी युरोपांत राजसत्तेवर पोपच्या धार्मिक सत्तेचें वर्चस्व असे. तें वर्चस्व झुगारून देण्याचा अनेक राजांनीं प्रयत्न केला. पण प्रारंभीं त्यांना यश आलें नाहीं. त्यांना पुन्हां पुन्हां पोपपुढें शरणागति पत्करावी लागली. कारण त्यांच्या प्रजेच्या मनावर धर्मश्रद्धेचें वर्चस्व होतें. विद्येच्या पुनरुज्जीवनानें तें वर्चस्व नष्ट होतांच पोपचें वर्चस्व नष्ट झालें. भांडवली वर्चस्वाचा प्रकार असाच आहे. धनमोहाला जोंपर्यंत जनता वश आहे तोपर्यंत कोणचाहि पक्ष सत्ताधारी झाला तरी भांडवलाचें वर्चस्व लवमात्र कमी होणार नाहीं. युरोपांतील राजाप्रमाणें सत्ताधारी पक्षाला पुन्हां पुन्हां भांडवलदारांपुढें शरणागति पत्करावी लागेल. कारण त्यांच्याविरुद्ध उभारलेल्या आघाडींत

ते सहज लीलेनें शेंकडों खिंडारें पाडतील. जनतेमध्यें राष्ट्रनिष्ठा, व्यक्तिस्वातंत्र्यप्रेम, लोकसत्तेवरील अनन्यभक्ति, विवेकशीलता व चारित्र्य-संपन्नता या गुणांची वाढ होऊन तिला धनमोह जेव्हां जिंकतां येईल, निदान धनमोहातीत अशा तरुण कार्यकर्त्यांची—राज्यकारभार चालविण्यास, सार्वजनिक व्यवहारांचें सूत्रचालन करण्यास अवश्य तितक्या कार्यकर्त्यांची—पुरेशी संख्या जेव्हां या देशांत निर्माण होईल, तेव्हांच भांडवली सत्तेच्या मगरमिठींतून ही भूमि मुक्त होईल. लोकांची भाविकता, अज्ञान, भाबडेपणा हा पोपच्या धर्मसत्तेचा पाया होता. त्याचप्रमाणें धनमोह हा भांडवली सत्तेचा पाया आहे. तो उखडून निघाल्यावांचून हा संग्राम जिंकणें अशक्य आहे.

जनतेचें बळ, जनताजागृति या सर्वांचा हाच अर्थ आहे. जागृति म्हणजे केवळ हक्काची जाणीव नव्हे. जबाबदारीची जाणीव, आपत्तीची जाणीव, त्या आपत्तीशीं झुंजण्याची सिद्धता, तिचें स्वरूप जाणण्याइतकी विवेकशीलता व वाटेंत येणाऱ्या मोहांना जिंकण्याचें मन:सामर्थ्य—एवढा जागृति या शब्दाचा अर्थ आहे. आणि अशी जागृति झाल्यावांचून औद्योगिक पुनर्घटना, उद्योगधंद्यांचें राष्ट्रीयीकरण, आर्थिक क्षेत्रांतील समता या शब्दांना कसलाहि अर्थ नाहीं. स्वातंत्र्य जसें कायद्यानें देतां येत नाहीं, त्याचप्रमाणें उद्योगधंद्यांचें राष्ट्रीयीकरण कायद्यानें करतां येत नाहीं. राष्ट्रीयी-करण म्हणजे उद्योगधंद्यावरील, अर्थोत्पादनाच्या साधनांवरील राष्ट्राची सत्ता; सरकारची नव्हे. आणि राष्ट्रांतील जनता संघटित, विवेकी व निग्रहानुग्रहसमर्थ नसेल तर राष्ट्रीयीकरण हें कधींहि शक्य होणार नाहीं. एका वर्गाच्या हातून धनदौलत निघून फार तर दुसऱ्या वर्गाच्या हातीं ती जाईल. पण तो दुसरा वर्ग पहिल्यासारखाच भांडवलदार होईल, हा विचार आपण विसरून चालणार नाहीं. कॉंग्रेसमधल्या विघटनेची जी उद्वेगजनक कथा आपण ऐकिली तिच्यावरून, भांडवलदार व कॉंग्रेसजन यांच्यांत मुळांतच कांहीं फरक असतो, ही भ्रामक समजूत आपल्या मनांतून दूर होईल. भांडवलदार हा धनाच्या जोरावर सत्ता काबीज करतो. कॉंग्रेसचे सभासद सत्तेच्या जोरावर धन जिंकूं पहातात. या दोघांवरहि नियंत्रण

ठेवणारी जनता जोंपर्यंत जागृत व समर्थ नाहीं, तोंपर्यंत आहे या स्थितींत कसलाहि बदल घडून येणें शक्य नाहीं.

हें सर्व विवेचन माझ्या तरुण मित्रांच्यासाठीं केलेलें आहे. या भरतभूमीचा उत्कर्ष व्हावा, येथील लोकसत्ता यशस्वी व्हावी, या देशांत सर्व क्षेत्रांत समता प्रस्थापित व्हावी अशा आकांक्षा ज्यांच्या मनांत आज घोळत आहेत आणि त्या आकांक्षांच्या सिद्धीसाठीं आपलें अंग झिजवावें असा ध्येयवाद ज्यांच्या चित्तांत उदित झाला आहे त्यांच्यासाठीं ही मीमांसा केली आहे. त्यांनीं हें ध्यानीं घ्यावें कीं कॉंग्रेसनें या देशांत लोकसत्तेचा एक महान् प्रयोग, एक अभूतपूर्व असा प्रयोग चालविला आहे. एवढ्या मोठ्या प्रमाणावर असा प्रयोग जगांत अजून कोणीं कधींहि केलेला नाहीं. तेव्हां यावेळीं, आपण कांठावर बसून टीकाकाराची किंवा तटस्थ निरीक्षकाची भूमिका न घेतां, त्या प्रयोगांत सामील व्हावें आणि तो कॉंग्रेसचा प्रयोग आहे असें न मानतां, आपला–म्हणजे अखिल भरतभूमीनें चालविलेला–प्रयोग आहे अशा बुद्धीनें त्यांत सहकार्य करावें. यासाठीं कॉंग्रेसचे दोष दृष्टीआड करावे किंवा तिच्या अधःपाताकडे डोळेझांक करावी, असें मला मुळींच म्हणावयाचें नाहीं. उलट, अत्यंत कठोर बुद्धीनें त्याचें परीक्षण करावें, असेंच मला सांगावयाचें आहे. माझा आग्रह एवढाच आहे कीं, मागल्या एका प्रकरणांत सांगितलेली विघटना काय किंवा आतां वर्णिलेली धनवशता काय, हे दोष, हीं पापें, हे रोग केवळ कॉंग्रेसचे नाहींत, आपला अखिल समाजच या रोगांनीं जर्जर झालेला आहे, या भयंकर सत्याचा त्यांनीं विसर पडूं देऊं नये.

## अखिल समाजाचा रोग

कॉंग्रेसचें सरकार ही संस्था किंवा भांडवलदार वर्ग यावरून दृष्टि काढून अन्य क्षेत्रांत त्यांनीं क्षणभर ती वळवावी, म्हणजे माझ्या म्हणण्याची त्यांना प्रतीति येईल. डॉक्टर व त्यांचीं इस्पितळें यांत सध्यां किती बेजबाबदारी, उन्मत्तता, हृदयशून्यता व धनोपासना चालू आहे हें त्यांनीं पहावें. वृत्तव्यवसायामध्यें संपादक, वार्ताहर इ. प्रकारचे लोक धनवंतांच्या हातांतील बाहुलीं कशीं झालीं आहेत तें लक्षांत घ्यावें. क्रिकेटसारख्या राजकाणापासून

सर्वस्वीं अलिप्त असलेल्या क्रीडेच्या क्षेत्रांत किती राजकारण चालतें, कर्णधाराच्या जागा कशा विकल्या जातात इकडेहि त्यांनीं नजर टाकावी. युनिव्हर्सिट्या, खाजगी शिक्षणसंस्था, परीक्षामंडळें, बोर्डें येथें किती अंदाधुंदी आहे, किती फूट व विघटना आहे, विद्यार्थ्यांच्या कल्याणाविषयीं किती काळजी आहे, हेंहि त्यांनीं तपासून पहावें. शेवटीं या तरुण मित्रांनीं स्वतःकडेहि आरशांतून पहाण्याचा प्रयत्न करावा. कॉलेजमध्यें वसतिगृहें, सफरी, संमेलनें यांच्या चिटणीशीच्या महान् पदावर आरूढ झालेले विद्यार्थी, भांडवलदार, कारखानदार, व्यापारी या वर्गांहून निराळ्या वृत्तीचे आहेत काय, याची मनोमन साक्ष त्यांनीं घ्यावी. पैसा हाताळण्याची अगदीं अल्पसंधी, कारभार करण्यापुरता अगदीं क्षुद्र अधिकार व निवडून आल्यामुळें मिळालेली अगदीं शून्यवत् सत्ता, एवढ्या गोष्टींमुळें, सरस्वतीच्या राज्यांत निष्पाप, निरागस अशा वृत्तीनें जे संचरतात अशी लोकांची समजूत आहे, त्यांची दृष्टि किती फिरते, त्यांच्यांत किती कलह माजतात, पक्ष पडतात व त्यांची नीति कोणत्या हीन पातळीला जाते हें त्यांनीं पाहिलें, तर कॉंग्रेसलाच काय पण भांडवलदार, कारखानदार व व्यापारी या वर्गांनाहि नांवें ठेवण्याला आपल्याला अधिकार नाहीं, असें त्यांच्या ध्यानांत येईल.

याचा अर्थ त्यांनीं टीकाच करूं नये असा नाहीं. पण सर्व समाजच भ्रष्ट व अधोगामी झाला आहे, कोणचाहि एक वर्ग या अवकळेंतून मुक्त नाहीं हें सत्य जाणून त्यांनीं टीका केली, म्हणजे त्या टीकेला आत्मनिरीक्षणाचें स्वरूप येईल आणि तसें झालें म्हणजे हें त्यांच्या ध्यानांत येईल कीं, कार्य करावयाचें असलें तर आहे त्या संघटनांत कॉंग्रेस ही संघटनाच सर्वांत जास्त स्वीकरणीय आहे, आणि म्हणून कॉंग्रेसमध्यें शिरून, तिच्या लोकशाहीच्या प्रयोगांत आत्मीयतेनें सहभागी होऊन, या भूमीच्या सर्व अंगांची पुनर्घटना करण्याचा प्रयत्न करणें हेंच धोरण शहाणपणाचें व अंतीं कल्याणकारक होईल. कॉंग्रेस ही या देशांतील एक महान् पुण्याई आहे. आणि सर्व समाज वर सांगितल्याप्रमाणें अनेक रोगांनीं ग्रस्त झाला असतांना तसली दुसरी पुण्याई निर्माण करणें अशक्य आहे. वर निर्देशिलेल्या तुलनात्मक दृष्टीनें त्यांनीं पाहिलें तर अशी एक पुण्याई निर्माण करण्यांत

आपल्याला यश आलें हेंच आपलें भाग्य आहे, हें म्हणणें त्यांना पटूं लागेल. अशा स्थितींत या थोर पुण्याईवर किंचित् काळ आलेलें मालिन्य पाहून त्यांनीं तिच्या प्रभावी सामर्थ्यांचा विसर पडूं देऊं नये. त्यांत आत्मघात आहे. लोकशाही यशस्वी होण्यास स्थिरशासन, परचक्रापासून संरक्षण व अंतर्गत शांतता यांची जरूर असते. गेल्या शंभर दीडशें वर्षांत ज्यांनीं ज्यांनीं लोकसत्तेचे प्रयोग केले त्यांच्यापैकीं एकालाहि हें सिद्ध करतां आलें नाहीं. कॉंग्रेसच्या म्हणजे दादाभाई, रानडे, गोखले, टिळक, महात्माजी, सुभाषचंद्र, मालवीय, मोतीलाल, लजपतराय यांच्या, आणि त्याचप्रमाणें राममोहन, लोकहितवादी, ज्योतिबा फुले, विष्णुशास्त्री, आगरकर, विवेकानंद यांच्या पुण्याईनें हें या देशांत सिद्ध झालें आहे. राष्ट्रपति राजेंद्रप्रसाद, पंडित जवाहरलालजी, सरदार वल्लभभाई यांच्या कर्तबगारीनें तें अजून टिकून राहिलें आहे. लोकशाही सिद्ध करण्यास ही एक अपूर्व संधि आपणांस लाभली आहे. अशा वेळीं कॉंग्रेसमध्यें शिरून या महान् प्रयोगांत या देशांतील तरुण कार्यकर्ते सामील होतील, व ध्येयनिष्ठा, चारित्र्य व त्याग या धनाची पुन्हां समृद्धि करतील, तरच औद्योगिक पुनर्घटना, राष्ट्रीयीकरण, आर्थिक समता इ. या भूमीचीं स्वप्नें साकार होतील. कॉंग्रेस अधोगामी आहे, नीतिभ्रष्ट आहे असें म्हणून आपण दूर उभे राहिलों तर हा प्रयोग अयशस्वी होण्याची सर्व जबाबदारी आपल्यावरच येईल, हें तरुणांनीं विसरूं नये.

---

## प्रकरण बारावें

# सामाजिक पुनर्घटना

## ब्राह्मणब्राह्मणेतर वाद

### (१)

लोकसत्ता ज्या समाजांत यशस्वी व्हावयाची तो समाज संघटित, अभग्न, एकसंघ असा असणें अवश्य आहे. त्या समाजांत अनेक भिन्न घटक असले

तरी आपण सर्व मिळून एक समाज आहों अशी भावना त्या सर्वांच्या मनांत नांदत असली पाहिजे. धर्म, वर्ण, जाति, पंथ, प्रांत इ. अनेक कारणांनीं प्रत्येक समाजांत अनेक भिन्न गट झालेले असतात. ऐतिहासिक कालांत त्यांच्यांत उच्चनीच, जित–जेते अशा प्रकारच्या भेदांनीं शत्रुत्व निर्माण झालेलें असतें. अनेक कारणांनीं निर्माण झालेल्या व पोसलेल्या या भेदभावना समूळ नष्ट करून समाजाच्या सर्व घटकांत आपण सर्व एकाच समाजवृक्षाच्या भिन्न शाखा आहों, आपण सर्व एकच आहों अशी भावना दृढमूल करण्यांत समाजाच्या नेत्यांना ज्या मानानें यश येईल त्या मानानें लोकसत्ता यशस्वी होईल. संस्कृतीचा प्रसार, शिक्षण, राजकीय, धार्मिक, सामाजिक क्षेत्रांतील समता, सम आकांक्षा, सम ध्येयभावना इ. अनेक बंधनांनीं भिन्न समाज एकरूप होतात. पण पुष्कळ वेळां हीं सर्व ऐक्यकारणें असूनहि ' आम्ही भिन्नच आहों ' असा आग्रह भिन्न गटांत टिकून राहतो. तसें झाल्यास हे आग्रह लोकशाहीला मारक होतील. म्हणून समाजाच्या भिन्न घटकांतील भेदभावना नष्ट करून त्यांचे भिन्न अहंकार एकरूप करून टाकणें लोकसत्तेला अत्यंत अवश्य आहे. दृढ व अभंग ऐक्य हा लोकसत्तेचा पाया आहे. कोणच्याहि देशांत अशा ऐक्यावांचून लोकसत्ता यशस्वी झालेली नाहीं व होणार नाहीं.

या दृष्टीनें भारतीय समाजांतील भिन्न घटकांचा आतां विचार करावयाचा आहे. पाश्चात्यांचें राज्य या भूमींत येण्यापूर्वी हा समाज अनंत भेदभावनांनीं छिन्नभिन्न झालेला होता. आणि अत्यंत दुःखाची गोष्ट ही कीं, तसा तो रहावा हेंच तत्त्वज्ञान या समाजानें शेकडों वर्षें अंगीकृत केलें होतें. पाश्चात्य विद्येचा प्रसार येथें होऊं लागतांच येथील समाज–धुरीणांना याची जाणीव होऊन प्रथम तें घातक तत्त्वज्ञान नष्ट करण्याचा उद्योग त्यांनीं हातीं घेतला. त्यांच्या त्या प्रयत्नांचें गेल्या अनेक प्रकरणांतून विवेचन केलें आहे. आतां गेलीं शंभर सवाशें वर्षें चालू असलेल्या या प्रयत्नांच्या यशाचें मापन व मीमांसा करावयाची आहे. त्या प्रयत्नांचें एक महान् फल म्हणजे स्वातंत्र्य हें आपल्या पदरांत पडलें आहे. पण त्यांच्या साह्यानें आपला समाज एकसंध, एकजीव व अभंग करून येथील लोकसत्ता यशस्वी करण्याच्या दृष्टीनें आपली किती प्रगति झाली आहे त्याचा विचार झाला पाहिजे.

आपल्या समाजांत राजकीय व आर्थिक कारणांनीं निर्माण झालेल्या भेदांचा व विघटनेच्या कारणांचा विचार आपण गेल्या दोन लेखांत केला आहे. आतां सामाजिक व धार्मिक कारणांनीं निर्माण झालेल्या विघटनेचा विचार करावयाचा आहे.

## तीन भेद

ब्राह्मणब्राह्मणेतर, स्पृश्यास्पृश्य व हिंदुमुसलमान हे प्रमुख भेद या क्षेत्रांत येतात. या भेदांचें निर्मूलन करण्याचे प्रयत्न या भूमींत अखंड चालू आहेत. ते यशस्वी होत आहेत, पुष्कळ अंशीं झाले आहेत असें कधीं कधीं वाटतें. पण कधीं असे प्रसंग, अशा घटना घडतात कीं या भेदभावनांना पहिल्यापेक्षांहि उग्र रूप येत आहे कीं काय अशी शंका येऊं लागते. म्हणूनच यांचा फार खोलवर विचार करणें अवश्य आहे. या भेदांतून निर्माण होणारा दूरीभाव, तज्जन्य कटुता व त्यांतून कधीं कधीं निर्माण होणारे कलह हे नाहींसे झाल्यावांचून भारतीय समाज एकसंध व अभंग होणार नाहीं. आणि तसें झाल्यावांचून भारताची लोकसत्ता यशस्वी होण्याची आशा धरतां येणार नाहीं.

वर उल्लेखिलेल्या तीन भेदांपैकीं, ब्राह्मणब्राह्मणेतर या भेदाचा विचार प्रथम करावयाचा आहे. नर्मदेच्या दक्षिणेस ब्राह्मणब्राह्मणेतरवादानें निर्माण झालेली कटुता मध्यंतरी अगदीं विकोपाला गेली होती. आणि आजही हा वाद शमल्यासारखा दिसत असला तरी उभय पक्षीयांच्या मनांतील परस्पराविषयींचे दंश कमी झाले आहेत, असें म्हणण्यास फारशी जागा आहे, असें वाटत नाहीं. तेव्हां ब्राह्मण आणि ब्राह्मणेतर यांच्यांतील या भेदाचीं मूलकारणें तपासून त्यांचें निर्मूलन करून त्यांच्यांत समभूमि निर्माण होण्याची शक्यता कितपत आहे हें पाहिलें पाहिजे.

महात्मा ज्योतीबा फुले यांनीं सत्यशोधक समाजाची स्थापना केल्या-पासून म्हणजे म्हणजे जवळजवळ गेलीं पाऊणशें वर्षें महाराष्ट्रांत हा वाद धुमसत आहे. कोल्हापुरास शाहू छत्रपति यांना अधिकारसूत्रें प्राप्त झाल्यापासून म्हणजे या शतकाच्या आरंभापासून या वादाला जास्तच तीव्रता येऊं लागली. आणि १९२० सालीं ब्राह्मणेतरांची प्रत्यक्ष चळवळ सुरू

झाली, तेव्हां या वादाच्या ज्वाळा खूपच भडकल्या. मद्रासमध्यें साधारण याच कालखंडांत हा वाद उद्‌भवला व पोसला आहे. डॉ. नायर यांच्या ब्राह्मणेतर पक्षांचें नांव जस्टिसपार्टी असें होतें. मॉंटेग्युचेम्सफर्ड यांनीं राजकीय सुधारणांचा नवा हप्ता देऊं करतांच महाराष्ट्रांत ह्या वादाला उग्र रूप आलें; त्याचप्रमाणें मद्रास प्रांतांतहि त्याच वेळीं व त्याच कारणानें यानें उग्ररूप धारण केलें. या पाऊणशे वर्षांच्या काळांत अनेक ब्राह्मणेतर पंडितांनीं व कार्यकर्त्यांनीं आपल्या पुस्तकांतून आपली भूमिका विशद केली आहे. या वादाचें विवेचन करण्यासाठीं त्या पुस्तकांतून ती त्यांची भूमिका समजावून घेणें अगत्याचें आहे. ज्योतिबा फुलें यांनीं 'गुलामगिरी' या आपल्या पुस्तकांत आपली भूमिका स्पष्ट करून सांगितली आहे. स्वामी धर्मतीर्थजी महाराज यांचा 'दि मीनेस ऑफ हिंदु इंपिरियालिझम' या नांवाचा ग्रंथ याच हेतूनें लिहिलेला आहे. स्वामी मूळचे मलबारचे मोठे कार्यकर्ते होते. पुढें लाहोरच्या हिंदु मिशनरी सोसायटीचे ते अध्यक्ष झाले. त्यांनीं आपला ग्रंथ १९४१ सालीं प्रसिद्ध केला. महात्मा फुले यांच्या व स्वामींच्या मतांत पुष्कळसें साम्य आहे. फरक एवढाच कीं, फुले यांनीं नुसतीं विधानें केलीं आहेत, मतें मांडलीं आहेत तर स्वामींनी अर्वाचीन पांडित्याच्या सर्व साधनांनीं आपला ग्रंथ भूषविला आहे. प्रा. अण्णा बाबाजी लठ्ठे यांनीं कोल्हापूरचे राजर्षि शाहू छत्रपति यांचें चरित्र लिहिलें आहे. त्यांत त्यांनीं या वादाची सांगोपांग चर्चा केली आहे. छत्रपति शाहू ब्राह्मणेतर चळवळीचे अध्वर्यु असल्यामुळें हा ग्रंथ प्रमाणभूत मानण्यास हरकत नाहीं. 'ब्रिटिश साम्राज्याचा उदय' हें लठ्ठे यांचें दुसरें छोटेसें पुस्तक आहे. त्यावरूनहि ब्राह्मणेतरांच्या भूमिकेची कल्पना येते. नागपूरचे काशीराव बापूजी देशमुख यांनीं 'क्षत्रियांचा इतिहास' या ग्रंथाच्या तीन खंडांत ऐतिहासिक व तात्त्विक चर्चा करून ब्राह्मणेतर पक्षांचें तत्त्वज्ञान सांगितलें आहे. डॉ. आंबडेकर यांनीं 'हू वेअर दि शूद्राज' हा ग्रंथ अलीकडेच लिहिला आहे. त्यांत एका क्षत्रिय शाखेच्या ऱ्हासाचीच मीमांसा असल्यानें त्यांतूनहि या विषयावर बराच प्रकाश पडतो. श्री. रा. केशव सीताराम ठाकरे—प्रबोधनकार हे थोर लेखक व संपादक महाराष्ट्रांत विश्रुत आहेत. 'कोदण्डाचे टणत्कार,' 'संस्कृतीचा संग्राम' व 'शेतकऱ्यांचें

स्वराज्य ' या त्यांच्या पुस्तकांत त्यांनीं ब्राह्मणब्राह्मणेतर या विषयाबद्दल आपले विचार आपल्या अत्यंत सडेतोड पद्धतीनें सांगितलेले आहेत. ब्राह्मणेतरांची भूमिका विशद करण्यासाठीं आधारभूत म्हणून घेतलेले मुख्य असे हे ग्रंथ आहेत. यांतील ठाकरे यांचीं पुस्तकें जरा निराळ्या कोटींतील आहेत. त्यांची विचारसरणी इतरांच्यापेक्षां जरा जास्त व्यापक, थोडी जास्त उदार व इतरांच्याबरोबर स्वतःच्या दोषांचीहि कसून तपासणी करणारी अशी आहे. वरील इतर ग्रंथांविषयीं पुढें जीं विधानें केलीं आहेत तीं कोठें कोठें त्यांच्या पुस्तकांना लागू पडणार नाहींत.

## ब्राह्मणांचें चित्र

या सर्व ग्रंथांवरून ब्राह्मणेतर पक्षाची भूमिका पाहूं लागतांच या थोर पंडितांच्या मनांत अगदीं अग्रभागीं असलेला जो पहिला सिद्धान्त आपणांस दिसून येतो तो हा कीं, वेदकालापासून आज १९५४ सालपर्यंत गेल्या सहासात हजार वर्षांच्या काळांत हिंदुस्थानावर जेवढे अनर्थ कोसळले, ज्या आपत्ति ओढवल्या, विनाशाचे जे प्रसंग गुदरले, येथें धार्मिक, सामाजिक, राजकीय—कोणच्याहि क्षेत्रांत जी अवनति झाली त्या सर्वाला येथले ब्राह्मण कारणीभूत आहेत. या लेखकांत कांहीं मतभेद आहेत. कांहीं विरोधी मतें यांनीं सांगितलीं आहेत; पण ब्राह्मण हा दुष्ट, कारस्थानी, स्वार्थी, अधम, नीच, स्वजनद्रोही, स्वदेशद्रोही, धर्महीन, ध्येयहीन, तत्त्वशून्य, केवळ संधिसाधू, हृदयशून्य असा आहे—हजारों वर्षें असा आहे आणि अजूनहि त्याच्यांत फरक झालेला नाहीं, याबद्दल कोणाच्याहि मनांत शंका नाहीं. याबद्दल त्यांच्यांत मतभेद नाहीं. ' आज तीन हजार वर्षें भटांचें राज्य चालूं आहे. त्यांत शूद्र व अतिशूद्र यांचे हाल होत आहेत. भट लोकांनीं येथल्या लोकांना ज्ञानहीन केलें, स्वतः खोटे ग्रंथ लिहून शूद्रांस फसविलें.' अशीं महात्मा फुले यांचीं मतें आहेत. (गुलामगिरी—प्रस्तावना) 'प्रारंभींच्या आर्यकाळापासून तहत आजपर्यंत भिक्षुकशाहीनें स्वतःच्या फाजील वर्चस्वाकरितां व स्वार्थाकरितां क्षत्रियांशीं व देशाशीं निमकहरामी केली व द्वेषबुद्धीची विषारी कारस्थानें केलीं.', ' शंकराचार्यानें भेदप्रधान भिक्षुकी हिंदुधर्माच्या नांवाखालीं अखिल ब्राह्मणेतर जनतेला ब्राह्मणांचे गुलाम

बनविलें व क्षत्रियांवर भिक्षुकी श्रेष्ठत्वाचा बोळा फिरवून व जातीभेद उत्पन्न करून हिंदी राष्ट्र रसातळास नेलें.' असा अभिप्राय काशीराव देशमुख यांनीं दिला आहे. (क्षत्रियांचा इतिहास, खंड १ ला, पृ. २४८–२५० ) 'वास्तविक पाहिलें तर मनाचा उदारपणा आजपर्यंत ब्राह्मणांनीं कधींहि कोठेंहि दाखविलेला नाहीं. संकुचित वृत्ति हेंच त्यांचें ब्रीद. उदार वृत्ति व मनाचा मोकळेपणा हा क्षत्रियांचाच मनोधर्म.' ( संस्कृतींचा संग्राम–ठाकरे पृ. १६. ) 'सामान्य नियमाला अपवाद असतात हें तत्त्व लक्षांत ठेवून असें म्हणावयास हरकत नाहीं कीं, ब्राह्मण–मग तो चित्पावन असो, यजुर्वेदी असो किंवा कोणीहि असो, त्याच्या आपमतलबाला किंचित् धक्का लागण्याची वेळ आली कीं तो सर्व देशबंधुत्वाचें नातें विसरून ब्राह्मणेतरांवर सापाप्रमाणें उलटण्यास कमी करणार नाहीं' (कोदंडाचे टणत्कार–पृ. १३७.) अशा तऱ्हेचीं श्री. ठाकरे यांचीं मतें सुप्रसिद्धच आहेत. स्वामी धर्मतीर्थजी महाराज, प्रा. लठ्ठे, डॉ. आंबेडकर यांनीं याच तऱ्हेचीं मतें मांडलेलीं आहेत.

वरील अवतरणें ब्राह्मणेतर ब्राह्मणांचीं भयंकर निंदा करतात अशी तक्रार करण्यासाठीं दिलेलीं नाहींत. तशी तक्रार करण्याचा, किंवा या विधानाबद्दल संताप येण्याचा अधिकार ब्राह्मणांना मुळींच नाहीं. याच पापानें त्यांचेहि हात धुतलेले आहेत. 'कलियुगांत क्षत्रियच नाहींत, फक्त ब्राह्मण व शूद्रच आहेत' हें मत ब्राह्मण शेंकडों वर्षें कवटाळून बसले होते. अनेक थोर क्षत्रिय वंश भारताच्या रक्षणाचें व प्रजापालनाचें कार्य करीत असल्याचें डोळ्यास दिसत असूनहि त्या सर्वांना शूद्र लेखणाऱ्या ब्राह्मणांच्या ठायीं समाजहितदृष्टि कितपत असेल तें दिसतेंच आहे. अर्वाचीन काळांतहि राजवाड्यांच्या सारख्या पंडिताला एकाद्या सामान्य चिटोऱ्याच्या आधारें सर्व कायस्थ प्रभूंची निंदा करण्यास दिक्कत वाटत नाहीं. तेव्हां दुसऱ्या सर्व जातींबद्दल अत्यंत हीन उद्गार काढणें हें आपल्या सर्वसमाजाच्या पिंडांतच आहे. ब्राह्मणांना तर याविषयीं राग येऊं देण्याचा काडीमात्र अधिकार नाहीं. यामुळें त्या हेतूनें हीं अवतरणें दिलेलींच नाहींत. यांत ब्राह्मणांविषयीं प्रगट केलेलीं मतें व पुढें दिलेला तपशील यांतून क्षत्रिय, वैश्य व इतर

ब्राह्मणेतर यांच्याबद्दल जो अभिप्राय प्रगट होतो त्याच्याकडे मला वाचकांचें लक्ष वेधावयाचें आहे.

## क्षत्रियांत दुही माजविली

या सर्व ब्राह्मणेतर पंडितांच्या मतें आपलें वर्चस्व अबाधित राखण्यासाठीं ब्राह्मणांनीं जें अनर्थ घडवून आणले त्यांतील पहिला मोठा अनर्थ हा कीं ब्राह्मणांनीं क्षत्रियाक्षत्रियांत प्रत्येक वेळीं दुही माजविली व त्यांच्यांत आपसांत युद्धें घडवून आणून अखिल क्षत्रिय समाजाचा नाश करून टाकला. राम—रावण, कंस—कृष्ण, कौरव—पांडव हे सर्व ज्योतिबा फुले यांच्या मतें देवभोळे क्षेत्रपति होते. ब्राह्मणांनीं त्यांच्यांत तंटे माजवून त्यांचा नाश केला. स्वामी धर्मतीर्थजी महाराज यांचा असाच आरोप आहे. त्यांच्या मतें ब्राह्मणांनीं कौरवपांडवांपासून आजच्या कॉंग्रेसच्या संघटनेपर्यंत हेंच धोरण कायम ठेविलें आहे. कौरवपांडवांत युद्ध घडवून त्यांचा नाश ब्राह्मणांनीं केला; दशरथ व रामचंद्र यांच्यांत वितुष्ट आणून रामाला हांकून देण्यास दशरथास भाग पाडलें; इतकेंच नव्हे तर पुढें सीतेशी घटस्फोट घेणें ब्राह्मणांनींच रामाला भाग पाडिलें. सीता जनकाची मुलगी. आणि जनक ब्राह्मणविरोधी! म्हणून त्यांनीं हा सूड घेतला. स्वामी म्हणतात, ‘ अगोदरच ब्राह्मणांच्या कारस्थानामुळें रामाचें जीवित उत्सन्न झालेलें होतें. म्हणून त्यांच्याशीं पुन्हां विरोध नको या बुद्धीनें रामानें आपल्या मनाविरुद्ध सीतेचा बळी दिला.’ ( मीनेस ऑफ हिंदु इंपिरियालिझम पृ. ६१—६७ ) बौद्ध धर्मांतहि ब्राह्मणांनींच फूट पाडली. ब्राह्मण स्वतः बौद्धधर्मांत शिरले व सूक्ष्म कारस्थानें करून, आपल्या दुष्ट बुद्धिसामर्थ्याचा उपयोग करून, ब्राह्मणांनीं तो धर्म रसातळास नेला. कारण, स्वामींच्या मतें, तो धर्म समतावादी असून खऱ्या अर्थानें राष्ट्रीयधर्म होता. ( पृ. ८१ ते ८७ ) बुद्धधर्माचें हिंदुस्थानावर चवदाशे वर्षें वर्चस्व होतें असेंहि स्वामींचें मत आहेच. क्षत्रियांत फूट पाडून त्यांचा नाश घडविणें हें व्रत ब्राह्मणांनीं पुढेंहि चालविलें होतें. कौटिल्य नांवाच्या ब्राह्मणानें चंद्रगुप्ताकरवीं शिकंदराला बोलाविलें. मगधाचा त्याला नाश करावयाचा होता. पण शिकंदर परत गेला. तेव्हां त्यानें चंद्रगुप्ताकरवीं नंदकुलाचा नाश करविला.

पुढें त्याचा नातू अशोक हा बौद्धधर्माचा पुरस्कार करू लागला तेव्हां ब्राह्मणांनीं पुष्यमित्राकडून त्याच्या वंशाचा नाश करविला. प्रा. आण्णा बाबाजी लठ्ठे यांचें याचप्रकारचें मत आहे. सातारा व कोल्हापूर या भोसल्यांच्या दोन शाखांत वैर धुमसत ठेवण्याचें कार्य पेशव्यांनीं केलें. येवढी मोठी दुफळी घडवून आणण्यापासून पुण्याला १९२० सालीं भवानी पेठेंत श्रीमंत शाहू छत्रपती यांनीं घेतलेल्या सभेंत व पुणें म्युनिसिपालिटींत १९२५ सालीं महात्मा फुले यांच्या स्मारकासाठीं भरलेल्या सभेंत ब्राह्मणेतरांत फूट पाडून कलागत लावून देण्याच्या लहान फाटाफुटीपर्यंत आणि वेद कालापासून तहत आजपर्यंत ब्राह्मण हा क्षत्रियांत फूट पाडून त्यांचा नाश घडवीत आहे असें ब्राह्मणेतर पक्षाच्या पंडितांचें मत आहे.

ब्राह्मणेतर पक्षानें ही जी भूमिका स्वीकारली आहे तिचा नव्या तरुण ब्राह्मणेतरांनीं शांतपणें विवेकानें विचार करावा अशी माझी त्यांना विनंति आहे. या भूमिकेमुळें ब्राह्मणांवर किती अन्याय होतो किंवा ऐतिहासिक सत्याचा किती अपलाप होतो या दृष्टीनें विचार करावा असें माझें सांगणें नाहीं. विचार अशा दृष्टीनें करावा कीं, ही भूमिका पत्करली तर हिंदुस्थानांत अत्यंत पराक्रमी, धीमान्, प्रज्ञावंत, असा जो क्षत्रियवर्ग व श्रीरामचंद्र, श्रीकृष्ण, चंद्रगुप्त, शिवछत्रपति यांसारखे जे त्यांतून निर्माण झालेले भारताचे महापुरुष त्यांच्याविषयीं काय अभिप्राय प्रगट होतो ? ब्राह्मणांवर निंदेचा भडिमार करतांना या ब्राह्मणेतर लेखकांनीं क्षत्रिय व एकंदर ब्राह्मणेतर जनता यांना कोणच्या पातळीवर आणून सोडलें आहे याचा विचार ब्राह्मणेतर तरुणांनीं करावा. कौरव, पांडव, श्रीकृष्ण, रामचंद्र, चंद्रगुप्त, हे महापुरुष दुसऱ्यानें ज्यांना सहज फसवावें, भरीं घालावें, चिथावून द्यावें, आणि हा आपणांस फसवीत आहे हें ज्यांना कळूं नये असे होते काय ? ब्राह्मणांनीं चिथावल्यामुळें कौरवपांडवांचें युद्ध जुंपलें असतें तर तें थांबविण्याची संधि शेवटीं आली होती. अर्जुन 'मीं लढत नाहीं' असें म्हणत होता. त्यावेळीं श्रीकृष्णाला तो अनर्थ सहज टाळतां आला असता. का श्रीकृष्णालाहि ब्राह्मणांचें कारस्थान कळण्याइतकी बुद्धि नव्हती ? आणि त्यानें गीता सांगितली ती स्वतःच्या प्रेरणेनें नव्हे काय ? तिच्यामुळें शेवटीं लढाईची प्रेरणा मिळाली. तेव्हां तीहि स्वतःच्या मनांत नसतांना

ब्राह्मणांच्या आग्रहाला बळी पडून कृष्णानें अर्जुनाला सांगितली काय ! सर्व अनर्थाला कारण ब्राह्मण झाले, आपल्यावर मुळींच जबाबदारी नाहीं, अशी भूमिका ब्राह्मणेतरांना घ्यावयाची आहे. पण ती घेतांना आपण दुसरें काय पत्करीत आहोंत याचा ते विचार करीत नाहींत असें वाटतें. क्षत्रियाला स्वतःची बुद्धि नाहीं, निश्चय नाहीं, अवलोक नाहीं ही बैठक ते पत्करीत आहेत. ब्राह्मण म्हणाले, लढा—लढले. ते म्हणाले, राणीला हाकलून द्या—दिली. मुलाला वनवासात पाठवा—पाठविला. असें म्हणण्यांत क्षत्रियांची केवढी मानहानि आहे ! आणि नुसती मानहानि नाहीं. क्षत्रियांच्या थोर चारित्र्यावर यानें बोळा फिरविला जातो. रामचंद्रानें अत्यंत उदात्त ध्येयानें सीतेचा त्याग केला होता. अशाच उदात्त धर्मकल्पनेनें तो पित्राज्ञा मानून वनवासांत गेला होता. आणि रामाचें रामत्व सर्व यांत आहे. त्याच्या व्यावहारिक युक्तायुक्ततेबद्दल कितीहि मतभेद असला तरी त्याची भव्योदात्त ध्येयनिष्ठा ही अमान्य करतां येणार नाहीं. पण ब्राह्मणांच्या जुलमामुळें दशरथानें त्याला हाकललें व तो गेला, आणि सीतेलाहि त्यानें ब्राह्मणांच्या जुलमामुळें दूर केलें असा त्याच्या कृत्याचा अर्थ बसविला तर त्यांत ब्राह्मणावर भडिमार करण्याचें श्रेय जरी मिळालें तरी रामचंद्राला व एकंदर क्षत्रियवर्गाला आपण कोणत्या पातळीवर आणून ठेवीत आहोंत याचा विचार ब्राह्मणेतर पंडितांनीं केला पाहिजे.

## जातिभेद निर्माण केले

ब्राह्मणांनीं जातीभेद निर्माण केले, समाजांत उच्चनीचता प्रसृत केली आणि हिंदुसमाजांत पराकाष्ठेची विषमता रूढ केली हा दुसरा अनर्थ होय. ब्राह्मणांच्या माथीं हें जातिभेदाचें अपश्रेय ठेवतांनाहि ब्राह्मणेतर पंडितांनीं वरील प्रकारच्या कोटिक्रमाचाच अवलंब केला आहे. आणि त्यामुळें क्षत्रिय राजवंशाची वरीलप्रमाणेंच विचित्र अवस्था होत आहे. काशीराव देशमुख यांनीं क्षत्रियांच्या इतिहासांत जातिभेद निर्मितीचें पुढीलप्रमाणें वर्णन केलें आहे. जातिभेदाचा विषम धर्म शंकराचार्यानें निर्माण केला. त्यापूर्वी वैदिक धर्म व आर्य धर्म हे समतेचे धर्म होते; पण आपलें वर्चस्व त्यांत प्रस्थापित होत नाहीं म्हणून ब्राह्मणांनीं जातिभेदाचा धर्म केला. त्याला राजाश्रय पाहिजे

म्हणून शंकराचार्य अबूचे प्रमार क्षत्रिय राजे यांच्याकडे गेला. व माझा हा धर्म तुम्ही प्रस्थापित करा अशी त्यानें प्रार्थना केली. क्षत्रिय हे जात्याच उदार. त्यांचें अंतःकरण फुलासारखें नाजुक. त्यामुळें या ब्राह्मणाची दया येऊन त्यांनीं त्याचा धर्म प्रस्थापित करण्याचें मान्य केलें. मग त्यांनीं प्रतिहार, चालुक्य, चव्हाण यांना नव्या हिंदुधर्माच्या प्रसाराची कल्पना सांगितली. त्यांना हें मान्य नव्हतें. पण प्रमार फार मोठे असल्यामुळें त्यांना विरोध करण्याची हिंमत कोणाला झाली नाहीं. मग त्यांनीं बौद्धधर्मीयांचा पाडाव करून त्या धर्माचा धुव्वा उडविला. हा जो नवा हिंदुधर्म त्यानेंच हिंदुस्थानचा नाश झाला. याच्या प्रसाराचा पहिला आशीर्वाद प्रमार, प्रतीहार, चालुक्य, चव्हाण आदि क्षत्रिय कुलोत्पन्न राजांनी दिला होता. हें सांगून देशमुख म्हणतात ' ही गोष्ट क्षत्रियांच्या उदारतेची व धर्मस्थापक वृत्तीची साक्ष पटवीत आहे. क्षत्रिय वृत्ति व क्षात्र तेज आणि ब्राह्मणी वृत्ति व भिक्षुकी भावना यांतील महदंतर तिच्यावरून दृष्टोत्पत्तीस येतें.' (क्षत्रियांचा इतिहास. खंड १ ला. पृ. १०२–१०७)

स्वामी धर्मतीर्थजी यांनीं अशाच प्रकारची मीमांसा केली आहे. आर्य धर्मांत आपलें वर्चस्व प्रस्थापित करण्यासाठीं ब्राह्मणांनीं आपली निराळी जात केली व नंतर सर्वच समाजांत त्यांनीं उच्चनीचता रूढ केली. या कामीं कांहीं क्षत्रिय राजांनीं ब्राह्मणांना साह्य केलें हें स्वामींना मान्य आहे. (मीनेस ऑफ हिंदु इंपिरियालिझम पृ. ४५–४६) पुढें बौद्धधर्मानें समतेचा पुकारा केला. त्यावेळीं ब्राह्मण त्या धर्मांत शिरले व त्यांनीं तेथेंहि जातिभेद रूढ करून त्या धर्माचा विनाश घडवून आणला. या ठिकाणीं अशी शंका येईल कीं बौद्ध धर्मगुरु व बौद्ध धर्मीय राजे या वेळीं काय करीत होते ? स्वामीजींचें उत्तर असें कीं त्यांनीं उदारपणानें ब्राह्मणांच्या या जातिभेदाकडे दुर्लक्ष केले. (पृ. १२७) एके ठिकाणीं तर स्वामीजींनीं असें म्हटलें आहे कीं स्वतः गौतमबुद्ध ब्राह्मणांचा पक्षपात करीत असे. तो त्यांच्याबद्दलच्या आदरानें नव्हे तर भीतीनें ! (पृ. १०२) त्यांच्यामतें त्या काळच्या सर्व राजांना ब्राह्मणांची दहशत वाटे. (पृ. १०६) जो राजा ब्राह्मणधर्माचा पुरस्कार करणार नाहीं त्याच्या राज्यावर ब्राह्मण संकटें आणीत. बौद्ध राजा गादीवर आला कीं त्याच्यावर परचक्र आणून ब्राह्मण

त्याचा नाश करीत. ( पृ. ११७–१२० ) आणि यामुळें बुद्ध व अशोक-सुद्धां या बलाढ्य ब्राह्मण खानदानी वर्गाशीं उघड विरोध करण्याचें टाळीत आले असले पाहिजेत. स्वामीजींच्या मतें रजपूत हे कोणी परकीय जमातींचे लोक होते. त्यांना ब्राह्मणांनीं क्षत्रियत्व दिलें. आणि मग या नव्या क्षत्रियांनीं सर्व देश ब्राह्मणांच्या पायाशीं गुलामासारखा आणून ठेवला. ( पृ. १२८–१२९ ) अ. बा. लठ्ठे यांच्या मतें ब्राह्मण व क्षत्रिय यांच्या दीर्घकालीन संघर्षांत शेवटीं आठव्या शतकाच्या सुमारास क्षत्रिय रजपूत हे ब्राह्मणांपुढें नमले. तेथून पुढें त्यांच्या अंगीं पराक्रम नव्हता असें नाहीं; पण ते केवळ ब्राह्मणांचे भाडोत्री शिपाई झाले. ध्येयनिष्ठा, उदात्तता यांचा त्यांच्या ठायीं लोप होऊन ते केवळ ब्राह्मणांचें एक हत्यार बनून राहिले. ( शाहू छत्रपति चरित्र, खंड १ ला, पृ. १६८ ).

## क्षत्रियांचें चित्र.

जातिभेदनिर्मितीची ब्राह्मणेतर पंडितांनीं केलेली मीमांसा पाहिली म्हणजे एक गोष्ट स्पष्ट होते. रजपूत, प्रमार, प्रतिहार, चालुक्य, चव्हाण हे सर्व क्षत्रियवंश व बुद्धकाळांतील इतर राजवंश या सर्वांनीं जाणूनबुजून जातिभेद प्रस्थापित करण्याचें व तो दृढमूल करण्याचें कार्य केलें आहे, हें या सर्व पंडितांना मान्य आहे; पण क्षत्रियांनीं हीं कृत्यें ब्राह्मणांच्या प्रेरणेनें केलीं असें त्यांचें मत आहे. विषमतेच्या धर्मामुळें अखिल हिंदु समाजाचा नाश होईल, राष्ट्र रसातळाला जाईल हें त्या सर्वांना दिसत होतें. पण कोणीं दयाबुद्धीनें, कोणी भीतीनें, कोणी अन्य कांहीं थोर वा हीन हेतूनें त्या धर्माच्या प्रस्थापनेसाठीं तरवार उपसली. ब्राह्मणांनीं आमच्यांत दुही माजवली आणि आम्ही भोळेभाबडे असल्यामुळें आपसांत लढलों, या भूमिकेप्रमाणेंच जातिभेदधर्मप्रस्थापनाच्या समर्थनार्थ अंगिकारलेली ही दुसरी भूमिकाहि क्षत्रियांना अपमानकारक व अनर्थावह आहे. प्राचीन काळच्या क्षत्रियांना एका जबाबदारींतून मुक्त करतांना हे पंडित त्यांच्यावर दुसरे वाटेल ते आरोप करीत आहेत. भाडोत्रीपणा, कमालीचा अविवेक,

भेकडपणा, ध्येयशून्यता हे अतिशय निंद्य गुण हे पंडित त्यांच्या अंगीं अभावितपणें चिकटवीत आहेत. ही भूमिका कितपत श्लाघ्य आहे ?

आज या ब्राह्मणेतर पंडितांचें ब्राह्मणांविषयीं अत्यंत हीन मत आहे. मागल्या काळच्या अनेक थोर क्षत्रिय वीरांचें मत तसें नव्हतें. पण त्यांना तें मतस्वातंत्र्य देण्यास हे पंडित तयार नाहींत. मागल्या काळीं ज्यांनीं ज्यांनीं ब्राह्मणांविषयीं आदरभाव व्यक्त केला व त्यांना वंद्य मानलें त्या सर्व क्षत्रिय वीरांची वाटेल ती निंदा करण्यास हे पंडित कमी करीत नाहींत. 'हू वेअर दि शूद्राज्' हा डॉ. आंबेडकरांचा ग्रंथ पहा. त्यांच्या मतें शूद्र हा शब्द आजच्याप्रमाणें हीनजातिवाचक नव्हता. शूद्र हें एका थोर क्षात्रिय वंशाच्या शाखेचें नांव होतें. सूर्यवंशीय राजे ही ती शाखा होय. वसिष्ठ हे या वंशाचे गुरु. पण पुढें ब्राह्मण फार गर्विष्ठ झाले; ते क्षात्रियांना तुच्छ लेखूं लागले. तें सूर्यकुलांतल्या राजांना सहन होईना. म्हणून त्यांनीं ब्राह्मणांविरुद्ध जाऊन त्यांच्यावर अत्याचार केले. तेव्हां ब्राह्मणांनीं सूडबुद्धीनें सूर्यवंशीय राजांचा उपनयनसंस्कार करण्याचें नाकारलें. आणि उपनयन नाहीं म्हणजे द्विजत्व नाहीं, असा प्रकार होऊन या सूर्यवंशीय शूद्र राजांचा अधःपात झाला. ते आपल्या श्रेष्ठपदावरून खालीं आले. आंबेडकरांच्या ग्रंथाचा तात्पर्यार्थ असा आहे. आतां त्यांच्या या सिद्धांतावर अनेक शंका येतील. त्यांचें निरसन करतांना व ब्राह्मणांवर भडिमार करतांना आंबेडकर क्षात्रियांविषयीं काय अभिप्राय प्रगट करतात तें पहा. सूर्यवंशीय राजांना ब्राह्मणांचा उन्मत्तपणा सहन होईना म्हणून ते त्यांच्याविरुद्ध गेले. मग इतर वंशांतल्या—चंद्रवंश, हैहय वंश—या वंशांतल्या राजांनीं हेंच धोरण कां अवलंबिलें नाहीं, ते ब्राह्मणाचा आदर कां करीत राहिले, असा प्रश्न येतो. आंबेडकर म्हणतात हे सर्व राजे नेभळे, नाकर्ते, स्वाभिमानशून्य असे होते. चंद्रवंशांत दुष्यंत, भरत, भीष्म, श्रीकृष्ण, अर्जुन, भीम, युधिष्ठिर असे थोर क्षात्रवीर होऊन गेले. हे सर्व स्वाभिमानशून्य, नेभळे, नाकर्ते होते हा निर्णय ब्राह्मणेतरांना मान्य आहे काय ? सूर्यवंशाचा अधःपात झाला म्हणजे काय, हें आंबेडकरांनीं स्पष्ट केलेलें नाहीं. ब्राह्मणक्षत्रिय हा वाद प्रथम वेदकालांतील दिवोदाससुदास यांच्यावेळीं सुरू झाला, असें डॉक्टरसाहेब म्हणतात. हरिश्चंद्राच्या वेळीं तो विकोपास गेला. तेव्हांच ब्राह्मणांनीं

उपनयन करण्याचें नाकारलें. पण त्यानंतर बत्तीस पिढ्यांनीं रामचंद्र झालेला आहे. आणि रामानंतरहि बत्तीस पिढ्या हा वंश राज्य करीत होता. म्हणजे अधःपात झाला हेंच खरें नाहीं. तरी ब्राह्मणांवर भडिमार करण्यासाठीं आंबेडकरांनीं या वंशाला अधःपतित ठरविलें आणि इतर सर्व क्षत्रियांना नेभळे, स्वाभिमानशून्य व नाकर्ते ठरविलें. रजपूत वंशांत बाप्पा रावळ, हम्मीर, पृथ्वीराज, संगराणा, राणाप्रताप यांसारखे महापुरुष होऊन गेले. पण प्रचलित कथा अशी आहे कीं रजपूत हे मूळचे परकी असून ब्राह्मणांनीं त्यांना क्षत्रियत्व दिलें. अर्थातच ते ब्राह्मणांना वंद्य मानीत. यामुळें या पंडितांनीं सर्व रजपुतांना भाडोत्री, ध्येयशून्य, हीन ठरवून टाकलें आहे. रजपूत हे इतिहासांत कशासाठीं प्रसिद्ध असतील तर ध्येयनिष्ठा, क्षात्र तेज, अग्निदिव्य यासाठीं—यांच्या अतिरेकासाठीं होते. सहाशे वर्षें त्यांनीं मुसलमानी आक्रमणाला टक्कर देऊन या भूमीचें रक्षण केलें. पुढें ते थकले, त्यांनीं हार खाल्ली हें खरें. पण प्रा. लड्डे यांच्यामतें त्यांनीं आठव्या शतकांतच हार खाल्ली व तेथून पुढें तें केवळ भाडोत्रीपणें लढत.

या भयंकर भडिमारांतून शिवछत्रपतीहि सुटत नाहींत. 'ब्राह्मणी वर्चस्वांतून शिवाजीचें मन कधींच मुक्त होऊं शकले नाहीं,' असें स्वामी-धर्मतीर्थजी म्हणतात. पण ठाकरे यांचा हल्ला फारच प्रखर आहे. त्यांच्यामतें कोल्हापूरचे राजर्षि शाहू छत्रपति हें शिवछत्रपतीपेक्षां पुष्कळच श्रेष्ठ होते. शाहू छत्रपतींनीं जें कार्य केलें तें शिवाजीनें केलें असतें तर त्यांच्यामतें इंग्रजांचें राज्य हिंदुस्थानावर झालेंच नसतें. पण ब्राह्मणी वर्चस्वाविरुद्ध लढा करण्याची रग शिवाजींत नव्हती. ठाकरे म्हणतात, 'शिवाजीनें मराठी स्वराज्य स्थापन केलें म्हणून आम्ही त्याचा गौरव करतों. पण तोहि भटी गोमूत्राच्या गाडग्यांत अडकून भटी ब्रह्मगाठींच्या आडाखेबाज फासांत डोळे उघडे ठेवून फांशी गेला' ( शेतकऱ्यांचें स्वराज्य–पृ. ५९ ते ६० ) श्रीमती ॲनी बेझंट यांचें नांव भारताच्या अर्वाचीन इतिहासांत मशहूर आहे. राजकीय क्षेत्रांत त्या अग्रस्थानीं होत्या. पण जातिभेद, अस्पृश्यता यांचें त्यांनीं कांहींसें समर्थन केलें आहे. यासाठीं ब्राह्मणेतरांनीं स्वतंत्रपणें त्यांना प्रतिगामी ठरविण्यास हरकत नव्हती. पण ब्राह्मणांना व जातिभेदाला अनुकूल असणारे ब्राह्मणेतर स्वतंत्रपणें विचार करूं शकतात हेंच या ब्राम्हणेतर

पंडितांना मान्य नाहीं. धर्मतीर्थजींच्या मतें ॲनीबेझंट व त्यांची थिआसफीकल सोसायटी या ब्राम्हणी वर्चस्वाला बळी पडल्या होत्या म्हणूनच त्यांचे असे विचार झाले. आजच्या काँग्रेसबद्दलहि त्यांचें तेंच मत आहे. ते म्हणतात, काँग्रेस ही क्षत्रिय झुजार वृत्तीची संस्था. पण जुन्या काळीं मराठे, रजपूत यांचा जसा उपयोग ब्राह्मणांनीं केला तसाच काँग्रेसचाहि उपयोग ते आज करीत आहेत.

क्षत्रियांतील दुही, यादवी व हिंदुस्थानांतील जातिभेद आणि एकंदर धर्मशास्त्रांतील विषमतेचीं तत्त्वें यांच्या सर्व जबाबदारींतून ब्राह्मणेतर समाजाला मुक्त करण्याच्या प्रयत्नांत, व ब्राम्हणांवर ती सर्व जबाबदारी लादण्याच्या भरांत ब्राम्हणेतर पंडितांनीं एकंदर क्षत्रियवंशाची, त्यांतील थोर पुरुषांची व एकंदर ब्राह्मणेतर समाजाची काय अवस्था व बदनामी करून टाकली आहे तें वर सांगितलें. आतां त्यांनीं प्राचीन काळच्या ज्या घटना वर्णिल्या आहेत त्यांतून क्षत्रियांना बदनामीकारक असे आणखी किती निष्कर्ष निघतात तें पाहिलें म्हणजे ही भूमिका कोणाहि ब्राह्मणेतराला मान्य होईल असें वाटत नाहीं. ब्राह्मण हा, या पंडितांच्या मतें, आज सहासात हजार वर्षें सर्व हिंदुस्थानभर वर्चस्व गाजवीत आहे. म्हणजे तो सारखा जागरूक, संघटित, व धूर्त असा असला पाहिजे. आणि क्षत्रिय मात्र एवढ्या काळांत सारखा विघटित, बेसावध, इतरांच्या सल्ल्यानें वागणारा, स्वयंप्रेरणा नसलेला असा असला पाहिजे. ब्राह्मणांच्या विरुद्ध त्याला एकजूट करतां आली नाहीं. त्यांचीं कारस्थानें तो ओळखूं शकला नाहीं. ब्राह्मणांनीं उपनयन करण्याचें नाकारलें तर त्यांच्यातील कोणालाहि द्रव्यानें, भीतीनें, भेदनीतीनें फोडणें, त्यांच्यांत दुही माजविणें व कांहीं ब्राह्मण आपल्या बाजूचे करून ठेवणें आणि त्यांच्या साह्यानें तरी इतर ब्राह्मणांचीं कारस्थानें जाणून घेणें हें क्षत्रियांना कधींहि शक्य झालें नाहीं. क्षत्रियांत दुही माजविणें मात्र ब्राम्हणांना केव्हांहि शक्य होतें. वास्तविक ब्राम्हणांच्या हातीं राजसत्ता अशी पेशवाईच्या काळीं फक्त होती. आणि बंगालमध्यें नवव्या दहाव्या शतकांत कांहीं काळ ब्राह्मणी राज्यें होतीं. पण बाकी सर्वत्र व सर्व काळीं राजसत्ता क्षत्रियांच्या हातीं होती. एवढी सत्ता इतक्या दीर्घकाल हातीं असूनहि क्षत्रियांना ब्राह्मणांपुढें हार खावी लागली. ब्राह्मण हा इतका

बुद्धिमान्, इतका सामर्थ्यसंपन्न, इतका संघटनाकुशल आणि क्षत्रिय मात्र कायमचा भोळाभाबडा, बलहीन, विघटित असा होता. अशा तऱ्हेचे क्षत्रियांना अत्यंत अवमानकारक निष्कर्ष या इतिहासमीमांसेतून व ब्राह्मणेतरांनीं स्वीकारलेल्या भूमिकेंतून निघतात. क्षत्रियांनीं ही पराभूततेची कल्पना कां पत्करावी तें कळत नाहीं. ब्राह्मण हे दुष्ट होते, कारस्थानी होते, नित्य घातक व्यूह रचीत, नित्य विनाशाच्या योजना आंखीत; पण आम्ही क्षत्रियांनीं त्यांचीं कारस्थानें, त्यांचे व्यूह, त्यांच्या दुष्ट योजना हाणून पाडल्या अशी भूमिकाहि त्यांनीं पत्करली नाहीं. नाश करण्यांत ब्राह्मणांना, क्षत्रिय हे राज्यकर्ते असूनहि, दर ठिकाणीं यश आलें; अशी दीन, दुबळी भूमिका त्यांनीं स्वीकारली आहे. सूर्यवंशासारख्या महान् राजवंशाचा अधःपात घडविण्यांत ब्राह्मणांना यश आलें. कौरवपांडवांमध्यें, त्यांच्यापैकीं एका बाजूस, भीष्म-कर्ण व दुसऱ्या बाजूस कृष्णार्जुन असे प्रज्ञावंत महापुरुष असूनहि यादवी माजवून त्यांचा नाश करण्यांत ब्राह्मण यशस्वी झाला. रामाला वनवासांत घालवून देण्यांत व सीतात्याग करायला लावण्यांतहि त्याला यश आलें. चंद्रगुप्त, अशोक, शिवाजी यांनाहि आपल्या 'गोमूत्राच्या गाडग्यांत' त्यांनीं अडकवून टाकलें. विषमतेचा धर्म प्रस्थापित करण्यांत, क्षत्रियांनाहि इतरांना हीन लेखावयास भाग पाडण्यांत ब्राह्मण यशस्वी झाले. दर ठिकाणीं ब्राह्मणांनीं आमच्यावर मात केली, अशी दैन्याची, दौर्बल्याची पराभूततेची भूमिका क्षत्रियांनीं, व ब्राह्मणेतर पंडितांनीं स्वीकारली आहे. याचे अत्यंत अनर्थकारक परिणाम सध्यांच्या काळांत झाले आहेत; पण ते सांगण्यापूर्वी ब्राह्मणांनीं ब्राह्मणेतरांना ज्ञानहीन ठेवलें या तिसऱ्या आरोपाचा विचार करून टाकूं.

## आम्हांस ज्ञानहीन ठेवलें

ही भूमिकाहि अशीच दैन्याची व दुबळेपणाची आहे. 'भट लोकांनीं तीन हजार वर्षें येथें राज्य केलें. त्या काळांत येथल्या लोकांना ज्ञानहीन केलें व खोटे ग्रंथ लिहून शूद्र अतिशूद्र यांना फसविलें' असें महात्मा फुले यांनीं म्हटलें आहे. प्रा. लठ्ठे यांनीं छत्रपतिशाहूचरित्रांत वीसपंचवीस वेळां तरी हा आरोप केला आहे. आजहि कर्मवीर भाऊराव पाटील यांचा

गौरव करणारे ब्राह्मणांच्यावर हाच आरोप करीत आहेत. सर्वांत आश्चर्याची गोष्ट ही कीं ब्रिटिश राज्य प्रस्थापित झाल्यानंतरच्या काळांतहि ब्राह्मणांनीं इतरांना विद्याहीन ठेवलें असा ब्राह्मणांच्यावर आरोप आहे. ब्राह्मणांनीं असें केलें कीं नाहीं हा मुद्दा वेगळा आहे. संस्कृतविद्या ब्राह्मणेतरांना देऊं नये अशी सनातन ब्राह्मणांची संकुचित दृष्टि होती यांत शंकाच नाहीं. अर्थात् पाश्चात्यविद्या सर्व समाजांत प्रसृत करण्याचे प्रयत्नहि भाऊ महाजन, बाळशास्त्री जांभेकर, लोकहितवादी यांच्या काळापासून अनेक ब्राह्मण करीत आले आहेत, हेंहि विसरून चालणार नाहीं. पण आपला आतांचा विषय तो नाहीं. प्रा. लठ्ठे यांनीं राजर्षि शाहू यांचें जें चरित्र लिहिलें आहे त्याला फ्रेझर नामक इंग्रज अधिकाऱ्यानें प्रस्तावना लिहिली आहे. त्यांत त्यानें स्वच्छ म्हटलें आहे कीं, १८३३ सालीं ब्रिटिश राज्यकर्त्यांनीं शिक्षणाची व्यवस्था आपल्याकडे घेतली. त्यानंतर या क्षेत्रांतली ब्राह्मणांची मक्तेदारी समूळ नष्ट झाली. असें असूनहि नंतरच्या काळांत आम्हांला ब्राह्मणांनीं विद्या मिळूं दिली नाहीं, आणि म्हणून आमचा समाज मागासलेला राहिला अशी तक्रार करणें क्षत्रियांच्या स्वाभिमानाला, कर्तृत्वाला, स्वयंप्रेरणेला शोभेल काय, असा प्रश्न आहे. याहि बाबतींत त्यांनीं दीन दुबळी अशीच भूमिका घेतली आहे.

क्षत्रियांच्या मताप्रमाणेंच वेद, उपनिषदें, महाभारत, रामायण हे भारताला भूषणभूत असलेलें वाङ्मय त्यांनींच लिहिलें आहे. तेव्हां त्या काळांत तरी ब्राह्मणांनीं विद्या दिली नाहीं,हा आरोप करतां येणार नाहीं. पुढें ब्राह्मणांचें कर्मकांड वाढलें तेव्हां क्षत्रियांनीं बौद्ध, जैन हे धर्म प्रस्थापित केले. या धर्मांचें वर्चस्व हिंदुस्थानांत चवदाशें वर्षें होतें, अनेक राजे स्वतः बौद्धधर्मी होते.अनेक हिंदुराजे सर्व धर्मांच्या पंडितांना सारखा आश्रय देत. तेव्हां या काळाबद्दलहि असा आरोप करतां येणार नाहीं. पुढें दहाव्या शतकापासून संतवाङ्मयाचा काळ सुरू झाला. त्या काळांत अनेक संत ब्राह्मणेतरच होते. आणि वेदान्तज्ञान सर्व समाजांत पसरविण्याचें कार्य त्यांच्या बरोबरीनें ब्राह्मण करीत होते. या काळांत दर वेळीं सनातन ब्राह्मण वर्ग या ज्ञानप्रसाराला सारखा विरोध करीत होता हें खरें आहे. पण तितकाच मोठा ब्राह्मणवर्ग अट्टाहासानें शूद्रापर्यंत भागवतधर्माचा प्रसार करीत होता हेंहि खरें आहे. यानंतरच्या

काळांत जिला विद्या असें म्हणतात, ती कोणाजवळ शिल्लक नव्हती. मागल्या काळांत पाणिनि, पतंजली, नागार्जुन, वराहमिहिर, ब्रह्मगुप्त, शंकराचार्य, कुमारिल भट्ट, भास्कराचार्य, इ. अनेक भाष्यकार, गणितज्ञ, अनेक साहित्यशास्त्रज्ञ जसे उदयास आले त्याप्रमाणें पुढील काळांत कोणीहि झाले नाहींत. त्यानंतर विद्याव्यासंगाला खरी चालना मिळाली ती ब्रिटिशांचें राज्य आल्यानंतर. त्यानंतरच्या काळांत ब्राह्मणेतरांनीं सर्व सामर्थ्य अंगीं असून व सर्व साधनें हाताशीं सुलभ असूनहि दीन दुबळी भूमिका कशी पतकरली आहे तें पहा. महात्मा ज्योतिराव फुले यांचें प्रारंभींचें मुख्य कार्य हें कीं त्यांनीं अस्पृश्यांसाठीं शाळा उघडल्या. आतां सनातन ब्राह्मण व स्पृश्य समाज यांचा भयंकर विरोध असतांना जे मराठे अस्पृश्यांना विद्या देण्याची व्यस्था करतात त्यांनीं आम्हांला ब्राह्मणांनीं विद्येपासून दूर ठेविलें अशी तक्रार करणें म्हणजे जाणूनबूजून स्वतःवर दैन्य व दौर्बल्य ओढवून घेण्यासारखें नाहीं काय? १८८० सालानंतर श्रीमंत सयाजीराव गायकवाड यांनीं ब्राह्मणेतरांना, विशेषतःमराठ्यांना शिक्षण देण्यासाठीं अट्टाहास चालविला होता. वसतिगृहें, शिष्यवृत्त्या, मोफत शाळा अशा सर्व प्रकारांनीं ते साह्य करीत होते. तेच प्रयत्न ग्वाल्हेर, इंदूर व कोल्हापूर येथें १८९० सालापासून चालू झाले. ही अनुकूलता असूनहि ब्राह्मणेतरांनीं विद्याक्षेत्रांत निर्णायक शक्ति ब्राह्मणांच्या हातीं आहे असें म्हणावें ही भूमिका आत्मप्रत्ययाची, जागृततेची व स्वावलंबनाची आहे काय? या काळांत महाराष्ट्रभर डेक्कन एज्युकेशन सोसायटी, शिक्षणप्रसारक मंडळी, आर्यन एज्युकेशन सोसायटी यांसारख्या शिक्षणसंस्था प्रस्थापित झाल्या होत्या. त्यांत ब्राह्मणेतरांना केव्हांहि मज्जाव नव्हता. डेक्कन एज्यु. सोसायटीचे अध्यक्ष स्वतः राजर्षि शाहू हेच होते. या संस्थेनें सर्व समाजाला शिक्षण सुलभ केलें असें त्या वेळच्या गव्हर्नरांनीं-लॉर्ड सँढर्स्ट-यानीं प्रशस्तिपत्रहि दिलें आहे. असें असूनहि भाऊराव पाटील यांचें चरित्रकार ब्राह्मणांनीं आपल्या मुलामुलींची फक्त सोय केली असें म्हणतात. इतक्या सोयी, इतकी संधि, इतकीं साधनें ब्राह्मणेतरांना अनुकूल असूनहि ब्राह्मण त्यांना विद्येपासून दूर ठेवूं शकतो, असें ब्राह्मणाचें अद्‌भुत सामर्थ्य तरी काय आहे आणि अशी ब्राह्मणेतरांची दुर्बलता तरी कोणची कीं जी त्यांना सारखी ब्राह्मणांच्या

आहारीं जाण्यास भाग पाडते? बंगालचें उदाहरण पहा. नवी पाश्चात्य विद्या हें उत्कर्षाचें साधन आहे, ती यशाची गुरुकिल्ली आहे, ती संजीवनी आहे हें तेथील ब्राह्मणेतरांच्या ध्यानांत येतांच तेथील अनेक श्रीमंत घराण्यांनीं त्या विद्येचा ध्यास घेऊन आपलीं मुलें लहानपणापासून इंग्लंडमध्यें पाठविण्यास सुरवात केली. त्यामुळें बंगालमध्यें रॉय, चतर्जी, बॅनर्जी, टागोर या ब्राह्मण घराण्याप्रमाणेंच घोष, बोस, पाल, दत्त हींहि घराणीं विद्यासंपन्न झालीं. आणि लालमोहन, आनंदमोहन, रासबिहारी, अरविंद, बारींद्रकुमार घोष, रमेशचंद्र दत्त, नरेन्द्रनाथ दत्त, (स्वामी विवेकानंद) जगदीशचंद्र, सुभाषचंद्र असे एकेक रथी महारथी त्यांच्यांत निर्माण झाले. महाराष्ट्रांतील मराठा घराण्यांनीं विद्येचा असा ध्यास घेतला असता तर! महाराष्ट्र, बडोदें, इंदूर, ग्वाल्हेर हे सर्व प्रांत मिळून, इंग्लंडमध्यें आपल्या मुलांना पाठवून शिक्षण देऊं शकतील अशीं शंभर एक घराणीं सहज होतीं. त्यांनीं हें धोरण ठेविलें असतें तर महाराष्ट्रांत ब्राह्मण–ब्राह्मणेतरवाद निर्माणच झाला नसता. कारण मग जीवनाच्या सर्व क्षेत्रांत मराठेच आघाडीवर राहिले असते. पण ज्योतिबांनीं दातांच्या कण्या करून शिक्षणाचें महत्त्व सांगितलें तरी ब्राह्मणेतर समाजाच्या मनावर व त्यांतील नेतृत्व करणारा जो मराठावर्ग त्याच्या मनावर तें ठसलेंच नाहीं. जनरल नानासाहेब शिंदे यांनीं आत्म-चरित्रांत अनेक ठिकाणीं ही गोष्ट आवर्जून सांगितली आहे. श्रीमंत सयाजीराव, श्रीमंत माधवराव शिंदे याबाबतींत फार निराश असत. त्यांनीं मराठ्यांच्या शिक्षणासाठीं लाखो रुपये खर्च केले. विलायतला जाण्याचा खर्चहि अनेकांना त्यांनीं देऊं केला, दिला. पण त्यांच्यांत पाश्चात्य विद्येची अभिरुचि निर्माण झाली नाहीं. त्या विद्येचें सामर्थ्य, तिची महती त्यांना कळावी तशी कळली नाहीं. बंगाल्यांतील घोष, बोस, दत्त या घराण्यांप्रमाणें त्यांनीं उपक्रम केला असता, इंग्लंड दूर राहू द्या–येथल्या युनिव्हर्सिट्यांत आपल्या मुलांना उच्च शिक्षण द्यावयाचें त्यांनीं ठरविलें असतें तर त्यांना प्रतिबंध करणें ब्राह्मणांना कालत्रयीं शक्य झालें नसतें. पण तसें सामर्थ्य ब्राह्मणांच्या अंगीं आहे, त्यांचा प्रतिबंध असतांना आपणाला शिक्षण घेणें शक्य नाहीं, हीच भूमिका त्यांनीं पतकरली आणि अजूनहि तीच सत्य होती असें ते मानीत आहेत.

ब्राह्मणब्राह्मणेतरवादांत ब्राह्मणेतर पक्षाच्या थोर धुरीणांनीं जी भूमिका स्वीकारली आहे तिच्यांतील मुख्य सिद्धांताचा येथवर विचार केला. हिंदुस्थानांतील सर्व अपयशाला, अवनतीला ब्राह्मणच जबाबदार आहेत असें सिद्ध करून स्वत:ला त्या अपश्रेयांतून मुक्त करून घेण्याच्या भरांत या पंडितांनीं क्षत्रिय समाजाच्या मनःसामर्थ्याचें व बुद्धिबलाचें जें मापन केलें आहे व त्याचें जें चित्र रंगविलें आहे तें किती अनर्थकारक व अवमानकारक आहे हें त्यावरून दिसून येईल. ब्राह्मणांची दुष्ट बुद्धि, त्यांचीं कारस्थानें, त्यांचे घातकी व्यूह यांचें जें वर्णन त्यांनीं केलें आहे तें सर्व खरें मानलें तर वेदकालापासून आतांपर्यंतचा क्षत्रिय समाज हा कर्तृत्व नसलेला, दुसऱ्याच्या चिथावणीनें वाटेल तो आत्मघात व राष्ट्रघात करण्यास प्रवृत्त होणारा, स्वत:च्या सार्वजनिक व कौटुंबिक जीवनांतहि ब्राह्मणांचें वर्चस्व सहन करणारा व सर्वस्वी ब्राह्मणांच्या आहारीं जाऊन, हातीं राजसत्ता असतांनाहि दीन-दुबळा झालेला होता, अशी विचित्र इतिहासमीमांसा आपल्याला पतकरावी लागते. कोणचाहि स्वाभिमानी मराठा ती पत्करील असें वाटत नाहीं.

## इंग्रज आपला उद्धारकर्ता

ब्राह्मणेतर पक्षानें स्वीकारलेली ही भूमिका केवळ तात्त्विक असती, पूर्व इतिहासांतील ब्राह्मण व ब्राह्मणेतरांच्या संबंधांविषयींचें एक विद्वानाचें मत, एवढेंच तिचें महत्त्व असतें तर लोकशाहीच्या विवेचनांत त्याला एवढें स्थान देण्याचें कारण पडलें नसतें. पण दुर्दैवानें तसें नाहीं. भारताच्या इतिहासावर ब्राह्मणेतरांनीं स्वीकारिलेल्या भूमिकेचा अत्यंत घातक असा परिणाम झालेला आहे. ब्राह्मणांनीं गेलीं सात आठ हजार वर्षें या भूमीवर आपली सत्ता चालविली. आपला विषमतेचा ब्राह्मणी धर्म रूढ करून आम्हां सर्व ब्राह्मणेतरांना पिळून काढलें व आमच्यांत दुही निर्माण करून, आम्हांला अज्ञानांत ठेवून सर्वस्वी हीन दीन करून टाकलें, ही भूमिका ब्राह्मणेतरांनीं केवळ तात्त्विक म्हणून स्वीकारली नाहीं, तर तिच्यांतून अपरिहार्यपणें निघणारा दुसरा एक सिद्धांत त्यांनीं असा काढला कीं, ब्राह्मण व ब्राह्मणेतर यांचें असें बलाबल असल्यामुळें हिंदुस्थानांत इंग्रजांचें राज्य राहिलें तरच ब्राह्मणेतरांचा उत्कर्ष होईल. ब्राह्मणांच्या दुष्ट शक्तीपासून

ब्राह्मणेतरांचा बचाव करण्याचें सामर्थ्य, ब्राह्मणेतर पुढाऱ्यांच्या मतें, त्यांच्या समाजाच्या ठायीं नसून तें इंग्रजांच्या ठायींच फक्त आहे. त्यांचें राज्य जर गेलें तर ब्राह्मण येथें पुन्हां विषमतेचा, उच्चनीचतेचा ब्राह्मणी धर्म रूढ करतील व ब्राह्मणी राज्य पुन्हां प्रस्थापित करतील. म्हणून इंग्रजी राज्याविरुद्ध चळवळ करणें हें घातक होय. भारती समाजाचा तिच्या-मुळें नाश होईल. अशी भूमिका ब्राह्मणेतर समाजानें १९३०–३५ सालापर्यंत पतकरली होती. स्वामी धर्मतीर्थजीमहाराज यांच्या १९४१ च्या ग्रंथांत हीच विचारसरणी प्रतिपादिलेली आहे. डॉ. आंबेडकरांच्या १९४५ च्या ग्रंथांतहि हीच भीति व्यक्तविलेली आहे. त्यानंतर आतां स्वातंत्र्यच आलें आहे तेव्हां तसें प्रतिपादन कोणी केलेलें ऐकिवांत येत नाहीं. पण लोकांच्या मनांतून हा विचार कितपत नष्ट झाला आहे तें सांगतां येत नाहीं.

महात्मा ज्योतिबा फुले यांच्या मतें आर्य म्हणजे फक्त ब्राह्मण. बाकी सर्व शूद्र होत. राम, कृष्ण, शिवाजी सर्व शूद्र होत. बळी हा शूद्र असून खिस्त हा त्याचाच अवतार होता. त्यामुळें सर्व खिस्ती व म्हणूनच इंग्रजहि शूद्र होत. 'आम्हा शूद्रांच्या गळ्यांतील दास्यत्वाचा पट्टा इंग्रजांनीं तोडला; मुकुंदराज, ज्ञानेश्वर, रामदास यासारखे पायलीचे पंधरा व आधोलीचे सोळा संत झाले. पण त्यांतील एकानेंहि शूद्रांच्या गळ्यांतील दास्यत्वाच्या पट्ट्यास बोट लाविलें नाहीं. इंग्रजांनीं मात्र आम्हांस सोडविलें. भट जो इंग्रजाविरुद्ध बंड करतो त्याचें कारण हेंच होय. येथली शूद्र प्रजा व शूद्र इंग्रज यांच्या पुरत्या ओळखी होऊन पुढें जड जाईल म्हणून ब्राह्मणांनीं इंग्रजांना हांकून लावण्याचा कट केला आहे. भट इंग्रजांविरुद्ध याच कारणास्तव द्वेष पसरतात. जीं बंडें झालीं त्यांत भट अग्रेसर नाहीं असें एकहि नाहीं. पण इंग्रज कांहीं जन्माचे पुरणार नाहींत. तेव्हां ते आहेत तोंपर्यंत भटांचें वर्चस्व मोडून स्वराज्य स्थापावें '—अशा तऱ्हेचें प्रतिपादन महात्मा फुले यांचें असे. (गुलामगिरी पृ. ५९, ६१, ८२) त्या काळीं लोकहितवादी, रानडे, दादाभाई यांची इंग्रज हेच आपले उद्धारकर्ते, अशी श्रद्धा होती. त्यांच्या मनांतील अर्थ असा कीं समाजरचना, राजकारण, अर्थव्यवस्था यांचें ज्ञान आम्हांला नाहीं. इंग्रजांच्या नेतृत्वानें त्या तत्त्वाचा अभ्यास होऊन प्रत्यक्ष व्यावहारिक धडेहि आम्हांला मिळतील. मग आम्ही कार्यक्षम होऊं व

स्वातंत्र्याला लायक होऊं. अमुक एका वर्गाच्या किंवा जातींच्या वर्चस्वांतून इंग्रज आम्हांस सोडविणार अशी ती भूमिका नव्हती. ब्राह्मणेतरांची भूमिका तशी होती. मागील इतिहासमीमांसा अक्षरशः खरी मानून त्यांनीं मनाशीं सिद्धान्तच ठरवून टाकला होता कीं ब्राह्मणांचें वर्चस्व नष्ट करणें आपणांला शक्य नाहीं. इंग्रजांनीं तें वर्चस्व मोडून द्यावें. आमचें दास्य त्यांनीं नष्ट करावें. तसें त्यांनीं केलें नाहीं तर स्वातंत्र्य येतांच पुन्हां येथें ब्राह्मणी राज्य प्रस्थापित होईल. अशी ही भूमिका होती. इंग्रज हा आपला उद्धारकर्ता नव्हे, तो आपला शत्रू आहे, आपल्या देशाचा व समाजाचा उद्धार स्वावलंबनानें आपणच केला पाहिजे, त्या कामीं इंग्रज साह्य तर करणार नाहींच, पण उलट पावलोपावलीं तो अडथळाच आणील, हें तत्त्वज्ञान प्रथम विष्णुशास्त्री यांनीं सांगितलें व टिळकांनीं आमरण त्याचा प्रसार केला. या त्यांच्या प्रयत्नाविषयीं प्रा. लठ्ठे यांनीं असें म्हटलें आहे कीं, ब्राह्मणांना प्रारंभीं सरकारी खात्यांत पुष्कळ नोकऱ्या मिळाल्या. १८७५ च्या सुमारास नोकऱ्यांचें प्रमाण आणखी वाढावयास हवें होतें, तें वाढेना. कारण खालच्या दर्जाच्या जागाच संपल्या. वरच्या दर्जाच्या म्हणजे कलेक्टर, डी. एस्. पी. अशा जागा इंग्रज सरकार ब्राह्मणांना देईना; म्हणून ब्राह्मणांनीं इंग्रजांविरुद्ध चळवळ सुरू केली. विष्णुशास्त्री, टिळक, राष्ट्रीय-पक्ष यांच्या चळवळींविषयीं ब्राम्हणेतरपक्षाचें हें मत आहे. महात्मा ज्योतिबा यांच्याप्रमाणेंच 'इंग्रज हा ब्राह्मणेतरांचा उत्कर्ष करतो, त्यांना जागृत करतो, त्यांची उन्नति करतो म्हणून ब्राह्मणांना इंग्रजांचा द्वेष वाटतो' असें प्रा. अ. बा. लठ्ठे यांनीं १९२४ सालीं मत दिलें आहे. (छत्रपती शाहूचरित्र-पृ. ३२४-२५) तेव्हां इंग्रज हे आपले उद्धारकर्ते होत, स्वराज्य देऊन ते येथून गेले तर येथें ब्राह्मण पुन्हां ब्राह्मणी राज्याची प्रस्थापना करतील, म्हणून इंग्रजाविरुद्ध लढा करावयाचा नाहीं-ही भूमिका ब्राह्मणेतरांनीं स्वीकारलेली होती. प्रा. लठ्ठे यांनीं 'हिंदुस्थानांतील ब्रिटिश साम्राज्याचा उदय' या नांवाचें पुस्तक लिहिलें आहे. त्याच्या प्रस्तावनेंत तें पुस्तक लिहिण्याचें कारण त्यांनीं दिलें आहे. 'हिंदी लोकांच्या राजकीय अथवा राष्ट्रीय शीलाविषयीं तिरस्कार, हल्लींहि (१९१४ सालीं) त्यांच्या हातीं अवशिष्ट असलेल्या राजसत्तेच्या जुलमीपणाची स्पष्ट जाणीव, व इंग्रजी

सत्तेविरुद्ध चालूं असलेल्या चळवळीपासून उत्पन्न होणाऱ्या दुष्परिणामांचें उघड दिसणारें स्वरूप या सर्वांमुळें हे लेख लिहिण्याची इच्छा उत्पन्न झाली, हें येथें सांगणें अवश्य आहे.' या पुस्तकांतील प्रकरणांना त्यांनीं, ब्रिटिश-साम्राज्याचा अरुणोदय, सूर्योदय, अशीं नांवें दिलीं आहेत. इंग्रज बहुजन-समाजाची काळजी करीत नाहींत, त्यांच्या शिक्षणाकडे दुर्लक्ष करतात, अशी तक्रार मधूनमधून फुले व लठ्ठे यांनीं केली आहे. पण त्यांच्यामतें याचें कारण असें कीं ब्राह्मण इंग्रजांनाहि फसवितात! क्षात्रियवर्ग आपसांत लढतो, जातिभेदाच्या विषमधर्मास साह्य करतो त्याचें कारण ब्राह्मणेतरांच्यामतें, ज्याप्रमाणें भोळेपणा, अज्ञान, भाबडेपणा हें आहे त्याचप्रमाणें इंग्रजांच्या बाबतींतहि भोळेपणा अज्ञान हेंच कारण आहे. साहेबांना हिंदी जनतेची खरी तळमळ आहे. तिचा उद्धार करावा ही उत्कट इच्छा आहे. पण त्यांना येथल्या परिस्थितीचें मुळींच ज्ञान नाहीं. म्हणून त्यांनीं पाश्चात्य विद्या फक्त ब्राह्मणांनाच दिली. (छत्रपति शाहू चरित्र पृ. ३२१-२४.) इंग्रज सरकार अत्यंत भोळें असून भटांनीं त्यांच्या डोळ्यांत माती टाकली. (गुलामगिरी-फुले-पृ. १०४) एरवीं ते ब्राह्मणेतरांचे वाली आहेत. अशी ब्राह्मणेतरांची विचारसरणी असल्यामुळें ब्रिटिश राज्याशीं एकनिष्ठ रहाणें अत्यंत अवश्य आहे या विचाराचा त्यांनीं १९३०-३५ पर्यंत पाठपुरावा केला होता. मद्राससमध्यें याच तऱ्हेची विचारसरणी ब्राह्मणेतर पक्षानें रूढ केली होती. १९१७-१८ या सालीं सुरू झालेल्या होमरूलच्या चळवळीला विरोध म्हणून ब्राह्मणेतरांनीं चळवळ सुरु केली. ब्रिटिश राज्यचआम्हांला जास्त पसंत आहे, कारण स्वराज्य आलें तर ब्राह्मणी राज्य होईल, तेव्हां सत्तादान करूं नये, अशी त्यांची मागणी होती. जस्टिस पार्टीचे अध्वर्यु डॉ. नायर हे ब्रिटिश सरकारपुढें ब्राह्मणेतरांचें गाऱ्हाणें सांगून स्वराज्याच्या मागणीस विरोध करण्यासाठीं विलायतेलाहि गेले होते. (लँड मार्क्स इन् इंडियन कॉन्स्टिटयुशन अॅन्ड नॅशनल डेव्हलपमेन्ट, खंड १ ला -पृ. ३५२-गुरुमुख निहालसिंग) वर उल्लेखिलेले मलबारचे स्वामी धर्मतीर्थजी यांनीं १९४१ सालीं सुद्धां याच तऱ्हेनें प्रतिपादन केलें आहे. 'परकीय वर्चस्व अहितकारकच असतें असें नाहीं, बुद्धीनें व धनानें आपण समर्थ आहों. तेव्हां आणखी कांहीं वर्षे-कांहीं दशकें-ब्रिटिशांचें राज्य

राहिलें तरी भयंकर नुकसान होईल असें नाहीं. (पृ.२) कॉंग्रेस ही एक क्षत्रिय झुंजार वृत्तीची संस्था आहे. पण तिच्यावर ब्राह्मणी वर्चस्व आहे. जुन्या काळीं ज्याप्रमाणें मराठे, रजपूत, इतर क्षत्रिय यांचा उपयोग ब्राह्मणांनीं केला, तसाच आतांही कॉंग्रेसचा उपयोग केला जाईल. (मीनेस ऑफ हिंदु इंपिरियालिझम पृ. ३०५ प्रकरण २३ ) [ याचा अर्थ असा कीं स्वामीजींच्या मतें महात्मा गांधी, वल्लभभाई पटेल, राजेंद्रबाबू, अबुलकलम आझाद हे हि भोळे, अज्ञ, परप्रत्ययनेय असे असून ब्राह्मण सूत्रें हलवितील तसे नाचणारे आहेत.] ब्राम्हणेतरांतील अग्रेसर असे जे क्षत्रिय-नायर व मराठे–त्यांनीं या विचारसरणीचा अवलंब केल्यानंतर अस्पृश्यांनीं तसा केला असेल यांत कांहीं आश्चर्य नाहीं. मात्र त्यांची भीति केवळ ब्राह्मणी राज्याची नसून एकंदर सवर्णांच्या राज्याची आहे. ब्राह्मणच फक्त दुष्ट व जुलमी आणि बाकी शूद्र, अस्पृश्य यांसह सर्व ब्राह्मणेतर दलित, ही ब्राह्मणेतर धुरीणांची भूमिका अस्पृश्यांना मान्य नाहीं. त्यांच्या मतें सगळाच सवर्ण समाज जुलमी आहे. शिवराम जानबा कांबळे हे अस्पृश्यामधले एक थोर पुढारी व कार्यकर्ते आहेत. महात्माजींनीं १९३० सालीं कायदेभंगाची मोहीम सुरू केली. त्यावेळीं कांबळे यांनीं–'हिंदी राष्ट्रीय क्रान्तिविरोधक पक्ष ' या नांवाचा पक्ष महात्माजींच्या चळवळीस विरोध करण्यासाठीं म्हणून प्रस्थापित केला होता. ' चातुर्वर्ण्यविध्वंसनाचें व अस्पृश्यता-निवारणाचें कार्य पूर्ण होईपर्यंत तरी हिंदुस्थानांत ब्रिटिश राजसत्तेची फार जरूर आहे असें या पक्षाचें मत आहे ' असें पक्षस्थापनेचें कारण देऊन महात्मा गांधी व त्यांचे अनुयायी यांनी कायदेभंगाची चळवळ तहकूब करून हीं कार्यें हातीं घ्यावीं, नाहींतर त्यांच्याविरुद्ध सत्याग्रहाची मोहीम करण्यांत येईल, असें कांबळे, घाटगे, पाताडे या पक्षप्रमुखांनीं जाहीर केलें होतें. ( कांबळे यांचें चरित्र–नवलकर. शेवटचें पृष्ठ ). डॉ. आंबेडकर यांनीं ' व्हॉट कॉंग्रेस ॲंड गांधी हॅव् डन् टु दि अनटचेबलस् ' या १९४५ च्या आपल्या पुस्तकांत ब्रिटिश राज्याविषयीं हेच विचार प्रगट केले आहेत. अस्पृश्यांनीं कॉंग्रेसच्या लढ्यांत कधींहि भाग घेतला नाहीं, असें सांगून त्याचें कारण त्यांनीं वरीलप्रमाणेंच दिलें आहे. ' अस्पृश्यांना अशी भीति वाटते कीं हिंदुस्थानला स्वातंत्र्य मिळतांच तेथें पुन्हां हिंदूंचें–( डॉ. आंबेडकर अस्पृश्यांना हिंदू मानीत नाहींत ) म्हणजे सवर्ण हिंदूंचें राज्य

होईल. आणि मग अस्पृश्यांची स्वातंत्र्य, समता, सुख, उत्कर्ष यांची आशा समूळ नष्ट होऊन ते केवळ मजूर होऊन रहातील. ' ( पृ. १६७ ) डॉ. आंबेडकरांच्या मतें ब्रिटिशांशीं लढा करण्याचीच जरूर नव्हती. कॉंग्रेसनें हा नसता उद्योग केला. ब्रिटिश सरकारची वृत्ति बदलत असून आपण आपसांत ऐक्य केलें कीं ते निश्चित स्वराज्य देतील. ब्रिटिशांच्या सद्भावनेवर कॉंग्रेसनें अविश्वास कां करावा हेंच त्यांना कळत नाहीं. ( पृ. १७७–८० ) १९३० सालीं एकदां आंबेडकरांचें मत निराळें होतें. त्यांचाहि ब्रिटिश सरकारवर विश्वास नव्हता. एका भाषणांत त्या सालीं ते म्हणाले कीं, ' आम्ही इंग्रजांच्या बाजूनें पूर्वी लढलों. त्यावेळीं इंग्रज आम्हांला तारतील असें आम्हांला वाटलें होतें. पण आमची फसगत झाली. इंग्रजांच्या वतीनें लढून आमचें कांहीं एक हित झालें नाहीं. त्यांना लढाया करावयाच्या होत्या तोंपर्यंत त्यांनीं आम्हांला हाताशीं धरलें. नंतर गरज सरो वैद्य मरो, अशी स्थिति झाली. तेव्हां स्वराज्य हेंच अस्पृश्यतेवर औषध आहे. आमच्या बेड्या स्वराज्यांतच तुटतील. बाकीच्या लोकांना जे राजकीय हक्क आहेत ते आम्हांला स्वराज्यांतच मिळतील. ' ( प्रभात २४–११–३० ) १९३० सालीं आंबेडकरांचें हें मत होतें. पण पुढें त्यांचें व त्यांच्या अनुयायांचें मत बदललें आणि इंग्रज हाच आपला उद्धारकर्ता होय, आपलें रक्षण व उत्कर्ष तोच करणार, म्हणून ब्रिटिश विरोधी चळवळ व लढा हा आपल्या समाजाला घातक ठरेल, हीच ब्राह्मणेतरांची प्रारंभींची भूमिका त्यांनीं स्वीकारली. वास्तविक ब्राह्मणेतरांनीं ही भूमिका १९३० च्या सुमारास सोडली. इंग्रजांच्या स्वरूपाचें ज्ञान होऊन ते संग्रामांत उतरले. पण अस्पृश्यांनीं १९४५ सालीं सुद्धां ती सोडली नव्हती.

आपण ब्रिटिश राज्याशीं एकनिष्ठ आहों, ही गोष्ट ब्राह्मणेतर किती अट्टाहासानें सांगत त्याचें एक उदाहरण देतों. ब्राह्मणब्राह्मणेतर वादांत १९२१–२२ च्या सुमारास अत्याचार होऊं लागतांच खटलेहि खूप झाले. व आततायी ब्राह्मणेतरांना शिक्षा झाल्या. त्याबद्दल विजयी मराठा पत्रानें सरकारविरुद्ध पुढील तक्रार केली आहे. ' प्रिन्स ऑफ वेल्सच्या आगमन-प्रसंगींची पुणें शहरांतल्या ब्राह्मण चळवळ्यांनीं उत्पन्न केलेली परिस्थिति तरी टाइम्सपुढें उभी रहावयास पाहिजे होती. त्यावेळीं व आजतागायतहि

महाराष्ट्रांत जी शांतता राहिली याचें कारण केवळ महात्मा फुले यांचे अनुयायी किंवा ब्राह्मणेतर पक्षाचे लोक होत. ब्राह्मणांच्या ब्रिटिश द्वेषाच्या चळवळीला आळा बसला असला तर त्याचें कारणहि हेच लोक होत. पण ब्रिटिश साम्राज्याच्या या दोस्तावरच आज टाइम्सकार आग पाखडीत असून साम्राज्य उलथून पाडणाऱ्यांच्या गळ्याला ते मिठी मारीत आहेत. (उतारा सत्याग्रही महाराष्ट्र-पृ. २२७ )

ब्राह्मणेतरांनीं आपली चळवळ उभारतांना तत्त्वज्ञानाची जी बैठक स्वीकारली तिचा आढावा घेऊन आपण एका दृष्टीनें तिचें परीक्षण केलें. पूर्वकाळच्या इतिहासाची त्यांनीं अत्यंत विपरीत मीमांसा करून क्षत्रिय वर्गाला व एकंदर ब्राह्मणेतर समाजाला आत्मप्रत्ययहीन, दुर्बल व ध्येयहीन ठरवून टाकलें. आणि ही मीमांसा केवळ तात्त्विक मर्यादेत न ठेवतां ती अक्षरशः खरी मानून ब्राह्मणी वर्चस्व आमचे आम्ही हाणून पाडूं शकणार नाहीं, यासाठीं ब्रिटिशांचें राज्यच येथें दीर्घकाल राहिलें पाहिजे, इंग्रज गेले तर पुन्हां आम्ही ब्राम्हणी धर्माच्या मगरमिठींत सांपडूं-श्रीकृष्ण, रामचंद्र, चंद्रगुप्त, शिवाजी, हे आमचे महापुरुषहि त्यांतून सुटूं शकले नाहींत-अशी दैन्याची व परावलंबनाची भूमिका त्यांनीं पत्करली.

ब्राह्मणेतर विद्वानांनीं स्वीकारलेल्या या भूमिकेमुळें त्यांच्याच वर्णनांतून क्षत्रिय समाजाविषयीं काय अभिप्राय प्रगट होतो, त्यांचें मानसिक व बौद्धिक सामर्थ्य याविषयीं काय मापन होतें, या दृष्टीनें येथवर परीक्षण केलें. आतां त्या भूमिकेचें ऐतिहासिक दृष्टीनें थोडें परीक्षण करावयाचें आहे. आणि त्यानंतर त्या भूमिकेचें ब्राम्हणेतर समाजावर किती घातक परिणाम झाले आहेत व अजूनहि होण्याचा संभव आहे व एकंदर भारतीय समाजावर यापुढें त्याचे काय परिणाम होतील याचें विवरण करावयाचें आहे.

---

( ब्राह्मणब्राह्मणेतर वाद )

# २

ब्राह्मणब्राह्मणेतर वादांत हिंदुस्थानांत वेदकालापासून जे जे अनर्थ झाले त्या सर्वांना ब्राह्मणच जबाबदार आहेत, हा सिद्धान्त प्रस्थापित करण्यासाठीं ब्राह्मणेतर पंडितांनीं जी इतिहासमीमांसा केली ती क्षत्रियांना व एकंदर ब्राह्मणेतर समाजालाच कशी अवमानकारक आहे हें वर सांगितलें. त्याचप्रमाणें ती इतिहासमीमांसा पत्करल्यामुळें इंग्रज हाच आपला उद्धारकर्ता आहे, या देशांतले ब्राह्मणीधर्माचें वर्चस्व मोडणें आपल्याला शक्य नाहीं, इंग्रजी राज्यकर्ते मात्र तें मोडूं शकतील, म्हणून त्यांचें राज्यच येथें टिकलें पाहिजे, आपण त्यांच्या साम्राज्याचे दोस्त झालें पाहिजे, नाहीं तर स्वराज्यप्राप्ति होतांच पुन्हां ब्राह्मणी राज्य प्रस्थापित होईल, असा ब्राह्मणेतरांचा बुद्धिनिश्चय झाला व १९३० सालापर्यंत ते स्वातंत्र्याच्या लढ्यापासून अलिप्त राहिले. इतकेंच नव्हे, तर ब्रिटिशराज्यविरोधी चळवळी या देशाला विघातक होतील असें त्यांनीं मानिलें, हाहि विचार वर ब्राह्मणेतर पंडितांच्या वचनांच्या आधारेंच सांगितला.

मला अशी खात्री वाटते कीं नव्या पिढीच्या ब्राह्मणेतर समाजाला ही विपरीत इतिहासमीमांसा, स्वतःलाच अत्यंत अवमानकारक असें हें पूर्वइतिहासाचें भाष्य आणि त्या भाष्यामुळेंच पत्करलेला दुसरा सिद्धान्त–इंग्रज जातांच येथें ब्राह्मणी राज्य प्रस्थापित होईल हा सिद्धान्त–मान्य होणार नाहीं. आणि तसें झाल्यास दुही माजविणें, जन्मनिष्ठ उच्चनीचतेचा पुरस्कार करून इतरांना हीन लेखणें, आपली विद्या इतरांपासून लपवून ठेवणें, हे जे दोष आहेत ते आपल्या समाजाच्या सर्वच जातींत, जमातींत, वर्गांत आणि वर्णांत आहेत, त्यांतून मुक्त असा कोणीहि नाहीं, हा इतिहाससिद्ध विचार त्यांना पटण्याचा संभव आहे. तसें झाल्यास ब्राह्मणब्राह्मणेतरवादाचें मूळच उपटल्यासारखें होईल. म्हणून त्या दृष्टीनें थोडी इतिहासचिकित्सा आतां करावयाची आहे.

## इतिहासाची साक्ष

पूर्वं इतिहासांत जेव्हां जेव्हां क्षत्रियाक्षत्रियांत यादवी माजली तेव्हां तेव्हां ती ब्राह्मणांनीं माजविली, आम्ही भोळेभावडे म्हणून फसलों, ही भूमिका स्वतःला अवमानकारक म्हणून तर ती क्षत्रियांनीं पत्करूं नयेच; पण ती इतिहाससिद्ध नाहीं हेंहि त्यांनीं ध्यानांत घ्यावें. ज्या यादवींशीं ब्राह्मणांचा चुकूनहि संबंध नाहीं अशी यादवी कितीतरी वेळां क्षत्रियांत उद्भवली आणि त्यांच्या नाशास कारण झाली, हें इतिहास सांगत आहे. पृथ्विराज व जयसिंग यांच्यांतील वैमनस्य व त्याचे अनर्थकारक परिणाम सर्वश्रुत आहेतच. दक्षिणेंतील मुसलमानी राज्यांत अनेक मराठे सरदार होते. त्यांत भोसले, जाधव, घोरपडे यांची आपसांत कशीं भयंकर वैरें माजलेलीं होतीं आणि एकमेकांचा अधःपात घडवून आणण्यास ते कसे टपलेले असत, हेंहि इतिहासाला माहीत आहे. यांत ब्राह्मणांचा कांहींच संबंध नव्हता. खुद्द शिवछत्रपतींच्या विरुद्ध चंद्रराव मोऱ्यांसारखे किती तरी मराठे सरदार होते. प्रत्यक्ष त्यांचा भाऊ त्यांना कधींच वश झाला नाहीं. तो विजापूरशींच एकनिष्ठ राहिला आणि त्यांचा पुत्र तर मोगलांना जाऊन मिळाला होता. प्रबोधनकार ठाकरे यांनीं संभाजीला दोष लावणाऱ्यांना नांवें ठेवून त्याच्या या कृत्याचें समर्थनच केलें आहे. त्यांचें म्हणणें असें कीं, घरांत सावत्र आई होती म्हणून संभाजी कंटाळला होता. त्याच्या कर्तबगारीस स्वराज्यांत वाव मिळेना. ह्यास्तव, मोगलाईत का होईना पण मर्दपणास वाव मिळेल, म्हणून संभाजी तिकडे गेला! छत्रपतींच्या राज्यांत सामान्य शेतकऱ्यांचे सेनापति झाले. मावळे, हेटकरी, भंडारी-सर्वांच्या कर्तृत्वास वाव मिळाला, तेथें प्रत्यक्ष युवराजाच्या कर्तृत्वास मात्र वाव मिळत नव्हता! असो. पुढील काळांतील संताजी व धनाजी यांचें वैर महाराष्ट्राला किती घातक ठरलें तें सर्वांना माहीतच आहे. तें ब्राह्मणांनीं माजविलें असें अजून कोणीं म्हटलेलें नाहीं. संताजीचें मुंडकें तोडणारा एक मराठाच होता. शाहू व ताराबाई यांच्या वैराची हीच कथा आहे. हें मुद्दाम पेटविलें असलें तर तें मोंगलांनीं पेटविलें होतें आणि औरंगजेबाच्या

मृत्यूनंतर २५ वर्षांचा लढा जिंकल्यानंतर त्यावेळचे प्रमुख मराठे कोणत्या तरी एका बाजूस दृढपणें चिकटून रहाते तर पेशवाईचा उदयच झाला नसता; पण तें धोरण न अवलंबितां त्या वेळचे प्रमुख सरदार–चंद्रसेन जाधव, रावरंभा निंबाळकर, दमाजी थोरात, उदाजी चव्हाण, हिंदुराव घोरपडे हे दोन्ही पक्ष सोडून मुसलमानांना जाऊन मिळाले. पुढें पेशवाई आली. तेव्हां मराठा सरदारांचीं आपसांतील वैरें ब्राह्मणप्रेरित होतीं असा दावा मांडणें तरी शक्य आहे; पण पेशवाई संपल्यावर शिंदे, होळकर, गायकवाड, भोसले असे मातबर सरदार स्वतंत्र फौजा संभाळून होते. त्यांनीं ऐक्य करून साताऱ्च्या प्रतापसिंह छत्रपतींचा पाठपुरावा केला असता तर इंग्रजी राज्य झालें नसतें; पण इंग्रजांनीं भेदनीतीचा अवलंब करून त्यांच्यांत दुही माजविली. त्यामुळेंच हे एकेकटे इंग्रजांशीं लढून सर्व पराभूत झाले. याचा अर्थ असा आहे कीं, आपल्या या भूमींत सर्व समाज संघटित करून ठेवील इतकी प्रबळ अशी कोणचीच निष्ठा त्यावेळीं नव्हती. स्वामिनिष्ठा नव्हती, धर्मनिष्ठा नव्हती व राष्ट्रनिष्ठा हा शब्दच आपण ऐकला नव्हता; आणि अशा निष्ठेच्या अभावीं येथले ब्राह्मण, येथले क्षत्रिय, येथले जैन, गुजराथी, मारवाडी इ. व्यापारी वैश्य आणि इतर सर्व जनता यांच्यांत वाटेल तेव्हां फूट पडत असे. कधीं मोंगल यादवी माजवीत, कधीं इंग्रज माजवीत. कधीं तेच इतर स्वार्थी विचारांनीं परस्परांत फूट पाडून आपापला पक्ष बळकट करीत. अशा स्थितींत एका जमातीनें किंवा वर्गानें दुसऱ्यावर, यांनीं आमच्यांत मुद्दाम दुही माजवून आमचा नाश घडविला, असा आरोप करणें एकतर इतिहासाच्या दृष्टीनें सयुक्तिक नाहीं, आणि दुसरें म्हणजे अशानें जी पराभूत वृत्ति व जे न्यूनगंड निर्माण होतात ते त्या समाजालाच फार घातक होतात. ब्राह्मण दुही माजवूं शकतात, मोंगल यादवी चेतवूं शकतात, इंग्रजहि आमच्यांत फूट पाडतात, असें सारखें म्हणत बसून आपल्या अधःपाताची जबाबदारी दुसऱ्यावर टाकल्यानें समाज मनानें पंगुळतो. आपल्यांत दुसरे लोक यादवी माजविणार, ते आपल्याला फसविणार आणि आपण त्या भेदनीतीला तोंड देण्यास असमर्थ आहों, असा याचा अर्थ होऊन समाज हतप्रभ होतो. परक्यानें कोणीतरी आपलें रक्षण केलें पाहिजे, आपला मार्ग सुकर केला पाहिजे, अशी परावलंबी

वृत्ति निर्माण होते. उत्कर्षप्रमाणेंच आपल्या अपकर्षालाहि आपले आपणच जबाबदार आहों ही भूमिका जीवनदायक आहे. तिच्यामुळें मन समर्थ व सकस बनतें. ब्राह्मणेतर तरुणांनीं इतिहासाकडे या दृष्टीनें पहावें अशी माझी त्यांना विनंति आहे. आपला अध:पात झाला तर इतर बाहेरचीं कारणें दर वेळीं कांहीं तरी असणारच; पण खरें कारण आपल्याठायींच आहे, हें प्रत्येक समाजानें जाणलें पाहिजे. ही जाणीव व तज्जन्य जबाबदारीची जाणीव निर्माण झाल्यावांचून कोणच्याहि समाजाचा उत्कर्ष होणार नाहीं.

## समाजरचनाच विषम

जन्मनिष्ठ उच्चनीचतेचा ब्राह्मणीधर्म हा ब्राह्मणांनीं निर्माण केला, जातिभेद त्यांनीं पसरून दिले, आम्ही तो धर्म प्रस्थापित करण्यास साह्य केलें असलें तरी तें त्यांच्या प्रेरणेनें केलें, आजहि आमच्यांत जन्मनिष्ठ उच्चतेची भावना जरी असली तरी ती ब्राह्मणांच्या चिथावणीनेंच टिकून आहे, ही भूमिकाहि याच तऱ्हेची आहे. दुर्दैवानें हिंदुस्थानांतील समाजरचनेचे तत्त्वज्ञान बव्हंशीं विषमतेवरच उभारलेलें आहे. इ. स. पूर्वी समतेची कांहीं तरी भावना होती असें दिसून येतें. पण पुढें हळूंहळूं ती नष्ट होत गेली. अविद्वांश्चैव विद्वांश्च ब्राह्मणः पूज्यते सदा । ब्राह्मण विद्वान् असो, अविद्वान् असो, तो पूज्यच आहे, असें तत्त्व मनूनें मांडलें. आणि ‘ टोणपा ब्राह्मण असेल साचा, तरी तो गुरु आठ वर्णांचा', ‘ जरी ब्राह्मण झाला कर्मभ्रष्ट, तरी तो तीन्ही लोकीं श्रेष्ठ ’ अशा तऱ्हेची विचारसरणी रूढ झाली. जातींची व उच्चनीचतेचीं बंधनें साधारण दहाव्या शतकाच्या सुमारास कडकपणें अमलांत येऊं लागलीं; आणि तेव्हांपासूनच हिंदुस्थानच्या विनाशास प्रारंभ झाला.

जन्मनिष्ठ उच्चनीचतेचें हें जें तत्त्व, ही जी समाजघातक विषमता तिचा तत्कालीन ब्राह्मणांनीं अतिशय हिरिरीनें पुरस्कार केला ही गोष्ट खरी आहे. बाराव्या तेराव्या शतकापासून इंग्रजांचें राज्य प्रस्थापित होऊन पाश्चात्य विद्या येथे येईपर्यंत सनातन ब्राह्मणवर्गाची दृष्टि अत्यंत संकुचित व हीन होऊन गेली होती. सर्व समाजाचा हळूंहळूं ऱ्हास होत होता. परक्यांच्या आक्रमणास देश

बळी पडत होता. तरी रूढ धर्मावरची त्यांची अंधनिष्ठा कमी झाली नाहीं. त्यामुळें समाजाच्या नाशाच्या कारणांची मीमांसा करून त्यावर उपाययोजना करण्याची ऐपत त्यांच्याठायीं कधींहि निर्माण झाली नाहीं. ज्ञानेश्वराला त्यांचा विरोध, एकनाथाला विरोध, तुकारामाला विरोध, शिवछत्रपतींच्या राज्याभिषेकाला विरोध, आणि थोरल्या बाजीरावावर सामाजिक बहिष्कार घालण्याची त्यांची तयारी ! शिवछत्रपति ही केवढी दिव्य शक्ति आहे, त्यांचा पराक्रम हिंदुधर्माचा कसा उत्कर्ष घडवीत आहे, या भूमीचा सर्व इतिहास बदलून टाकण्याचें सामर्थ्य त्यांच्यांत कसें आहे, हें या सनातन शास्त्री, पंडित, भिक्षुक या वर्गाला आकलनच झालें नाहीं. कलावाद्यन्तयोः स्थितिः । नन्दांतं क्षात्रियकुलम् । ही वचनें मूढपणें उराशीं धरून त्यांनीं शिवप्रभूंच्या क्षत्रियत्वाला व म्हणूनच राज्याभिषेकाला विरोध केला. आणि सनातन भिक्षुक वर्गाची हीच वृत्ति गेल्या शतकाच्या अखेरपर्यंत जवळ जवळ कायम होती.

पण याचा अर्थ असा नव्हे कीं इतर कोणी जाती किंवा इतर कोणी समाज या जन्मनिष्ठ उच्चनीचतेच्या घातक तत्त्वाच्या वर्चस्वापासून मुक्त होते.तसें असतें तर त्यांनीं या धर्माविरुद्ध तेव्हांच संग्राम करून या राष्ट्राला वांचविलें असतें. छत्रपतींच्या राज्याभिषेकाला जसा अंध, सनातनधर्मनिष्ठ शास्त्री-पंडितांचा विरोध होता, तसाच श्रेष्ठ, खानदानी कुळांतल्या मराठ्यांचाहि होता. भोसल्यांचें कुळ ते कमी समजत. ‘ मोहिते, महाडिक, निंबाळकर, सावंत, जाधव, घोरपडे वगैरे बडे बडे मराठे सरदार पहिल्यापासूनच शिवाजीच्या राज्याभिषेकाच्या कल्पनेला विरुद्ध होते. ’ असें सांगून प्रबोधनकार ठाकरे यांनीं त्या वेळच्या मराठ्यांवर कडक टीका केली आहे. आणि आपल्या म्हणण्याच्या सिद्ध्यर्थ इतिहासपंडितांचा उताराहि दिला आहे. ( कोदण्डाचा टणत्कार. पृ. ३६, ३७. ) ही खुद्द शिवछत्रपतींच्याबद्दल त्यांची दृष्टि; मग मराठेतर समाजांबद्दल—कुणबी, माळी, लोहार, कुंभार, कोळी, परीट या एकंदर समाजांबद्दल काय असेल त्याची सहज कल्पना येईल. महर्षि विठ्ठल रामजी शिंदे यांनीं याविषयीं उद्बोधक माहिती दिली आहे. मद्रासकडे नायर हे जमीनदार होते. त्यांतील नायर शिलेदारानें चेरुमाचा ( हीन जातीयाचा )

करमणुकीखातर प्राण घेतला तरी चालत असे. ( भारतीय अस्पृश्यतेचा प्रश्न पृ. १५६ ) ब्राह्मण व नायर ( क्षात्रिय ) या दोघांनीं, त्यांच्या मतें, अस्पृश्यांना गुलाम बनविलें होतें. त्यांची आणखीहि एकदोन मतें आत्मनिरीक्षण करतांना ब्राह्मणेतर तरुणांनीं ध्यानांत घ्यावीं. बौद्धांची अहिंसा व जैनांचा कडकडीत शाकाहार यामुळें सामाजिक रचनेची संकीर्णता कमी न होतां उलट वाढलीच. आणि त्या काळीं अस्पृश्यतेचें दृढीकरणच झालें. द्रविडांबद्दल त्यांनीं लिहिलें आहे कीं, आर्यांप्रमाणेंच द्रविडांतहि चातुर्वर्ण्य असल्याचे पुरावे सांपडतात. ( पृ. ३९ ) एके ठिकाणीं ते म्हणतात कीं राजपुत, जाठ, गुरखे, मराठे, कुणबी, चित्पावन, नंबुद्री, नायडू, मुदलियार, नायर, पाळेगार-या जाति हिंदुधर्माच्या पोलादी चौकटींत वरिष्ठ स्थान पटकावून बसल्या आहेत. ( पृ. १८३ ) आणि हीच गोष्ट इतिहासप्रसिद्ध आहे. भरतभूमीचें जें जें वैभव आहे त्याचें श्रेय ज्याप्रमाणें क्षत्रियांना व ब्राह्मणांना आहे, त्याचप्रमाणें येथें जें जें हीन आहे त्याचें अपश्रेयहि प्राधान्यानें या दोघांना आहे. माझें तर असें मत आहे कीं या श्रेयाचे व अपश्रेयाचे वाटेकरी या दोघांप्रमाणें इतर समाजहि आहेत. वैश्यांनीं व्यापारवृद्धि केली; इतकेंच नव्हे तर अनेक वेळां त्यांनीं राज्यकारभारहि केला आहे. आणि भारतीय संस्कृतीचे ते निःसंशय श्रेयभागी आहेत. पण श्रेयाबरोबर अपश्रेयाचीहि जबाबदारी माथीं घ्यावी लागते. नुसत्या श्रेयाची जबाबदारी घेणें व अपश्रेयाची टाळणें याला अर्थच नसतो. तसें केल्यास या समाजाला इतर अनेक अवगुण आपल्या अंगीं चिकटवून घ्यावे लागतात, इकडे आज लोकांचें दुर्लक्ष होत आहे.

ब्राह्मण हाच केवळ स्वतःला जन्मानें श्रेष्ठ समजतो व त्या श्रेष्ठत्वाचीं सुखें व हक्क मिळवूं पहातो, आणि मराठे तसें करीत नाहींत, असें आहे काय ! माझे वाडवडील वेदवेत्ते होते, शास्त्री होते, पुण्यशील होते, धर्मनिष्ठ होते म्हणून त्यांच्याप्रमाणें मलाहि, मी तसा नसलों तरी, केवळ मी त्यांच्या कुळांत जन्माला आलों म्हणून तुम्हीं दक्षिणा दिली पाहिजे, माझी पूजा केली पाहिजे, अशी ब्राह्मणांची मागणी होती. आणि ही वृत्ति अगदीं अनिष्ट व घातक होती, यांत शंका नाहीं. पण इतरांची वृत्ति कांहीं निराळी

नव्हती. मराठे हेच म्हणत आले. माझ्या वाडवडिलांनीं तरवार मारली, त्यांनीं वतन मिळविलें, आतां मी तसा पराक्रमी नसलों तरी केवळ त्यांच्या कुळांत आलों आहे, म्हणून मला त्यांचें वतन पाहिजे, माझा तो हक्कच आहे, अशीच मराठ्यांची मागणी आहे. वतन, मिरास, सरदारी, सरंजामदारी, संस्थान व राज्य हीं केवळ जन्मानें, वंशपरंपरेनें मिळवणें ही जन्मनिष्ठ उच्चनीचताच आहे. अंगीं पराक्रम नसला तरी क्षत्रिय राजाचा मुलगा राज्यावर हक्क सांगतो, आपलें श्रेष्ठत्व मिरवितो. त्याचप्रमाणें ब्राह्मणांचा मुलगा अंगीं विद्वत्ता नसतांना दक्षिणेवर हक्क सांगतो व मी टोणपा असलों तरी आठ वर्णांचा गुरुच आहे, अशी प्रौढी मिरवितो. हिंदुस्थानच्या इतिहासांत एकाहि ब्राह्मणेतरानें, मी पराक्रम केला नाहीं तेव्हां मला वतन किंवा सरंजाम नको, राज्य नको, असें कधींहि म्हटलेलें नाहीं. केवळ जन्मानें मिळालेले हक्क व सुखें, तेहि, ब्राह्मणाप्रमाणेंच, तें योग्यच आहे असें मानून भोगीत आहेत. आणि आपण श्रेष्ठ कुलांतले व इतर हीन कुलांतले असा अभिमान मिरवीत आहेत.

ब्राह्मणेतरांची ही प्रवृत्ति महात्मा ज्योतिबा फुले यांच्या पूर्वीच्या काळीं होती व आतां नाहीं, असें मुळींच नाहीं. ब्राह्मणेतर सांगतात कीं, पूर्वी आम्ही भोळे होतों, आम्हांस ब्राह्मणांनीं फसविलें, पण महात्मा फुले यांनीं आमच्यांत जागृति केली व आमची दृष्टि उघडली. फुले यांनीं ब्राह्मणी धर्माच्या वर्चस्वाविरुद्ध निर्भयपणें झगडा केला. ब्राह्मणेतर समाजाला जागृति आणण्यासाठीं सर्व आयुष्य अर्पण केलें हें सत्यच आहे. आणि त्यामुळें आपला सर्वच समाज त्यांचा ऋणी आहे. पण त्यांच्यानन्तरच्या काळांत ही उच्चनीचतेची भावना मराठ्यांच्या वृत्तींतून अजिबात गेली व ब्राह्मणांतच फक्त राहिली असें आहे काय ? जातिभेदाचें व अस्पृश्यतेचें सर्व खापर ब्राह्मणांच्या माथीं फोडणाऱ्या मराठा खानदानी वर्गानें ९६ कुळांच्या बाहेर विवाहसंबंध करण्यास आरंभहि केलेला नाहीं. गांवोगांवीं अस्पृश्यांना, जरा अतिक्रम केल्याबरोबर, झोडपून काढण्यांत तेच पुढाकार घेत आहेत. महाडच्या चवदार तळ्याच्या सत्याग्रहाच्या वेळीं, पर्वतीच्या सत्याग्रहाच्या वेळीं, अस्पृश्यांना विरोध करणारांत बहुसंख्य ब्राह्मणेतरच होते. पर्वतीवर मंदिरप्रवेशसत्याग्रहाच्या वेळीं अस्पृश्यांबरोबर सत्याग्रह करून स्पृश्यांचा

दगडधोंड्यांचा मार खाणारांत न. वि. गाडगीळ, वि. म. भुस्कुटे, देशदास रानडे, बाळूकाका कानिटकर हे ब्राह्मण होते व मार देणारांत ब्राह्मणाप्रमाणेंच गुंजाळ, झांजले इ. ब्राह्मणेतर होते. ( शिवराम जानबा कांबळे–चरित्र—नवलकर–पर्वतीसत्याग्रह प्रकरण ) महर्षि शिंदे अस्पृश्यांत मिसळत, हें सनातन मराठ्यांना मंजूर नव्हतें. त्यांच्या भगिनी वारल्या तेव्हां या मंडळींनीं खांदा देण्याचें नाकारलें. तो नव्या मताच्या मराठ्यांनीं दिला. केशवराव जेधे असेच अस्पृश्यांत वावरत. तेव्हां त्यांच्यावर त्यांच्या समाजानें तीन वर्षें बहिष्कार घातला होता. ( सत्याग्रही महाराष्ट्र–प्रेमा कंटक पृ. २२७ ) याचा अर्थ असा कीं ब्राह्मणी धर्मातील जन्मनिष्ठ उच्चनीचतेवर मराठ्यांची ब्राह्मणाइतकीच दृढ श्रद्धा होती व आहे आणि त्यांतून मिळणारी सर्व श्रेष्ठता व सुखेंहि त्यांना भोगावयास हवीं आहेत; पण आज त्याची जबाबदारी फक्त ब्राह्मणांवर लादावी असा त्यांचा विचार आहे; आणि तो महात्मा फुले यांनीं जागृति आणल्यानंतरहि !

## मराठा–मराठेतर

मराठे हे ब्राह्मणाइतकेच जन्मनिष्ठ उच्चनीचतेचे कट्टर अभिमानी आहेत हें ब्राह्मणेतर चळवळीचीं थोडीं फळें पदरांत पडूं लागलीं तेव्हां स्वच्छ दिसून येऊं लागलें. ब्राह्मणेतर चळवळ सुरू झाली तेव्हां, ब्राह्मण फक्त जुलमी, अन्यायी, विषमतेचे पुरस्कर्ते, आणि बाकी सर्व समाज–मराठे, कुणबी, माळी, लोहार, सुतार, परीट, कुंभार, कोष्टी, साळी, अस्पृश्य–हा समाज दलित अशी भूमिका, या ब्राह्मणेतरांतील नेते जे मराठे, त्यांनीं घेतली. आणि त्यासाठींच वर सांगितलेलें तत्त्वज्ञान पूर्वींच्या इतिहासाच्या विपरीत मीमांसेच्या आधारें त्यांनीं प्रसृत केलें. असें करतांना त्यांनीं खरोखरीच या सर्व समाजाशीं सर्व दृष्टींनीं एकरूप व्हावयाचें ठरविलें असतें, तर त्या सामाजिक क्रांतीला तुलना नव्हती. सर्व जगांत ती एक अभूतपूर्व गोष्ट घडली असती. पण इतक्या अभूतपूर्व गोष्टी जगांत घडत नाहींत. मॉंटफर्ड सुधारणा येऊन सरकारी नोकऱ्या व सत्ता हातीं येते असें दिसतांच मराठा वर्गाचें स्वरूप बदललें व इतर समाजांना त्याची जाणीव होऊन मराठा व मराठेतर असा भेद निर्माण झाला. प्रबोधनकार ठाकरे

यांनीं याविषयीं केलेलें विवेचन फार उद्‌बोधक आहे. ब्राह्मणेतरांच्या बाजूनें ब्राह्मणांवर भयंकर भडिमार करणारे हे एक थोर लेखक आहेत. त्यांच्याच शब्दांत या प्रकाराचें वर्णन केलें कीं, त्याकडे कलुषित व पक्षपाती दृष्टीनें पाहिल्याचा आरोप येण्याचें कारण उरणार नाहीं. 'शेतकऱ्यांचें स्वराज्य' या आपल्या पुस्तकांत ठाकरे लिहितात—'जातिभेद, देव-मानवांतला दलाल भट, आणि सामाजिक उच्चनीचता, या तीन महत्त्वाच्या राष्ट्रीय दोषांवर कत्यार चालविणाऱ्या सत्यशोधक समाजाचा पुरस्कार ब्राह्मणेतरांनीं सरास केल्यामुळें या चळवळींच्या संघशक्तीचा दुरुपयोग मराठे चळवळे स्वजातिवर्चस्वाकडे करतील, अशी प्रथमतः कोणालाहि शंका आली नाहीं. (पण) मराठे झाले तरी पिण्डानें जातिभेदाळू हिंदूच! विद्येंत अगदींच मागासलेले....आम्ही करूं ती पूर्व दिशा असा भटी मद त्यांना चढला. केवळ मागासलेल्या खेडवळ ब्राह्मणेतर जनतेची संघटना साधावी तर कार्यकर्त्या मराठ्यांचें वर्तन अनेक मराठेतर समाजांना जाचक होऊं लागलें.' (पृ. ८०) यानंतर श्री. ठाकरे यांनीं केलेल्या विवेचनाचा सारांश असा:—मॉटफर्ड रिफॉर्म्सचीं नवीं कौन्सिलें सुरू होण्याच्या सुमारास तर ब्राह्मणेतर पक्षांत भयंकर उत्पात माजले. मराठामराठेतर भेदाचा पाया याच वेळीं भक्कम पडला. मराठे या वेळेपासून स्वजातिवर्चस्वाची भाषा अट्टाहासानें बोलूं लागले. मराठा वृत्तपत्रें मराठेतरांना उघड धमक्या देऊं लागलीं. ब्राह्मणेतर चळवळ म्हणजे मराठा चळवळ, असें भाष्य मराठे करूं लागले. क्षत्रिय म्हणजे फक्त मराठे, अशी व्याख्याहि त्यांनीं जाहीर केली. कौन्सिलदाऱ्या, दिवाणगिऱ्या आणि सरकारी नोकऱ्या या खास मराठ्यांना मिळाव्या—आणि त्याहि लायकीच्या प्रमाणांत नव्हे, तर लोकसंख्येच्या प्रमाणांत—एवढ्याच क्षुद्र बिंदूवर ब्राह्मणेतर चळवळीची भिंगरी फिरूं लागली. (पृ. ८०–८२) आज ब्राह्मणेतर चळवळींचें कोणी 'धार्मिक लढा' कोणी 'वर्गलढा' असें वर्णन केलें आहे. महात्मा फुले यांची दृष्टि धार्मिक लढ्याची होती. पण ती त्यांच्यापुरतीच राहून पुढें नष्ट झाली. देव व जनता यांच्यांत भट हा दलाल नको, हा धार्मिक लढयाचा आत्मा होय. पण ब्राह्मणेतर चळवळींचे प्रमुख नेते राजर्षि शाहू यांनींच 'क्षात्रजगद्‌गुरु' निर्माण केले. प्रा. लठ्ठे यांनीं 'ब्राह्मणी वर्चस्वाचा अंत'

असें याचें वर्णन केलें आहे. पण ठाकरे यांचे मतें, याच वेळीं महात्मा फुले यांचें थोर तत्त्व ब्राह्मणेतरांनीं सोडलें. आणि त्यामुळें ब्राह्मणेतर चळवळींत दांडगी फूट पडली. कारण एक दलाल जाऊन तेथें दुसरा दलाल आला, इतकाच फरक! मराठेतर क्षत्रियांना याची फार चीड आली. 'वगैलढा' हें वर्णन, ठाकरे यांचे मतें, अरोंच सयुक्तिक नाहीं. उमरावतीच्या ब्राह्मणेतर कॉंग्रेसमध्यें 'ब्राह्मण वगळून बाकींची सारी दुनिया समाविष्ट केली होती. शेतकऱ्यांच्या मुंड्या मुरगळणारे गुजर, मारवाडी, देशाला दारूबाज बनविण्याचा राजरोस मक्ता घेणारे सोमयाजी पारशी, कज्जेदलाल वकील इ. शेतकऱ्यांचे खास शत्रू त्यांचे पुढारी बनले. कसाईच गोरक्षणाचे चळवळीचे सूत्रधार बनल्यावर परिणामाची कल्पना सहज येईल. (पृ. ८१) ज्ञानदेव ध्रुवनाथ घोलप या अस्पृश्य पुढाऱ्यांनीं मराठ्यांविषयीं हेंच लिहिलें आहे. "मराठ्यांनीं ब्राह्मणांना हांकलून देऊन त्यांच्या जागा आपण घेतल्या आहेत. अस्पृश्यांनीं आपलीं मुलें शाळेंत पाठवूं नयेत म्हणून घरादारांचा नाश करूं अशा त्यांनीं धमक्या दिल्या."

## सर्व समाजच रोगग्रस्त

ब्राह्मणेतर चळवळीला हें जें रूप आलें त्यावरून हें स्पष्ट होईल कीं जन्मनिष्ठ उच्चनीचता हा रोग आपल्या सर्व समाजाच्याच रक्तांत भिनलेला आहे. आणि तो नाहींसा करण्यासाठीं सर्व समाजांतल्या पुरोगामी शक्तींनीं एकवटून प्रयत्न केले पाहिजेत. आपल्या देशांतील प्रत्येक जातींत विवेकी, बुद्धिनिष्ठ व उदार बुद्धीचे, निःस्वार्थी व त्यागी लोक जसे सांपडतात तसेच अविवेकी, अंधनिष्ठ, संकुचित वृत्तीचे, स्वार्थी असेहि लोक सांपडतात. ही वस्तुस्थिति दृष्टीआड केली तर, ब्राह्मण व ब्राह्मणेतर एवढ्या दोनच फळ्या होऊन समाजाची विघटना तेथें थांबणार नाहीं. तर मराठा व मराठेतर, मराठा क्षत्रिय व इतर क्षत्रिय, महार व महारेतर, अशा सारख्या चिरफळ्या होत जातील. नव्हे, तशा होत चालल्याच आहेत. आणि या प्रवृत्तीला वेळींच पायबंद बसला नाहीं, तर भारतीय समाजाची पुनर्घटना करणें जवळजवळ अशक्य होऊन बसेल.

विषमतामूलक असा जो सनातन धर्म, ज्याला ब्राह्मणी धर्म असें सर्व ब्राह्मणेतर पंडितांनीं संबोधिलें आहे आणि जो फक्त ब्राह्मणांनींच प्रसृत केला असा त्यांचा आरोप आहे, तो ब्राह्मणी धर्म नष्ट करावा असा प्रयत्न पाश्चात्य विद्येनें दृष्टि उघडल्याबरोबर स्वतः ब्राह्मणानींच अट्टाहासानें सुरू केलेला आहे. राजा राममोहन रॉय व त्यांचा ब्राह्मसमाज, रानडे, भांडारकर व त्यांचा प्रार्थना समाज, स्वामी दयानंद व त्यांचा आर्यसमाज हे सर्व याच क्षेत्रांतले प्रयत्न आहेत. लोकहितवादी यांनीं या जुनाट व घातकी धर्मावर व त्यालाच चिकटून राहणाऱ्या मूढ ब्राह्मणांवर जितका भडिमार केला तितका ब्राह्मणेतरांनीं सुद्धां केला नसेल. आणि माझ्या मतें, यासाठीं ब्राह्मण लोक त्यांचे कायमचे ऋणी राहतील. आगरकर व त्यांचा 'सुधारक' यांचा तर रूढधर्मांचा विध्वंस करण्यासाठींच जन्म होता, हें सर्वश्रुत व सर्वमान्य आहे. विष्णुशास्त्री, टिळक व त्यांची परंपरा यांनीं केव्हां केव्हां नव्या सुधारणेस विरोध केला आहे. पण जन्मनिष्ठ उच्चनीचतेचे ते पुरस्कर्ते होते असें, त्यांचे लेख ज्यानीं वाचले आहेत त्यांना, केव्हांहि म्हणतां येणार नाहीं. या देशांत पूर्वी व आतांहि राष्ट्राभिमान ही निष्ठाच नाहीं आणि ती जातिभेदामुळें नाहीं, असें स्पष्ट सांगून राष्ट्रनिष्ठा अंगीं बाणविण्या-साठीं आपण पाश्चात्यांना गुरु केलें पाहिजे, असें विष्णुशास्त्री यांनीं निःसंदिग्धपणें सांगितलेलें आहे. टिळकांनीं कोल्हापूरच्या राजर्षि शाहू छत्र-पतींच्या वेदोक्ताच्या प्रकरणांत व पुढें पटेल बिलाच्या वेळीं सनातन्यांची प्रतिगामी बाजू घेतली ही गोष्ट अत्यंत वाईट झाली, व त्यामुळें आपल्या समाजाची मोठी हानि झाली आहे हें खरें आहे. पण त्यामुळें ते जन्मनिष्ठ उच्चनीचतेचे पुरस्कर्ते होते व त्यांना ब्राह्मणी राज्य प्रस्थापित करावयाचें होतें असा आरोप सयुक्तिक होणार नाहीं. १८८१ सालीं लेखणी उचलल्या-पासून, गिरण्यांमध्यें फायद्याचा हिस्सा कामगारांना मिळाला पाहिजे, शेतकरी व कारागीर कॉंग्रेसमध्यें आला पाहिजे, कष्टकरी लोक म्हणजेच देशांतली प्रजा, मँचेस्टरमुळें येथला कोष्टी मरत आहे, चांदी पौंडाची चलाखी करून सरकार शेतकऱ्याला पिळीत आहे, सारावाढीमुळें, सर्व्हे सेटलमेंटमुळें शेतकरी उठकळेस आला आहे, या जनतेला जागृत करणें हेंच सुशिक्षितांचें काम आहे, असा टिळकांनी सारखा धोशा चालविला होता. व्यक्तिस्वातंत्र्याचे

ते कट्टे पुरस्कर्ते होते. ज्या देशांत विचारस्वातंत्र्य नाहीं तो देश मृत समजावा, अशी त्यांची शिकवण होती. जातिभेद किंवा सामाजिक रूढि यामुळें येणारी उच्चनीचता मानावयाची नाहीं, असें लोकशाही स्वराज्य-पक्षाचें धोरण म्हणून त्यांनीं जाहीर केलें होतें. टिळकांचें हें सर्व कार्य दृष्टिआड करून वेदोक्तासारख्या काहीं प्रकरणामुळें त्यांना ब्राह्मणीधर्माचे उपासक म्हणावयाचें असेल, तर या आरोपांतून कोणीच सुटणार नाहीं. महात्माजींनीं चातुर्वर्ण्याचेंच नव्हे, तर जातिभेदाचें कितीतरी ठिकाणीं समर्थन केलें आहे. पितृपरंपरेनें विशिष्ट गुण माणसाच्या अंगीं येतात, त्या गुणांच्या मर्यादा मनुष्याला ओलांडणें शक्य नाहीं म्हणून वर्णव्यवस्थेनें सांगितलेले, जन्मानें ठरणारे व्यवसायच माणसानें करावे, असें महात्माजी सांगत असत. ( मॉडर्न रिव्ह्यू-ऑक्टोबर १९३५ ) गांधीजींनीं पुष्कळ ठिकाणीं जाति-भेदास विरोध केला आहे. पुढें पुढें स्पृश्य व अस्पृश्य यांचे विवाहहि त्यांनीं घडविले; पण 'विशिष्ट गटांतूनच वधू निवडणें हा फार मोठा संयम आहे, आत्म्याचा विकास होण्यासाठीं मिश्रविवाह व सहभोजन यावर बंदी घालणें अवश्य आहे' अशीहि शिकवण ते देत. ( यंग इंडिया ६-१०-२७ ) आणि तुमच्या विचारांत विसंगति आहे असें कोणी म्हटल्यास त्यांना तें मान्य होत नसे. 'जातिनिष्ठ व्यवसाय' हा तर गांधीवादानें मार्क्सवादावर, आणि आजची आर्थिक क्षेत्रांतली घातकी स्पर्धा टाळण्यासाठीं, उपाय म्हणून सांगितलेला आहे. पितृपरंपरेनें आलेला व्यवसाय स्वीकारल्यानें मनुष्याच्या शक्तीची बचत होऊन ती शक्ति त्याला आत्मिक उन्नतीसाठीं वापरतां येते असें त्यांचें मत होतें. [ यंग इंडिया २९-९-२७ ] या त्यांच्या मतामुळें अस्पृश्यांचे नेते डॉ. आंबेडकर त्यांच्यावर चिडून जात. आणि अस्पृश्यांच्याच नव्हे तर वरिष्ठ ब्राह्मणेतर समाजांतील नेत्यांनीं सुद्धां, काँग्रेसचा उपयोग ब्राह्मण करून घेत आहेत, असा यामुळें अभिप्राय दिल्याचें मागें सांगितलेंच आहे. माणूस कितीहि मोठा झाला, त्याच्या वृत्ती कितीहि क्रांतिकारक असल्या, तरी पूर्वरूढींचे संस्कार कोठें तरी त्याच्या मनांत घर करून बसलेले असतात व केव्हां केव्हां ते प्रबल होतात, हें आपण लक्षांत घेतलें पाहिजे आणि तेवढ्यासाठीं त्याच्या सर्व कार्यावर बोळा फिरविण्याचें धोरण निषिद्ध मानलें पाहिजे. पण ब्राह्मणेतर पंडित या जीवनाकडे या

हंसक्षीर न्यायानें पहात नाहींत. त्यामुळें त्यांनीं रजपुतांना भाडोत्री ठरविलें, साक्षात् शिवछत्रपतींना ब्राह्मणी वर्चस्वाच्या अधीन झालेले पुरुष असें मानलें, जन्मनिष्ठ उच्चनीचतेचे पुरस्कर्ते, असा टिळकांवर आरोप केला आणि महात्माजींवरसुद्धां त्याच तऱ्हेचे आरोप करण्यास कमीं केलें नाहीं ! अशा स्थितींत गेलीं शंभर वर्षें ब्राह्मणी धर्माचें तत्त्वज्ञान नष्ट करण्याचे स्वतः ब्राह्मणांनींच जे प्रयत्न चालविले आहेत त्याच्या मागची सद्भावना त्यांना कितपत मान्य होईल याची शंकाच आहे. पण तशी सद्भावना आहे असें क्षणभर गृहीत धरून त्यांनीं ब्राह्मणांच्या या प्रयत्नांचा विचार केला तर त्यांच्या मनांतील कटुता बरीच कमी होईल असें वाटल्यामुळें त्यांना तशी नम्र विनंति करून हें विवेचन मी करीत आहें.

विषमतामूलक ब्राह्मणी धर्म नष्ट करण्याचा सुधारकांनीं प्रयत्न केलाच आहे. पण अर्वाचीन काळांत शास्त्री पंडितांनींसुद्धां या कामीं मोठा पुढाकार घेतला आहे. नारायणशास्त्री मराठे या थोर पंडिताला याचें बरेंचसें श्रेय आहे. त्यांच्याशिवाय विद्वद्रत्न के. ल. दप्तरी, महामहोपाध्याय काणे, विद्यावाचस्पति सदाशिवशास्त्री भिडे, महामहोपाध्याय पाठकशास्त्री, तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी, तर्कतीर्थ पंडित रघुनाथशास्त्री कोकजे यांनीं अविश्रांत परिश्रम करून, अनेक ग्रंथ लिहून धर्माला आलेलें अमंगल रूप घालवून त्याचें पुनरुज्जीवन करण्याचा प्रयत्न चालविला आहे. लोणावळ्याचें धर्मनिर्णयमंडळ हें त्याचेंच फल होय. हें मंडळ आतां जातिवर्णनिरपेक्ष कोणाचेहि धर्मसंस्कार वेदमंत्रांनीं करण्यास सिद्ध आहे. भिन्न जातीय विवाह करूं इच्छिणारांनाहि, अनुलोम प्रतिलोम कसलाहि विवाह असला तरी, मंडळ साहाय्य करण्यास सदैव तत्पर आहे. तेव्हां आतां उच्चनीचतेचा पुरस्कार करणाऱ्या ब्राह्मणधर्माचा ब्राह्मणांनींच कणा मोडून पाडला आहे यांत शंका नाहीं.

ह्याचा अर्थ असा नव्हे कीं, समाजांतील ब्राह्मणवर्ग त्या जुन्या रूढीच्या दुष्ट वर्चस्वांतून पूर्णपणें मुक्त झाला आहे. तसें प्रतिपादन मला मुळींच करावयाचें नाहीं. अजूनहि सनातन धर्माला दृढपणें कवटाळून बसणारे अनेक ब्राह्मण शहरांतून आणि विशेषतः पाश्चात्य संस्कृतीपासून दूर

असणाऱ्या खेड्यापाड्यांतून अनेक सांपडतील. स्वतःच्या श्रेष्ठपणाची प्रौढी मिरविणें, इतरांना हीन लेखणें त्यांचा संपर्क टाळणें, अंधपणेंच जुनें आचारविचार चालवीत रहाणें, आपल्या आचारविचारउच्चारानें इतर जातींचीं, समाजांचीं मनें कशीं दुखवतात, त्यामुळें भिन्न जातींत कटुता कशी निर्माण होते व ही कटुता द्वेषभावनेंत परिणत होऊन समाजविघटनेस कशी कारण होते, याची फिकीर कधींहि न करणें–हीं जीं अपभ्रष्ट सनातन धर्माचीं लक्षणें तीं त्यांच्या ठायीं अजूनहि दिसून येतात. तेव्हां ब्राह्मण समाज सर्वांगानें सुधारला आहे व सामाजिक पुनर्घटनेस सर्वस्वी अनुकूल भूमिका त्यानें घेतली आहे, असा पक्ष मला अगदीं मांडावयाचा नाहीं. मला ब्राह्मणेतरांच्या निदर्शनास एवढेंच आणावयाचें आहे कीं ब्राह्मण जसा या जुन्या ब्राह्मणी धर्माच्या वर्चस्वांतून मुक्त झालेला नाहीं तसाच इतर कोणचाहि समाज त्यांतून मुक्त झालेला नाहीं. विकृत अशा सनातन धर्माचीं वरील सर्व लक्षणें मराठ्यांपासून शूद्रअतिशूद्रांपर्यंत प्रत्येक जातींत त्याच प्रमाणांत, आणि पाश्चात्य विद्या त्यांच्यांत कमी प्रसृत झालेली असल्यामुळें, थोड्या जास्त प्रमाणांत दिसून येतात. आणि म्हणूनच माझी त्यांना अशी प्रार्थना आहे कीं, याविषयीं भ्रामक समजुती निर्माण करून त्यांनीं पूर्वीप्रमाणेंच दुसरी एखादी विपरीत भूमिका घेऊं नये. मागल्या इतिहासाविषयीं अशाच भ्रामक समजुती त्यांनीं निर्माण केल्या. मागल्या सर्व अनर्थांची जबाबदारी ब्राह्मणांवर लादण्याच्या बुद्धीनें क्षत्रियांना त्यांनीं अत्यंत हीन व अवमानकारक भूमिकेवर आणून सोडलें. महाराष्ट्रांतल्या मराठा समाजानें अंगीकारलेली ही भूमिका पाहून हा काय विनोद होता! कीं दैवदुर्विलास होता, हेंच कळत नाहीं. गेल्या आठ–नऊशें वर्षांत या देशावर अरब, अफगाण, तुर्क, मोगल, इंग्रज, डच, पोर्तुगीज, फ्रेंच यांनीं आक्रमणें करून आपापलीं लहानमोठीं राज्यें स्थापलीं. त्यांना ब्राह्मणी वर्चस्व सहज उधळून देतां आलें. त्यांनीं इतर प्रजेबरोबर ब्राह्मणांचेंहि वाटेल ते हाल केले, त्यांचे समाजच्या समाज नाहींसे करून टाकले, त्यांचें सक्तीनें धर्मांतर अनेक वेळां अनेक ठिकाणीं केलें, आणि याविरुद्ध प्रतिकार करण्यांत ब्राह्मणांना, कांहीं अपवाद वजा जातां, इतर समाजाप्रमाणेंच केव्हांहि यश आलें नाहीं. कोणीहि येऊन ब्राह्मणी वर्चस्वाचा असा धुरळा

करून टाकण्यास समर्थ ठरत असतांना, मराठयांनीं मात्र आपणांत हें सामर्थ्य नाहीं, अशी भूमिका स्वीकारावी आणि इंग्रजांच्या स्वार्थीपणाचीं हजारों प्रत्यंतरें येत असतांना, त्यांना आपले उद्धारकर्ते मानून तिलाच दृढपणें चिकटून रहावें हें या भूमीचें आणि विशेषतः महाराष्ट्राचें केवढें दुर्दैव होय ! सुदैवानें १९३० सालापासून इंग्रजांच्या आश्रयानें आत्मोद्धार करण्याचें धोरण ब्राह्मणेतरांनीं टाकलें आहे. पण उच्चनीचतेच्या धर्माचें वर्चस्व सर्वच समाजावर आहे, या रोगांतून कोणीहि मुक्त नाहीं, ही भूमिका त्यांनीं अजून स्वीकारली आहे, असें वाटत नाहीं. ब्राह्मण फक्त जुलमी, अन्यायी, विषमतेचे भोक्ते आणि बाकी सर्व महाराष्ट्रीय समाज समतावादी, उदार, नव्या विचारसरणीचा, अशी अजून त्यांची भूमिका असल्याचें दिसतें. यामुळें ब्राह्मण या जातीचें वर्चस्व नष्ट करण्यांत त्यांना यश मिळेल, पण ब्राह्मणी धर्माचें वर्चस्व कधींच नष्ट होणार नाहीं.

पुढील काळांत ब्राह्मणेतर समाजाचें पुढारीपण मराठा समाजाकडे येईल असें वाटतें. विषमतेच्या ब्राह्मणी धर्माचे उपासक केवळ ब्राह्मणच नसून आपल्याहि अंगीं तोच रोग आहे याची दखल त्यांनीं घेतली नाहीं तर, त्यांना ब्राह्मणेतरांचें नेतृत्व करण्यांत यश येईल असें वाटत नाहीं. मराठा-मराठेतर चळवळ शाहू राजर्षींच्या देखतच कशी सुरू झाली हें प्रबोधनकार ठाकरे यांच्या आधारें वर दाखविलेंच आहे. ब्राह्मणांना ज्या दुष्कर्मासाठीं मराठे दोष देत आले, त्याच दुष्कर्मांत ते आतां आपल्या चळवळीचा बळी देत आहेत, असा ठाकरे यांचा स्पष्ट अभिप्राय आहे. म्हणजे मराठेतर लोक मराठयांवर नाराज आहेत. अस्पृश्य समाजांतहि असेच वारे वहात आहेत. अस्पृश्य हे या ब्राह्मणेतरांतून फुटून निघाले आहेत, आणि मराठा पुढारी स्वार्थांध आहेत, असा त्यांनीं त्यांच्यावर आरोप केला आहे. ( अस्पृश्यांच्या चळवळींतील सावळा गोंधळ—भाई अमरसिंग ) आणि मराठा समाजानें पहावयाचें ठरविलेंच तर त्याला मराठेतर वर्गाच्या या प्रवृत्तीचे अनेक पुरावे उपलब्ध होतील. अस्पृश्य व आदिवासी हे समाज आतां जोरानें उठावणी करीत आहेत. यावेळीं नगरपालिका, जिल्हाबोर्डें, काँग्रेस-समित्या, त्यांतील प्रमुख आसनें, सरकारी अधिकाऱ्यांचीं बरीचशीं आसनें आणि मंत्रीमंडळें यांवर सर्वत्र बव्हंशीं मराठा वर्ग अधिष्ठित झालेला त्यांना

दिसेल. अशा वेळीं आपला सर्व समाज समतावादी, उदार असून विषमतेच्या ब्राह्मणी धर्मातून मुक्त आहे, असा खोटा डांगोरा हा नेतृत्व करणारा समाज पिटीत राहील तर स्वतःच्या समाजाची व इतर समाजांची पुनर्घटना करण्यांत तो अयशस्वी होईल; आणि मग ब्राह्मणवर्गाला एकजात जलुमी व अन्यायी ठरविण्यासाठीं त्यांनीं इतिहासाची जशी मीमांसा केली आणि ती सत्य मानून परावलंबनाची भूमिका जशी त्यांनीं स्वीकारली, तशीच मीमांसा व तशीच भूमिका हे नवीन वर येणारे समाज व जुने मराठेतर पत्करतील.

## भोळेपणाची भूमिका

आपण फसलों, अपयशी झालों, आपल्यांत फूट पडली, आपण विषमता प्रस्थापित केली व अन्याय केला तर तें सर्व कोणातरी दुसऱ्या कारस्थानी समाजाच्या कारवाईला बळी पडल्यामुळें होय, आपल्या समाजाच्या अंगीं वास्तविक ते दोष मुळींच नाहीत, आपला समाज भोळा भाबडा, श्रद्धाळू असा आहे, कारस्थान, कपट, त्याला कळत नाहीं, अशी भूमिका अजूनहि ब्राम्हणेतरांनीं सोडली नसावी असें वाटतें. मुंबई प्रदेशांत मंत्रि-मंडळांमध्यें महाराष्ट्राच्या वांट्याला महत्त्वाचीं खातीं आलेलीं नाहींत, प्रति-निधींच्या प्रमाणांत त्यांना मंत्रीमंडळांत जागाहि मिळालेल्या नाहींत, मुंबईचें प्रतिनिधित्व करण्याचा त्यांचा हक्क लाथाडण्यांत आला, अशा तऱ्हेची टीका एकेकाळीं वर्तमानपत्रांत चालू होती. या टीकेंत प्रामुख्यानें असा एक सूर होता कीं मराठ्यांना–हिरे, चव्हाण, या त्यांच्या प्रतिनिधींना–गुजराथ्यांनीं फसविलें, बनविलें, आणि म्हणून ही अवस्था झालेली आहे. कोणाच्या मतें ही फसवणूक ब्राह्मणांनीं केली आहे. यावेळीं मुख्यप्रधान वास्तविक भाऊसाहेब हिरे व्हावयाचे. तें न होण्याची कारणमीमांसा एका मराठा पत्रांत पुढील-प्रमाणें दिलेली आहे. बाळासाहेब खेर यांना मुरारजीच मुख्य मंत्रि व्हावे असें वाटत होतें. हिरे त्यांना नको होते. म्हणून त्यांनीं बनाव असा घडवून आणला कीं हिरे यांना मुरारजीकडे पाठवून 'आपणच मुख्यमंत्री व्हावें अशी आमची इच्छा आहे' असे हिरे यांचे तोंडून वदविलें. हिरे हे आपल्या योजनांच्या स्वप्नसृष्टींत दंग होते. त्यामुळें आपण कोणच्या कचाट्यांत सांपडलों आहों याचें त्यांना भान राहिलें नाहीं. वगैरे. मुंबई विधिमंडळांतील

मराठ्यांच्या अपयशाची मीमांसा ही, मागील अंकावरून पुढें चालू, अशापैकीं आहे. फसविणारा कपटकारस्थानी ब्राह्मण आणि फसणारे भोळे-भाबडे, अजाण, अश्राप मराठे! कंसश्रीकृष्ण, कौरवपांडव, रामरावण हे सर्व महात्मा फुले यांच्या मतें देवभोळे क्षेत्रपति होते. त्यांना ब्राह्मणांनीं फसविलें, त्यांच्यांत दुही माजविली व त्यांचा नाश केला. सातारचे शेवटचे छत्रपति प्रतापसिंह यांचे बंधु आप्पासाहेब हे स्वतःच त्यांच्याविरुद्ध जाऊन इंग्रजांस सामील झाले. त्याविषयीं लिहितांना काशीनाथराव देशमुख म्हणतात कीं 'हा भोळा मराठा वीर' सांगलीकर व नातू यांच्या कारस्थानास बळी पडला. प्रत्येक ठिकाणीं क्षत्रिय—मराठा हा भोळा आहे भाबडा आहे, त्याला स्वतःची कणखर बुद्धि नाहीं, स्वयंप्रभ कर्तृत्व नाहीं. त्याला ब्राह्मणांनीं फसविलें, त्याला मोंगलांनीं फसविलें, त्याला इंग्रजांनीं फसविलें, त्याला गुजराथ्यांनीं फसविलें, आणि आतां पुन्हां त्याला, त्याच्या हातीं सर्व राजसत्ता, बहुमताचा पाठिंबा, महात्मा फुले व राजर्षि शाहू यांनीं निर्माण केलेली जागृति, हें सर्व असूनहि, ब्राह्मण फसवीत आहेत! आणि हे भोळे मराठे वीर फसत आहेत! भगवान् श्रीकृष्णापासून काँग्रेसमधील मराठ्यांपर्यंत हाच प्रकार चालू आहे!

मला एक सुदैवाची गोष्ट अशी वाटते कीं भाऊसाहेब हिरे व यशवंतराव चव्हाण यांनीं ही भूमिका पत्करलेली नाहीं. आपण फसलों, आपल्या मनासारखें आपल्याला घडवितां आलें नाहीं, असें त्यांना कदाचित् वाटतहि असेल. पण सर्व साधनें व उपकरणें हाताशीं असतांना आपल्या अपयशाची जबाबदारी दुसऱ्यावर लादून आपण भोळेपणाची सबब सांगावी, ही भूमिका त्यांना अत्यंत अवमानकारक वाटत असावी. आपण उत्कर्ष पावलों तर आपले आपण; आणि खालीं गेलों, अपयशी ठरलों, तरी आपले आपणच; एका श्रेयाप्रमाणें दुसऱ्या अपश्रेयाचीहि जबाबदारी माझ्या शिरावर आहे, याच भूमिकेंत स्वाभिमान आहे, व भावी उत्कर्षाचीं बीजें आहेत असें त्यांचें मत असावें असें त्यांच्या भाषणांवरून दिसतें. हें खरें असेल व त्यांच्या नेतृत्वानें हीच भूमिका ब्राह्मणेतरांनीं पत्करली असेल तर महाराष्ट्राचा भाग्योदय लवकर होण्याची आशा धरण्यास हरकत नाहीं. कारण माझें असें निश्चित मत आहे कीं गेलीं शंभर वर्षें मराठा समाज जो मागासलेला

राहिला आहे, आपलें पूर्वकाळचें कर्तृत्व व पराक्रम त्याला प्रगट करतां आला नाहीं, त्याचें कारण म्हणजे त्यानें पत्करलेली अत्यंत अवमानकारक अशी भूमिका हेंच होय. पूर्व इतिहासाची विपरीत मीमांसा करून सर्व अनर्थांची जबाबदारी ब्राह्मणांच्या माथीं लादण्यासाठीं त्यानें महापराक्रमी क्षत्रियांना ब्राह्मणांच्या हातांखालचीं बाहुलीं ठरवून टाकलें व त्यामुळेंच ब्राह्मणी वर्चस्व मोडण्यास आपण असमर्थ आहों असें ठरवून, आपला उत्कर्ष इंग्रज करून देणार, ही मराठ्यांच्या क्षात्रतेजाला अत्यंत अवमानकारक अशी भूमिका त्यानें पत्करली. मराठा समाज हा मागासलेला राहिला त्याचें हें कारण आहे. याविषयीं थोडी शास्त्रीय चिकित्सा करून हें लांबलेलें विवेचन संपवितों.

## कर्तृत्वाची महाप्रेरणा

कॅनडा, न्यूझीलंड, ऑस्ट्रेलिया व दक्षिण आफ्रिका, या देशांकडे वाचकांनीं जरा दृष्टिक्षेप करावा. इंग्लंड, फ्रान्स, जर्मनी, इटली या युरोपांतल्या देशांतील अस्सल युरोपीय रक्ताच्या लोकांनींच वरील देश वसविलेले आहेत. तरी गेल्या शंभर दोनशें वर्षांत त्या देशांत (कादंबरी, काव्य, नाटक इ.) साहित्य, विज्ञान, धर्मसुधारणा, राजकीय नेतृत्व, तत्त्वज्ञान, रणपांडित्य, समाजसंघटना, इ. सांस्कृतिक क्षेत्रांत एकहि पुरुष शॉ, गालस्वर्दी, क्युरी, पाश्चर, न्यूटन, लूथर, लेनिन, स्टॅलिन, माओट्से टुंग, रसेल, मार्क्स, हिंडेनबर्ग, रोमेल, झुकॉव्ह, यांच्याइतका उंच गेलेला दिसत नाहीं. क्वचित् अपवाद कोठें असेल, पण एकंदरीनें अशी थोर प्रतिभा, बुद्धिमत्ता व कर्तृत्व त्या देशांत दिसत नाहीं, हें खरें आहे. आणि याच लोकांनीं त्याच पद्धतीनें वसविलेला अमेरिका हा देश पहातां तेथें सर्व प्रकारच्या कर्तृत्वास नुसतें उधान आलेलें दिसतें. वॉशिंग्टन, जेफरसन, लिंकन, रूझवेल्ट, एडिसन, कॉम्टन, ग्रॅहम बेल, लेक, मायकेनसन, राइटबंधु, विल् ड्युरँट्, जॉन ड्यूई, पर्ल बक्, अप्टन सिंक्लेअर, हेलन केलर, जेन ॲडम्स, हेन्री फोर्ड, लिंडबर्ग असे राजकारणी, शास्त्रसंशोधक, तत्त्ववेत्ते, साहित्यविशारद अमेरिकेंत होऊन गेले व प्रत्यहीं होत आहेत

इंग्लिश, फ्रेंच, डच, जर्मन हेच लोक कॅनडा, न्यूझीलंड, इ. देशांत आहेत. आणि तेच लोक अमेरिकेंत आहेत. असें असतांना त्यांच्या चरित्रांत व कर्तृत्वांत एवढा फरक कां पडावा? याचें उत्तर माझ्या मतें एकच आहे. कॅनडा, न्यूझीलंड, दक्षिण आफ्रिका, व आस्ट्रेलिया येथील लोक आपल्या उत्कर्षासाठीं, विशेषतः आपल्या संरक्षणासाठीं, सर्वस्वीं इंग्लंडवर अवलंबून आहेत. निदान आतांपर्यंत तरी होते. स्वतःच्या उत्कर्षाची व विशेषतः मरणमारणाच्या संग्रामाची जबाबदारी ते घेत नाहींत. या जबाबदारीचा अर्थ फार मोठा असतो. विज्ञान-संशोधन, शस्त्रास्त्राची तयारी, सर्व जगावर चौफेर सावध दृष्टि टाकीत रहाणें, संघटनेचें तत्त्वज्ञान सिद्ध ठेवून प्रसृत करणें, धर्म, नीति, यांची चिंता वाहणें या सर्वांचा अंतर्भाव यांत होतो. अशी ही राष्ट्राच्या मरण-मारणाच्या संग्रामाची जबाबदारी शिरावर घेऊन त्याची नित्य चिंता वाहणें ही कर्तृत्वाला चेतना देणारी अत्यंत श्रेष्ठ अशी प्रेरणा आहे. आपल्या राष्ट्राच्या उत्कर्षाची चिंता मनुष्य करूं लागला कीं त्याला स्वतःच्या गुणांचा उपयोग करण्याचें कारण व संधि निर्माण होते. ज्याला हा उत्कर्ष साधावयाचा नाहीं, त्याची ज्याला फिकीर नाहीं, त्याच्या अंगीं मोठे गुण असले तरी ते कुजून सडून जातात. केवळ दोन एकर जमीन नांगरून पोराबाळांचें पोट भरणें, किंवा जरूर तेवढे मासे पकडून निर्वाह करणें, किंवा असलेली वाडवडिलांची मिळकत संभाळून विलास करणें, किंवा कारकुनी करून गुजारा करणें यापलीकडे ज्यांची दृष्टि जातच नाहीं, त्यांना तो संसार संभाळण्यासाठीं शास्त्रसंशोधन, साहित्यलेखन यासाठीं लागणारे गुण अंगीं असले तरी त्यांची जरूरच लागणार नाहीं, आणि म्हणून त्या गुणांना चालना मिळणार नाहीं! राष्ट्राच्या उत्कर्षाची चिंता, मरणमारणाच्या संग्रामाची जबाबदारी व कर्तृत्व यांचा संबंध हा असा अगदीं उघड दिसणारा आहे. त्यांत गूढ असें कांहीं नाहीं. न्यूझीलंड, कानडा इ. देशांनीं राष्ट्रीय उत्कर्षाची जबाबदारी स्वतःच्या शिरावर कधींच घेतली नाहीं. आपल्यावर कोणी स्वारी केली तर ब्रिटन आपलें रक्षण करील, या विचारानें ते निर्धास्त राहिलेले लोक आहेत. त्या लोकांच्या रक्तांत मोठे गुण, मोठें कर्तृत्व असलें पाहिजे यांत शंका नाहीं. पण त्यांचा वापर

करण्याचें त्यांना कारण पडत नाहीं. म्हणून ते उदयास येत नाहींत. उलट अमेरिकेनें ब्रिटनची सत्ता दीडशें वर्षांपूर्वीच झुगारून देऊन आपल्या उत्कर्षाची, प्रगतीची, विकासाची व अंतिम संग्रामाची जबाबदारी आपल्या शिरावर घेतली. आणि ती घेतांच यक्षिणीची कांडी फिरावी तसा प्रकार होऊन तेथें सर्व प्रकारचें कर्तृत्व उफाळून वर आलें.

राष्ट्राच्या उत्कर्षाचें चिंतन सर्व प्रकारच्या कर्तृत्वाला प्रेरक होतें, हा सिद्धान्त मानवी समाजाबद्दल जे इतर अनेक सिद्धान्त प्रस्थापित झाले आहेत त्यांच्याइतका सत्य आहे. जड पदार्थाविषयींचे सिद्धान्त ज्याप्रमाणें शेकडां शंभर बरोबर ठरतात, त्याप्रमाणें समाजशास्त्राचे सिद्धांत कधींच ठरत नाहींत. कारण मानवी मन हें जवळ जवळ अज्ञातच आहे. या मर्यादा ध्यानांत ठेवून वरील सिद्धांताचा वाचकांनीं विचार केला तर त्याचा बराच प्रत्यय त्यांना येईल असें वाटतें.

## अखिल राष्ट्राचें चिंतन

माझ्या मतें मराठा समाज गेलीं शंभर वर्षें मागासलेला राहिला आहे त्याचें हें कारण आहे. राष्ट्राच्या उत्कर्षाचें चिंतन करण्याची प्रवृत्ति आपल्या देशांत अर्वाचीन काळांत तरी पाश्चात्य विद्येमुळें निर्माण झाली आहे. त्या पाश्चात्य विद्येची उपासना या प्राचीन काळच्या थोर व कर्तृत्वशाली समाजानें केली नाहीं. आणि ज्या थोड्या लोकांनीं केली त्यांनीं देशाच्या मरणमारणाच्या संग्रामांतून अलिप्त रहाण्याचें धोरण ठेविलें. त्यामुळें गेल्या शंभर वर्षांत महात्माजी, सुभाषचन्द्र, योगी अरविंद, लजपतराय, पंडित जवाहरलाल, विवेकानंद, वल्लभभाई, रानडे, गोखले, टिळक, सावरकर, जगदीशचन्द्र, चंद्रशेखर रमण, रामानुजम्, राधाकृष्णन्, रवींद्रनाथ यांच्याप्रमाणें सर्व क्षेत्रांत अखिल भारताचे नेतृत्व करणारे पुरुष त्या समाजांतून, त्यांच्या रक्तांत तें सामर्थ्य असूनहि, निर्माण झाले नाहींत. त्याचप्रमाणें महाराष्ट्राच्या इतिहासांतहि डॉ. भाऊ दाजी, डॉ. भांडारकर, न्या. तेलंग, चिंतामणराव वैद्य यांसारखें संस्कृत पांडित्य, हरीभाऊ, देवल, खाडिलकर, गडकरी यांसारखी साहित्यप्रतिभा, शिवरामपन्त परांजपे, डॉ. जयकर यांसारखें वक्तृत्व, चिंतामणराव देशमुख, धनंजयराव गाडगीळ

यांच्यासारखें अर्थकोविदत्व, आणि गणित, विज्ञान, तत्त्वज्ञान, इतिहास-संशोधन इ. क्षेत्रांतील पारंगतता प्राप्त करून घेऊन, राष्ट्रीय प्रपंचाच्या या सांस्कृतिक क्षेत्रांतहि त्यांना प्रगति करतां आली नाहीं. ब्राह्मणेतरांतील जे मराठेतर वर्ग, त्यांतले लोक पूर्वकाळांतहि या क्षेत्रांत अग्रभागीं फार थोडे आले होते. त्यामुळें त्यांनीं अर्वाचीन काळीं या क्षेत्रांत अजून पाऊल टाकलें नसलें तर त्यांत एवढेंसें आश्चर्य नाहीं. पण मराठा समाजाचा मागासलेपणा हा अगदीं असमर्थनीय आहे. चाफेकर, सावरकर, बापट, कान्हेरे यांचा मार्ग त्यांना ब्रिटिश साम्राज्यावरील निष्ठेमुळें मान्य नसणें हें ठीक होतें. पण आय्. सी. एस्. चा मार्गहि त्यांनीं अनुसरला नाहीं ! तो त्यांनीं अनुसरला असता तर पाश्चात्य विद्येची उपासना त्यांना घडली असती. आणि मग, त्याच क्षेत्रांत नव्हे तर राष्ट्रीय प्रपंचाच्या सर्वच क्षेत्रांत ते अग्रमालिकेंत येऊन उभे राहिले असते.

सुदैवानें १९३०–३५ सालापासून अखिल ब्राह्मणेतर वर्ग हा राष्ट्राच्या मरणमारणाच्या संग्रामांत उतरला आहे. आपला उद्धार इंग्रज करतील, ही परावलंबनाची भाषा त्यानें तेव्हांपासून सोडली आहे. पाश्चात्य विद्येची महतीहि आतां त्यानें जाणली आहे. कर्मवीर भाऊराव पाटील यांसारखे थोर कार्यकर्ते ब्राह्मणेतरांत या विद्येचा आणि विशेषतः तिला आवश्यक असणाऱ्या तपोनिष्ठेचा प्रसार करण्यासाठीं सर्वस्व अर्पण करीत आहेत. यामुळें त्या समाजाच्या कर्तृत्वाला बहर येईल व सर्व क्षेत्रांत तें फुलूं लागेल, अशी निश्चित आशा वाटते.

असो. या तऱ्हेनें सर्व क्षेत्रांत कर्तृत्व बहरूं लागलें म्हणजे बहुधा ब्राह्मणेतर समाज अत्यंत कठोर अशा आत्मनिरीक्षणास सिद्ध होईल. आणि मग स्वतःच्या समाजाला अत्यंत अवमानकारक अशी प्राचीन इतिहासाची मीमांसा टाकून देऊन त्या काळच्या श्रेयाप्रमाणेंच अपश्रेयाचीहि भागीदारी तो स्वीकारील हें निश्चित. कारण अशी अपयशाची जबाबदारी टाळल्यानें आपलाच अधःपात होतो, असें त्याच्या ध्यानांत येईल. असें झालें तर चालू इतिहासांतहि दर ठिकाणीं भोळेपणाची भाबडेपणाची भूमिका घेऊन आपल्या अपयशाचें खापर दुसऱ्याच्या माथीं फोडण्याऐवजीं आम्ही चुकलों, फसलों, घसरलों, तर त्याला आमचे आम्ही जबाबदार आहों,

आणि आमच्या चुका आम्ही निस्तरणार आहों अशा रगदार, व स्वाभिमानी भावनेची जोपासना त्यांच्या ठायीं निश्चित होईल; आणि मग ब्राह्मणब्राह्मणेतरवादाचें मूळच उपटल्यासारखें होऊन आपला समाज एकसंध होण्याची आशा धरतां येईल. यायोगें आणखीहि एका दृष्टीनें प्रगति होण्याचा संभव आहे. जातिभेद नष्ट व्हावा व सर्व महाराष्ट्रीय समाज एक रक्ताचा व्हावा अशा तऱ्हेचें तत्त्वज्ञान सध्यां प्रसृत होत आहे. ब्राह्मणब्राह्मणेतरांतील कटुता कमी होऊन हे दोन समाज जवळ आले तर त्या तत्त्वज्ञानाला जोर व वेग प्राप्त होऊन कदाचित् तें प्रत्यक्षात येण्याची आशा निर्माण होईल.

ब्राह्मणब्राह्मणेतर या विषयाचें विवेचन येथें संपलें. आपला सर्वच समाज, त्याचे सर्वच घटक विषमतेच्या, संकुचित दृष्टीच्या रोगानें ग्रस्त आहेत आणि येथल्या प्राचीन काळच्या व आतांच्याहि उत्कर्षाची व अधःपाताची जबाबदारी सर्वांवरच आहे, श्रेयाप्रमाणें अपश्रेयाला सर्वच भागीदार आहों, अशी या विवेचनामागली भूमिका आहे. ती मान्य झाल्यास येथले बरेचसे प्रश्न सुटतील आणि भारतीय लोकसत्ता यशस्वी होण्याची शक्यता निर्माण होईल असें वाटतें.

---

## प्रकरण तेरावें

# सामाजिक पुनर्घटना

## अस्पृश्य व आदिवासी

स्वातंत्र्याच्या उत्तरकाळांत एकंदर भारतीय जीवनाची पुनर्घटना करण्याचे प्रयत्न कॉंग्रेसनें व इतर कार्यकर्त्यांनीं सुरू केले. त्यांपैकीं राजकीय व आर्थिक पुनर्घटनेच्या प्रयत्नांच्या यशापयशाचें मोजमाप आपण प्रथम केलें आणि त्यानंतर आतां सामाजिक पुनर्घटनेचा प्रश्न विचारार्थ घेतला आहे. मागें जागोजागीं अनेक वेळां हें सांगितलें आहे कीं, धर्म, पंथ, जाति, वर्ण,

प्रांत, वर्ग इ. जेवढीं म्हणून भेदकारणें अस्तित्वांत असूं शकतात, तीं सर्व आपल्या या भूमींत जारी आहेत आणि त्यामुळें हा भारती समाज भेदजर्जर व म्हणून दुबळा होऊन गेलेला आहे. या अनेक भेदांपैकीं तीन प्रमुख भेदांचा विचार करण्याचें आपण ठरविलें होतें. ब्राह्मणब्राह्मणेतर, स्पृश्य-अस्पृश्य व हिंदुमुसलमान हे ते भेद होत. यापैकीं पहिल्या प्रश्नाचा विचार करून झाला. आतां अस्पृश्य व आदिवासी यांच्या प्रश्नांचा विचार करावयाचा आहे.

या दोन समाजांची नुसती लोकसंख्या पाहिली तरी हा प्रश्न केवढा प्रचंड व किती बिकट आहे याची कल्पना येईल. हिंदुस्थानांत एकंदर अस्पृश्यांची लोकसंख्या पांच ते सहा कोटीपर्यंत आहे आणि नाग, भिल्ल, गोंड, संताळ इ. आदिवासी लोकांची संख्या दोन ते तीन कोटी आहे. १९५१ च्या गणतीप्रमाणें भारताची लोकसंख्या ३५ कोटी ६८ लक्ष आहे. यावरून असें ध्यानांत येईल कीं, भारताच्या एकंदर लोकसंख्येपैकीं एकचतुर्थांश लोक असे आहेत कीं ज्यांचा सुसंस्कृत जीवनाच्या प्राथमिक अवस्थेशींहि अजून परिचय झालेला नाहीं. आज हजारों वर्षें हे कोट्यवधि लोक हिंदुसमाजाच्या सरहद्दीच्या आसपास रहात आहेत; पण त्यांना आपल्यांत घेऊन आत्मसात् करून सर्व मिळून एक अभंग हिंदुसमाज करून टाकण्यांत येथील नेत्यांना यश आलेलें नाहीं. पूर्वींच्या समाजधुरीणांनीं या बाबतींत काय प्रयत्न केले हें पाहणें केवळ ऐतिहासिक दृष्टीनेंच नव्हे तर आजचा प्रश्न सोडविण्याच्या दृष्टीनेंहि उद्बोधक होईल. तसा थोडासा प्रयत्न पुढे करावयाचाहि आहे; पण आपण एवढें मनांत निश्चित ठेविलें पाहिजे कीं, हे आठनऊ कोटी लोक त्यांच्यावर अनंत प्रकारचे संस्कार होऊन नागरिक या पदवीप्रत येईपर्यंत आपल्या लोकसत्तेला व्यवहारांत कसलाहि अर्थ निर्माण होणार नाहीं. त्यांना त्या पदवीला आणून पोचविण्यासाठीं अर्वाचीन काळांत पूर्वसूरींनीं व कॉंग्रेसच्या नेत्यांनीं कोणचे प्रयत्न केले याचा प्रथम आपण आढावा घेऊ व नंतर पुढील विवेचन करूं.

ब्रिटिशांचें राज्य या देशांत प्रस्थापित झाल्यानंतर या देशांत थोर पुरुषांची जी पहिली पिढी निर्माण झाली तिच्या असें ध्यानांत आलें कीं,

आपलीं समाजरचनेचीं सर्व तत्त्वें अगदीं निखालस चुकीचीं असून तीं नष्ट केल्यावांचून आपल्या समाजाची उन्नति होणार नाहीं. चातुवर्ण्य, जातिभेद, अस्पृश्यता हीं तत्त्वें विषमतामूलक असून त्यामुळें जन्मावरून मनुष्याची योग्यता ठरविण्याचें घातक तत्त्व आपण रूढ करून ठेविलें आहे. त्याचा त्याग करून, समतेच्या पायावर आपल्या समाजाची पुनर्रचना केल्यावांचून आपण समर्थ व बलशाली होणार नाहीं. राजा राममोहन रॉय यांच्यापासून आजच्या धर्मनिर्णयमंडळापर्यंत शेकडों सुधारकांनीं भारती समाजाच्या बुडाशीं असलेलें विषमतेचें तत्त्वज्ञान नष्ट करून त्या जागीं नवें तत्त्वज्ञान प्रस्थापित करण्याचे प्रयत्न कसकसे केले हें मागल्या प्रकरणांत व त्याच्या आधींच्याहि प्रकरणांत सविस्तर सांगितलें आहे. आज आतां अस्पृश्यता-निवारणाच्या क्षेत्रांत प्रत्यक्ष कार्य काय झालें त्याचा आढावा घ्यावयाचा आहे.

## महात्मा फुले

याविषयींच्या तत्त्वज्ञानाच्या क्षेत्रांत राजा राममोहन, दादोबा पांडुरंग, लोकहितवादी इ. सुधारक हे अग्रभागीं असले तरी प्रत्यक्ष व्यवहाराच्या क्षेत्रांत अग्रपूजेचा मान महात्मा ज्योतिबा फुले यांचा आहे. तत्त्वज्ञानाची महती कितीहि असली तरी प्रत्यक्ष कृतीवांचून तें सर्व तत्त्वज्ञान फोल ठरतें. ती कृति–प्रत्यक्ष आचारानें अस्पृश्यता नष्ट करण्याचें कार्य–या थोर पुरुषानें केली. १८५१ सालीं त्यांनीं पुण्यास अस्पृश्यांसाठीं पहिली शाळा उघडली. त्यासाठीं त्यांच्यावर भयंकर गहजब झाला. त्यांना आपल्या पित्याचें घरहि सोडावें लागलें. त्यांच्या पत्नीचा छळ झाला; पण त्यांनीं आपलें धैर्य सोडलें नाहीं. अस्पृश्य हाहि आपल्यासारखाच मानव आहे, हा समतेचा विचार हिंदुसमाजांत प्रसृत करून टाकण्याचा त्यांचा निर्धार रतिमात्र ढळला नाहीं. पुढें तर त्यांनीं आपल्या घरांतला हौद अस्पृश्यांना खुला करून आणखी एक पाऊल टाकलें. महात्मा फुलें यांनीं दहाबारा वर्षें अस्पृश्यांसाठीं शाळा चालवून, त्यांच्यांत मिसळून, त्यांच्याबरोबर अन्न-पाण्याचा व्यवहार करून हिंदुधर्मावर असलेला हा कलंक नष्ट करण्याचा जो अत्यंत धडाडीनें प्रयत्न केला त्यासाठीं अखिल महाराष्ट्रच नव्हे, तर सर्व हिंदुस्थान त्यांचा ऋणी राहील.

महात्मा फुले यांच्यासारखाच आचारानें अस्पृश्यता नष्ट करण्याचा दुसरा उपक्रम बंगालमधील शशिपाद बंदोपाध्याय यांनीं केला. १८६६ सालीं त्यांनीं ब्राह्मपंथाचा स्वीकार केला. व तेव्हांपासून ते अस्पृश्यांत ससेहा मिसळून जेऊं खाऊं लागले. या वर्गांत शिक्षणप्रसार करण्यासाठीं त्यांनीं शाळा काढल्या व वर्तमानपत्र चालविलें. ते स्वत: त्यांच्यांत जाऊन कीर्तन करीत व त्यांनाहि कीर्तनें करावयास शिकवीत. आरोग्य, स्वच्छता, मद्यपानबंदी या सुधारणा त्यांनीं तेथील चांडालवर्गांत घडवून आणल्या. इकडे महाराष्ट्रांत महात्मा फुले यांच्यानंतर महर्षि विठ्ठल रामजी शिंदे यांनीं या क्षेत्रांत फार मोठें कार्य केलें. त्यांनीं आपलें सर्व आयुष्यच या कार्याला वाहून टाकलें होतें. १९०६ सालीं 'डिप्रेस्ड क्लासेस मिशन' ही संस्था त्यांनीं स्थापन केली आणि पुढील पंचवीसतीस वर्षांत सर्व हिंदुस्थानभर तिच्या शाखा काढून अस्पृश्यांना शिक्षण देणें, त्यांच्यासाठीं वसतिगृहें चालविणें, स्पृश्य हिंदूंत मतपरिवर्तन घडवून आणणें, अस्पृश्यांत राजकीय जागृति व संघटना घडविणें इ. अनेक मार्गांनीं त्यांनीं हें कार्य चालविलें होतें. याशिवाय हिंदुस्थानांतील अनेक संस्थानिकांनीं आणि त्यांतल्या त्यांत श्रीमंत सयाजीराव गायकवाड, कोल्हापूरचे शाहू छत्रपति व म्हैसूरचे महाराज यांनीं या अस्पृश्यतानिवारणाच्या कामीं बहुमोल कार्य केलें आहे. हातीं सत्ता असल्यामुळें यांनीं शिक्षणप्रसार तर केलाच, पण त्याशिवाय आपल्या संस्थानांत त्यांनीं अस्पृश्यांना अधिकाराच्या जागा देणें, त्यांना वैदिक पद्धतीनें संस्कृत धर्मग्रंथांतून शिक्षण देणें, सर्व खात्यांतून व खुद्द राजवाड्यांतहि अस्पृश्यांना खुला संचार देणें व त्यांच्यासह भोजन करणें इ. मार्गांनींहि सुधारणा घडवून विषमतेचा हा रोग नष्ट करण्याचा फार जोराचा प्रयत्न केला.

साधारण १९०० सालापासून अस्पृश्य वर्गांत जागृति होऊन त्या वर्गांतून त्यांचे स्वतःचे नेते व कार्यकर्ते निर्माण होऊं लागले. त्यांमध्यें शिवराम जानबा कांबळे यांचा प्रामुख्यानें उल्लेख केला पाहिजे. यांनीं १९०३ सालीं सासवड येथें अस्पृश्यांची एक मोठी सभा भरविली व दीड हजार अस्पृश्यांच्या सह्या घेऊन सरकारकडे त्यांना लष्करांत व पोलिसखात्यांत नोकऱ्या द्याव्या असा अर्ज केला. स्वजातीच्या उत्कर्षासाठीं

अशा रीतीनें जमून चर्चा व विचारविनिमय करण्याचा पायंडा कांबळे यांनीं घालून दिला म्हणून या सभेचें महत्त्व विशेष आहे. येथून पुढें अस्पृश्य वर्गात खूपच चळवळी झाल्या आणि १९२० च्या नंतरच्या काळांत रा. ब. राजा, श्रीनिवासन, डॉ. आंबेडकर असे त्या जातींतच थोर नेते निर्माण होऊन अस्पृश्योद्धाराचें कार्य झपाट्यानें प्रगत होऊं लागलें.

## नवें चैतन्य

१९२० ते २२ या कालांत जी असहकारितेची चळवळ झाली, तिच्यामुळें या देशांत एक नवीन युग निर्माण झालें. सामाजिक सुधारणा व राजकीय सुधारणा यांचे प्रवाह या काळापर्यंत भिन्न पात्रांतून चालले होते व त्यांच्या गति एकमेकींस कांहींशा विरोधी होत्या. तो विरोध आतां नाहींसा झाला. महात्मा गांधी यांनीं आर्थिक उन्नति, अस्पृश्यतानिवारण, हिंदुमुसलमानांचें ऐक्य इ. भिन्न क्षेत्रांतल्या सुधारणांचे धागे स्वातंत्र्याच्या लढ्यांत गुंतवून दिल्यामुळें या सर्व चळवळींना एक नवें तेज व चैतन्य प्राप्त झालें आणि त्यांचें कार्य अत्यंत वेगानें सुरू झालें. आतांपर्यंतच्या सर्वच चळवळी, सर्व संघटना व तज्जन्य जागृति ही सुशिक्षित मध्यमवर्गीयांच्या कक्षेपर्यंतच मर्यादित राहिलेली होती. आतां याच मध्यमवर्गीय तरुणांनीं महात्मा गांधींचा संदेश खेडोपाडीं नेऊन पोचविण्याचें कार्य आरंभिल्यामुळें सुधारणांचें लोण बहुजनसमाजापर्यंत पोचलें आणि भारताचा हा पुराण पुरुष जागा होण्याचीं चिन्हें दिसूं लागलीं. पूर्वीच्या पाऊणशे वर्षांत ब्राह्मसमाज, प्रार्थनासमाज, सत्यशोधकसमाज, आर्यसमाज, राममोहन रॉय, लोकहितवादी, महात्मा फुले, रानडे, आगरकर, रामकृष्ण परमहंस, विवेकानंद यांच्या प्रतिपादनामुळें हिंदुसमाजांत रूढ झालेलें जुनें घातकी तत्त्वज्ञान जवळ जवळ उच्छिन्न झालें होतें आणि समता, स्वातंत्र्य, व्यक्तित्व, धर्मपरिवर्तन, बुद्धिप्रामाण्य या महनीय तत्त्वांनीं विभूषित असें सामाजिक पुनर्घटनेचें नवें तत्त्वज्ञान मूळ धरूं लागलें होतें. महात्मा गांधींचा व कॉंग्रेसचा राजकीय संग्रामाचा संदेश घेऊन हिंदुस्थानच्या खेड्यांत संचारार्थ गेलेले हजारो तरुण या नव्या तत्त्वज्ञानाचे पुरस्कर्ते होते. त्यांनीं विचारानें व आचारानें अस्पृश्यतेला या काळांत अक्षरशः सुरुंग लावला आणि या पुरातन संस्थेचा पाया निखळून

टाकला. सर्व समाज कांहीं एका उदात्त ध्येयानें प्रेरित होऊन जेव्हां कार्याला लागतो त्यावेळीं समाजांतल्या सर्वच प्रगतिकारक चळवळींना तेज प्राप्त होतें आणि स्वातंत्र्याचा लढा हें अशा ध्येयांपैकीं सर्वांत श्रेष्ठ असें ध्येय आहे. धर्म, जाति, पंथ यांनीं निर्माण झालेले क्षुद्र भेद या महान् यज्ञाच्या अग्नीनें वितळून जातात. स्वातंत्र्याच्या लढ्यांतूनच वांशिक, जातीय व धार्मिक भेद नष्ट होऊन इंग्लंड, जर्मनी, इटली, तुर्कस्थान, जपान, चीन इ. राष्ट्रें निर्माण झालीं, हें इतिहासानें दाखविलें आहे. भरतभूमींत १९२० ते १९४७ या काळांत हेंच घडून आलें. अस्पृश्यता हा अन्याय आहे, तो हिंदुधर्मावरील कलंक आहे हा विचार गेल्या शंभर वर्षांत रूढ होऊन त्याअन्वयें वर निर्देशिलेलीं कार्यें सुरू झालीं होतीं; पण मानवाचा स्वभावच असा आहे कीं केवळ सत्याच्या ज्ञानामुळें तो एकदम जागचा हलत नाहीं. अन्यायाच्या केवळ बौद्धिक जाणीवेमुळें तो परिवर्तनाला सिद्ध होत नाहीं; पण मरणमारणाच्या संग्रामांत उतरल्यानंतर तो सर्व क्षेत्रांत एकदम क्रांतीला सिद्ध होतो. जुनीं तत्त्वज्ञानें उध्वस्त करून टाकण्यास एरवीं त्याचें मन कचरतें; पण या संग्रामाच्या प्रेरणेनें त्याच्या उदात्त वृत्ति जागृत होतात आणि मग तो क्षुद्र भेदभाव विसरण्यास सिद्ध होतो. १९२० नंतरच्या वीस पंचवीस वर्षांच्या काळांत अस्पृश्यतानिवारणाचें कार्य अत्यंत वेगानें होऊन आज अखिल भारतीय समाजानें आपल्या जीवनाच्या मूळ घटनेंतूनच अस्पृश्यता काढून टाकली आहे. याचें कारण, महात्मा गांधींनीं स्वातंत्र्याच्या लढ्यांत अस्पृश्यतानिवारण हें एक अवश्य कलम करून टाकलें हें आहे. त्या उदात्त ध्येयाशीं ही कल्पना निगडित होतांच भारतीयांनीं ती मनोभावानें स्वीकारली. आणि ती विषमता, तो अन्याय, तें लांछन नष्ट करून टाकण्याच्या कामीं यश मिळविलें.

या कालांत अस्पृश्यता निवारणाच्या कार्यास केवढी उठावणी मिळाली याचें केवळ दिग्दर्शन केलें तरी त्यावरून पूर्ण कल्पना येईल. शाळा, रस्ते, विहिरी, पाणवठे या ठिकाणीं अस्पृश्यांना स्पृश्यांनीं खुला प्रवेश दिला, एवढेंच नव्हे तर मदुरेच्या मीनाक्षीसारखीं शेंकडों पुरातन देवालयें त्यांच्या-साठीं खुलीं केलीं. एकट्या हरिजनसेवकसंघाचें कार्य पाहिलें तरी हिंदूंच्या पालटलेल्या वृत्तीचें प्रत्यंतर येईल. या संघानें शेकडों शाळा काढल्या

आहेत. सर्व प्रांत मिळून अस्पृश्यांसाठीं १२० वसतिगृहें चालविलीं आहेत. औद्योगिक शाळा चालवून अस्पृश्यांना वीणकाम, सुतारी, लोहारी, शिवणकाम, चर्मकाम, पुस्तकबांधणी इ. व्यावसायिक शिक्षण देण्याची सोय केली आहे. मंदिरें, रस्ते, पाणवठे खुले करणें यासाठीं संघाचे सारखे प्रयत्न चालू असत. सारांश या दलित समाजाच्या उन्नतीचा जो जो मार्ग दिसला तो या संघानें चोखाळला आहे. १९३७ सालीं कॉंग्रेस सत्तारूढ होतांच तिनें वरील सर्व गोष्टी कायद्यानेंच घडवून आणल्या. शिवाय अस्पृश्यांसाठीं सहकारी संस्था काढल्या. पडीत जमिनी त्यांना लागवडीस दिल्या. आणि जिल्हाधिकाऱ्यांच्या जागांपासून मंत्र्यांच्या जागांपर्यंत सर्व प्रकारच्या अधिकारांच्या जागा त्यांना देऊन त्यांच्या कर्तृत्वाला वाव करून दिला.

## अस्पृश्यांच्या नेत्यांच्या दृष्टीनें

अशा रीतीनें गेल्या शंभर वर्षांत अस्पृश्यता नष्ट करून हिंदु समाजापासून अलग राहिलेला पांचसहा कोटींचा एक प्रचंड मानवसमूह त्याला जोडून टाकण्याचे जे प्रयत्न झाले ते युगपरिवर्तनाच्या दृष्टीनें बरेच समाधानकारक आहेत असें म्हणण्यास हरकत नाहीं. मतपरिवर्तन, प्रत्यक्ष आचार, शिक्षणाचा प्रसार, राजकीय जागृति व कायदा इ. यावच्छक्य मार्गांनें स्पृश्य समाजानें व विशेषतः कॉंग्रेस आणि महात्माजी यांनीं ही दुष्ट रूढी नाहींशी करण्याचे प्रयत्न केले व त्यानंतर स्पृश्य व अस्पृश्य हे समाज एकजीव होऊन जाणें हा केवळ कालावधीचा प्रश्न आहे असें सर्वत्र दिसूं लागलें. पण याच सुमारास वर सांगितल्याप्रमाणें अस्पृश्यांत डॉ. आंबेडकरांसारखे थोर नेते निर्माण झाले व अस्पृश्यांच्या या नेत्यांना तेव्हांपर्यंत झालेल्या कार्यामुळें मुळींच समाधान झालें नाहीं. आणि तें अगदीं साहजिक होतें. अस्पृश्यांच्या रोजच्या जीवनांतील दुःखें व यातना इतक्या असह्य आहेत आणि थोडीशी जागृति आल्यानंतर त्या त्या यातनांची व स्पृश्यांकडून होणाऱ्या अवमानाची जाणीव इतकी भयंकर असते कीं, केवळ जुन्या युगाची दिशा बदलली एवढ्यामुळें त्या समाजाला एकदम समाधान वाटेल अशी आशा धरणें वेडेपणाचें ठरेल. आणि त्या दृष्टीनें, म्हणजे काम फार मंदगतीनें चाललें आहे अशा अर्थाची टीका अस्पृश्य नेत्यांनीं कॉंग्रेसवर

व स्पृश्यांवर केली असती तर ती सयुक्तिकच होती. पण तेवढ्यानें भागलें नाहीं. डॉ. आंबेडकर, मद्रासकडचे भाग्यारेड्डी व इतरहि अनेक अस्पृश्य पुढारी यांनीं, काँग्रेसनें व स्पृश्य समाजानें या बाबतींत कांहींच हालचाल केली नाहीं, असें प्रतिपादन करण्यास सुरवात केली. वर सांगितलेले जे प्रयत्न, त्यांचें त्यांना मुळींच महत्त्व वाटेनासें झालें, इतकेंच नव्हे तर, अस्पृश्य समाजाला मागल्याप्रमाणेंच गुलामगिरीच्या अवस्थेंत डांबून टाकण्याचें काँग्रेसचें, महात्माजींचें व एकंदर स्पृश्य समाजाचें धोरण आहे, असें ते म्हणूं लागले. १९३१ सालीं गोलमेज परिषदेंत व त्यानिमित्तानें हिंदुस्थानांतहि श्रीनिवास, रा. ब. राजा, एम् व्ही. भाग्यारेड्डी, डॉ. आंबेडकर प्रभृति अस्पृश्य पुढाऱ्यांचीं जीं भाषणें झालीं त्या सर्वांचा हाच सूर होता. १९३१ सालापर्यंत अस्पृश्यांनीं असा अविश्वास दर्शविला यांतहि एकवेळ नवल वाटण्याजोगें कांहीं नाहीं. कारण प्रत्यक्ष प्रश्न सुटण्याच्या दृष्टीनें दृश्य अशी प्रगति त्यावेळपर्यंत थोडीच झाली होती. पण १९३७ सालीं काँग्रेसच्या हातीं सत्ता आल्यानंतर तिनें या बाबतींत कायदे करून खरोखर फार मोठी प्रगति केली. तेवढ्यावरून, स्पृश्यांच्या हातीं सत्ता गेली तर येथें पुन्हां ब्राह्मणी राज्य सुरू होईल, पुन्हां चातुर्वर्ण्याची प्रस्थापना होईल, पुन्हां अस्पृश्यतेचे नियम कडक होतील ही अस्पृश्यांच्या मनांतली भीति नाहींशी व्हावयास हवी होती. पण आश्चर्य असें कीं १९४५ सालीं डॉ. आंबेडकरांनीं 'व्हॉट काँग्रेस अँड गांधी हॅव डन् टु दि अनटचेबल्स्' हें पुस्तक लिहून काँग्रेसवर पुन्हां ब्राह्मणी राज्याचे आरोप पहिल्यापेक्षां जास्त कटुतेनें व त्वेषानें केले आहेत. आणि त्यानंतर १९४८ सालीं स्वातंत्र्य-प्राप्तीनंतर नवी घटना स्वतः घडवीत असतांनाहि 'हू वेअर दि अनटचेबल्स्' हें पुस्तक लिहून त्याच्या प्रस्तावनेंत तेंच मत प्रतिपादिलें आहे. 'आज सर्व पांडित्य, सर्व विद्याध्ययन ब्राह्मणवर्गांतच आहे व अस्पृश्यता व एकंदर विषमता कायम ठेवण्यांत त्यांचा स्वार्थ असल्यामुळें तो वर्ग अस्पृश्यतानिवारणास व एकंदर क्रान्तिकारक विचार स्वीकारण्यास कधींच तयार होणार नाहीं.' असें या प्रस्तावनेंत त्यांनीं म्हटलें आहे. अर्थात् येथें केवळ ब्राह्मणांविरुद्ध कटाक्ष असला तरी आंबेडकरांचा दंश सर्वच सवर्ण हिंदूंवर आहे. नेहरू, टिळक, परांजपे यांच्याच

मापानें आपल्या पुस्तकांत त्यांनीं गांधी, वल्लभभाई यांना मोजलें आहे. महात्माजींबद्दल तर ते अत्यंत कडवटपणें लिहितात. आणि या सर्वाला प्रधान कारण एकच कीं अस्पृश्यांच्या स्वतंत्र मतदारसंघाला महात्माजींनीं विरोध केला. वास्तविक डॉ. आंबेडकरांचेंहि मत एकदां मिश्र मतदारसंघाला अनुकूल होतें. पुढें त्यांचें मत बदललें. पण तेवढ्यामुळें महात्माजींना त्यांनीं शत्रु लेखावें हें सयुक्तिक वाटत नाहीं. पण हा वाद आतां जुना झाला आहे. आणि त्यांतील कडवटपणा अस्पृश्यांच्या मनांत शिल्लक असला तरी त्याचा जोर कमी झाला असल्यामुळें त्याचा फारसा विचार करण्याचें कारण नाहीं.

## आजचे मनु—डॉ. आंबेडकर

स्वातंत्र्यप्राप्तीनंतर अस्पृश्यतानिवारणाच्या दृष्टीनें काँग्रेसनें एक महत्कृत्य केलें. डॉ. आंबेडकरांनाच पंडित नेहरूंनीं भारताची घटना तयार करण्याचें काम सांगितलें. हें सांगतांना पंडितजींनीं जणूं अशीच भूमिका घेतली होती : ‘ यापूर्वी आम्हीं सवर्णीयांनीं समाजरचनेचे सिद्धांत ठरविले, नियम केले व त्याच्या आधारें तुमच्यावर घोर अन्याय केला. आतां त्याचें परिमार्जन करण्याची संधि आम्हांला आली आहे. ती आम्ही घेतों. आतां समाजरचनेचे सिद्धांत तुम्ही ठरवा, नियम तुम्ही करा. आम्हीं नियम केले, आणि ते तुम्हांला उत्कर्षकारक व सुखप्रद असे असले तरी त्यांत संशयाला जागा राहील. तेव्हां नवी समाजरचना तुम्हीच करा. त्या चौकटींत बसण्यास आम्ही तयार आहोंत.’ स्पृश्य समाज, त्यांतहि ब्राह्मण व त्यांतहि स्मृतिकार मनु यांवर आंबेडकरांचा भयंकर कटाक्ष आहे. तेव्हां त्याच स्पृश्य समाजानें मूर्धस्थानीं अधिष्ठित केलेले ब्राह्मण महामंत्री नेहरू यांनीं नव्या काळच्या मनूचेंच कार्य करावयास एका थोर अस्पृश्य पंडिताला विनंति करावी हें नव्या काळाला सर्वथैव उचित असें झालें आहे. या कृत्यानें काँग्रेसनें युगायुगांचीं घोर पापें तत्त्वत: तरी धुवून टाकलीं आहेत. यासाठीं तिला द्यावें तितके धन्यवाद थोडेच आहेत.

स्वातंत्र्य प्राप्त होतांच येथें पुन्हां ब्राह्मणी राज्य सुरू होईल आणि अस्पृश्यांचा पूर्वीसारखाच छळ सवर्णीय करूं लागतील ही त्यांच्या मनांतील

भीति, एका अस्पृष्टाकडेच नवी घटना तयार करण्याचें काम देण्यांत आलें हें पाहून कमी झाली असेल असें वाटतें. डॉ. आंबेडकरांचें मात्र त्यांनीं स्वतःच ती घटना तयार केली असूनहि, समाधान झालेलें नाहीं असें दिसतें. मंत्रीपदाचा राजीनामा दिल्यानंतर, कॉंग्रेसनें अस्पृश्यांसाठीं कांहींहि केलेलें नाहीं, हें प्रतिपादन ते करीतच राहिले आहेत. आणि आतां तर आपण केलेली घटना जाळून टाकण्याच्या लायकीची आहे असें ते सांगूं लागले आहेत. पण स्वत: नव्या समाजरचनेचे नियम केल्यानंतरहि ते असें म्हणत राहिले तर त्यांचें समाधान कोणी कधीं करूं शकेल असें वाटत नाहीं. पण सुदैवानें एकंदर अस्पृश्य समाज अशा मनःस्थितींत राहिला आहे असें वाटत नाहीं. कॉंग्रेसच्या आतांपर्यंतच्या सेवेमुळें व या शेवटच्या कृतीमुळें अस्पृश्यांच्या मनांतली भीति नष्ट झाली असून त्यांचा कॉंग्रेसवरचा व सवर्णीयांवरचा विश्वास बराचसा वाढला असावा असें, गेल्या निवडणुकींत त्यांनीं कॉंग्रेसला जो एकमुखी पाठिंबा दिला त्यावरून, म्हणावेंसें वाटतें. सवर्णीयांवरचा विश्वास वाढला नसला तरी, निदान आतां येथून पुढें स्वराज्यांत आपल्या सर्व प्रकारच्या गुणांना व कर्तृत्वाला जास्त अवसर मिळेल इतकें त्यांना वाटूं लागलें असलें तरी जुनें युग कॉंग्रेसनें पालटलें असें म्हणण्यास प्रत्यवाय नाहीं.

स्पृश्य व अस्पृश्य हीं हिंदुस्थानचीं दोन शकलें सांधून देण्याचें महाकार्य कॉंग्रेसनें केलें आहे. आतां हीं शकलें एकजीव होऊन हा समाज अभंग होऊन जाणें, हें केवळ कालावधीचें काम आहे. अर्थात् तेंहि सोपें आहे असें नाहीं. त्यासाठीं दोन्ही समाजांना फार मोठीं पथ्यें पाळावीं लागतील. फार विवेकानें व संयमानें वागावें लागेल; पण हें घडून येईल अशी आशा वाटते.

अस्पृश्य समाजाविषयींचें बहुतेक विवेचन येथें संपलें. आणखी कांहीं विचार सांगावयाचे आहेत. पण आदिवासी व अस्पृश्य या दोघांनाहि ते साधारण असल्यामुळें प्रथम आतां आदिवासी समाजाविषयीं विवेचन करावयाचें आहे.

## आदिवासी

भरतभूमींत प्राचीन काळापासून आजपर्यंत भिन्न वर्णांच्या, भिन्न रक्तांच्या, भिन्न धर्मांच्या, भिन्न परंपरांच्या, भिन्न संस्कृतींच्या शेकडों

जमाती येऊन स्थायिक झालेल्या आहेत. येथल्या अगदीं मूळच्या रहिवाशांना आज आदिवासी किंवा आदिद्रवीड असें म्हणतात. त्यांचा संसार येथें चालू असतांना द्रवीड लोक येथें आले व त्यांच्यामागून आज ज्यांचा विशेष बोलाबाला आहे ते आर्य लोक आले. हा ठोकळ हिशेब झाला. पण या भूमीच्या चित्रपटाकडे पाहिलें तर येथें वरच्याशिवाय आणखी असुर, दास, यवन, चीन, शबर, किरात, पुलिंद, बर्बर, यक्ष, गंधर्व, किन्नर, विद्याधर, वानर इ. जमाती वेदकाळीं होत्या असें दिसतें. आणि आजचें संशोधन असें सागतें कीं, त्यांच्यापैकीं कांहीं जमाती आर्यांइतक्याच सुधारलेल्या होत्या, तर कांहीं अगदीं रानटी होत्या. यानंतर ऐतिहासिक काळाकडे पाहिलें तर शक, युएची, कुशान, हूण, मग, ग्रीक अशा अनेक जमाती, लाखांच्या संख्येनें येथें येऊन शेकडों वर्षें स्थिर झालेल्या दिसतात. शिकंदराच्या काळापासून हर्षाच्या काळापर्यंत या जमातींचीं नऊ आक्रमणें भरतभूमीवर झालीं व तेवढीं सर्व येथील वीरपुरुषांनीं मारून काढून या भूमीचें स्वास्थ्य अबाधित राखिलें. यानन्तर अर्वाचीन काळांत प्रथम मुसलमानांचीं आक्रमणें सुरू झालीं. हे येथें येणारे मुसलमानहि असेच भिन्न वंश, भिन्न परंपरा, भिन्न संस्कृति, भिन्न पंथ यामुळें परस्परांपासून विलग होते. अरब, तुर्क, मोंगल, इराणी, अफगाण असे अनेक वंश, शिया, सुन्नी, सूफी असे अनेक पंथ या प्रकारचे त्यांच्यांतहि अनेक भेद होते. त्यांचा सहाशे सातशे वर्षें सहवास व राज्य येथें झाल्यामुळें मूळच्या भारती समाजाच्या वैचित्र्यांत व त्यामुळें येथील गुंतागुंतींत आणखी भर पडली. या मुसलमानांच्या नंतर पोर्तुगीज, डच, फ्रेंच व इंग्रज हे लोक येथें आले आणि विजेते म्हणून शेकडों वर्षें येथें स्थायिक झाले.

अशा या शेकडों जमातींचा एकजीव करून त्यांच्यांतून एक समाज निर्माण करणें हें कार्य किती कठीण, किती दुःसाध्य आहे, याची कोणालाहि सहज कल्पना येईल. आणि ज्यांना येणार नाहीं त्यांनीं, अशा तऱ्हेच्या अनंत भिन्न जमाती ज्या भूभागांत एकत्र येऊन वसलेल्या आहेत, अशा भूभागांकडे दृष्टि टाकावी व तेथील नेत्यांना हें कार्य कितपत साधलें याचा विचार करावा.

## हिंदु समाजाचा जन्म

आज हिंदु समाजाचा विचार करूं लागलों म्हणजे आपण चटकन् म्हणतों कीं, हा समाज एक समाज आहे या म्हणण्याला कांहीं अर्थ नाहीं. आणि जो हिंदुसमाज आपल्याला घडावयाचा आहे त्याच्या तुलनेनें आपण विचार केला तर तें अगदीं खरें आहे. पण आपण जरा दुसऱ्या बाजूनें विचार करावा. वर सांगितल्याप्रमाणें तुलनेनें पहाण्याचा प्रयत्न केला म्हणजे आपली टीका जरा सौम्य करावी असें आपल्याला वाटेल. युरोप खंडाचा आपण विचार करूं या. या भूभागांत आज दोनतीन हजार वर्षें अशाच अनेक जमाती येऊन रहात आहेत. त्या जमाती भारतांतल्यासारख्या एकमेकांपासून पराकाष्ठेच्या भिन्नहि नाहींत. इसवी सनाच्या सातव्याआठव्या शतकापर्यंत या सर्व ख्रिस्ताच्या अनुयायी झालेल्या आहेत. असें असून, सर्व युरोप म्हणजे एक देश आहे आणि आपण सर्व युरोपी म्हणजे एक समाज आहों, ही कल्पना तेथें वातावरणांतहि उदित झाली नाहीं. आपण तुलना करावयास बसलों म्हणजे इंग्लिश समाज, जर्मन समाज हे डोळ्यांपुढें ठेवून हिंदुसमाजाचा विचार करतों. हिंदुसमाज व येथून पुढें भारती समाज तितका संघटित व पराक्रमी व्हावा ही आपली आकांक्षा असल्यामुळें त्या दृष्टीनें ही तुलना करण्यास हरकत नाहीं. नव्हे, ती अवश्य आहे; पण आतांपर्यंत झालेल्या—विशेषत: इसवी सनाच्या सातव्या शतकापर्यंत झालेल्या —कार्यांची चिकित्सा करतांना अशी तुलना करणें केव्हांहि युक्त होणार नाहीं. कारण इंग्लिश किंवा जर्मन समाज यांचा जीव अगदीं लहान, आणि त्यांच्यांतील भेद फारच कमी. तेथें राष्ट्ररूपानें संघटित झालेले बहुतेक लोक एकधर्मी, एकभाषी, आणि विशेष म्हणजे जवळजवळ एकवंशी आहेत. तांत्रिकरीत्या त्यांच्यांत वंशभेद असला तरी अगदीं गोरे व अगदीं काळे, उंच नाकाचे व बसक्या नाकाचे, अत्यंत सुरेख व अत्यंत कुरूप, अत्यंत सुसंस्कृत व अत्यंत रानटी अशी भिन्नता त्यांच्यांत नव्हती; यामुळें इंग्लंड, जर्मनी या देशांत त्यांची संघटना झाली ही नवलाची गोष्ट नसून तितकी बलिष्ठ संघटना स्पेन, इटली, पोलंड व मध्य युरोपांतील देश, येथें होऊं शकली नाहीं, ही नवलाची गोष्ट आहे. तेव्हां अशी तुलना करून हिंदुसमाजाकडे पाहणें

योग्य नाहीं. इतका विशाल भूखंड, इतक्या विविध जमाती व इतकी कमाली वा संस्कृतिभिन्नता असा योग ज्या ठिकाणीं आला त्या ठिकाणच्या लोकांनीं, तेथल्या समाजधुरीणांनीं त्या मानवसमूहाला एकरूप देण्याचे काय प्रयत्न केले व ते किती यशस्वी झाले, तें पाहून मग तुलना करावी. तशी केली तर असें दिसेल कीं, अखिल भरतखंड हा एक देश आहे व आपण सर्व हिंदु मिळून एक समाज आहों हा जो भाव भारतीयांच्या चित्तांत येथल्या आर्यद्रविडअसुर नेत्यांनीं निर्माण केला त्याला जगाच्या इतिहासांत तुलना नाहीं. हा भाव केवळ भाव म्हणूनच राहिला. त्याला प्रभावी अशा निष्ठेचें रूप आलें नाहीं, हें खरें; पण एवढ्या मोठ्या मानवसमूहांत एक भाव निर्माण करणें ही गोष्ट सुद्धां कांहीं लहानसहान नाहीं. अखिल हिंदुस्थानांत आपण एक आहोंत ही मनोमन साक्ष नसती तर काय झालें असतें, याचा विचार करावा. आज आपण संघटना करावयास निघालों त्यावेळीं अखिल भरतखंड एक आहे, हें गृहीत धरून पुढें चाललों आहों. ही पूर्वपुण्याची केवढी अलौकिक जोड आहे! भावी मंदिराचा आयताच बांधून मिळालेला हा पाया किती भव्य आहे! त्याच्या अभावीं आपली युरोपसारखी किंवा दक्षिण अमेरिके-सारखी किंवा पूर्वेकडील अनाम, सयाम, जावा, सुमात्रा, बोर्निओ या प्रदेशांसारखी स्थिति झाली असती. हा सर्व मिळून एक देश आहे व आपण सर्व मिळून एक समाज आहों, हा भाव–निष्ठा तर नाहींच–पण हा भावहि त्यांच्या स्वप्नांत कधीं आलेला नाहीं. त्यामुळें तेथें सर्व भिन्न देशच आहेत. आज सर्व युरोपखंड हा एक देश व्हावा व सर्व युरोपियांचा एक समाज व्हावा अशी निकड तेथील विचारी नेत्यांना वाटूं लागली आहे; पण तें स्वप्न पहाण्यापलीकडे आपणांस जातां येईल अशी त्यांना मुळींच आशा नाहीं. पश्चिम युरोपांतील देशांची संस्कृति व तेथील नागरिकांचें रंगरूप हें पुष्कळसें सारखें आहे. पण तेवढ्यांचा सुद्धां एक देश व एक समाज घडविणें हें अशक्यप्राय म्हणून तेथील नेत्यांना सोडून द्यावें लागत आहे. फार पूर्वीच्या काळींच आर्यद्रविडअसुर नेत्यांनीं अवधान राखून येथल्या अनंत भिन्न जमातींच्या भिन्न अहंकारांतून, अस्पष्ट, अस्फुट, मंद असा का होईना, पण एक अहंकाराचा सूर निर्माण करण्याचे जसे प्रयत्न केले तसे तेथील

नेत्यांनीं केले असते तर ! आपण भारताची संघटना करण्यास उद्युक्त होतांच, अखिल भरतखंड एक आहे, व आपण सर्व एक समाज आहों, ही गोष्ट गृहीत धरूनच निघालों. सर्वांच्या मनांत असलेली ही भावना आतां आपल्याला फक्त दृढ करावयाची आहे. पण युरोपमध्यें ती निर्माण करण्यापासून तयारी हवी आहे. आणि तें जमणें जवळजवळ अशक्य आहे. कारण आतां तेथील भिन्न अहंकार जास्त कठीण,जास्त निबर व जास्त विसंवादी होऊन बसले आहेत. हीच गोष्ट इस्लामी देशांची आहे. तुर्कस्थान इराण, अफगाणिस्थान, आरबस्थान, बलुचिस्थान, इजिस हे देश आज शेकडों वर्षें इस्लामचे अनुयायी, एकधर्मी, आहेत. पण एवढा प्रदेश मिळून एक देश, अशी भावना तेथील नेत्यांना निर्माण करतां आली नाहीं. इजिस, अरेबिया, सिरिया, ट्रॅन्सजॉर्डन हे तर एकधर्मी व एकवंशी देश आहेत. पण त्यांनाहि एक अरबराष्ट्र, एक समाज करतां आला नाहीं व अजूनहि येत नाहीं. या दृष्टीनें तुलना करून पाहिलें म्हणजे भारताच्या प्राचीन नेत्यांच्या कार्याची महती आपल्या ध्यानांत येईल.

## सहिष्णुता

येथें ज्या अनेक जमाती होत्या व ज्या अनेक बाहेरून आल्या त्यांना, त्यांनीं त्यांची धार्मिक वा सामाजिक मतें सोडलीं पाहिजेत असा, किंवा अमुक मतें किंवा आचार पतकरले पाहिजेत असा, कसलाहि आग्रह न धरतां येथल्या समाजधुरीणांनीं हिंदुत्वाच्या कक्षेंत समाविष्ट करून घेतलें. यासाठीं त्यांनीं कोणच्याहि लोकायत्त उदारमतवादी देशांत सांपडणार नाहीं इतकी परमतसहिष्णुता दाखविली आहे. नव्या समाजानें आपलीं सर्व धर्ममतें, श्रद्धा, आचार हीं सोडून जुन्या समाजांत विलीन होऊन गेलें पाहिजे असा आग्रह न धरतां, दोन्ही समाजाच्या मतांचें व आचारांचें कांहींसें मिश्रण घेऊन तें नवीन व्यापक रूप सर्वांनीं स्वीकारावें असें धोरण आर्यद्रविडादि नेत्यांनीं स्वीकारल्यामुळें अनेक जमाती येथें परस्परांशेजारीं राहून सलोख्यानें नांदू लागल्या आणि मग कालांतरानें राजकीय, आर्थिक व कित्येक ठिकाणीं वैवाहिक संबंधानेंहि त्यांच्यांतील अनेक जमाती एकरूप होऊं लागल्या. आर्य व असुर यांचे विवाह झाले. आर्य व

द्रवीड यांचे तर सर्रास रक्तसंबंध होऊन नर्मदेच्या दक्षिणेस या दोन जमाती भिन्न राहिल्याच नाहींत. ज्या जाति अशा रीतीनें एक झाल्या नाहींत त्या जातिव्यवस्थेंत आर्थिक दृष्टीनें परस्परावलंबी होऊन राहिल्या. पण कोणचीहि जमात कशाहि स्वरूपांत येथें राहिली तरी हिंदुत्वाच्या सूत्रांत तिची गुंफण झाल्यावांचून राहिली नाहीं. आणि एकदां या कक्षेंत आल्यानंतर आपल्या गुणकर्मांप्रमाणें कोणच्याहि उच्च पायरीवर जाण्यास सर्वांना मुभा होती. रजपूत हे कोणाच्या मतें बाहेरून आलेले आहेत. पण क्षत्रिय वर्णाच्या उच्च पदवीवर त्यांना सहज जातां आलें. 'मग' जमातीचे लोक येथें आल्यावर ब्राह्मणवर्णीय झाले. वन्य जमातींचे इतिहास लिहिणाऱ्यांपैकीं अनेकांनीं त्या जमाती हिंदुत्वांत समाविष्ट झाल्यावर क्षत्रिय म्हणून मान्य झाल्याचीं उदाहरणें दिलीं आहेत. इसवी सनाच्या सातव्या शतकापर्यंत ही एकीकरणाची, सहिष्णुतेची, संग्रहाकतेची व उदारतेची परंपरा चालू होती असें दिसतें. त्या काळाच्या आधींच्या आठदहा शतकांत शक, युएची, कुशान, हूण इ. सातआठ जमातींचे प्रचंड लोंढेच्या लोंढे भारतांत आले व लक्ष लक्ष संख्येनें येथें स्थायिक झाले; पण ते आपल्या भिन्न रूपानें हिंदुस्थानांत आज कोठेंहि दिसत नाहींत. ते कोट्यवधि लोक हिंदुसमाजानें आत्मसात् करून टाकले. इतका जिवंतपणा त्या वेळेपर्यंत हिंदुसमाजांत होता. पुढें मात्र याविषयींचें तत्त्वज्ञान, धोरण, आचार–सर्वच बदलून गेलें. भेद टिकवून धरण्याचीच प्रवृत्ति आपल्या समाजांत बळावली व त्यांतच लोक भूषण मानूं लागले. त्यामुळें तोंपर्यंत चालत आलेली एकीकरणाची प्रक्रिया थांबून जुने भेद सांधले गेले नाहींत आणि नवीन ज्या मुसलमान जमाती येथें आल्या त्यांना आत्मसात् करण्याचें कार्य कोणीं प्रारंभिलें सुद्धां नाहीं. या विपरीत धोरणामुळें आजच्या हिंदुसमाजापुढें अनेक बिकट प्रश्न येऊन उभे राहिले आहेत.

हा जुना इतिहास थोड्याशा विस्तारानें देण्याचा हेतु असा कीं सातव्या शतकांत थांबलेली समाजाच्या एकीकरणाची ही प्रक्रिया आपण नुसती पुढें चालू केली तर अस्पृश्य, आदिवासी व मुसलमान यांच्यासह म्हणजे यांना संगृहीत करून घेऊन नवा भारती समाज निर्माण करणें आपणांस सुलभ होईल हें आपल्या ध्यानीं यावें.

पण हा इतिहास पहाण्यांत आणखी एक हेतु आहे. अलीकडे मागले इतिहास वेदकाळापर्यंत चाळून त्यांतून जुने अन्याय व जुनीं वैरें उकरून काढून त्या अन्वयें भावी धोरणें आखावीं असे प्रयत्न चालू आहेत. ब्राह्मण-ब्राह्मणेतर वादाचें विवेचन केलें त्यांत असलीं उदाहरणें भरपूर दिलीं आहेत. त्याच ग्रंथांतून अस्पृश्यसमाजाविषयीं अशाच तऱ्हेचें प्रतिपादन केलेलें आढळतें. त्याशिवाय 'हू वेअर दि अनूटचेबल्स' अशासारखे ग्रंथहि याच हेतूनें लिहिले जात आहेत. आतां आदिवासी जमाती पुढें येऊं लागल्या कीं त्यांच्यांतून नवे पंडित निर्माण होऊन तेहि याच तऱ्हेचे ग्रंथ लिहूं लागतील. केवळ सत्यसंशोधन किंवा इतिहासजिज्ञासा एवढ्याच बुद्धीनें हे प्रयत्न झाले तर त्यांचें कोणीहि स्वागतच करील. पण सध्यांची प्रक्रिया निराळी आहे. जुन्या काळच्या अन्यायाच्या जाणीवा चेतवून नवा संताप त्या त्या जमातींत निर्माण करावा आणि प्रत्येक जमातीनें आपल्याला स्वतंत्र स्थान या भरतभूमींत मागावें, अशा वळणानें हें पांडित्य चाललेलें दिसतें. द्रविडीस्थानची मागणी, शिखीस्थानची मागणी, स्वतंत्र नागराष्ट्राची मागणी, या मागण्या याच जातीच्या आहेत. या मागण्या प्रबळ झाल्या, त्या त्या बाबतींत त्यांचा प्रभाव पडून त्यांना त्या जमातींचें पाठबळ मिळालें, तर हिंदुस्थानचीं अनंत शकलें होऊन येथें युरोपांतल्याप्रमाणें नित्य युद्धें, मारामाऱ्या, आक्रमणें यांचें खैदान सुरू होईल. आणि त्यांमध्यें, ज्यांनीं अन्याय केला त्यांचीच नव्हे तर आतांपर्यंत अन्यायानें जे पीडिले गेले त्यांचीहि आहुति पडून, हा भारती समाज पूर्वीपेक्षांहि छिन्नभिन्न होऊन, पुन्हां त्याला गुलामगिरी प्राप्त होईल.

या जुन्या इतिहासाच्या संशोधनाविषयीं एक महत्त्वाचा विचार सांगावासा वाटतो. भारतीय व पाश्चात्य पंडितांनीं या प्राक्–कालीन घडामोडींविषयीं इतकीं परस्पर भिन्न मतें सांगितलीं आहेत, इतक्या वेगळाल्या उपपत्ति बसविल्या आहेत आणि जुन्या घटनांचे इतके वेगवेगळे अर्थ केले आहेत कीं, त्यांच्या आधारें आज अन्यायाचें खापर किंवा कल्याणबुद्धीचें श्रेय अमक्या एका जमातीस देणें सर्वथा अशक्य आहे हें कोणाच्याहि सहज ध्यानीं येईल. आणि त्यावरून आजचें धोरण ठरविणें हें तर अगदींच वेडेपणाचें होईल. येथें बाहेरून कोण आले व मूळचे येथले

कोण, हें निश्चित झालेलें नाहीं. आर्य म्हणजे नेमके कोण, असुर, दास, दस्यु, शूद्र, हीं अभिधानें मागल्या काळीं नेमकीं कोणाला उद्देशून लाविलीं होतीं हें नक्की सांगतां येत नाहीं. चातुर्वर्ण्य ही आज अन्याय्य वाटणारी संस्था आर्योनीं निर्माण केली कीं द्रविडांनीं, हेंहि निश्चित ठरवितां येत नाहीं. आश्रमधर्माची स्थापना तर प्रल्हादपुत्र कपिलासुर या असुरानें केली, असें कोणाकोणाचें मत आहे. वेदकाळीं व त्यानंतरच्या काळांत येथें अनेक लढाया झाल्या. त्यांत उभयपक्ष नेमके कोणचे होते, म्हणजे त्या लढाया आर्यअनार्यांत होत्या कीं आर्याआर्यांत होत्या, का आर्य व दस्यु, आर्य व असुर यांच्यांत होत्या, याविषयीं पंडितांत एकमत नाहीं. अस्पृश्यता नेमकी केव्हां निर्माण झाली, कां निर्माण झाली, आणि अस्पृश्य हे मूळचे कोण याविषयीं तर एखादी उपपत्ति सांपडली आहे असें वाटण्याइतकेंहि समाधान मिळालेलें नाहीं. असा एकंदर मागील संशोधनाचा डोलारा अनिश्चित व डळमळीत पायावर उभा असतांना त्याच्या आधारें आजचीं परस्परांविषयींचीं धोरणें ठरविणें असमंजसपणाचें होईल. भारती समाजाच्या एकीकरणाविषयीं एवढे प्रास्ताविक विचार सांगून आदिवासींच्या प्रश्नाविषयीं थोडक्यांत निरूपण करतों आणि मग अस्पृश्य व आदिवासी या दोन्ही समाजांविषयीं कांहीं सामान्य कल्पना सांगून हें विवरण संपवितों.

अस्पृश्यतेच्या प्रश्नाप्रमाणेंच आदिवासींच्या प्रश्नाकडे कॉंग्रेसनें स्वातंत्र्यप्राप्तीच्या पूर्वीपासून लक्ष पोंचविलेलें आहे. १९३७ सालीं सत्ता हातीं आली तेव्हांपासून बहुतेक प्रांतिक सरकारांनीं आपापल्या प्रांतांत आदिवासी मंडळें स्थापून कातकरी, वारली, भिल्ल, गोंड, संताळ, नाग, भूईया, भिंजवर, महातोस, कोरकू, होस, कोल, मुंडा, इ० जमातींच्या उत्कर्षासाठीं प्रयत्न आरंभिले. त्याच्याहि आधीं इंग्रज मिशनऱ्याप्रमाणें या वन्य जमातींच्या वस्तींत जाऊन राहून त्यांना सुसंस्कृत जीवनाच्या मार्गावर आणण्याचा प्रयत्न अनेक समाजसेवकांनीं केला होता. आतां स्वातंत्र्यप्राप्तीनंतर आदिवासी समाजाच्या प्रगतीसाठीं भारताच्या घटनेंतच योजना केली असून तिच्या अन्वयें अध्यक्षांनीं लक्ष्मीदास श्रीकांत या त्याकामीं आतांपर्यंत सर्व आयुष्य ज्यांनीं वेचलें आहे अशा, गृहस्थांची नेमणूक केली आहे. सात जून १९५२ रोजीं दिल्लीला या प्रश्नाची चर्चा करण्यासाठीं कार्यकर्त्यांची व सरकारी अधिका-

त्यांची परिषद् भरली होती. अध्यक्ष राजेंद्रप्रसाद, महामंत्री नेहरू, उपाध्यक्ष राधाकृष्णन् हेहि या परिषदेला जातीनें उपस्थित होते. यावरून या प्रश्नाचें अस्पृश्यांच्या प्रश्नाइतकेंच महत्त्व आहे याची पुरेपूर जाणीव भारतीयांना झाली आहे असें वाटतें.

या लोकांना जमिनी द्याव्या, सावकारादि आक्रमकांपासून त्यांना संरक्षण द्यावें, त्यांच्यासाठीं शाळा, आरोग्यभुवनें, वसतिगृहें, शिष्यवृत्त्या, अधिकाराच्या जागा यांची सोय करावी, आणि हजारों कार्यकर्ते तयार करून भारताच्या नागरिकत्वाची पदवी या वन्य जमातींना त्वरेनें प्राप्त करून द्यावी, असा सरकारचा संकल्प आहे. त्याप्रमाणें आतां कार्याला सुरवात होऊन हळूंहळूं या जमातींची प्रगति होऊं लागेल. ही प्रगती होऊं लागतांच अस्पृश्याप्रमाणेंच त्यांच्या जमातींविषयींहि अनेक तात्त्विक प्रश्न निर्माण होतील. त्यांचा विचार करण्यास व या जमातींविषयीं धोरण ठरविण्यास सोपें जावें म्हणून कांहीं तात्त्विक व ऐतिहासिक चर्चा येथें करावयाची आहे.

गेलीं साठसत्तर वर्षें या देशांत दशवार्षिक शिरगणति होत असते. त्यावेळीं या शिरगणतीवरून मिळालेल्या माहितीच्या आधारें येथील सामाजिक प्रश्नांचें तात्त्विक मंथन करण्यासाठीं मोठमोठे तज्ज्ञ अधिकारी नेमलेले असतात. बेनस्, शूबर्ट. डॉ.हटन,सर हर्बर्ट रिसले, डूंकप, लेसी, रॉय, बसू, मुजुमदार ही या क्षेत्रांत अभ्यास करणारी प्रमुख विद्वान् मंडळी होत. त्यांनीं त्या त्या वेळीं जीं विवेचनें करून ठेवलीं त्यावरून मिळणारी माहिती व त्यांनीं सांगितलेले विचार आपल्या समाजाच्या घडणीच्या दृष्टीनें प्रत्येक सुशिक्षित भारतीय नागरिकास माहीत असणें अवश्य आहे असें वाटल्यावरून ते येथें दिले आहेत.

## मूळचे कोण ?

पहिली महत्त्वाची गोष्ट अशी कीं, या भूमींतले अगदीं मूळचे रहिवासी कोण हें निश्चितपणें सांगणें शक्य नाहीं. आर्यांच्या आधीं, द्रविडांच्याहि आधीं आलेल्या म्हणून आदिवासी किंवा आदिद्रवीड असें म्हणून सध्यांच्या वन्य जमाती या मूळच्या रहिवासी असें आपण समजतों; पण या पंडितांच्या मतें

भिल्ल, गोंड, संताळ, महतोस, भूईया या वन्य जमाती सुद्धां येथें बाहेरून आलेल्या असण्याचा संभव आहे. कोणाच्या मतें येथें त्यांच्यापूर्वी निग्रोवंशाचे लोक असावे. दुसरें असें कीं भिल्ल, गोंड, इ० जमाती आज जेथें राहतात तेथेंच त्या पहिल्यापासून राहिलेल्या आहेत असें नाहीं.एक आदिवासी जमात दुसरीवर आक्रमण करून तिला देशोधडीला लावते व आपण तेथें वस्ती करते, हा प्रकार मागें सारखा चालू होता. कोल या जमातीनें भूईया जमातीला उठविलें. गोंड व कामर यांनीं महतोस, कोरव, भिंजवर यांना उठवून बिलासपूर हद्दींत हाकलून लावलें. तात्पर्यार्थ असा कीं, आम्ही या अमक्या भूमीचे पहिले वारसदार, असा हक्क इतिहासाच्या आधारें सांगून नसते कलह निर्माण करण्याची जी आज प्रवृत्ति निर्माण होत आहे तिला या पंडितांचा मुळींच आधार नाहीं.

दुसरी गोष्ट–हिंदु समाजानें आजपर्यंत या वन्यजमातींच्या उद्धारार्थ कसलेच प्रयत्न केले नाहींत, त्यांची केवळ उपेक्षा केली, असा समज आहे, तो अगदीं भ्रामक आहे असें या संशोधकांचें मत आहे. वर ज्या अनेक जमाती सांगितल्या त्यांपैकीं प्रत्येक जमातीचे पुष्कळसे लोक हिंदुधर्माच्या कक्षेंत समाविष्ट करून घेण्यांत आलेले आहेत. आणि अशा हिंदूकरणामुळें त्या आदिवासी जमातींची सर्वतोपरी प्रगति झालेली आहे असा या पंडितांनीं निर्वाळा दिला आहे. ( दि ॲबोरिजिनस्–सो कॉल्ड–अँड देअर फ्यूचर–डॉ. जी. एस्. घुर्ये–या पुस्तकाच्या पहिल्या तीन प्रकरणांतून ही माहिती व विचार संकलित केले आहेत. ) मात्र हें हिंदूकरण वर सांगितलेल्या पद्धतीनें झालेलें आहे. या जमाती हिंदुत्वाच्या कक्षेंत आल्या; पण त्यांच्यावर सक्तीनें कसलेच आचारविचार लादले गेले नाहींत. हिंदूचीं दैवतें, आचार, विचार, तत्त्वज्ञान त्यांनीं स्वीकारलें. त्याचप्रमाणें ज्यांच्याशेजारीं या जमाती राहूं लागल्या त्या हिंदूंच्या धर्ममतांवर व आचारांवर त्यांच्या मतांचा व आचारांचाहि परिणाम झालेला आहे. या लोकांचा हिंदुत्वांत समावेश झाला तो सर्वस्वीं खालच्या थरांत झाला असेंहि नाहीं. भिल्ल, गोंड, कोरकू यांच्यांतील कांहीं शाखांनीं आपली खूपच प्रगति करून घेतली व आपण क्षत्रिय आहोंत, रजपूत आहोंत असा हक्क सांगून त्याला मान्यताहि मिळविली आहे. त्यांतील कांहीं मोठमोठे जमीनदार व कांहीं मोठ्या दर्जाचे शेतकरी

झाले आहेत. श्री. विल्स यांच्या मतें पैका कानवार ही जमात म्हणजे हिंदूकरणामुळें होणाऱ्या प्रगतीचा आदर्शच होय. कानवाराप्रमाणेंच कुरमी महतोस या जमातीनें आपल्या क्षत्रियत्वास मान्यता मिळविलेली आहे. यांची लोकसंख्या सुमारें सात लक्ष आहे.

हिंदूंच्या संसर्गानें आदिवासी जीवनावर कसलेच वाईट परिणाम झाले नाहींत असें नाहीं. ब्रिटिश राज्यपद्धति रूढ झाल्यावर हिंदूंच्या सरहद्दीवर रहाणाऱ्या वन्य जमातींमध्यें दारूचे मक्तेदार व सावकार यांनीं अगदीं अनर्थ करून सोडला होता. त्याचप्रमाणें जुना धर्म सुटला व नवीन आत्मसात् करतां आला नाहीं यामुळें कित्येक जमातींचा अधःपात झाला आहे. पण हे समाजव्यवस्थेच्या मूलतत्त्वांचे दोष नव्हत. आपण त्या मूलतत्त्वांच्या दृष्टीनें विचार करीत आहोंत. आणि त्या दृष्टीनें पहातां, ज्या जमाती मागें राहिल्या त्या स्वतःच्या अंगचा आळस, नाकर्तेपणा, व्यसनाधीनता या दुर्गुणांनीं राहिल्या, असेच या विद्वान् संशोधकांनीं आपलें मत दिलें आहे.

## स्वतःची जबाबदारी

हिंदु समाजरचनेचा व भारती समाजाच्या नव्या घडणीचा विचार करतांना हें सामाजिक निगमन अत्यंत महत्त्वाचें आहे असें मला वाटतें. अस्पृश्य समाजाची सध्यांची स्थिति, त्याचा पूर्वेतिहास व त्याची भावी काळांतील प्रगति याविषयीं यावरून कांहीं महत्त्वाचे विचार सुचतात. आज अस्पृश्यांतील कांहीं पंडित, पूर्वकाळीं आम्ही येथले राजे होतों, शास्ते होतों, असें सांगतात. 'हू वेअर दि अनूटचेबल्स' या आपल्या पुस्तकांत डॉ. आंबेडकरांनीं, सध्यांचे अस्पृश्य म्हणजे भिन्नभिन्न जमातींतून सांडलेले, तुटून निघालेले, फुटलेले असे गांवाच्या सरहद्दीवर गुजारा करून रहाणारे पण सध्यांच्या सवर्णीयांच्याच रक्तामांसाचे लोक होत, असें म्हटलें आहे. हीं मतें जर खरीं असतील तर एक महत्त्वाचा प्रश्न उपस्थित होतो. सध्यांची हीन स्थिति या लोकांना कां प्राप्त झाली, हा तो प्रश्न होय. या प्रश्नाचा अर्थ असा. या लोकांवर सवर्णीयांनीं जुलूम केला, अत्यंत अन्यायानें व दुष्टपणानें त्यांना वागविलें, त्यांच्या सर्व जीविताचा कोंडमारा करून त्यांना माणुसकींतूनहि खालीं ओढलें, याविषयीं कसलीहि शंका नाहीं. आणि हा

घोर अन्याय असून तो हिंदुधर्मावर कलंक होय याविषयींहि दुमत नाहीं. अशी वस्तुस्थिति असल्यामुळें अस्पृश्यांनीं स्पृश्यहिंदूंवर कितीहि भयंकर टीका केली तरी ती त्यांनीं सोसली पाहिजे, असेंच माझें मत आहे. पण या तऱ्हेची स्पृश्यांवर जहरी टीका केल्यानंतर अस्पृश्यांनीं स्वतःच्या मनाला एक प्रश्न विचारला पाहिजे. आणि तोच प्रश्न आदिवासी जसजसे समंजस होतील तसतसा त्यांनींहि आपल्या मनाला विचारला पाहिजे. तो प्रश्न असा-स्पृश्य हिंदूंनीं व त्यांतील श्रेष्ठवर्णीयांनीं आपल्यावर जुलूम केला, आपल्याला खालीं दडपलें हें सर्व खरें असलें तरी आपल्या हीन दशेचें, अधःपाताचें, नाशाचें खापर सर्वस्वीं त्यांच्या माथीं फोडून चालेल का? आपल्या अवनतीला आपण मुळींच जबाबदार नाहीं हें खरें आहे काय? अशा तऱ्हेचें आत्मनिरीक्षण अस्पृश्य करीत नाहींत; पण तें करणें अवश्य आहे असें वाटतें.

माझें असें ठाम मत आहे कीं, कोणच्याहि समाजाच्या अधःपाताला, त्याच्या दुर्गतीला, पारतंत्र्याला त्याचे आक्रमक, त्याला निर्दाळणारे, त्याला पायदळीं घालणारे हे जितके जबाबदार असतात तितकेच किंबहुना त्याहून कांहीं अंशीं जास्त त्या समाजाचे लोक जबाबदार असतात. इंग्रजांचें राज्य येथें झाल्यावर येथल्या नेत्यांनीं हे इंग्रज आमच्या सर्व अवनतीस कारण आहेत असा पुकारा केला. आणि तें बाजवीहि होतें. पण त्याचबरोबर त्यांनीं स्वतःच्या समाजावरहि कमालीचा भडिमार केला. आणि आपल्या आजच्या स्थितीला वास्तविक आपणच जबाबदार आहों हा विचार अहोरात्र त्याच्या मनावर बिंबविण्याचा प्रयत्न केला. लोकहितवादी, विष्णुशास्त्री, टिळक, आगरकर, महात्माजी यांचे लेख वरवर चाळले तरी हें दिसून येईल. मागल्या इतिहासाची चिकित्सा करणाऱ्या अस्पृश्यांनीं ही कठोर आत्मनिरीक्षणाची भूमिका घेतली नाहीं तर, आपल्या अधःपाताला दुसरे लोकच सर्वस्वीं कारण झाले, हा दुबळा विचार त्यांच्या उन्नतीच्या आड आल्याखेरीज रहाणार नाहीं. गोंड, कोरकू, कानवर अशा जाती मुळांत अगदीं वन्य असतांना त्यांनीं आणि संताळ, नाग यांनींहि या भूमींत आर्थिक व सामाजिक क्षेत्रांत खूपच उंच स्थान मिळविलें. जेथें लढे करावे लागले तेथें तेहि त्यांनीं केले. पण खरें म्हणजे या तऱ्हेच्या

अभिसरणास हिंदुसमाजाची कधींच हरकत नव्हती. अस्पृश्यांवर सवर्ण हिंदूंनीं व विशेषतः ब्राह्मणांनीं जुलूम केला असा इतिहास आहे. पण आतां असें ध्यानांत येत आहे कीं कित्येक अस्पृश्य जमातींनीं ब्राह्मणांना कधींच गुरु मानलें नाहीं. आणि ब्राह्मणहि अस्पृश्यांचे धर्मविधि करण्याचें काम बहुधा स्वीकारीत नसत. ब्राह्मण अस्पृश्यांना हीन लेखीतच. पण कित्येक ठिकाणीं अस्पृश्यहि ब्राह्मणांना हीन लेखीत व आपल्या वस्तींत पाऊल टाकूं देत नसत. डॉ. आंबेडकर ही गोष्ट अभिमानानें सांगतात, ( हू वेअर दि अनूटचेबल्स पृ. ७४ ) आणि अस्पृश्य मूळचे बौद्ध होते असेंहि म्हणतात. म्हणजे ज्या रक्ताचे आर्य त्याच रक्ताचे अस्पृश्य. पूर्वी ते एकदां राजसत्ताधीश होते. ब्राह्मणांचा तिटकारा करण्याइतकें मानसिक धैर्य व सामाजिक सामर्थ्य त्यांच्या ठायीं होतें. असें असतांना युगानुयुगें अत्यंत भयंकर जुलूम, घोर अन्याय, अगदीं नरकवासाचें जिणें हें सर्व सहन करीत आपण कसें राहिलों, हा प्रश्न अस्पृश्यांनीं स्वतःस विचारला पाहिजे. हिंदुस्थान हा १८ लक्ष चौरस मैलांचा देश, आणि सहा हजार वर्षांचा त्याचा इतिहास. एवढ्यामध्यें अर्वाचीन काळचा विचार केला तरी मुसलमान, पोर्तुगीज, इंग्रज यांनीं ब्राह्मणांना व एकंदर स्पृश्य हिंदूंना अनेक वेळां नामोहरम केलें होतें. त्या संधीचा फायदा घेऊन आपण उठावणी करून सवर्णीयांचें हें किळसवाणें वर्चस्व कां नष्ट केलें नाहीं, याचा विचार तरुण सुशिक्षित अस्पृश्यांनीं केला पाहिजे. शंभर वर्षांपूर्वी पेशव्यांशीं लढून आम्हीं इंग्रजांना राज्य मिळवून दिलें, असें महारांचे नेते म्हणतात. म्हणजे इंग्रजांचें त्यांना अपरिमित साह्य त्याच वेळीं झालें होतें. त्यांचा आत्मविश्वास तेव्हांच जागृत झाला होता. असें असून गेल्या शंभर वर्षांत महारांनीं कोणची प्रगति करून घेतली ? आज शंभर वर्षांनीं, इंग्रजांनीं आम्हांला फसविलें, आमचा फक्त उपयोग करून घेतला व मग आम्हांला तोंडघशीं पाडले, अशी तरी भूमिका अस्पृश्य घेतात किंवा इंग्रजच आमचे तारक, ते गेले तर पुन्हां हे ब्राह्मण, क्षत्रिय व बनिये आम्हांला नरकांत घालतील, अशी भूमिका पत्करतात. दोन हजार वर्षांत एवढ्या विस्तीर्ण प्रदेशांत, हजारों उलथापालथी होत असतांना, कोणीहि कोणच्याहि थरांतून कोठेंहि जात असतांना, परकीय आक्रमणामुळें, त्यांचा आश्रय करणाऱ्या अस्पृश्यांना

शेकडों वेळां प्रगतीची, उच्च जीवन प्राप्त करून घेण्याची संधि मिळालेली असतांना, आज आपल्या हीन दशेचें कारण म्हणजे स्पृश्य हिंदूंचा जुलूम एवढेंच अस्पृश्यांनीं म्हणत बसावें हें प्रचाराच्या दृष्टीनें युक्त असलें तरी आत्मनिरीक्षणाच्या दृष्टीनें सर्वस्वी हानिकारक आहे. सवर्णीयांवर त्यांनीं टीकेचा भडिमार अवश्य करावा. ते निःसंशय समर्थनीय आहे. कारण त्यांनीं घोर अन्याय केला आहे ही वस्तुस्थितीच आहे. पण त्यापेक्षां शतपट भडिमार त्यांनीं स्वतःवर केला पाहिजे. ही भूमिका अस्पृश्यांनीं व आदिवासी समाजांनीं स्वीकारली तर पूर्व काळीं केव्हां तरी एकमेकांचे वैरी असलेले स्पृश्य, अस्पृश्य व आदिवासी हे समाजमनाच्या दिलदारीचा व उदारवृत्तीचा परिपोष करूं शकतील. आणि तसें झालें तरच भावी काळांत त्यांच्या संघटनेंतून अभंग, एकसंध असा भारती समाज निर्माण होऊं शकेल. जुन्या काळीं वैरी म्हणून राहिलेले समाज जुन्या वैराचे दंश खेळीमेळीनें विसरतील तरच त्यांचें ऐक्य होऊं शकतें. पण आपण पराभूत झालों त्याला आपले प्रमादहि अंशतः कारणीभूत आहेत, असें दोन्ही पक्षांना वाटल्यावांचून खेळीमेळीची भावना निर्माण होणें शक्य नाहीं. तेव्हां स्वतःच्या उत्कर्षाच्या दृष्टीनें आणि भारती समाजाच्या पुनर्घटनेच्या दृष्टीनेंहि अस्पृश्यांनीं आत्मनिरीक्षणाची भूमिका स्वीकारणें अवश्य आहे असें वाटतें.

## तारकमंत्र

आणि ही भूमिका स्वीकारतांच उन्नतीचा एक राजमार्ग त्यांच्या दृष्टीस पडेल. केवळ अस्पृश्यांच्या जातीय उन्नतीच्या दृष्टीनें पाहिलें तरी अखिल भारताच्या उत्कर्षाची जबाबदारी आपल्यावर आहे हीच भावना त्यांना तारक ठरेल. त्या भावनेचा परिपोष झाला तरच त्यांच्यांतून मोठमोठे शास्त्रज्ञ, साहित्यिक, कलाकार, मुत्सद्दी, पंडित, तत्त्ववेत्ते, इतिहासकार, शिक्षणशास्त्रज्ञ असे वैभवशाली पुरुष निर्माण होतील. जातीच्या उन्नतीच्या चळवळी त्यांनीं थांबवाव्या असें मला म्हणावयाचें नाहीं. पण अखिल भारताचें चिंतन हा माझ्या मतें जातीय उन्नतीचाच मार्ग आहे. किंवा हें मुळींच पटत नसलें आणि केवळ जातीय उन्नति हीच दृष्टि ठेवावयाची असली तरी, त्या हेतूनें सुद्धां श्रेष्ठ राष्ट्रीय

वैभवाची जोपासना करण्याचा मार्गच त्यांनीं अनुसरणें अवश्य आहे. डॉ. आंबेडकरांनीं सुद्धां, आतां आपण राष्ट्रीय दृष्टीनेंच कार्याला लागलें पाहिजे, असे उद्गार दिल्ली, हैदराबाद, येथील भाषणांत अनेक वेळां काढले आहेत. पण अस्पृश्य व आदिवासी यांनीं कठोर आत्मनिरीक्षणाची भूमिका घेतल्यावांचून, आपल्या अधःपाताला अंशतः तरी आपण जबाबदार आहों ही जाणीव स्वसमाजांत निर्माण केल्यावांचून, ही अखिल राष्ट्रीय निष्ठा व केवळ तिच्यांतूनच निर्माण होणारें वैभव त्यांना प्राप्त होणार नाहीं.

आजचा जगांतला कोणचाहि देश घेतला तरी पुरातन काळापासून तेथें एकच समाज नांदत होता असें म्हणतां येणार नाहीं. मागल्या काळीं शेकडों जमाती इतस्ततः भ्रमत होत्या. प्रत्येक देशांत पंधरावीस जमातींचें मिश्रण तर सहज झालेलें आहे. या जमाती जेव्हां प्रथम एकत्र आल्या तेव्हांचे त्यांचे संबंध स्नेहाचे, मैत्रीचे, आपुलकीचे असे मुळींच नव्हते; तर शत्रुत्वाचे, जित-जेत्यांच्या वैराचे, भिन्न वंशीयांच्या द्वेषाचे, असेच होते. पण हळूंहळूं त्यांनीं तें शत्रुत्व, तें वैर व द्वेष दृष्टीआड करून ऐक्यपोषक अशा घटकांकडे जास्त लक्ष दिलें; व तसे घटक नसतील तर ते निर्माण करण्याचा प्रयत्न केला. तेंच धोरण भरतभूमींतील आजच्या भिन्न घटकांनीं अवलंबिलें पाहिजे. निदान स्पृश्य हिंदुसमाजानें तरी या तत्त्वाचा कधींहि विसर पडूं देतां कामा नये. अस्पृश्य व आदिवासी यांच्या मनांतील संतापाचे व अन्यायाच्या निष्कृतीचे भाव एकाएकी शमतील असें नाहीं. तें कालगतींचें काम आहे. पण स्पृश्य समाजानें त्यांकडे दुर्लक्ष करून गेल्या शंभर वर्षांतील धोरणच एकनिष्ठेनें पुढें चालवावयाचें हें व्रत स्वीकारलें व भारती समाज संघटित करावयाचाच अशा प्रतिज्ञेनें पावलें टाकलीं, तर लोकशाहीला अवश्य ती अभंगता आपल्या समाजांत निर्माण होणें अशक्य आहे असें नाहीं.

---

*

## प्रकरण चौदावें

# सामाजिक पुनर्घटना

## हिंदु व मुसलमान

आपली लोकसत्ता यशस्वी व्हावयाची तर अखिल भारतीय समाज हा एकरूप, संघटित व अभंग होणें कसें अवश्य आहे, हें मागील प्रकरणांतून विशद करून सांगितलें. ज्या अनेक भेदांनीं आपला समाज विच्छिन्न झालेला आहे, त्यांतील ब्राह्मणब्राह्मणेतर, स्पृश्यअस्पृश्य व हिंदुमुसलमान हे प्रमुख भेद होत. यांपैकीं तिसरा भेद म्हणजे हिंदुमुसलमान. हा भेद म्हणजे भारताच्या संघटित जीवनाच्या दृष्टीनें अत्यंत कठीण असा प्रश्न आहे. याच्या तुलनेनें पहिले दोन भेद कांहींच नव्हेत. कारण कांहीं झालें तरी त्यांतील सर्व पक्षांची हिंदुस्थान ही आपली मायभूमि आहे, तिचा उत्कर्ष हाच आपला उत्कर्ष, त्या उत्कर्षासाठीं वाहून घेणें यांतच आपल्या जीविताची सार्थकता आहे, अशी दृढ व अचल निष्ठा आहे. येथील प्राचीन संस्कृतीविषयीं व ती निर्माण करणाऱ्या महापुरुषांविषयीं त्यांच्या मनांत गाढ अशी भक्ति आहे. श्रीकृष्ण, रामचंद्र, व्यासवाल्मीकि येथपासून श्रीशिवछत्रपति, टिळक, महात्माजी, अरविंद, सुभाषचंद्र या थोर परंपरेचा ते अभिमान बाळगतात. ही निष्ठा, ही भक्ति, व हा अभिमान मुसलमानांच्या ठायीं नसल्यामुळें हिंदु व मुसलमान या समाजांच्या ऐक्याचा प्रश्न अत्यंत बिकट आहे. तो किती बिकट आहे, हिंदुमुसलमान हा प्रश्न स्वातंत्र्य-पूर्वकाळाप्रमाणेंच आज स्वातंत्र्याच्या प्राप्तीनंतर व पाकिस्तानच्या निर्मिती-नंतरहि पूर्वीइतकाच कठीण कसा आहे, याची पुढील माहितीवरून कल्पना येईल.

१९३७ सालीं प्रांतीय विधिमंडळाच्या निवडणुका झाल्या. त्यांत मुस्लीम लीगला कोणच्याहि प्रांतांत बहुमत मिळालें नव्हतें; इतकेंच नव्हे, तर मुस्लीम लीग हा पक्ष राजकारणांत विचारांत घेण्याजोगा मुळींच नाहीं,

असा त्या निवडणुकांतून निर्णय निघत होता. एकंदर मुस्लीमांचीं मतें ७३ लक्ष १९ हजार होतीं. त्यापैकीं ३ लक्ष २१ हजार मतेंच फक्त म्हणजे शे. ४·४ मतें लीगला मिळालीं. बिहार, वायव्यसरहद्द, ओरिसा व सिंध या प्रांतांत लीगला एकहि जागा मिळाली नाहीं. पंजाबमध्यें १७५ जागांपैकीं लीगला फक्त एक मिळाली. बंगालमध्यें लीगला ३९ जागा मिळाल्या तर लीगेतर मुस्लीमांना १२२ जागा मिळाल्या. सिंध, पंजाब, सरहद्द व बंगाल या मुस्लीम बहुसंख्य प्रांतांत लीगची अशी वाताहत झाली, मग इतरत्र काय झालें असेल याची कल्पना सहज येईल. मुस्लीमांच्या जागा लीगला मिळाल्या नाहींत म्हणजे त्या कॉंग्रेसला मिळाल्या असें नाहीं. त्या बहुतेक लीगेतर मुस्लीम पक्षांना—युनियानिस्ट, राष्ट्रीय मुस्लीम, मोमीन, अहरार इ. पक्षांना मिळाल्या. तरी लीगचे वर्चस्व मुस्लीमांवर नाहीं, असें त्यामुळें निश्चित झालें.

हिंदुमुसलमानांच्या ऐक्याच्या प्रतिपादकांना व विशेषतः कॉंग्रेसचें मुस्लिमांविषयींचें जें उदार धोरण त्याच्या पुरस्कर्त्यांना हा देखावा फारच आशादायक वाटला. मुस्लिमांची वृत्ति जातीय नसून राष्ट्रीय आहे, द्विराष्ट्रवाद त्यांना मुळींच मान्य नाहीं, महात्माजींचें व कॉंग्रेसचें त्यांच्याविषयींचें धोरणच समर्थनीय ठरलें, असे निष्कर्ष त्यांनीं काढले व संघटित भारतीय समाजाचीं सुखस्वप्नें ते पाहूं लागले. वास्तविक अशीं स्वप्नें पहाण्याचा त्यांना कसलाहि अधिकार नव्हता. १९२१ ते १९३७ या काळांत पाकिस्तानचा प्रचार पुढील काळासारखा तीव्र वेगानें होत नसला तरी त्या काळांत हिंदुस्थानांतील बहुतेक प्रांतांत हिंदुमुसलमानांचें अत्यंत भयानक असे दंगे जवळ जवळ दरसाल होत होते. आणि हिंदूंवर मुलसमानांचें अनेक प्रकारांनीं आक्रमण चालू होतें. कत्तली, जाळपोळ लूट यांना सीमा राहिली नव्हती. १९२७ सालापासून मुसलमान कॉंग्रेसपासून दूर चालले होते व स्वातंत्र्याच्या लढ्यांत बहुसंख्य मुसलमान सहकार्य करीत नव्हते. असा पूर्व इतिहास होता तरी १९३७ च्या निवडणुकांत लीगला मुळींच थारा न मिळाल्यामुळें मुसलमान समाजांत भारताबद्दल राष्ट्रनिष्ठा जागृत झाली, असा निर्वाळा बहुतेक लेखक देऊं लागले.

पण त्या सर्वांचा हा आशावाद १९४६ च्या निवडणुकांनीं अगदीं धुळीस मिळविला. या सालीं केंद्रीय विधिमंडळांत मुस्लिमांच्या मतांपैकीं शे. ८७ मतें लीगला मिळालीं. प्रांतीय विवडणुकांत ६० लक्षांपैकीं ४५ लक्ष म्हणजे शे. ७५ मतें लीगला मिळालीं. १९३७ सालीं मुस्लिमांच्या ४९२ राखीव जागांपैकीं सर्व प्रांत मिळून लीगला १०९ मिळाल्या होत्या. १९४६ सालीं ४९२ पैकीं लीगला ४२८ जागा मिळाल्या. पंजाबमध्यें लीगला ३७ सालीं एकच जागा होती. तेथें आतां ७५ मिळाल्या. सिंध मध्यें एकहि जागा ३७ सालीं नव्हती. ४६ सालीं २७ जागा लीगनें जिंकल्या. बंगालमध्यें ३९ ऐवजीं आतां ११४ जागा लीगकडे गेल्या. दक्षिण हिंदुस्थानांतहि असाच प्रकार घडला. मद्रासमध्यें ३७ सालीं लीगला १० प्रतिनिधि पाठवितां आले. ४६ सालीं तिनें २८ पाठविले. मुंबईत १८ ऐवजीं ३०, मध्यप्रांतांत ५ ऐवजीं १३ अशी वाढ झाली. उत्तर हिंदुस्थानांतील अजून भारतांत असलेल्या प्रांतांतहि हेंच दृश्य दिसलें. ३७ सालीं बिहारमध्यें लीग एकहि जागा जिंकूं शकली नव्हती. आतां तिनें ३४ जिंकल्या. उत्तरप्रदेशांत २६ च्या ऐवजीं ५४ जागा तिनें मिळविल्या. म्हणजे १९३७ ते १९४६ ह्या काळांत आज पाकिस्तानांत गेलेल्या प्रांतांतच लीगचें वर्चस्व वाढलें असें नसून सध्यां हिंदुस्थानांत राहिलेल्या प्रत्येक प्रांतांतहि मुस्लीमांच्या समाजांतील बहुसंख्य लोक लीगवादी बनले असें स्पष्ट दिसतें. १९४६ च्या जुलैमध्यें घटनापरिषदेच्या निवडणुका झाल्या. त्यांतहि मुस्लीम समाजानें, आम्ही सर्व लीगवादी म्हणजे पाकिस्तान-वादी व द्विराष्ट्रवादी आहों, या भूमिबद्दल आम्हांला भक्ति नाहीं, ही आमची मायभूमी आहे असें आम्हांला वाटत नाहीं, हाच अभिप्राय प्रगट केला. घटना परिषदेंतील ८० जागांपैकीं ७३ जागा लीगनें मिळविल्या. दोन तपें मुस्लीमांच्या हृदयपालटासाठीं अहोरात्र खटपट करणाऱ्या कॉंग्रेसला मुस्लीमांच्या फक्त चार जागा मिळाल्या. ॲंग्लो इंडियन, ख्रिश्चन, शेडयूल्ड् कास्टस् यांच्या जागांपैकीं बहुतेक सर्वच्या सर्व कॉंग्रेसला जिंकतां आल्या. पण मुस्लीमबांधवांच्या बाबतींत तिचा प्रभाव चालूं शकला नाहीं. आपल्या सर्व प्रतिज्ञा, घोषणा व वचनें मागें घेऊन कॉंग्रेसला या देशाच्या फाळणीला मान्यता द्यावी लागली त्याचें हें कारण आहे.

१९३७ ते १९४६ या काळांत बहुसंख्य मुसलमान लीगच्या मागें गेले, त्याचें मुख्य कारण म्हणजे लीगनें पुढें मांडलेली पाकिस्तानची, मुस्लीमांच्या स्वतंत्र राष्ट्राची कल्पना हें होय. सर सय्यद अहंमदांच्या काळापासून म्हणजे गेल्या शतकाच्या शेवटच्या दशकापासून मुसलमान हे ब्रिटिश सरकारचे दोस्त झालेले होतेच. हा मोठा समाज भारतीय समाजापासून तोडून आपल्याकडे घेण्याच्या सरकारच्या प्रयत्नांना पहिल्यापासूनच घवघवीत यश आलें होतें. ब्रिटिश सरकारच्या प्रेरणेनें १८९२ सालापासूनच हिंदुमुसलमानांचे दंगे सुरू झाले होते. पुढें मुस्लीमांना विभक्त मतदार संघ देऊन सरकारनें कायमच तोडून काढलें. त्या मागल्या काळापासूनच मुसलमानांच्या मनांत, कांहीं अपवाद वगळले तर—त्यांचा विचार पुढें होईलच—हिंदुसमाज, हिंदुसंस्कृति, हिंदुभूमी यांच्याबद्दल प्रेम नाहीं. तर पूर्ण तिटकारा आहे. आपण जेते आहों, श्रेष्ठ आहों, आणि हिंदु हे गुलाम आहेत, दास आहेत, याच भावना आपल्या मनांत ते पोषीत राहिले होते. मध्यंतरी १९२०—२६ या असहकारितेच्या काळांत खिलाफतीचा प्रश्न कॉंग्रेसनें उचलून धरला म्हणून मुस्लीमांनीं वरकरणी भारतीयांच्या राष्ट्रीय आकांक्षांशीं कांहींशी, अत्यल्प प्रमाणांत, समरसता दाखविली होती. पण याच काळांत वर सांगितल्याप्रमाणें सर्व हिंदुस्थानांत हिंदुमुसलमानांच्या दंग्यांना भयानक रूप प्राप्त झालें होतें. त्या दंग्यांत येथील मंदिरें, महापुरुष आणि भारतीय संस्कृतीचीं इतर प्रतीकें, त्याचप्रमाणें वंदे मातरम् हें राष्ट्रगीत व कॉंग्रेसचा तिरंगी ध्वज हीं नव्या राष्ट्रीय आकांक्षांचीं प्रतीकें यांची मुस्लीमांनीं पराकाष्ठेची हेलना करून, या भूमीविषयीं, येथल्या संस्कृतीविषयीं, येथल्या परंपरेविषयीं आपल्या काय भावना आहेत, तें वेळोवेळीं प्रगट केलें होतें. म्हणजे १९४६ च्या आधीं मुस्लीमांच्या भावना नंतरच्या भावनांपेक्षां कांहीं निराळ्या होत्या असें नाहीं. लीगच्या मागें किंवा इतर कोणच्याहि संस्थेच्या मागें ते अशा संघटित बलानें या वेळेपर्यंत उभे राहिले नव्हते इतकाच त्याचा अर्थ आहे. १९३७ सालानंतर निराळें झालें तें हें कीं आतांपर्यंतच्या त्यांच्या ज्या भावना, कोठलाच मार्ग दिसत नसल्यामुळें, कोंडून आंतल्या आंत सळसळत बसल्या होत्या त्यांना आतां अवसर प्राप्त करून देणारी पाकिस्तानची कल्पना जन्माला आली. ती नव्हती तोंपर्यंत

कांहीं झालें तरी आपल्याला येथें, या परक्या शत्रुदेशांत, रहाणें प्राप्त आहे, तेव्हां कशी तरी निभावणी केली पाहिजे, अशा केवळ अगतिक भावनेनें मुसलमान समाज हिंदुस्थानांत रहात होता. आणि इंग्रज राज्यकर्त्यांच्या आश्रयानें शक्य तितका आपला फायदा करून घ्यावा, अशी त्याची बुद्धि होती. हिंदुसमाजाबद्दल ममत्व, बंधुभाव, आपलेपणा असा त्याला कधीं वाटला नाहीं व वाटण्याची आवश्यकता कधीं त्याला भासली नाहीं. पाकिस्तानची कल्पना उदयास येतांच त्या समाजाच्या या अगतिकेच्या, परिस्थितिवशतेच्या सर्व भावना नाहींशा होऊन त्याला एक नवें आशाकेंद्र दिसूं लागलें. आणि मुस्लीम लीगनें त्या नव्या आशाआकांक्षा सफल करण्याचा मार्ग दाखवून त्याविषयींची संभवनीयता स्पष्ट केली, तेव्हां अखिल भारतांतला मुस्लीम समाज तिच्यामागें संघटित होऊन उभा राहिला.

१९३७ सालीं निवडणुकांत ज्या मुस्लीम लीगला कोठच्याच प्रांतांत थारा मिळाला नव्हता ती १९४६ सालच्या निवडणुकांत मुसलमानांची एकमेव प्रतिनिधि ठरली याचें कारण हें असें आहे. या सातआठ वर्षांच्या काळांत पाकिस्तानचा फार मोठ्या प्रमाणावर तिनें प्रचार केला. कॉंग्रेसचें राज्य म्हणजे हिंदूंचें राज्य, असें समीकरण तिनें मांडलें आणि ब्रिटिश राज्य येथून जातांच लोकशाहीच्या नियमानें बहुसंख्य जे हिंदु त्याचें राज्य येथें प्रस्थापित होऊन त्यांच्या सत्तेखालीं इस्लामी धर्म व इस्लामी संस्कृति यांचा सर्वनाश होणार आहे, असें भविष्यकाळाचें भेसूर चित्र लीगच्या पुढाऱ्यांनीं मुस्लीम जनतेपुढें उभें केलें. याला उपाय त्यांच्या मतें एकच होता. हिंदुस्थानची फाळणी करून मुसलमानांचें स्वतंत्र राष्ट्र स्थापन करणें हा तो उपाय होय. हें द्विराष्ट्रवादाचें तत्त्वज्ञान मुस्लीम नेत्यांनीं आपल्या समाजापुढें मांडलें. वर सांगितल्याप्रमाणें त्याच्या जोपासनेसाठीं अवश्य ती भूमि आधींच तयार होती, त्यामुळें तें तत्त्वज्ञान त्या समाजाच्या मनांत तत्काळ रुजून त्याला धुमारे फुटले व ही भरतभूमि एकसंध व अखंड करण्याचे प्रयत्न–हजारों वर्षांचे भारतीयांचे प्रयत्न–विफल होऊन या प्राचीन राष्ट्राचीं शकलें झालीं.

मुस्लीम समाजानें द्विराष्ट्रवादाचें, विभक्ततेचें हें जें तत्त्वज्ञान अंगीकारिलें व अनेक युक्त्याप्रयुक्त्यांनीं सफल करून दाखविलें, त्याला त्यांच्या समाजांत कोणाचाच विरोध नव्हता असें नाहीं. अनेक मुसलमान लेखक, पत्रकार, पंडित, अनेक मुस्लीम संस्था यांनीं याच काळांत पाकिस्तानच्या कल्पनेला कसून विरोध केला होता. पाकिस्तान हें मुस्लीम समाजालाच घातक आहे, हा विचार सांगण्यासाठीं या मुस्लीम नेत्यांनीं लेख लिहिले, पत्रकें काढलीं, ग्रंथ लिहिले, सभा घेतल्या, ठराव केले, चळवळीहि केल्या; पण मुस्लीम जनतेला वळवून तिचा कौल आपल्याला अनुकूल करून घेण्यांत त्यांना अणुमात्र यश आलें नाहीं.

१९४३ च्या एप्रिलमध्यें मजलिस इ अहरार या संस्थेची सभा उत्तर-प्रदेशांतील सहाराणपूर गांवीं भरली होती. तिच्या अध्यक्षपदावरून मौलाना गुलाम घौस यांनीं पाकिस्तानला विरोध करून, 'हिंदुस्थानचें पूर्ण स्वराज्य हेंच आमचें, आमच्या संस्थेचें व सर्व मुसलमानांचें ध्येय आहे' असें सांगितलें. 'स्वराज्य आलें तर हिंदूंचें राज्य होईल अशी आपणांस मुळींच भीति वाटत नाहीं, तसें झाल्यास तें राज्य चालूं न देण्याचें सामर्थ्य आमच्यांत आहे,' असेंहि त्यांनीं बजावलें. 'मुस्लीम लीग ही वास्तविक मुस्लीम जनतेची खरी प्रतिनिधि नसून काँग्रेस फक्त तिलाच पाचारण करते, इतर मुस्लीम संस्थांना करीत नाहीं, म्हणून आम्ही काँग्रेसशीं सहकार्य करीत नाहीं.' अशी तक्रार त्यांनीं नमूद करून ठेविली आहे. त्याच एप्रिल महिन्यांत दिल्लीला मोमिनांची परिषद् भरली होती. त्या वेळीं अध्यक्ष जहिरुद्दिन यांनीं 'पाकिस्तानयोजना ही मुसलमानांनाच जास्त घातक असून आम्हांला ती मुळींच मान्य नाहीं. मुस्लीम लीग ही सर्व मुसलमानांची प्रतिनिधि नाहीं. आम्ही चारपांच कोटी मोमीन तिचें नेतृत्व मुळींच मानीत नाहीं. आपण सर्व मुस्लीमांचे प्रतिनिधि असल्याचा लीगचा दावा भ्रामक, विपर्यस्त व कपटीपणाचा आहे.' इत्यादि विचार सांगितले. मुस्लीम मजलीस ही संस्था १९४३ सालींच स्थापन झाली होती. पाकिस्तानला विरोध, हिंदुस्थानचें अखंडत्व, हिंदुस्थानचें पूर्ण स्वातंत्र्य, मुस्लीमांच्या हक्कांचें संरक्षण—हें आपलें ध्येय असल्याचें या संस्थेच्या जाहीरनाम्यांत नमूद केलेलें आहे. पाकिस्तान म्हणजे मुसलमानांची

आत्महत्या असून हिंदुस्थानचें स्वातंत्र्य व एकराष्ट्रीयत्व या मार्गांत बॅ. जीना ही एक धोंड आहे, जीनांचें नेतृत्व प्रतिगामी आहे, त्यापासून आपल्या समाजाचें रक्षण केलें पाहिजे, असेहि विचार या जाहीरनाम्यांत प्रकट केलेले आहेत. याशिवाय अझाद मुस्लीम कॉन्फरन्स, शियापरिषद्, अल्लाबक्ष यांच्या अध्यक्षतेखालीं भरलेली जमियत उलउलेमांची परिषद्, साऊथ इंडिया अँटीसेपरेशन कॉन्फरन्स इ. अनेक संस्थांनीं पाकिस्तान मुसलमानांनाच घातक आहे, जीनांच्या नेतृत्वावर आमचा विश्वास नाहीं, मुस्लीम लीग आमची प्रतिनिधि नाहीं, या अर्थाचे ठराव संमत केले होते. ( इंडियन चार्टर–जहांगीर कोतवाल )

याशिवाय भारताच्या अखंडत्वाला व हिंदुमुसलमानांच्या ऐक्याला पोषक असे अनेक विचार अनेक मुस्लीम पंडितांनीं व नेत्यांनीं या काळांत आपल्या समाजाला सांगण्याचा प्रयत्न करून पाहिला होता. हिंदु व मुसलमान यांचा धर्म भिन्न असला तरी मुळांत हे दोन्ही समाज एकवंशीय असल्यामुळें केवळ धर्मभेदामुळें त्यांनीं फुटून निघण्याचें कारण नाहीं, हा विचार अफझल हक्क, अल्लाबक्ष, मिया महंमद शफी इत्यादि नेत्यांनीं अनेक वेळां सांगितलेला आहे. हिंदुमुसलमानांच्या ऐक्याला, हिंदुस्थान ही आपली मातृभूमि आहे असें मानण्याला, इस्लाम धर्माचा मुळींच विरोध नाहीं, हा विचार तर अनेकांनीं अनेक वेळां मुस्लीम समाजाला पटवून देण्याचा प्रयत्न केलेला आहे. स्पेन जिंकणारा मुसलमान सेनापति तारिक याचें वचन उद्धृत करून डॉ. शोकत अल्ली अन्सारी यांनीं, मुसलमानांना हिंदुस्थान ही परकी भूमि वाटण्याचें मुळींच कारण नाहीं, असें सांगितलें आहे. एका पंडितानें तर, महंमद पैगंबर यांनीं मुसलमानांनीं मुस्लिमेतरांबरोबर एक राष्ट्र घडवण्याचा उपदेश केल्याचें सांगितलें आहे. पैगंबरांच्या मतें राष्ट्र घडविण्यास एक धर्म असणें अवश्य नाहीं; तर भिन्न समाजांचे हितसंबंध एक असले कीं पुरेसे आहे.

१९३७ च्या पूर्वीच्या काळांतहि हिंदुस्थान हीच आपली मातृभूमि आहे, भारतांतील इतर धर्मीयांसह आपणांस राष्ट्र म्हणून संघटित झालें पाहिजे, अशी मुसलमान समाजाला शिकवण देण्याचा प्रयत्न मुस्लीम

नेत्यांनीं केला होता. १९०३ सालीं बुद्रुद्दीन तय्यबजी यांनीं अ. भा. मुस्लिम शिक्षण परिषदेच्या अध्यक्षपदावरून 'काँग्रेसच्या कार्याला विरोध करणाऱ्या कोणच्याहि संस्थेशीं दुरूनसुद्धां संबंध ठेवण्याची माझी इच्छा नाहीं.' असे उद्गार काढले. पुढील काळांत डॉ. अन्सारी, खान अबदुल गफारखान, हकीम अजमलखान इत्यादि मुस्लीम नेत्यांची काँग्रेसवरील निष्ठा याच प्रकारची होती. या सर्वांत मौ. अबुल कलम आझाद यांचे प्रयत्न विशेष महत्त्वाचे आहेत. १९१२ सालीं त्यांनीं 'अल हिलाल' हें राष्ट्रीय वृत्तीचा प्रसार करणारें साप्ताहिक सुरू केलें. त्याचा खप २५००० पर्यंत गेला होता. मौ. आझाद यांनीं तेव्हांपासून काँग्रेसची एकनिष्ठ सेवा केली आहे. मुसलमानांत राष्ट्रीय वृत्ति बाणविण्याचा प्रयत्न ते आज ४०।४५ वर्षें अखंड करीत आहेत. भारताच्या उत्कर्षाची जबाबदारी इतरांइतकीच, हिंदूंइतकीच मुसलमानांवरहि आहे, भारत हीच आमची मातृभूमि आहे, या भूमीवर बाहेरच्या मुस्लीमांनीं आक्रमण केलें तर त्या स्वधर्मीयांशींहि आम्ही लढूं, अशा तऱ्हेचे विचार इतरहि अनेक मुस्लीम पुढाऱ्यांनीं या काळांत सांगितले होते. १९३१ सालीं लाहोर येथें नॅशनॅलिस्ट मुस्लीम कॉन्फरन्स भरली होती. मलिक बरकत अली हे त्या वेळीं स्वागताध्यक्ष होते. 'डॉ. इकबाल यांच्या पाकिस्तानच्या कल्पनेनें तुम्ही भ्रमून जाऊं नका. नव्या पिढीच्या मुस्लीमांना हिंदुस्थानच्या फाळणीची कल्पना कधींच मान्य होणार नाहीं.' असा उपदेश त्यांनीं स्वबांधवांना त्या वेळीं केला होता.

पण यांतल्या कशाचाहि उपयोग झाला नाहीं. बॅ. जिना व त्यांचे पाकिस्तानवादी सहकारी यांचा प्रचारच प्रभावी ठरला. १९४६–४७ च्या निवडणुका या तत्त्वावर लढविल्या गेल्या. आणि हिंदुस्थानच्या सर्व प्रांतांतील बहुसंख्य मुस्लीमांनीं आपण पाकिस्तानवादी आहों, द्विराष्ट्रवादी आहों, भारताबद्दल आम्हांला आत्मीयता वाटत नाहीं, ही भूमि, हे लोक, ही संस्कृति यांचा आम्हांला संबंध नको, हा आपला निःसंदेह अभिप्राय प्रगट केला. आणि त्यामुळें काँग्रेसला हिंदुस्थानच्या फाळणीला मान्यता द्यावी लागली.

या सर्व कालावधींत आणि विशेषतः १९२० नंतरच्या २०।२५ वर्षांत मुस्लीम बांधवांना संतुष्ट करण्यासाठीं, त्यांचें सहकार्य मिळविण्यासाठीं आणि त्यांच्या मनांत राष्ट्रीय भावना निर्माण करून स्वातंत्र्याच्या लढ्यांत त्यांचें साह्य प्राप्त करून घेण्यासाठीं, हिंदूंनीं व विशेषतः कॉंग्रेसनें पराकाष्ठेचे प्रयत्न केले होते. 'स्वराज्याचे हक्क आमच्या मुस्लीम बांधवांना दिले तरी चालतील' असें टिळकांनीं जाहीररीत्या सांगितलें होतें. पुढें कॉंग्रेसचीं सूत्रें महात्माजींच्या हातीं गेल्यानंतर, त्यांनीं कसलाहि प्रयत्न करण्याचें बाकी ठेवलें नाहीं. त्यांनीं लढा सुरू केला तोच मुळीं मुसलमानांच्या खिलाफत प्रकरणासाठीं. सातआठ कोटी लोकांना, त्यांच्या धार्मिक असंतोषाचा फायदा घेऊन, ब्रिटिश सरकारच्या विरुद्ध उठावणी करण्यासाठीं सज्ज करण्याचा गांधीजींचा तो प्रयत्न राजकीय मुत्सद्देगिरीच्या दृष्टीनें फारच अभिनंदनीय असा होता. अशा संग्रामांतूनच दोन भिन्न समाजांत ऐक्य-भावना निर्माण होत असतात.पण आपल्यासाठीं आपले हिंदुबांधव लढले,तेव्हां त्यांच्याशीं आपण सहकार्य करावें, समरस व्हावें, ही भावना मुस्लीमांच्या मनांत मुळींच निर्माण झाली नाहीं. उलट, कॉंग्रेसला जें तेज आलें तें आम्ही मुसलमान तिच्यांत सामील झालों म्हणून आलें, अशी उपकार-कर्त्याचीच प्रौढी त्या वेळीं अनेक मुसलमानांनीं मिरवली; म्हणजे खिलाफतीच्या लढ्यांत हिंदु आपले सहकारी झाले, असें तर त्यांना वाटलें नाहींच; तर उलट, कॉंग्रेसमध्यें जाऊन हिंदूंवरच आपण उपकार करून ठेवले आहेत, अशीच त्यांची भावना झाली. स्वातंत्र्याच्या लढ्यांत सहभागी होणें म्हणजे हिंदूंवर उपकार करणें होय, असें मानणाऱ्या समाजाला तो लढा आपला वाटत नव्हता, तें स्वातंत्र्य त्याचें स्वतःचें ध्येय नव्हतें, हें अगदीं स्पष्ट आहे; पण हें पाहूनहि महात्माजींनीं आपल्या मनाला निराशेच्या आहारीं जाऊं दिलें नाहीं; आणि अगदीं शेवटपर्यंत मुस्लीमांचा अनुनय करण्याची पराकाष्ठा केली. १९३७ सालीं कॉंग्रेसला सत्ता प्राप्त झाल्यानंतर, प्रत्येक प्रांतातले मंत्री मुस्लीमांना संतुष्ट करण्यांत अहमहमिका करूं लागले. आणि आपण त्यांच्यासाठीं कोणचीं कोणचीं सत्कृत्यें केलीं त्यांच्या याद्या ते जाहीर करूं लागले. सत्तारूढ झाल्यानंतर कॉंग्रेस अहिंसामंत्राचा जप करीत असली तरी

अनेक मार्गांनीं ती हिंसा करीत होती. पण उत्तरेंतील अनेक प्रांतांत अनेक शहरीं मुसलमानांचीं आक्रमणें नित्याचीं होऊन बसल्यावरहि हिंदूंना आत्मरक्षणासाठीं तरी संघटित करावें हा विचार तिनें मनांत येऊं दिला नाहीं. कारण त्यामुळें हिंसा घडण्याचा संभव होता. आणि 'कॉंग्रेस हिंदूंची जपणूक करते' असा आरोप येण्याची शक्यता होती. हिंदूंची कत्तल झाल्यानें हिंदुपक्षपातित्वाचा आरोप कॉंग्रेसवर येण्याचा मुळींच संभव नव्हता. पण मुस्लीम आक्रमणापासून आत्मरक्षण करण्यासाठीं संघटना केल्यानें तो आला असता. म्हणून कॉंग्रेसनें आपली शुद्ध भूमिका राखण्यासाठीं पहिली गोष्ट डोळ्यांआड केली. वास्तविक कॉंग्रेसनें हिंदु व मुसलमान या दोन्ही धर्मांच्या तरुणांची एकत्र संघटना करण्यास हरकत नव्हती. पण मुसलमानी आक्रमणाविरुद्ध उभारलेल्या संघटनेंत मुसलमान तरुण येणार नाहींत, हीं कॉंग्रेसची खात्री होती. आणि नुसत्या हिंदूंची संघटना ही जातीय ठरते, नुसत्या हिंदूंची कत्तल ही तशी ठरत नाहीं, असा पोक्त विचार करून कॉंग्रेसनें कोणच्याहि प्रकारच्या संघटनेचा केव्हांहि विचार केला नाहीं. शेवटीं कॉंग्रेसला पाकिस्तान द्यावें लागलें याचें कारण असें सांगण्यांत येतें कीं, १९४६ च्या निवडणुकींत लीगला प्रचंड बहुमतानें निवडून देऊन अखिल मुस्लीम समाज तिच्यामागें उभा राहिला आणि कॉंग्रेस ही स्वयंनिर्णयाच्या तत्त्वाला बांधलेली होती. पण हें कारण अगदीं हास्यास्पद आहे. कारण पाकिस्तानामुळें मुसलमानांचा प्रश्न मुळींच सुटत नव्हता व सुटलाहि नाहीं. ७।८ कोटी मुसलमानांपैकीं निम्म्याच्यावर मुसलमान अजून हिंदुस्थानांतच आहेत. आणि जे १।२ कोटी हिंदु पाकिस्तानांत आहेत त्यांच्याहि स्वयंनिर्णयाचा विचार कॉंग्रेसनें करावयास हवा होता. पाकिस्तानांत राहिलेल्या हिंदूंचें पुढें काय होईल याची कल्पना कॉंग्रेसला नसेल असेंहि म्हणणें शक्य नाहीं. असें असूनहि कॉंग्रेसनें पाकिस्तानाला मान्यता दिली, याचें खरें कारण म्हणजे मुस्लिमांनीं केलेली 'डायरेक्ट ॲक्शनची' उठावणी हें होय. १५ ऑगस्ट १९४७ च्या आधीं वर्षभर मुसलमानांनीं जाळपोळ, विध्वंस, कत्तली करून सर्वत्र नोआखलीचें वातावरण निर्माण केलें होतें. यावेळीं या अत्याचाराला तोंड देऊन आत्मरक्षण करण्याइतकी संघटना कॉंग्रेसनें

तयार ठेवली असती तर ते अत्याचार अशक्य झाले असते आणि पाकिस्तानची कल्पना वाऱ्यावर विरून गेली असती. पण मुसलमानांना विरोध करणें म्हणजे जातीयता, आणि संघटना म्हणजे हिंसा, हें काँग्रेसचें विचारसूत्र ठरून गेलें होतें. त्यामुळें डायरेक्ट ॲक्शनला तोंड देणें हें काँग्रेसला कालत्रयीं शक्य झालें नसतें. काँग्रेसचें हें तत्त्वज्ञान पाकिस्ताननिर्मितीला बऱ्याच अंशीं कारण झालेलें आहे, हें आज तरी आपण विसरूं नये. इतिहासांतील घटितें आपणांस बदलतां येतील हें खरें नाहीं. पण भावी घटितें टाळतां येतील, हें निश्चित खरें आहे. आणि पाकिस्तान होण्याचें हें कारण आपण दृष्टिआड केलें तर यापुढेंहि अनेक पाकिस्तानें निर्माण होणें अशक्य नाहीं. कारण, हिंदुस्थानांतील ४।५ कोटी मुसलमानांना अजूनहि स्वयंनिर्णयाचा हक्क आहेच ! हैद्राबाद, अलीगड येथें त्या दृष्टीनें हालचालीहि चालू असाव्या असें दिसतें. आणि निधर्मीपणा व अहिंसा यांचे सध्यांचे अर्थ जोपर्यंत आपल्या मनांत रूढ आहेत तोपर्यंत आणखी दहापांच लाख हिंदूंची हिंसा होऊन आहे या हिंदुस्थानांतून दुसरें एक पाकिस्तान पुढील पंचवीस तीस वर्षांत निर्माण होणें अगदीं असंभवनीय आहे असें मानण्याचें कारण नाहीं.

हिंदु-मुसलमानांच्या संघर्षाचा व या दोन समाजांचें ऐक्य घडवून आणण्याच्या प्रयत्नांचा गेल्या पन्नास पाऊणशे वर्षांचा इतिहास आपण पाहिला तर ऐक्य घडविण्याचे प्रयत्न अनेक नेत्यांनीं अनेकपरीनें केले असले तरी खऱ्या दिशेनें ऐक्यप्रयत्न कोणींच केलेले नाहींत हें थोडा विचार केला असतां सहज कळून येईल. अनेक देशांतील लोकसत्तांचा आणि त्यांतहि ब्रिटिश लोकसत्तेचा अभ्यास फार बारकाईनें केला तर त्यावरून एक गोष्ट स्पष्टपणें दिसून येईल कीं, ब्रिटनमध्यें गेल्या तीनचार शतकांत मानवाच्या मनाची घडण समूळ बदलली असल्यामुळेंच तेथें समाजसंघटना व लोकसत्ता हीं शक्य झाली आहे. विद्येचें पुनरुज्जीवन, धर्मसुधारणा व सामाजिक क्रांति हीं तीन मन्वंतरें ब्रिटनमध्यें व थोड्याफार अंशानें पश्चिम युरोपांतील सर्व देशांमध्यें घडून गेल्यावरच तेथें राष्ट्रनिष्ठा दृढमूल झाली व वाढीस लागली. राष्ट्रनिष्ठा ही लोकसत्तेची पूर्व अवस्था आहे. कारण धार्मिक सहिष्णुता, सामाजिक समता व राजकीय प्रबुद्धता यावांचून राष्ट्रनिष्ठा

संभवत नाहीं. माझ्या भूमींत रहाणारे सर्व लोक—मग ते भिन्न धर्मांचे, पंथाचे, वर्गांचे कसेहि असले तरी—माझे बांधव आहेत आणि इतर भूमींतल्या कोणच्याहि मानवापेक्षां—स्वधर्मीयापेक्षांहि—ते मला जवळचे आहेत, ही भावना वरील तीन गुणांवांचून निर्माण होणें शक्य नाहीं. आणि सहिष्णुता, समता व प्रबुद्धता निर्माण होण्यासाठीं रेनेसान्स, रेफर्मेशन व रेव्होल्यूशन—यिद्येचें पुनरुज्जीवन, धर्मक्रान्ति व सामाजिक क्रान्ति-या मन्वंतरांतून समाज जाणें अवश्य आहे. पुनरुज्जीवनांतून मानवता व बुद्धिप्रामाण्य यांचे संस्कार होतात. धर्मसुधारणेंतून आचारविचारांचें कर्मकांड, अंधनिष्ठा, असहिष्णुता, धर्माधिकाऱ्यांचें वर्चस्व या घातक गोष्टी नष्ट होऊन मनाला औदार्य प्राप्त होतें आणि सामाजिक क्रान्तींतून समता, बंधुता व स्वातंत्र्य यांचे प्रगल्भ संस्कार मनावर होतात. हे सर्व संस्कार मनावर होऊन मानवाच्या मनाची घडण समूळ बदलल्यावांचून देशांत राष्ट्रनिष्ठा निर्माण होत नाहीं. व तिच्यावर अवलंबून असलेली लोकशाही ही तर बाह्यरूपांतहि अवतरत नाहीं.

भारताचें दुर्दैव असें कीं येथील मुसलमान समाज या मन्वंतरांतून गेला नाहीं. हिंदुमुसलमानांची समस्या अत्यंत बिकट होऊन बसली याचें मुख्य कारण हें आहे. भारताच्या लोकसत्तेचा विचार करतांना गेल्या अनेक प्रकरणांतून राममोहन रॉय, ईश्वरचंद्र विद्यासागर, महात्मा फुले, लोकहितवादी, रानडे, आगरकर, विवेकानंद यांनीं आपल्या देशांत हीं मन्वन्तरें कशीं निर्माण केलीं तें सविस्तर सांगितलें आहे. आपल्या मुस्लीम बांधवांतहि आरंभीं या चळवळी कांहीं अंशीं सुरू झाल्या. पण पुढें त्यांचा प्रसार झाला नाहीं. त्यामुळें त्यांच्यावर जुन्या अंधनिष्ठांचें वर्चस्व बव्हंशीं जसेंच्या तसें कायम आहे. उदारमतवाद त्या समाजांत प्रसृत झालाच नाहीं. आणि त्याचा प्रसार झाला नाहीं तोंपर्यंत बाकीचे सर्व प्रयत्न व्यर्थ होत. तुर्कस्थान, अरबस्तान, इजिप्त, इराक, इराण, अफगाणिस्तान, इ. मुस्लीम राष्ट्रांतील सध्यांच्या घडामोडी आपण पाहिल्या, तर या मन्वंतरांची लोकसत्तेला किती आवश्यकता आहे हें सहज कळून येईल. तुर्कस्थानाला केमालपाशासारखा अलौकिक प्रभावी व समर्थ नेता मिळाल्यामुळें तेथील राष्ट्रघटना यशस्वी झाली व तेथील लोकसत्ताहि यशस्वी होण्याच्या मार्गावर आहे. तुर्कांच्या लोकसत्तेचा आपण अभ्यास

केला तर त्यावरून आपणांस हेंच दिसून येईल. ‘मी माझा देश आशियांतून उचलून युरोपांत नेऊन ठेवीन’ अशी केमालपाशाची प्रतिज्ञा होती. त्या प्रतिज्ञेचा दुसरा काय अर्थ आहे ? ‘वरील तीनहि मन्वंतरें मी तुर्कस्थानांत घडवून आणीन’ हाच तिचा भावार्थ आहे. तुर्कस्थानचा गेल्या तीस वर्षांचा इतिहास पाहिला तर असें दिसून येतें कीं भारतांत हिंदुमुसलमानांचें ऐक्य घडून येण्यासाठीं मुसलमान समाजांत जी निष्ठांची क्रांति घडून येणें अवश्य आहे असें भारतीयांना वाटतें ती क्रान्ति तेथें घडून आलेली आहे.

३ मार्च १९२४ रोजीं तुर्की लोकसभेपुढें केलेल्या भाषणांत केमाल पाशानें आपलें धोरण अगदीं स्पष्ट शब्दांत मांडलें आहे. ‘यापुढें राजसत्तेचा व धर्माचा संबंध रहाणार नाहीं. विज्ञानाच्या पायावर शासनाची उभारणी होईल. जुनाट धर्मकल्पनांनीं चालणारीं न्यायमंदिरें व जुनीं धर्मशासनें नष्ट करून त्याजागीं नवे शास्त्रशुद्ध निर्बंध आपण निर्माण केले पाहिजेत.’ असें धोरण जाहीर करून केमालपाशानें कठोर निश्चयानें तें अमलांत आणलें. अंध धर्मनिष्ठेमुळें आरबी संस्कृति व आरबी भाषा यांचें जगांतल्या सर्व मुसलमानांवर वर्चस्व असतें. आतां राष्ट्रनिष्ठेला महत्त्व आल्यामुळें केमाल पाशानें तें वर्चस्व नष्ट करून टाकलें. आणि तुर्कभूमींत निर्माण झालेलें जें जें वैभव, त्याचा अभिमान धरण्यास त्यानें तुर्की लोकांना शिकविलें. कुराण हा धर्मग्रंथ त्याला मान्य होता. पण तो तुर्की भाषेंतून पढला पाहिजे, प्रार्थना तुर्कीतून झाल्या पाहिजेत, असा त्याचा आग्रह होता. स्वधर्मीयांखेरीज इतरांना काफर समजण्याची मुसलमानांची रीत आहे. ती त्यानें निषिद्ध मानली. महंमद पैगंबरांच्या पूर्वी होऊन गेलेले तुर्की थोर पुरुष मुसलमान असणें शक्य नव्हतें. इतके दिवस त्यांना कोणी वंद्य मानीत नसे. कारण ते विधर्मी होते. आतां दृष्टिकोन बदलला. अरबस्तानांतील मुसलमान थोर पुरुषांपेक्षां हे विधर्मी तुर्की थोर पुरुष आपणाला जास्त वंद्य होत, अशी भावना तुर्कस्थानांत सर्वत्र बळावली. पॅन इस्लामिझमच्या चळवळीचा तुर्की लोक आतां निषेध करूं लागले. कारण ती संघटना जुन्या अंध धर्मवेडाच्या पायावर उभारली होती. तुर्कांखेरीज इतर मुसलमानांशीं आमचा इतर धर्मीयांप्रमाणेंच संबंध राहील, इतरांपेक्षां आम्ही त्यांना जास्त जवळचे मानणार नाहीं, असें तुर्क राष्ट्रानें जाहीर केलें. तुर्कस्थानामागोमाग इजिप्त,

सिरिया, इत्यादि मुसलमान राष्ट्रांनीं हेंच धोरण अंगीकारलें. इजिप्तच्या राष्ट्रसभेचे चिटणीस हमीद् अल अलेली १९१० सालच्या आपल्या भाषणांत म्हणतात—' ज्यांनीं पिरामिड उभारले, युरोपचें अस्तित्व नव्हतें तेव्हां ज्यांनीं संस्कृति निर्माण करून तिचा प्रसार केला, त्यांचें कर्तृत्व, त्यांची प्रज्ञा आमच्या रक्तांत आहे.' पिरामिडचे निर्माते व इजिप्तचा प्राचीन ग्रंथ ' बुक ऑफ दि डेड ' याचे कर्ते अर्थातच मुसलमान नव्हते. त्यामुळें ७ व्या शतकांत इजिप्त हा इस्लामधर्मी झाल्यापासून गेलीं १२०० वर्षें इजिप्तमध्यें या पूर्वजांचा कोणी अभिमान धरीत नव्हते. पण आतां इजिप्तमध्यें राष्ट्रभावना निर्माण झाली आहे. त्यामुळें अभिमानविषयांत धर्मदृष्टीपेक्षां राष्ट्रदृष्टि बळावली आणि हे पूर्वज वंद्य ठरले. त्यांचें रक्त आपल्या अंगांत आहे याचा इजिप्तमधल्या मुसलमानांना अभिमान वाटूं लागला.

हिंदुस्थानांतील मुसलमानांमध्यें ही राष्ट्रीय दृष्टि निर्माण झाली तरच हिंदु मुसलमानांचें ऐक्य शक्य आहे. तरच भारतीय समाज अभंग व संघटित होईल. पण हें घडविणें सर्वस्वी मुस्लीम नेत्यांच्या हातीं आहे. जुन्या मुल्लामौलवींचीं वचनें, जुने धर्मग्रंथ, जुन्या रूढी हे विषय अत्यंत नाजुक असतात. त्यांत सुधारणा किंवा क्रान्ति घडवावयाची ती स्वधर्मीयांनींच घडविली पाहिजे. अन्यधर्मी मनुष्याच्या उपदेशाचा परिणाम समाजावर या बाबतींत अगदीं विपरीत होतो. तुर्कस्थान, इजिप्त, सिरिया या देशांतील धार्मिक व सामाजिक क्रान्ति ही त्या त्या देशांतील मुस्लीम नेत्यांनींच घडविली आहे. त्याप्रमाणें हिंदुस्थानांत झालें तरच मुसलमान समाज पुनरुज्जीवन, धर्मसुधारणा, सामाजिक क्रान्ति या मन्वन्तरांतून जाईल व त्याच्या ठायीं भारतीय राष्ट्राविषयीं आपलेपणा निर्माण होईल. आज राम, कृष्ण, शिवाजी, टिळक, गांधी या भारताच्या महापुरुषांविषयीं मुसलमानांना आदर नाहीं. एक सबंध राष्ट्र निर्माण करणाऱ्या शिवाजीपेक्षां त्यांना अफजुलखान श्रेष्ठ वाटतो. कारण शिवाजी विधर्मी व अफजुलखान मुस्लीम होता. डॉ. शोकत उल्ला अन्सारी यांनीं मुसलमानांना कॉंग्रेस राज्याचा संताप व द्वेष वाटू लागण्याचीं जीं कारणें दिलीं आहेत त्यांत गांधीजयंति व टिळकपुण्यतिथि कॉंग्रेसनें सरकारीरीत्या साजरी केली हें एक कारण म्हणून दिलें आहे. व्यासवाल्मीकीसारखे महापुरुष, रामायणमहाभारतासारखे ग्रंथ, संस्कृत

भाषा, वन्देमातरम् हें राष्ट्रगीत या सर्वांचा मुसलमानांना द्वेष वाटतो. याचें कारण एकच आहे. आणि तें म्हणजे हें सर्व विधर्मीयांचें आहे. वास्तविक हे पुरुष, हे ग्रंथ, ही भाषा आज आपल्या अंगभूत गुणांनींच जगद्वंद्य ठरलीं आहेत. सर्व जग त्यांचा अभिमान बाळगतें आणि हें आपल्या भारताचें वैभव म्हणून, तुर्कस्थान, इजिप्त येथील मुस्लीम राष्ट्रनेत्यांच्या धोरणानें पाहिलें तर, येथील मुसलमानांना त्याचा जास्तच अभिमान वाटावा. पण जुन्या अंध धर्मनिष्ठा नाहींशा करून इस्लामला जें उदात्त रूप तुर्की नेत्यांनीं दिलें आहे तसें भारतांत देणारा नेता येथें झाला नाहीं. त्यानें मुस्लिमांना नव्या मन्वन्तरांतून नेलें नाहीं. तें होत नाहीं तोंपर्यंत मुसलमानांना भरतभूमीच्या या वैभवाविषयीं प्रेम वाटणें शक्य नाहीं व हिंदुमुसलमानांचें ऐक्य यालाहि अर्थ नाहीं.

आतांपर्यंत भारतांतील नेत्यांनीं हिंदुमुसलमानांच्या ऐक्याचें पुष्कळच प्रयत्न केले. पण त्यांत या मूळ महातत्त्वाचा विचारहि कोणीं केला नाहीं. कॉंग्रेसचे प्रयत्न झाले ते सर्व,हिंदूंना इतक्या जागा मिळाल्या तर मुसलमानांना किती, कोणच्या सवलती मुसलमानांना दिल्या म्हणजे ते किती प्रमाणांत या राष्ट्राच्या स्वातंत्र्यसंग्रामांत सहभागी होतील, असे देवघेवीच्या, व्यापारी व्यवहाराच्या स्वरूपाचे होते. मुसलमानांचा पाकिस्तानचा अट्टाहास सुरू झाल्यानंतरहि सर्वपक्षीय परिषदेंत पं. कुंझरू यांनीं अशी योजना सुचविली कीं, हरिजन सोडून राहिलेल्या हिंदुमुसलमान समाजांत दोन्ही जमातींना समान प्रतिनिधित्व द्यावें. आणि ही सूचना स्वीकार्य आहे, योग्य आहे असा आचार्य जावडेकरांनीं आपला अभिप्राय दिला आहे. मुसलमान पुढाऱ्यांशीं जेव्हां जेव्हां कॉंग्रेसच्या नेत्यांच्या वाटाघाटी होत तेव्हां तेव्हां त्यांचें स्वरूप याच प्रकारचें असे. हिंदूंनीं मुसलमानांना काय द्यावें व त्याच्या बदल्यांत मुसलमानांनीं काय मान्य करावें. आरंभींच्या काळांत या प्रयत्नांना अर्थ होता. पण खिलाफत प्रकरणानंतर मुसलमान कॉंग्रेसपासून दूर झाल्यानंतर पुन्हां तसल्याच प्रकारच्या प्रयत्नांना कांहींहि अर्थ नव्हता. त्यांचें अंध धर्मवेड नाहींसें झाल्यावांचून ऐक्याची भाषा करण्यांत काहीं अर्थ नाहीं, हें त्याच वेळीं स्पष्ट झालें होतें. पण त्यानंतरहि अगदीं स्वातंत्र्यप्राप्तीच्या काळापर्यंत व्यापारी कराराच्या स्वरूपाचेच प्रयत्न चालू होते.प्रारंभींचा

अनुभव जमेला धरून ही भूमि, येथली परंपरा येथले महापुरुष यांच्या-बद्दल आपुलकी वाटल्यावांचून मुसलमानांशीं ऐक्य शक्य नाहीं हें कॉंग्रेसनेत्यांनीं एकतर जाणलें नसावें किंवा जाणूनहि त्यांना बोलण्याचें धैर्य झालें नसावें. जाणलें नसावें असें वाटत नाहीं. कारण रामाबरोबर रहीमाचा व कृष्णाबरोबर करीमाचा जयघोष करणें अवश्य आहे, यानेंच ऐक्य होणार आहे, हें कॉंग्रेसनेत्यांच्या ध्यानीं आलें होतें आणि तसा जप व जयघोष हिंदूंनीं सुरूहि केला होता. पण मुसलमानांनीं रहिमाबरोबर रामाचा व करीमाबरोबर कृष्णाचा जप करणें अवश्य, असा त्यांना उपदेश यांनीं कधीं केला नाहीं. इतकेंच नव्हे तर, ज्या सभेत मुसलमान आहेत तेथें आपल्या परंपरेबद्दल आपणच मुग्ध रहावें, तिच्या अभिमानाचा उच्चार करूं नये, असें धोरणच कॉंग्रेसच्या नेत्यांनीं स्वीकारलें. तें कांहीं असो. एवढें खरें कीं पुनरुज्जीवन, धर्मसुधारणा व सामाजिक क्रान्ति या मन्वंतरांतून मुसलमान समाज जाणें अवश्य आहे, त्यावांचून या भूमीबद्दल मुसलमानांना आपलेपणा वाटणें अशक्य आहे, हे महान् सत्य डोळ्यांपुढें ठेवून कॉंग्रेसनें आपलें धोरण आंखलें नव्हतें यांत शंका नाहीं.

मार्क्सवादी लोकांना तर या मन्वंतरांचें मुळींच महत्त्व वाटत नाहीं. त्यांच्या अर्थवादी एकांतिक अंध दृष्टीमुळें, धर्मवेडाला स्वतंत्र अस्तित्व आहे हेंच त्यांना मान्य नाहीं. धर्मनिष्ठा, शब्दप्रामाण्य, सामाजिक, उच्चनीचता हे सर्व धनवंतांनीं धनहीनांना भरडून काढण्यासाठीं निर्माण केलेले भ्रम आहेत, असाच त्यांचा सिद्धांत आहे. त्यामुळें वर्गविग्रहाची आग पेटवून दिली कीं हे भ्रम आपोआपच नष्ट होतील, अशी त्यांची कल्पना होती. पण जगांतल्या इतर देशांप्रमाणेंच हिंदुस्थानांतहि धर्मवेड हा भ्रम ठरण्याऐवजीं कम्युनिस्टांचे त्याविषयींचे सिद्धांत हाच भ्रम ठरला. मुंबई, कलकत्ता, नागपूर, कानपूर, इ. शहरीं कामगारांच्या प्रचंड संघटना मार्क्स-वादी लोकांनीं उभारल्या होत्या. त्यांत मुस्लीम कामगारहि सामील झालेले होतेच. पण मार्क्सवादाच्या वीसपंचवीस वर्षांच्या शिकवणुकीनंतरहि, वर्ग-लढ्याचें तत्त्वज्ञान अहोरात्र कानावर पडत असतांहि, धर्माच्या तत्त्वावर हिंदुस्थानची फाळणी केली पाहिजे, असाच या पुरोगामी, क्रान्तीच्या आघाडीवर असलेल्या मुस्लीम कामगार वर्गानें निर्णय दिला. आणि हिंदु

भांडवलदार आणि जमीनदार व मुसलमान भांडवलदार व जमीनदार यांना आम्ही समान लेखीत नसून हिंदू धनिकांना दूरचे लेखतों व मुसलमान धनिकांना आपलें मानतों, हें स्पष्ट केलें. हिंदुकामगारांविषयीं स्ववर्गीय म्हणून त्यांना जिव्हाळा वाटला नाहीं; मुसलमान धनिकांविषयीं स्वधर्मीय म्हणून आपलेपणा वाटला ही गोष्ट सर्व कामगार एकजात लीगच्या मागें उभे राहिले यावरून सिद्ध झाली. आचार्य जावडेकर हे एकांतिक मार्क्सवादी नाहींत. पण त्यांनीं सुद्धां म्हटलें आहे कीं, 'हिंदुस्थानचें अखंडत्व हें धर्मातीत राष्ट्रीय वृत्तीवर अवलंबून आहे. व ही धर्मातीत राष्ट्रीय वृत्ति मध्यमवर्गापेक्षां किंवा वरिष्ठवर्गापेक्षां कनिष्ठ शेतकरीकामकरी वर्गात जागृत होणें व टिकणें अधिक सुलभ आहे.' (हिंदु–मुसलमान ऐक्य. पृ. १६२) असें आचार्यांनीं कां म्हणावें हें ध्यानांत येत नाहीं. गांधीपंथांत एकंदरच अज्ञानाविषयीं जास्त प्रेम आहे तें येथें प्रभावी झालें असावें असें वाटतें. एरवीं आचार्यांनीं असें लिहिलें नसतें. कारण धर्मातीत मनोवृत्तीचा संबंध प्राधान्यानें बुद्धिप्रामाण्य, विवेकनिष्ठा यांच्याशीं असतो. आणि इतिहास, तत्त्वज्ञान, भिन्न भिन्न विज्ञानशाखा यांच्या अभ्यासानें बुद्धिप्रामाण्य निर्माण होतें. युरोपांत विज्ञानाची जेव्हां प्रगति झाली तेव्हांच धर्मातीत राष्ट्रीय वृत्ति निर्माण झाली. आणि ती प्रथम विद्यासंपन्न मध्यमवर्गात व वरिष्ठ वर्गातच झाली. शेतकरी कामकरी वर्गांत प्रथम विज्ञान पसरलें तेव्हांच हें लोण तेथपर्यंत पोचलें. आचार्यांनीं अन्यत्र रेनेसान्स, रेफर्मेशन, रेव्होल्यूशन यांची महती मान्य केली आहे. पण येथें त्यांचा दृष्टिकोन मार्क्सप्रणीत आर्थिक तत्त्वज्ञानानें झांकोळल्यासारखा दिसतो.

असो, तात्पर्यार्थ असा कीं, हिंदुमुसलमानाचें ऐक्य घडविण्याचा महत्त्वाचा व मुख्य मार्ग म्हणजे मुस्लीम समाजांत आमूलाग्र मानसिक परिवर्तन घडून येणें, हा होय. आणि त्या परिवर्तनाचें मुख्य साधन म्हणजे राममोहन, आगरकर, विवेकानंद यांनीं हिंदुसमाजांत प्रसृत केलेली बुद्धिवादी विचारसरणी हें होय. मुस्लीमांनीं हिंदुस्थानला आपली मातृभूमि मानावी व तिच्या उन्नतीचा भार आपल्या शिरावर घ्यावा, या मताचे अनेक मुसलमान पंडित व लेखक भारतांत आहेत, हें आरंभीं दिलेल्या माहितीवरून स्पष्ट आहे. या विचारवंत मुस्लीमांना ही राष्ट्रनिष्ठा आपल्या

समाजांत निर्माण व्हावी असें वाटत असेल, तर त्यांनीं वर निर्दिष्ट केलेल्या मन्वंतरांतून आपल्या बांधवांना नेण्याचे प्रयत्न केले पाहिजेत. या कार्यांत यश आलें तर त्यांनाच येईल. इतर समाजांतल्या नेत्यांचा येथें कांहीं उपयोग नाहीं. म्हणून, भरतभूमि हीच आपली मातृभूमि अशी त्यांची खरोखरच कृतबुद्धि असेल तर, त्यांनीं ' मातृभूमीची निष्ठा ' या शब्दांत समाविष्ट असलेल्या सर्व भावना मुसलमान समाजांत निर्माण करण्याची कसोशी केली पाहिजे.

मुसलमान समाजांत धर्मातीत राष्ट्रीय दृष्टि निर्माण करण्याच्या या प्रयत्नांत यश कितपत येईल हें सांगतां येत नाहीं. आज तर मनाला निराशाच वाटत आहे. संधि सांपडेल तेव्हां जबाबदारीच्या अधिकारावरचे मुस्लीम लोकहि येथले कागदपत्र घेऊन पाकिस्तानांत पळून जात आहेत. स्वातंत्र्यदिनाच्या उत्सवालाहि कोठें विरोध होत आहे. मुस्लीम लीगच्या पुनरुद्धाराचे प्रयत्न कोठें चालू झाले आहेत. मशिदीची सबब पुढें काढून हिंदूंच्या मिरवणुकीवर मुसलमान पूर्वीप्रमाणेंच हल्ले करीत आहेत. पाकिस्तानचें निशाणहि हिंदुस्थानांत उभारण्याचे कोठें कोठें प्रयत्न होत आहेत. आणि सर्वांत भयंकर म्हणजे श्रीशिवछत्रपतींची अत्यंत निरर्गल अशी निंदा महाराष्ट्रांतहि कांहीं मुसलमान करीत आहेत. हें चालू आहे तोंपर्यंत या दोन समाजांची संघटना होणें अशक्य आहे.

तथापि अशाहि स्थितींत क्वचित् कोठें आशेचे किरण दिसत असल्याचा भास एकादे वेळीं होतो. काश्मीरप्रकरण हें अशापैकींच एक आहे, असें केव्हां केव्हां वाटतें. काश्मिरी मुसलमानांना पाकिस्तानांत जावयाचेंच असतें तर त्यांना कोणी अडवूं शकला असता, असें वाटत नाहीं. असें असूनहि दृढनिश्चयानें भारतांतच रहावयाचें, असें तेथील नेत्यांनीं व जनतेनें ठरविलें आहे. तेथील नेते मधूनमधून कांहीं भाषणें अशीं करतात कीं, त्यांच्या भारतनिष्ठेविषयीं व राष्ट्रीयतेविषयी शंका यावी. पण पुन्हां पुन्हां ते तीं भाषणें रद्द करून भारतांत रहाण्याचा निश्चय प्रगट करतात. या सगळ्या-वरून एक गोष्ट तरी निश्चित होते कीं, केवळ स्वधर्मीय ते आपले, अशी अंधनिष्ठा काश्मिरी मुसलमानांत नाहीं. अन्यधर्मीयांशीं राष्ट्रीय ऐक्यभावनेनें

ते संघटित होण्याची शक्यता आहे, अशी आशा या घटनेवरून वाटते. खान अबदुल गफरखान यांची 'खुदा ई खिदमतगार' ही संघटना म्हणजे अशाच प्रकारचा एक आशेचा किरण होता. आज वायव्य प्रांत हा पाकिस्तानांत समाविष्ट झाल्यामुळे त्याचें फारसें व्यावहारिक महत्त्व नाहीं. पण तात्त्विक दृष्ट्या त्याला अजूनहि महत्त्व आहे. धर्मातीत राष्ट्रीय दृष्टि कडव्या पठाण जमातींतहि निर्माण होऊं शकते, याचा तो पुरावा आहे. काश्मीर, वायव्य प्रांत या प्रदेशांत जें झालें तें भारताच्या इतर भागांतहि होण्याची शक्यता आहे, असें तात्त्विक दृष्टीनें तरी म्हणावयास हरकत नाहीं. कलकत्त्याचे रेझा ऊल करीम, मुंबईचे अकबरअली मिर्झा यांसारख्या कांहीं पंडितांना परंपरेच्या अभिमानाचें महत्त्वहि पटलें आहे असें दिसतें. 'पाकिस्तान एक्झॅमिन्ड' या आपल्या पुस्तकांत रेझा ऊल करीम म्हणतात—

'मुसलमानांना अनेक शतकें या भूमीनें पोसलें आहे. त्यांचा आतां अॅरबस्तान, इराण या देशांशीं कांहींएक संबंध नाहीं. आतां हिंदुस्थान हीच आमची मातृभूमि आहे. वेद, उपनिषदें, रामायण, महाभारत ही माझीच धनदौलत आहे. रामसीता, अशोक, अकबर, कालिदास, अमीर खुश्रू ही माझी थोर परंपरा आहे. हिच्यापासून मला कोणीहि तोडून काढूं शकणार नाहीं. तिच्यांत कांहीं दोष असतीलहि; पण ती माझी म्हणूनच मला प्रिय आहे.' मुसलमानांनीं ही वृत्ति दाखविली तर हिंदू तर काय आपल्या परंपरेंत सर्व थोर विभूति समाविष्ट करून घेण्यास एका पायावर तयार आहेत. आर्य, अनार्य, द्रवीड, दास, दस्यु, आदिवासी या सर्वांच्या परंपरा एकजीव करून टाकूनच आतांपर्यंतचें वैभव भारतीयांनीं विकसित केलें आहे. दशावतार, विष्णुसहस्रनाम, गीतेंतील विभूतियोगाचा अध्याय, लग्नांतील गोंधळ–प्रसंगींचें देवताआवाहन, पंचायतनपूजा, हीं सर्व हिंदूंच्या या वृत्तीचीं लक्षणें आहेत. अर्वाचीन काळांतहि कृष्णकरीम, रामरहीम हा जयघोष त्याच वृत्तींतून उद्भवलेला आहे; पण याच्या बुडाशीं असलेली व्यापक, उदार, धर्मातीत दृष्टि आमच्या मुस्लीम बांधवांत निर्माण होत नाहीं, हीच काय ती उणीव आहे आणि त्यामुळेंच ही समस्या बिकट होऊन बसली आहे.

लूथरच्या धर्मसुधारणेनंतर पश्चिम युरोपांतील देशांत कॅथॉलिक व प्रोटेस्टंट असे दोन तट पडले. आणि जवळ जवळ प्रत्येक देशांत भयंकर यादवी युद्धें झालीं. यांतून मुक्त राहिलें असें फक्त ब्रिटन. प्रोटेस्टंट इंग्लंडचा संपूर्ण नाश करण्यासाठीं पोपच्या प्रेरणेनें स्पेनच्या कॅथॉलिक राजानें इंग्लंडवर आरमाडा धाडला होता. म्हणजे तें युद्ध कॅथॉलिक व प्रोटेस्टंट या तत्त्वावर होणार होतें. अशा वेळीं कॅथॉलिक शत्रूला तोंड देण्यासाठीं उभारलेल्या सेनेचें आधिपत्य इंग्लंडनें एका कॅथॉलिक सेनापतीकडेच दिलें होतें. आपल्या लोकांच्या धर्मातीत राष्ट्रीय निष्ठेवर इंग्लिश जनतेचा इतका विश्वास होता. अशा तऱ्हेचा विश्वास आज हिंदुमुसलमानांचा परस्परांवर नाहीं. तो निर्माण झाल्यावांचून या दोन समाजांची संघटना होणें अशक्य आहे. वर सांगितलेलीं मन्वंतरें मुस्लीम समाजांत घडून येणें या गोष्टीमुळें याची केवळ पूर्व तयारी होईल. भविष्यकालांत होणाऱ्या अनेक संग्रामांत या भूमीच्या संरक्षणार्थ, तिच्या उत्कर्षासाठीं, तिच्या जनतेच्या न्याय्य हक्कांसाठीं, तिच्या अनंतविध समस्या सोडविण्यासाठीं हे दोन्ही समाज सारख्याच आत्मीयतेनें सहभागी होतील, शरीर झिजवितील, यातना भोगतील, रक्त सांडतील, आत्मबलिदान करतील, त्याच वेळीं त्यांची एकमेकांविषयींची साशंकता नष्ट होईल व भारतीय समाज एकजीव होईल. हें सर्व घडवून आणणें येथील भारतनिष्ठ मुस्लीम नेत्यांच्या हातीं आहे. केमालपाशाच्या धैर्यानें त्यांनीं स्वबांधवांना धर्मयुगांतून विज्ञानयुगांत आणून सोडलें तरच हिंदु व मुसलमान या दोन समाजांचें एक राष्ट्र घडून येईल.

---

# प्रकरण पंधरावें

# मानवपुनर्घटना

दुर्गेषु च महाराज षट्सु ये शास्त्रनिश्चिताः ।
सर्वे दुर्गेषु मन्यन्ते नरदुर्गं सुदुर्गमम् ।।

महाभारत, शांतिपर्व अध्याय ५५–३५

" शास्त्रांच्या विषयांत ज्यांची मति निश्चित झाली आहे ते पंडित असें सांगतात कीं, राज्यरक्षणासाठीं जे सहा प्रकारचे दुर्ग म्हणजे किल्ले अवश्य असतात त्यांत नरदुर्ग हा सर्वांत दुर्भेद्य असा दुर्ग होय. [ अनन्यनिष्ठ राजसेवक हाच खरा राज्याचा आधार होय. ]"

" अनेक लोक धनाची महती गातात; आणि धनाचा उपयोग असतो यांत शंका नाहीं. पण अंतिम यशापयश हें मानवावरच अवलंबून असतें. इतिहास हा मानवानें घडविला आहे. आणि मानवजातीची प्रगति झाली ती मानवाच्या कर्तृत्वामुळें झालेली आहे; धनामुळें नव्हे. शिक्षणानें, संस्कारानें आपण भारतांत जर इष्ट ती मानवमूर्ति घडवूं शकलों तर बाकीचें कार्य अत्यंत सुसाध्य आहे "—पंडित जवाहरलाल नेहरु—( कुरुक्षेत्र-खास अंक—२ ऑक्टोबर १९५३ )

स्वातंत्र्यप्राप्तीनंतर आपण येथें जें लोकसत्ताक शासन स्थापन केलें तें यशस्वी करण्यासाठीं आपल्या जीवनाची सर्वांगीण पुनर्घटना करणें अवश्य आहे हा विचार सांगून त्या पुनर्घटनेची दिशा कोणची, मार्ग कोणचे, महत्त्व किती या सर्वांचें विवेचन गेल्या कांहीं प्रकरणांतून केलें. राजकीय, आर्थिक व सामाजिक या तीन अंगांची पुनर्घटना करण्यासाठीं काँग्रेस सरकारनें कोणचे प्रयत्न केले व त्यांचें फळ काय मिळालें याचा कांहींसा आढावाहि त्या लेखांत आपण घेतला. आतां आपल्या लोकशाहीच्या यशाच्या दृष्टीनें

मानवपुनर्घटनेचें जें सर्वांत महत्त्वाचें कार्य त्याचा विचार करून भारतीय लोकसत्तेचें हें विवेचन पुरें करावयाचें आहे.

कोणत्याहि समाजाच्या उत्कर्षाला जीं अनेक प्रकारचीं धनें अवश्य असतात, त्यांत ' मानवधन ' हें सर्वांत जास्त महत्त्वाचें आहे. सुपीक जमीन, अरण्यें, खाणी, नद्या, बंदरें, समुद्रकिनारा, व्यापार, कारखानदारी इ. सर्व धनें आपापल्या परी अवश्य व महत्त्वाचीं आहेतच. पण विवेक, त्याग, कर्तृत्व, दूरदृष्टि, बुद्धिमत्ता, व्यवहारचातुर्य तेजस्वी व अभिमानी वृत्ति, उदात्त ध्येयवाद इ. गुणांनीं संपन्न असलेला मानव हें कोणत्याहि राष्ट्राचें खरें धन होय. हें धन असल्यावर इतर धनें नसलीं तरी निर्माण करतां येतात किंवा बाहेरून मिळवितां येतात. पण हें धन नसेल तर इतर धनें असून नसल्यासारखीं होतात. तीं असलीं तरी त्यांची माती होते, किंवा इतर देशांतल्या लोकांना त्यांचा उपयोग होऊन स्वदेशाला तीं जास्तच घातक ठरतात. इतर देशांतल्या कोणत्याहि लोकशाहीचा आपण अभ्यास केला तर यशःसिद्धि ही भोंवतालच्या परिस्थितीवर फार थोडी अवलंबून असून मानवाचें मन, बुद्धि, अंतःकरण यांचे जे गुण त्यांवर ती बव्हंशीं अवलंबून असते हें आपल्या ध्यानांत येईल. क्रियासिद्धिः सत्त्वे भवति महतां नोपकरणे । या कविवचनाचा भावार्थ हाच आहे. इंग्लंडमध्यें राजसत्तेवर नियंत्रण घालण्यांत आलें व लोक संघटित लोकशाहीचा मार्ग यशस्वीपणें क्रमूं लागले. त्याचवेळीं जर्मनी, फ्रान्स, पोलंड, स्पेन, इटली येथेंहि त्याच दिशेनें पावलें टाकण्याचा प्रयत्न झाला होता. या देशांच्या भौतिक परिस्थितींत त्याकाळीं तरी म्हणण्यासारखा फरक नव्हता. असें असूनहि त्यांना यश आलें नाहीं. इंग्लंड पूर्ण यशस्वी झालें, फ्रान्स व जर्मनी कांहीं दृष्टींनीं यशस्वी झाले. पण इटली, स्पेन व पोलंड यांना यशाचें दर्शनहि झालें नाहीं. उलट त्यांचा कमालीचा अधःपात झाला. याला कारण एकच. तेथला मानव हा नव्या जबाबदाऱ्या पेलण्यास असमर्थ ठरला. ते ते समाज रसातळास गेले तें यामुळें. पूर्वीच्या काळीं युरोपांत ग्रीसचा उदय झाला. गेल्या शतकाच्या अखेरीस पूर्वेकडे जपानचा उदय झाला. त्यावेळीं ग्रीस किंवा जपान यांच्या भोंवतालच्या देशांतील परिस्थिति त्यांच्यापेक्षां निराळी होती असें नाहीं. भौतिक परिस्थिति जवळ जवळ तीच होती. तरी ग्रीक

व जपानी मानवानें आपल्या अंतरांतील त्याग, विवेक, कष्ट करण्याची व यातना सोसण्याची सिद्धता, उच्च आकांक्षांसाठीं वाटेल ती किंमत देण्याची मनाची तयारी इ. अनेक प्रकारचें धन दोन्ही हातांनीं उपसून बाहेर काढलें व आपला उत्कर्ष करून घेतला. इतर आवतीभोंवतींचे समाज कशांत उणे पडले असतील तर ते या आंतरिक धनाच्या बाबतींत. याचा अर्थ असा कीं, राष्ट्राच्या उन्नतीच्या बाबतींत निर्णायक ठरणारें धन म्हणजे मानवधन होय. भारताच्या इतिहासांतील फार प्राचीन काळांतील महर्षि व्यास यांच्यापासून भारताचे आजचे भाग्यविधाते पंडित जवाहरलाल नेहरु यांच्यापर्यंत हें एकच महातत्त्व येथले थोर पुरुष भारतीयांना सांगत आहेत. विवेक, त्याग, धैर्य, प्रज्ञा, निष्ठा या मानवी सद्गुणांचें संवर्धन करा. प्रारंभीं दिलेल्या अवतरणांचा हाच भावार्थ आहे. पन्हाळा किंवा सिंहगड हे खरे किल्ले नव्हत. बाजीप्रभु, तानाजी मालुसरे हे खरे किल्ले होत. शिवछत्रपतींचें, मराठी राज्याचें रक्षण त्यांनीं केलें. हे दुर्भेद्य नरदुर्ग हाच खरा राष्ट्राचा आधार होय. भेदनीतीला ते वश झाले, त्यांची निष्ठा चळली, त्यांचा विवेक सुटला कीं दगडाचे किल्ले कांहींच करूं शकत नाहींत. ते शत्रूलाच साह्यभूत होतात. म्हणून नरदुर्ग सर्वांत श्रेष्ठ असें महाभारतकारांनीं सांगून ठेविलें आहे. पंडित जवाहरलाल आज तेंच सांगत आहेत. नवें राष्ट्र घडावयाचें तर नवी मानवमूर्ति प्रथम घडली पाहिजे. मग आपल्याला दुष्कर असें कांहीं नाहीं. मानवधन हें खरें धन होय. इतर धनें गौण होत.

मानव पुनर्घटना याचा अर्थ आतां सहज ध्यानांत येईल. अविवेक, अंधनिष्ठा, विघटनावृत्ति, स्वार्थ, मोह, दैववाद इ. भारतीयांच्या अंगचे दुर्गुण नष्ट करून त्यांच्या ठायीं त्याग, विवेक, धैर्य, ध्येयनिष्ठा इ. सद्गुणांचें संवर्धन करणें म्हणजेच पुनर्घटना. ही पुनर्घटना आहे असें म्हणण्याचें कारण असें कीं वरील सर्व आंतरिक धन हें मानवाच्या स्वाधीनचें आहे. तें त्याच्या ठायीं आजच आहे. तें कोठून बाहेरून प्राप्त करून घ्यावयाचें नाहीं. आनुवंश, भौगोलिक परिस्थिति, अर्थव्यवस्था, यांवरहि तें अवलंबून नाहीं. तें धन सर्वस्वीं स्वाधीन आहे. आपल्या मनाची घडण फक्त बदलावयाची आहे. अवश्य ते घटक तेथेंच इकडे तिकडे पडलेले आहेत. ते घेऊन, जुने काढून टाकून,रचना फक्त नवीन करावयाची

आहे. पण हें कार्य दिसावयास इतकें सोपें असलें तरी मानवाचा आजपर्यंतचा इतिहास पहातां असें दिसतें कीं, सर्वांत दुःसाध्य अशी एखादी गोष्ट असेल तर ती हीच आहे. स्वातंत्र्यानंतरचा आपला इतिहास पहातां तोहि हीच साक्ष देणार असें वाटूं लागलें आहे.

मानवाच्या आंतरिक गुणांच्या संपादनाच्या दृष्टीनें गेल्या पांचसहा वर्षांचें आपल्या समाजाचें चित्र पाहूं लागलों तर मन खेदानें व्याप्त होतें. भावी काळासंबंधीं भीति वाटूं लागते आणि मनाचा धीर सुटल्यासारखा होतो. या क्षेत्रांत प्रगति तर नाहींच. पण दरवर्षी, दरदिवशीं, नव्हे प्रतिक्षणीं, प्रतिपदीं आपण अधःपाताकडे चालला आहों आणि तेहि अत्यंत वेगानें घसरत आहोंत, असें दिसून येत आहे. लोकायत्त भारताचें सार्वजनिक जीवन आपण तपासूं लागलों तर त्या जीवनाचें प्रत्येक अंग नासलेलें, सडलेलें आहे, असें आढळूं लागतें. मानवी गुणांची संपत्ति आपण पोषिली तर नाहींच पण स्वातंत्र्यापूर्वी तिचा जो कांहीं सांठा आपल्याजवळ होता तोहि आपण गमावून टाकून दिवाळखोरीच्या कांठावर येऊन उभे राहिलों आहों. येथून विनिपात फार दूर नाहीं. अनेक शतकानंतर आज आपणांस स्वातंत्र्याची प्राप्ति झाली आहे. पण आतां विश्वप्रयत्न करून मानवाच्या आंतरिक धनाची जोपासना केली नाहीं तर पूर्वसूरींनीं भगीरथ प्रयत्नांनीं आणलेली ही गंगा तशींच वाहून जाईल आणि आपण पूर्वी अनेक शतकें नरकांत पिचत पडलों होतो तसेंच पुन्हां पडून राहूं. ही आपत्ति येऊं नये म्हणून या भूमीच्या तरुण कन्यापुत्रांनीं जिवाचा पण लावून अवश्य त्या सद्गुणांची जोपासना प्रथम स्वतःच्या ठायीं व नंतर समाजांत केली पाहिजे. त्यासाठीं त्यांना प्रथम वस्तुस्थितीचें दर्शन घडवून मग त्या गुणांच्या जोपासनेसाठीं त्यांनीं कोणचे मार्ग अनुसरावे हें या प्रकरणांत सांगावयाचें आहे.

वर सांगितलेलें मानवाचें जें आंतरिक धन म्हणजे त्याच्या मनाचे व बुद्धीचे गुण त्याचे दोन भागांत वर्गीकरण करतां येईल. कार्यक्षमता व नीतिमत्ता हे ते दोन भाग होत. यांमध्यें मानवाच्या सर्व गुणांचा समावेश होतो. त्यांतील कार्यक्षमतेचा प्रथम आढावा घेऊं आणि नंतर भारताच्या सार्वजनिक जीवनांतील नीतिमत्तेचा हिशेब करूं. कोणचेंहि कार्य अंगावर

घेतलें तर प्रथम त्याची संपूर्ण योजना आंखणें, खर्चाचा अंदाज करणें, सामग्रीचें स्वरूप ठरविणें, तज्ज्ञ माणसें जमविणें, त्यांच्यांत कामाची वांटणी करणें ही कर्तृत्वाची पहिली कसोटी होय. यानंतर या योजनेप्रमाणें कार्य घडवून आणणें हें कार्यक्षमतेचें दुसरें लक्षण होय. त्यासाठीं सतत जागरूक राहून अंतिम ध्येयाकडेच सर्व कार्यौघ सारखा जात राहील अशी काळजी घेणें, भिन्न खात्यांत एकसूत्रता राखणें, शिथिलता, बेजबाबदारी यासाठीं कडक शिक्षा करून असले दोष निपटून काढणें इ. गुणांची आवश्यकता असते. हे गुण म्हणजेच ही कार्यक्षमता आपण भारतीयांनीं कितपत प्रगट केली तें आतां पहावयाचें आहे. गेल्या पांचसहा वर्षांत आपण ज्या निरनिराळ्या योजना आंखल्या त्यांची हकीकत मागें दिलीच आहे. त्या योजनांवर सरकारनेंच तज्ज्ञांकडून जे अहवाल लिहवून घेतले त्यांच्या आधारानेंच आपल्याला आपल्या कार्यक्षमतेचें मापन करतां येईल.

१९४६ सालीं कॉंग्रेसनें सत्ता हातीं येतांच 'प्रांतविकासयोजना' आंखली होती. चार वर्षांनीं त्या कार्याचें परीक्षण करून त्यासंबंधीं अभिप्राय द्यावा, अशी डॉ. ग्यानचंद यांना सरकारनें विनंती केली होती. त्यांनीं जें निवेदन सादर केलें आहे त्यावरून आपणा भारतीयांच्या ठायीं क्रियासिद्धीला लागणारें सत्त्व मुळींच नाहीं असें स्पष्ट दिसून येतें. साधन-सामग्री म्हणजे उपकरणें येथें विपुल आहेत असें नाहीं; पण तें सत्त्व जर आपल्या ठायीं असतें तर आहेत या साधनांच्या जोरावरच आपणांस सध्यांच्यापेक्षां दसपट यश मिळवितां आलें असतें असें दिसून येईल.

## कार्यक्षमता

डॉ. ग्यानचंद यांनीं या योजनांच्या कार्यवाहींतील पहिला दोष दाखविला तो हा कीं, अखिल भारत डोळ्यापुढें ठेवून त्यांची आंखणी झालेली नाहीं. प्रत्येक प्रांताचे हितसंबंध जणुं निराळे आहेत असें धरून, किंवा कसलाच विचार न करतां, या योजना ठरविल्या गेल्या आहेत. नवीन रस्त्यांची बांधणी पंजाब व बंगाल या प्रांतांत होणें अवश्य होतें. पण या प्रांतांत रस्त्यांवर एकदोन कोटीच खर्च झाला असून उत्तर प्रदेशांत मात्र

तेरा कोटि रुपये झाला आहे. १९४९ पर्यंत एकंदर सर्व प्रांतांचा विकास-खर्च २२९ कोटी झाला यांतील ५६ कोटी म्हणजे एक चतुर्थांश खर्च इमारती व रस्ते याकरतांच झाला आहे. हें ग्यानचद यांच्या मतें अगदीं असमर्थनीय आहे. आसाम व मुंबई या प्रांतांत मोठे कारखाने निघणें अत्यंत अवश्य होतें. पण या प्रांतांत त्यांच्या योजना सुद्धां नाहींत. पाटबंधाऱ्यावर सर्वांत जास्त खर्च मध्यप्रदेशांत होणें अवश्य होतें. कारण नांगरटीखालीं येण्याजोगी पण पडीत जमीन तेथें सर्वांत जास्त आहे. पण त्याच प्रांतांत सर्वांत कमी खर्च झाला आहे. (प्रॉव्हिन्शियल डेव्हलपमेंट प्रोगॅम—ग्यानचंद—गव्हर्मेंट ऑफ इंडिया १९४९. पृ. १७३ ते १८९ ) हें सर्व सांगून डॉ. ग्यानचंद म्हणतात कीं, या सर्व कार्यक्रमांत एकसूत्रता अशी नाहींच. एका प्रांताचा दुसऱ्या प्रांताशीं संबंध नाहीं. आणि अखिल भारताचे समग्र दर्शन तर योजनेंत कोणालाच नव्हतें. प्रत्येक प्रांताला पैशाचा विशिष्ट वांटा मिळाला होता. आणि प्रत्येक प्रांत तो परस्परनिरपेक्ष खर्च करीत होता. कोणाचा कोणाला मेळ नव्हता. पंडित नेहरूंनीं वरील पुस्तकाच्या प्रस्तावनेंत तर आणखी पुढें जाऊन म्हटलें आहे कीं भिन्नभिन्न प्रांतांचा एकमेकांशीं मेळ नाहीं इतकेंच नव्हे, तर प्रांतांतल्या एका खात्याचा दुसऱ्या खात्यांशीं मेळ नाहीं. आणि पुढें कांहीं उदाहरणें देण्यांत येतील त्यावरून असें दिसेल कीं, एका कारखान्यांत किंवा एका संस्थेतहि एका विभागाचा दुसऱ्याशीं मेळ नसतो! भारताचा प्रचंड विस्तार व विपुल सुप्त संपत्ति पाहून अभिमानाचीं भाषणें करणें सोपें आहे. पण या अफाट पसाऱ्यांतील अनंत घटकांना एकसूत्रबद्ध करून या अनंत घटकांतून एक भारतमूर्ति निर्माण करणें अत्यंत दुष्कर आहे. तसें झाल्यावांचून आपलें स्वातंत्र्य टिकणेंसुद्धां शक्य नाहीं. मग भारतीय समाजाचें संघटित राष्ट्र बनविणें आणि तें राष्ट्र लोकायत्त करणें हें तर सुतराम् अशक्य आहे. भारतीय राष्ट्रपुरुष असें आपण बोलतांना बोलतों. पण पुरुषाच्या प्रत्येक हालचालींत, बोलण्यांत, विचारांत आणि सर्व जीवनांत जी एकसूत्रता असते——जी नसेल तर मनुष्याला मनुष्यत्वच येणार नाहीं——ती एकसूत्रता भारतीय पुरुषाच्या अंगीं आल्यावांचून त्याला राष्ट्रपुरुष कसें म्हणतां येईल? ती एकसूत्रता आणणें हें आत्म्याचें कार्य आहे. तसा आत्मा भारताला अजून निर्माण

झालेला नाहीं. आणि तो निर्माण करण्याची आपल्या ठायीं पात्रता आहे असें दिसत नाहीं. दोनशें पानांच्या पुस्तकांत डॉ. ग्यानचंद यांनीं निदान पन्नास वेळां तरी हें सांगितलें असेल !

या योजनेंतील दुसरा दोष असा कीं तिच्या पुढें निश्चित हेतु व साध्य असें रेखलेलें मुळींच नव्हतें. प्रत्येक प्रांतांत लक्षावधि किलोवॅट वीज निर्माण करण्याच्या योजना आंखल्या आहेत, कांहीं चालू झाल्या आहेत; पण या निर्माण होणाऱ्या विजेचा वापर कसा करावयाचा हें अजून कांहींच ठरलेलें नाहीं. याचा व्हावा तितका विचारच झालेला नाहीं. आणि ग्यानचंद म्हणतात कीं, असें आहे तोंपर्यंत हा खर्च समर्थनीय आहे असें म्हणतां येत नाहीं. ( उक्तग्रंथ पृ. १६९ ) अंतिम हेतूचा व व्यापक दर्शनाचा अभाव असल्यामुळें कोणच्या कार्याला अग्रमान द्यावा व कोणचें पुढें ढकलावें याचें ताळतंत्र रहात नाहीं. डॉ. ग्यानचंद यांच्या म्हणण्याचें प्रत्यंतर मुंबई व मद्रास या प्रांतांत दिसून येतें. हे दोन्ही प्रांत अन्नधान्याच्या बाबतींत तुटीचे आहेत आणि नेमक्या याच प्रांतांनीं दारुबंदी करून आपलें २०।२५ कोटींचें उत्पन्न घालविलें आहे. आसामचें उदाहरण असेंच आहे. या प्रांतांत भूमीच्या कुशींत सुप्त धन अगणित आहे. आणि तज्ज्ञांच्या मतें, या धनाच्या निर्मितीवर जितका खर्च करावा तितका फलदायी होईल. पण विकसनांत या प्रांताला २२९ कोटींपैकीं फक्त ६ कोटी मिळाले आहेत. आणि येथल्या खनिज संपत्तीला अजून स्पर्शहि झालेला नाहीं. इतकेंच नव्हे तर ती खणून वर काढण्याची योजनाहि आखलेली नाहीं. सर्व मिळून अंतीं काय साधावयाचें आहे किंवा एखाद्या विशिष्ट योजनेनें अंतीं काय प्राप्त करून घ्यावयाचें आहे हेंहि ठरलें नसेल तर आंखलेल्या योजना किती फलदायी होतील हें दिसतेंच आहे !

या पुस्तकांत भिन्नभिन्न ठिकाणीं डॉक्टर ग्यानचंद यांनीं जे शेरे दिले आहेत ते एकत्र केले तर आपल्या १९४६ ते ५० या पंचवार्षिक योजनेचें रूप पुढीलप्रमाणें दिसेल. या योजना प्रत्यक्षांत आणणाऱ्या अधिकाऱ्यांत दृढनिश्चय नाहीं, स्वयंप्रेरणा नाहीं व तळमळ नाहीं. (पृ. ४२, ७९ ) सामग्र्यानें अवलोकन करून योजना आंखावी, प्रत्येक

घावलास आढावा घेऊन सावध रहावें व त्या अनुभवानें शहाणें व्हावें, ही विद्या आमच्यांत नाहीं. ( पृ. ७७ ) आरंभीं केंद्रसरकारनें या विकास-कार्यक्रमाला ८०० कोटी मंजूर केले होते, पण पुढें ५०० कोटीची कपात केली. आतां इतकी कपात झाल्यावर कांहीं योजना रद्द करून थोड्या चालू ठेवणें प्राप्त होतें. पण तसें करतांना--म्हणजे ही निवड करतांना--विवेकबुद्धि वापरलेली दिसत नाहीं. ( ७९ ) एकसूत्रता आणण्यासाठीं कांहीं प्रांतांत स्वतंत्र अधिकारी नेमलेले आहेत व कोठें कोठें तर स्वतंत्र खातेंच काढलेलें आहे. पण या खात्यांनाहि आपल्या कार्याची कल्पना नाहीं. ते अधिकारी माहिती जमा करतात, दप्तर ठेवतात आणि जरूर तेथें माहिती पुरवितात; पण अनेक ठिकाणांहून येणाऱ्या माहितीचा परस्पर मेळ घालावयाचा आहे, त्यांत तारतम्य ठरवून कोणची योजना मागें जात आहे, कोणची पुढें जात आहे, त्यांतून हितअहित कशांत आहे इ. धोरण त्यावरून आंखावयाचें आहे याची जाणीवच या अधिकाऱ्यांना नाहीं. म्हणून हीं खातीं अर्थशून्य आहेत. त्यांचा कांहीं उपयोग नाहीं. ( पृ. ११४ )

हा अकार्यक्षमतेचा तपशील देऊन शेवटीं डॉ. ग्यानचंद असा निर्णय देतात. ' या विकासयोजनेंतील खर्चाची छाननी केली तर असें दिसतें कीं यांत एकसूत्रता नाहीं. पैशाची जी प्रांतवार वांटणी केली तिच्यामागें कांहीं सुबुद्ध आंखणी किंवा तारतम्य आहे असें दिसून येत नाहीं. गरजा व सुप्तशक्ति यांचा हिशेब नाहीं. योजनेच्या कार्यात अनेक निर्णय केवळ तात्कालिक स्फूर्तीनें घेतलेले दिसतात. तेव्हां हाताशीं असलेल्या साधनांचें व शक्तीचें यापेक्षां जास्त फल राष्ट्राला मिळालें नाहीं यांत काय नवल ! असल्या हिशेबशून्य खर्चामुळें हातीं असलेल्या अल्पशा साधनांचाहि उधळ व नाश होणें हें हिंदुस्थानसारख्या देशांत अटळच आहे. ' ( पृ. १८९ ).

प्रस्तावनेंत डॉ. ग्यानचंद यांनीं याहिपेक्षां कठोर टीका केली आहे. ते म्हणतात. 'येवढ्या मोठया योजना, सामान व मानवी शक्ति यांचा इतका मोठा व्यय, पण त्यामानानें फळ नाहीं. शिवाय आतां आर्थिक स्थिति खालावल्या-मुळें या योजना पूर्ण होतील अशी ग्वाही देतां येत नाहीं. पण या योजनांचें

अपयश हें साधनांच्या अपुरेपणांत नाहीं. खरें वैगुण्य म्हणजे एकसूत्रता, सुसंगति, परस्पर अन्वय यांचा अभाव हें आहे. आणि धनसाधनें वाढलीं तरी त्यांचें भवितव्य बदलणार नाहीं. प्रत्येक पायरीगाणिक सुसूत्रता, सुबद्धता, एकात्मता आणली तरच या फलद्रूप होतील.'

डॉ. ग्यानचंद यांचें हें निवेदन व त्यांची टीका पूर्णपणें यथार्थ कशी आहे हें 'शिंदरी फर्टीलायझर फॅक्टरी' च्या गाजलेल्या इतिहासावरून कळून येईल. हाहि इतिहास सरकारनें नेमलेल्या 'एस्टिमेट कमिटीनें' च लोकांपुढें मांडला आहे. आपल्या राज्यकारभाराचें निःस्पृह पंडितांकडून मापन करवून घेऊन त्या मापनांत कितीहि कठोर व जहरी टीका केलेली असली तरी तें स्वतःच प्रसिद्ध करून जनतेपुढें मांडण्याचें जें अत्यंत प्रांजल धोरण नेहरूसरकारनें अवलंबिलें आहे व ग्यानचंद, गोरावाला, एस्टिमेट कमिटी यांच्या इतिवृत्तांवरून ज्याचें प्रत्यंतर येत आहे, त्या धोरणासाठीं आपल्या सरकारला जितके धन्यवाद द्यावे तितके थोडेच आहेत. सरकार-विरुद्ध कोणी टीका करतांच किंवा तसा विचार कोणाच्या मनांत आला असेल अशी शंका येतांच सोव्हिएट रशियांत त्या मनुष्याला गोळी घालतात. आणि भारताचे सूत्रधार पंडितजी मुद्दाम निःस्पृह अशा पंडितांना निमंत्रण देऊन त्यांनीं केलेली टीका प्रांजलपणें जनतेपुढें मांडतात. हें पाहून भारतीय प्रजासत्ताकाच्या भवितव्याविषयीं निर्माण होत चाललेली निराशा क्षणभर तरी कमी होते यांत शंका नाहीं. असो. एस्टिमेट कमिटीनें शिंदरी फॅक्टरी-बद्दल काय सांगितलें तें आपणांस पहावयाचें आहे.

या कारखान्याच्या उभारणीचा खर्च प्रथम अंदाजानें सुमारें ११ कोटी धरलेला होता. पुढें १२ कोटींची मागणी करण्यांत आली व त्यानंतर १५, १८, २३ अशी ती सारखी वाढविण्यांत आली व अजूनहि ही रक्कम पुरेशी होईल अशी खात्री नाहीं. असें कां व्हावें याविषयीं चवकशी झाली तेव्हां पुढील गोष्टी उघडकीस आल्या. उद्योग व पुरवठा या खात्याच्या अधिकाऱ्यांनींच कमिटीपुढें साक्ष देतांना सांगितलें कीं, या योजनेच्या खर्चाचें अंदाजपत्रक केलेलेंच नव्हतें! साधारण आंकडा सांगितला होता. तसेंच या योजनेवर नियंत्रण असें कोणाचेंच नव्हतें. अर्थमंत्री यांनीं

या खर्चांचे हिशेब पाहून त्यांतील गोंधळ नाहींसा करण्याचा प्रयत्नहि केला नाहीं. ११ कोटींवरून २३ कोटींपर्यंत खर्च कां वाढला या प्रश्नाचें उत्तर असें कीं, योजना मंजूर झाल्यावरहि कारखान्यासाठीं लागणारी जमीन व यंत्रें विकत घेण्याची त्वरा करण्यांत आली नाहीं. तेवढ्या मुदतींत किंमती वाढत गेल्या व त्यामुळें सरकारला पुष्कळ वेळां चौपट किंमती द्याव्या लागल्या. याची चवकशी करून याला जबाबदार कोण तें सरकारनें निश्चित करावें, अशी एस्टिमेट कमिटीनें शिफारस केली आहे. या कारखान्यांत स्वतंत्रपणें खर्चाच्या रकमा मंजूर करणारे बारा अधिकारी होते आणि आठ स्वतंत्र हिशेबनीस होते! यांच्या प्रत्येकांच्या कचेऱ्या स्वतंत्र होत्या व त्यांचा एकमेकींस मेळ नव्हता. मेळ घालण्याचा एकदांहि प्रयत्न करण्यांत आला नाहीं. उद्योग व पुरवठा या खात्यानें शिंदरी योजनेवर देखरेख करण्यास पुष्कळ स्वतंत्र अधिकारी नेमले असूनहि वरील प्रकार झाला. या अधिकाऱ्यांच्या पगाराचा खर्च भरमसाट असून तो मुळींच करावयास नको होता, असें कमिटीचें मत आहे. एस्टिमेट कमिटीच्या पूर्वी 'काटकसर समिती'नें बऱ्याच गोष्टी सरकारच्या निदर्शनास आणल्या होत्या. तरी त्याकडे कोणीं लक्ष दिलें नाहीं. हें सर्व निवेदन करून कमिटीनें परखडपणें असें विचारलें आहे कीं, 'सरकारी कारभार चालविण्याची ही काय रीत आहे कीं काय?' याबाबतींतली शिथिलता, बेजबाबदार वृत्ति, हलगर्जीपणा आणि कर्तृत्वशून्यता अगदीं अक्षम्य आहे. गरीब हिंदी जनतेचे कोट्यवधि रुपये यामुळें अगदीं मातींत गेले आहेत. उपकरणें आहेत, पैसा आहे, योजना आहेत, पण त्यांचा घटयिता जो माणूस त्याच्या ठायीं कसलेंहि 'सत्त्व' नाहीं. तें निर्माण झाल्यावांचून कोणचीहि पंचवार्षिक वा दशवार्षिक योजना सफल होणें शक्य नाहीं.

बिहारचे अर्थमंत्री श्री. सिंह यांनीं गया येथें कॉंग्रेसच्या एका सभेंत जे उद्‌गार काढले त्यावरूनहि याच मताचा पाठपुरावा होईल. ते म्हणाले, 'पाटबंधाऱ्यांच्या ज्या लहान योजना आंखल्या होत्या, त्यांत कोट्यवधि रुपये नुसते उधळले गेले. हे पाटबंधारे नीट झाले असते तर बिहारमध्यें दुष्काळ पडला नसता. सरकारच्या भिन्न खात्यांत कसलीच एकसूत्रता नव्हती.

आणि पुष्कळशा पाटबंधाऱ्यांच्या योजना म्हणजे विनोदप्रकरणेंच होतीं.' ( टाइम्स ऑफ इंडिया २५–११–१९५० )

भिन्नभिन्न प्रांतांतल्या नियोजनांच्या अपयशाची जी कथा वर सांगितली. तशीच रडकथा केन्द्रसरकारच्या आर्थिक नियोजनाची आहे, हें स्वतः पंडितजींनींच सांगून टाकलेलें आहे. प्रांतांचे प्रधानमंत्री व कॉंग्रेसचे प्रतिनिधि यांचेपुढें भाषण करतांना जवाहरलालजी म्हणाले, 'नियोजनाविषयीं आपण भाषणें पुष्कळ केलीं; पण आतांपर्यंत फारसें कांहीं साधलेलें नाहीं. अनेक दिशांनीं आपण प्रयत्न केले पण केन्द्र व प्रांत यांत आणि प्रांताप्रांतांत अवश्य तें सहकार्य व एकसूत्रता आम्ही आणूं शकलों नाहीं. मी अगदीं प्रांजलपणें सांगतों कीं, केन्द्रसरकारमध्येंहि अखिल भारताचें समग्र दर्शन घेण्याचा काळजीपूर्वक प्रयत्न केला गेला नाहीं.' ( टाइम्स ऑफ इंडिया २६–४–५० )

आपल्या कार्यक्षमतेचें स्वरूप हें असें आहे. विषयाचें पूर्णज्ञान, पूर्व योजना, काम सुरू झाल्यानंतरची जागरूकता, कार्य तडीस नेऊन इष्ट हेतु सिद्धीस नेण्याची जबाबदारी व तळमळ या सर्व गुणांचा कार्यक्षमतेंत अंतर्भाव होतो. दुर्दैवानें या सर्व गुणांचा आपल्या कारभारांत अभावच दिसून येतो. डॉ. ग्यानचंद यांनीं प्रांत–विकास योजनांचा जो चित्रपट दिला आहे तसेच इतर खात्यांचे चित्रपट आहेत. आपले सरकारी कायदेपंडित कायदे करतात त्यांचा न्यायालयांत धुरळा होतो. आपले इंजिनियर धरणाच्या भिंती बांधतात त्या पाण्याची लाट त्यांच्यावर थडकण्याच्या आधींच वांकड्या होतात किंवा कोसळून पडतात. त्यांनीं बारा वर्षे टिकावयाच्या हिशेबानें बांधलेलीं घरें सहा महिन्यात निकामी होतात. गुन्हेगारीला आळा घालण्याचें काम पोलीसांकडे दिलें कीं गुन्ह्यांच्या प्रमाणांत वाढ होण्यास प्रारंभ होतो. अन्नधान्य वाढविण्याची मोहीम सुरू केली कीं अन्नधान्याचें उत्पादन कमी होऊं लागतें. आपलें आरोग्यखातें, आपलें शिक्षणखातें, आपले नभोवाणीखातें–प्रत्येक ठिकाणीं आपल्या कार्यक्षमतेचे डिंडिम असेच वाजत आहेत. भिन्नभिन्न सरकारी खातीं व इतर सार्वजनिक संस्था यांचे अहवाल वाचले म्हणजे कर्तृत्वाचा व आपला दहा जन्मांत तरी कधीं संबंध आला होता कीं नाहीं अशी शंका येऊं लागते.

आपल्या कार्यक्षमतेचें स्वरूप न्याहाळल्यानंतर आतां आपल्या नीतिमत्तेचें रूप पहावयाचें आहे. कार्यक्षमता व नीतिमत्ता हीं राष्ट्रपुरुषाचीं दोन फुप्फुसें आहेत. त्यांतून त्याचें श्वसन चालतें. यांपैकीं एक जरी कार्य करीत राहिलें तरी प्राण राहूं शकतो. सतराव्या शतकांतील ब्रिटनच्या राज्यकारभाराचें 'अत्यंत अधोगामी पण अत्यंत कार्यक्षम' असें इतिहासकार वर्णन करतात. म्हणजे एकाच फुप्फुसावर तेथला कारभार चालला होता. पण तेवढ्यावर परमोत्कर्ष साधला नाहीं तरी अनेक संकटांतून ब्रिटन पार पडलें. पण जेथें दोन्ही फुप्फुसें बिघडलीं आहेत तेथें अशी आशा धरतां येईल काय ?

आपल्या देशाच्या सार्वजनिक जीवनांतील नीतिमत्तेचें सध्यां संपूर्ण दिवाळें निघालेलें आहे याबद्दल आतां दुमत होईल असें वाटत नाहीं. राजकीय पुनर्घटना व औद्योगिक पुनर्घटना या प्रकरणांत विषयाच्या अनुषंगानें कॉंग्रेसची संघटना, व्यापारी वर्ग व एकंदर समाज यांच्यातील कमालीच्या अनीतीचें वर्णन केलेंच आहे. विषयाच्या पूर्ततेसाठीं आपला एकंदर राज्यकारभारहि अनीतीच्या रोगानें कसा सडून गेला आहे याची माहिती येथें देतों. ही माहिती सरकारी अहवालांतूनच घेतलेली आहे. आपल्या सरकारी खात्यांत एकहि खातें असें नाहीं कीं जे या रोगापासून मुक्त आहे. ( १ ) हिंदुस्थानचे अकाउटंट जनरल आपल्या सर्व परदेशी वकिलातींतून हिंडून आले व त्यांनीं आपला अहवाल सरकारला सादर केला. त्यांत त्यांनीं सांगितलें आहे कीं या वकिलातींत सर्वत्र उधळेपणाचा कारभार आहे. पैशाचा हिशेब एकाहि वकिलातींत समाधानकारक ठेवलेला नाहीं. ( सकाळ. २८-१०-५१ ) इंग्लंडमध्यें खरेदी केलेल्या जीपगाड्यांचें प्रकरण सुप्रसिद्धच आहे. या वकिलाती परदेशी कंपन्यांशीं करार करतात, तेहि सावधगिरीनें केलेले नसतात. कराराचा भंग झाला तर त्यासाठीं कंपनीला जबाबदार धरतां येईल अशी तरतूदच कांहीं करारांत केली नव्हती. अर्थात् यांतील हेतु उघड आहे. ( २ ) उत्तर प्रदेशांतील स्थानिक स्वराज्यांची नुकतीच तपासणी झाली. तिच्या अहवालांत पुढीलप्रमाणें माहिती मिळते. बनारस, कानपूर, लखनौ, मुझफरपूर, झांशी, डेहराडून, इटावा या म्युनिसिपालिट्यांनीं नियमाप्रमाणें हिशेब ठेवलेला नाहीं.

उत्पन्नापेक्षां खर्च प्रत्येक ठिकाणीं जास्त आहे. प्रत्येक वेळीं टेंडरें स्वीकारतांना सर्वांत महाग होतीं तीं स्वीकारलेलीं आहेत. उघळपट्टी, लांचलुचपत, अफरातफर यांचा सर्वत्र बुजबुजाट आहे. अफरातफरीचीं एकंदर ९१ प्रकरणें उघडकीस आलीं आहेत आणि असें असून सरकारनें तिकडे दुर्लक्ष केलें आहे. (३) पब्लिक सर्व्हिस कमिशनच्या प्रांतोप्रांतींच्या अहवालावरून आपल्या सरकारी कारभाराचें रूप असेंच ओंगळ असल्याचें दिसून येतें. संघराज्याचें एक व प्रत्येक प्रदेश राज्याचें एक अशीं पब्लिक सर्व्हिस कमिशनें नेमावीं व सरकारी खात्यांतील वरिष्ठ जागा त्यांच्या शिफारसीअन्वयेंच भराव्या, असा भारताच्या घटनेंतील ३२०–३ या कलमानें दण्डक घातलेला आहे. वशिलेबाजी, लांचलुचपत याला आळा बसावा हा यांतील हेतु आहे. पण बहुतेक सर्व प्रांतांतील राज्यसरकारें या कलमाचा भंग करीत आहेत. मध्यप्रदेशांतील प. स. कमिशनचे अध्यक्ष भवानीशंकर नियोगी यांनीं प्रतिवर्षी राष्ट्राध्यक्षांना सादर करावयाच्या अहवालांत स्पष्टपणें असें नमूद केलें आहे कीं, आपापल्या खात्यांत नेमणुका करतांना सरकारी अधिकारी आम्हांला विचारीत नाहींत. शिक्षण, जंगल या खात्यांनीं आपल्याच मर्जीप्रमाणें नेमणुका केल्या. आणि जाब विचारला तेव्हां, कार्यक्षमता वाढावी व काम त्वरित व्हावें या हेतूनें असें केलें, असें उत्तर दिलें. नेमणुका करतांना सर्व कागदपत्रें कमिशनकडे धाडलीं पाहिजेत हाहि नियम पाळलेला नाहीं. कित्येक वेळां तर नेमणुका केल्याचें कमिशनला कळविलेंहि नाहीं. (टाईम्स ऑफ इंडिया २–९–१९५०) हैद्राबाद, पंजाब येथील प. स. कमिशनच्या अध्यक्षांनीं अशाच तक्रारी नमूद केलेल्या आहेत. कमिशनला न विचारतां प्रत्येक खात्यांत सरकार वाटेल ती ढवळाढवळ करतें असें या अहवालांचें म्हणणें आहे. (सकाळ ३०–१२–५१) (४) शिक्षणसंस्था, विद्यामंदिरें हीं सरस्वतीचीं म्हणून मानलेलीं निवासस्थानेंहि या गलिच्छ अनीतीच्या रोगांतून मुक्त नाहींत. आग्रा व अलाहाबाद विद्यापीठांच्या कारभारासंबंधीं उत्तर प्रदेशच्या शिक्षणमंत्र्यांनीं जें निवेदन केलें आहे तें वांचून कोणालाहि धक्का बसल्याखेरीज रहाणार नाहीं. वशिलेबाजी, खाबूपणा, लांचलुचपत, हे सर्व प्रकार या विद्यापीठांत १९४१ सालापासूनच असल्याचें निदर्शनास येत आहे. स्वातंत्र्यानंतर ते कमी न होतां सहस्रपटीनें

वाढलेच आहेत असें या शिक्षणमंत्र्यांनीं सांगितलें आहे. सीनेटमध्यें निवडून येण्यासाठीं मतें मिळवून दिलीं, किंवा प्रत्यक्ष पैसे दिले तरच या विद्यापीठांत परीक्षक नेमले जातें. कांहीं केवळ मॅट्रिक झालेल्या गृहस्थांना एम्. ए. चे परीक्षक नेमलें होतें. अधिकाऱ्यांच्या नात्यांतील विद्यार्थ्यांना पहिला वर्ग देण्याचें अमान्य केल्यामुळें कांहीं विद्वानांचें परीक्षापद गेलें. अशा योजनेमुळें अगदीं रद्दी विद्यार्थ्यांना तेथें एम्. ए. च्या परीक्षेत सहज पहिला वर्ग मिळतो. आणि या सर्व प्रकारची दखल सरकार घेणार आहे म्हणून या विद्यापीठांचे अधिकारी सध्यां संतप्त झाले आहेत. ( टाइम्स ऑफ इंडिया १९-११-५२ ) आपला एकंदर राज्यकारभार नीतीच्या दृष्टीनें कोणच्या पातळीवर जाऊन बसला आहे याची यावरून सहज कल्पना येईल. हल्लीं मुळीं सर्वत्र असा नियमच झाला आहे कीं एखादें धरण बांधण्यासाठीं, लोकांना कर्ज देण्यासाठीं, सहकारी तत्त्वावर पुनर्रचना करण्यासाठीं सरकारनें एखादें खातें किंवा संस्था स्थापिली कीं एक वर्षाच्या आंत तिच्या कारभारांतील वशिला, लांच, गोंधळ यांची चौकशी करण्यासाठीं एक कमिशन नेमावें लागतें !

आपल्या देशाला सर्व दृष्टींनीं असा जो विपरीत काळ प्राप्त झाला आहे त्याचें प्रधान कारण म्हणजे कॉंग्रेस या संस्थेचा अधःपात हें होय. या देशाच्या उन्नतीचें श्रेय जसें बव्हंशीं कॉंग्रेस या संस्थेलाच आहे त्याचप्रमाणें त्याच्या अधोगतीचेंहि खापर बव्हंशीं तिच्याच माथीं फुटणार अशी भवितव्यता दिसत आहे. शरीरांत हात, पाय, काळीज, फुफ्फुस, मेंदू, या सर्व अवयवांचें महत्त्व आपापल्यापरी आहेच. पण या सर्वांना संघटित करून, त्यांच्यांत प्राण भरून, त्यांचा कारभार एकसूत्री ठेवून सर्व शरीरांत एकत्व व तज्जन्य चैतन्य प्रस्थापित करण्याचें कार्य आत्मा करीत असतो. भारती राष्ट्र पुरुषाच्या देहांत हें कार्य कॉंग्रेस इतके दिवस करीत होती. त्याच्या आत्म्याच्या ठायीं स्वातंत्र्यपूर्व कालांत ही संस्था होती. तो आत्मा स्वातंत्र्यानंतर नष्ट झाला. आणि आतां या देशाची अवस्था एकाद्या कलेवरासारखी होऊन त्याचीं अंगें व उपांगें विघटित होऊं पहात आहेत. मागें राजकीय पुनर्घटना या लेखांत पंडित जवाहरलाल नेहरू, सरदार पटेल, राष्ट्राध्यक्ष राजेंद्रबाबू यांचीं जीं अनेक वचनें उद्धृत केलेलीं आहेत

व आपण डोळ्यांनीं जें चित्र नित्य पहात आहोंत त्यावरून वस्तुस्थिति अशी झाली आहे याबद्दल कोणी वाद करील असें वाटत नाहीं. येथें मानवपुनर्घटनेशीं त्याचा संबंध काय हें दाखवून आपणांस पुढें जावयाचें आहे.

अगदीं लहान अशा कुटुंबसंस्थेपासून राष्ट्र या व्यापक संस्थेपर्यंत सर्व संस्थांच्या इतिहासांतून असा एक नियम दिसून येतो कीं या संस्थांत ध्येयवादानें प्रेरित होऊन अहोरात्र तिच्या भवितव्याची काळजी करीत, यातना व कष्ट सोशीत, एखादी थोर व्यक्ति जेव्हां अखंड जळत रहाते तेव्हांच त्यांच्यांत जिवंतपणा टिकून राहतो. खोलीमध्यें एखादा दिवा जळत असला म्हणजे ज्याप्रमाणें भोंवतालच्या अंधारांतला कणनूकण उजळून निघत असतो त्याप्रमाणें जेव्हां राष्ट्रांत एकादा महापुरुष ध्येयवादाच्या आगींत उभा राहून नित्य जळत रहातो तेव्हां इतरांच्या मनांतील हीन भाव नित्य उजळून निघतात व त्यांचें सात्त्विक गुणांत रूपांतर होत रहातें. ज्या संस्थेच्या नेतृत्वानें राष्ट्राचें कार्य चालू असतें ती जोपर्यंत ध्येयवादानें प्रेरित झालेली असते, आपण केलेल्या कष्टाचें फळ राष्ट्राच्याच पदरीं पडणार आहे अशी तिच्या निःस्वार्थीपणामुळें जनतेची जोपर्यंत खात्री असते तोपर्यंत जनताहि ध्येयवादानें प्रेरित होऊन निःस्वार्थीपणें कष्ट करण्यास सिद्ध होते; आणि जनतेच्या या सहकार्यानेंच राष्ट्रीय प्रपंचाचा गाडा ओढणें शक्य होतें. स्वातंत्र्याच्या पूर्वकालांत कॉंग्रेस ही अशी ध्येयवादानें प्रेरित झालेली संस्था होती आणि त्यामुळेंच जनतेचें सहकार्य मिळविण्याचें सामर्थ्य व पुण्याई तिच्या ठायीं निर्माण झाली होती. आणि म्हणूनच स्वातंत्र्याच्या लढ्यांत आत्मबलिदान करण्याइतकें सहकार्य करण्याची प्रेरणा ती लक्षावधि लोकांच्या मनांत निर्माण करूं शकली. आपल्या ध्येयवादानें, निःस्वार्थीपणामुळें नित्य जळत रहाण्याच्या धैर्यामुळें अखिल जनतेचें सहकार्य प्राप्त करून घेण्याची जी पुण्याई तोच राष्ट्राचा आत्मा होय. ती पुण्याई, तो आत्मा आज नष्ट झाला आहे व त्यामुळें या देशाचें कलेवर होऊं पहात आहे.

स्वातंत्र्यानंतर आपल्या देशाची आपल्याला पुनर्घटना करावयाची होती. ती केवळ कॉंग्रेसला आपल्याच संघटनेच्या बळावर करणें अशक्य होतें.

जनतेचें तन मन धन या कार्यासाठीं राबणें अवश्य होतें. हजारो सुशिक्षित तरुण, लक्षावधि शेतकरी व कामगार, यांचे बौद्धिक व शारीरिक कष्ट, आणि कोट्यवधि जनतेचा मनोमन पाठिंबा यांची या कार्याच्या सिद्धतेला आवश्यकता होती. आपल्याजवळ भांडवल नाहीं, अन्नधान्य नाहीं, यंत्रें नाहींत, इतर साधनसामुग्री नाहीं; तज्ज्ञ लोक आपल्याकडे कमी, कसबी कामगार कमी, प्रत्यक्ष कामाचा अनुभव कमी; अशा सर्व उणीवा होत्याच. पण त्या उणीवा कार्यसिद्धीच्या आड आल्या नसत्या. म्हणजे भांडवल किंवा साधनसामुग्री यांच्यावांचून कामें झालीं असतीं असा भावार्थ नाहीं. तर त्या उणीवा भरून काढणें शक्य झालें असतें. केव्हां ? कॉंग्रेसची पुण्याई कमी झाली नसती तर. आपल्या राष्ट्राच्या कर्णधारांप्रमाणेंच त्यांच्या नेतृत्वानें काम करणारे प्रांतोप्रांतींचे नेते आणि त्यांच्या शिस्तींत वागणारे जिल्ह्यांतले, तालुक्यांतले, शहरांतले, गांवांतले कार्यकर्ते हे त्यागी आहेत, निःस्वार्थी आहेत, आपल्या ( म्हणजे जनतेच्या ) हितासाठीं ते आहोरात्र कष्टत आहेत असा विश्वास जनतेच्या ठायीं निर्माण झाला असता तर अर्धपोटी राहून उन्हातानाची पर्वा न करतां, अपयशानें निराश न होतां, आपल्या राष्ट्रांतल्या कोट्यवधि सुशिक्षित अशिक्षित नागरिकांनीं कॉंग्रेसशीं हार्दिक सहकार्य केलें असतें. आणि मग इकडचे पर्वत तिकडे सहज फेकून देतां आले असते. आज कॉंग्रेसला भांडवलदारांचें दास्य पतकरावें लागलें आहे असें आपण ऐकतों. पण हीहि गोष्ट सध्यांच्या स्थितींत अपरिहार्य म्हणून जनतेनें मान्य केली असती. कॉंग्रेसचे मोठमोठे पदाधिकारी व हजारों कार्यकर्ते हे आपले आहेत, जनतेच्या हितावांचून त्यांना अन्य दृष्टि नाहीं ही खात्री जनतेला मनोमन पटली असती तर वाटेल त्या आपत्तीशीं झुंज देण्यास ती सिद्ध झाली असती. भावी काळाच्या आशेच्या प्रेरणेनें तिनें वर्तमानकाळाचे कष्ट, यातना, उपासमार सर्व कांहीं आनंदानें साहिलें असतें. इंग्रजांचें राज्य होतें तेव्हां हें दिसून आलें नाहीं काय ? तुरुंग, लाठीमार, गोळीबार, संसाराचा विध्वंस हें सर्व समोर दिसत असूनहि कॉंग्रेसशीं सहकार्य करून आत्मबलिदान करण्यासहि लक्षावधि भारतीय पुढें आले. आतांच्या आपत्ति तुरुंग, गोळीबार त्यांच्या मानानें कांहींच नाहींत. कष्ट करून जें फल मिळवावयाचें तें पूर्वीसारखें दूरवरचें, अनिश्चित असेंहि नाहीं. असें असूनहि, कॉंग्रेसमध्यें तरुण

रक्त येत नाहीं, असे दुःखाचे, निराशेचे उद्गार पंडितजींना काढावे लागतात. आणि जनतेचें सहकार्य मिळत नाहीं, तिच्या मनांत कॉंग्रेसविषयीं तिटकारा येत चालला आहे, असें शेंकडो अधिकाऱ्यांना जाहीरपणें सांगावें लागतें. यांचें कारण एकच. भांडवल नाहीं, यंत्रें नाहींत, साधनसामुग्री नाहीं हें कारण नव्हे. जनतेच्या सहकार्यावर हक्क सांगण्याइतकी पुण्याई कॉंग्रेसजवळ शिल्लक नाहीं ! त्याची अपेक्षा करण्याइतकाहि अधिकार तिला सांभाळून ठेवतां आला नाहीं. कॉंग्रेसला अनेक भयंकर आपत्तींना तोंड द्यावयाचें होतें हें खरें आहे. निर्वासितांचा प्रश्न, काश्मीरचें प्रकरण, संस्थानिकांचा प्रश्न, अन्नधान्याचा तुटवडा, दुष्काळ, टोळधाडी, महापूर, व्यापारी व भांडवलवाले यांचा स्वार्थ, कम्युनिस्ट लोकांचा दहशतवाद आणि स्टॅलिन-निष्ठा या सर्व आपत्ति अत्यंत भयानक व दुस्तर होत्या व आहेत याविषयीं शंका नाहीं. पण कॉंग्रेसची शुद्ध ध्येयनिष्ठा जर अचल, अभंग राहिली असती तर या प्रश्नांचें, या आपत्तींचें स्वरूप फार सौम्य झालें असतें, त्यांतल्या कांहीं नाहींशा झाल्या असत्या व कांहीं उद्भवल्याच नसत्या. आज कॉंग्रेसचे अधिकारी पुष्कळ वेळां जनतेला टाकून बोलतात. लोक अत्यंत स्वार्थी आहेत, आळशी आहेत, त्यांना समाजहितबुद्धि नाहीं, त्यांची दृष्टि संकुचित आहे, त्यांची अभिरुचि हीन आहे, सत्य, संयम, विवेक या गुणांशीं त्यांची ओळख नाहीं, आणि यामुळें कॉंग्रेसच्या प्रयत्नांना यश येत नाहीं, असें भाष्य करतात. भारतीय जनता अशी आहे याबद्दल वादच नाहीं. सामाजिक निष्ठा, जनहितबुद्धि, संघटनेसाठीं अवश्य असणारा विवेक या दृष्टीनें आपण अगदीं खालच्या पातळीवर आहों याबद्दल दुमत केव्हांहि नाहीं; पण स्वातंत्र्यापूर्वी जनता अशीच होती. नव्हे याहूनहि खालच्या पातळीवर होती. तशाहि स्थितींत कॉंग्रेसच्या नेत्यांनीं व हजारो कार्यकर्त्यांनीं आपल्या ध्येयनिष्ठेमुळें तिला उच्च कार्याची प्रेरणा दिली. जनतेला अशी प्रेरणा देऊन तिला उच्च पातळीवर चढविणें हेंच कॉंग्रेसचें कार्य आहे. जनता स्वार्थी आहे, आळशी आहे म्हणून आम्हांला यश येत नाहीं असें म्हणणें म्हणजे, अंधार काळा आहे म्हणून मला प्रकाशतां येत नाहीं, अशी दिव्यानें तक्रार करण्यासारखें आहे. अंधाराला उजळून

टाकण्यासाठींच दिवा जळत असतो. भोंवतालच्या जनतेंत उच्च संस्कृतीचें संवर्धन करण्यासाठींच तिचा नेता स्वतः तनमनधनानें जळत रहातो. तें व्रत त्यानें पाळल्यानंतर मग जनतेचा अधिक्षेप करण्याचा अधिकार त्याला प्राप्त होतो. एरवी नाहीं. जनता अधोगामी झाली हें कॉंग्रेसच्या अपयशाचें कारण नसून कॉंग्रेसची ध्येयच्युति ही जनतेच्या व राष्ट्राच्या अधःपाताचें कारण आहे.

कल्याणी येथील कॉंग्रेसच्या अधिवेशनांत पंडित जवाहरलाल यांनीं हाच महनीय विचार कॉंग्रेसजनांना ऐकविला. ते म्हणाले, कीं " गेल्या अनेक वर्षांच्या अनुभवानें माझ्या मनाची अशी निश्चिति झाली आहे कीं, आपण जनतेला योग्य तऱ्हेनें साद घातली तर ती उत्तम प्रतिसाद देते; पण जेथें प्रतिसाद मिळविण्यांत आपण अपयशी होतो तेथें दोष आपलाच असतो, जनतेचा नव्हे. "

कॉंग्रेस सध्यां किती पतित झाली आहे हेंहि पंडित जवाहरलाल नेहरू यांनीं अत्यंत उद्वेगून वेळोवेळीं जे उद्गार काढले आहेत त्यावरूनच दिसून येईल. जातीय संकुचित दृष्टि हा राष्ट्रीय जीवनांत फार मोठा रोग होय. या रोगानें कर्नाटक, राजस्थान, महाराष्ट्र, बिहार इ. अनेक प्रदेश ग्रस्त झालेले आहेत. उमेदवारांची निवड याच दृष्टीनें होणार व मतदानहि याच चाकोरींतून जाणार हें ठरलेलें आहे. निवडणुकीच्या प्रचारासाठीं रांची येथें पंडितजी गेले असतांना तेथें जातीयतेचा बुजबुजाट झालेला त्यांना दिसला. ' मी येथें आलो तो भारताच्या नागरिकांना भेटण्यास आलो होतो. रजपूत, भूमिहर, कायस्थ, अशा जातींना भेटावयास मी आलो नाहीं. येथें ही जातीयता बोकाळली आहे हें ऐकून मला फार दुःख झालें. जातीयवादी लोकांना मी कॉंग्रेसमधून हाकलून देईन ' असे उद्गार त्यांनीं तेथें काढले. ( टाइम्स ऑफ इंडिया १-१-५२ ) मद्रास प्रांतांत अनेक ठिकाणीं व आसाममध्येंहि निवडणुकींत यश यावें म्हणून कॉंग्रेस अत्यंत जातीय व पाकिस्ताननिष्ठ अशा मुस्लीम लीगशीं प्रेमानें सहकार्य करीत आहे हें प्रसिद्धच आहे. कॉंग्रेसच्या श्रेष्ठ सत्ताधाऱ्यांनीं त्या त्या स्थानिक अधिकाऱ्यांना याचा जाब विचारला; पण त्यांना कोणी भीक घालीत नाहीं

हेंहि आतां जनतेला माहीत झालें आहे. अखिल भारतीय काँग्रेससमितीवर निवडून येण्यासाठीं सध्यां कोणच्याहि पापमार्गाचा अवलंब करण्यास काँग्रेसजन भीत नाहींत. सभासदांची खोटी नोंद चालू आहे. मतासाठीं दारू व पैसा देण्यांत येत आहे. शेवटीं प्रतिपक्षाची टाळकीं फोडण्यासहि लोक कचरेनासे झाले आहेत. हैदराबादमध्यें असे प्रकार झाले त्यावरून पंडितजींनीं नागपूरच्या एका भाषणांत फार कडक उद्गार काढले. ' अशा लोकांना कसलीहि दयामाया न दाखवतां मी काँग्रेसमधून हाकलून देईन ' असें ते म्हणाले. ' सध्यां अनेक लोकांनीं काँग्रेसमध्यें प्रवेश करून विधिमंडळांत निवडून येणें हा धंदाच केलेला आहे. अशा प्रकारामुळेंच काँग्रेस अपयशी झाली आहे; पण मग तें तिला योग्य शासनच झालें असें म्हटलें पाहिजे. ' असे निराशेचे उद्गार त्यांनीं काढले. ( भारत-ज्योति २-११-५२ ) निवडणुकीनंतर सत्ता हातांत आल्यावर राष्ट्राचें धन आपल्या सग्यासोयऱ्यांना वांटून देणें, निवडणुकींत ज्यांनीं साह्य केलें त्याची भर करणें हे प्रकार सर्व प्रदेशांत काँग्रेस करीत आहे. बिहारमध्यें ४०० एकर जमीन अशा तऱ्हेनें दिली गेली. त्या प्रकरणाची चौकशी करण्यासाठीं काँग्रेस सत्ताधरांनीं एक समिति पण नेमली होती. ( टाइम्स १२-११-५२ ) विघटना, दुफळी, अंतःकलह या रोगानें काँग्रेस किती नासली आहे व हा रोग नष्ट करण्याच्या बाबतींत पंडितजी, सरदार पटेल, राजेंद्रबाबू हे धुरीण कसे निराश झाले आहेत हें मागें 'राजकीय पुनर्घटना' या लेखांत दाखविलेंच आहे. नित्याच्या सरकारी कारभारांत हस्तक्षेप करावयाचा व आपल्या वशिल्याच्या माणसांना नोकऱ्या द्यावयाच्या, कोणावर गुन्हेगारीसाठीं खटले झाले असल्यास ते काढून टाकावयास भाग पाडावयाचें, कंत्राटें आपल्या सग्यासोयऱ्यांना द्यावयाची ही प्रवृत्ति काँग्रेस पदाधिकाऱ्यांत किती प्रमाणांत आहे हें गोरावाला, राजाजी, काटजू यांनीं अनेक वेळां दाखवून दिलें आहे. त्याचा अहवाल सरकारनेंच प्रसिद्ध केला आहे. मागें एकदां पंडितजी मुंबईला आले होते तेव्हां काँग्रेसकार्यकर्त्यांपुढें त्याचें जें ६-१२-५२ रोजीं भाषण झालें त्यांत त्यांनीं काँग्रेसच्या नीतीवर थोडक्यांत हीच टीका केली. ' काँग्रेसच्या अधि-वेशनाला अगदीं कमी सभासद आले तरी चालतील; पण वाममार्गानीं

निवडून आलेले लोक मला मुळींच चालणार नाहींत. मी हा प्रकार मुळींच सहन करणार नाहीं. आज कॉंग्रेसजन जातीय व जमातीय भावना चेतवून आपली स्वतःची पोळी पिकवीत आहेत. ही वृत्ति त्यांनीं टाकून दिली पाहिजे. त्याचप्रमाणें आपसांतील चुरस, हेवेदावे हेहि बंद केले पाहिजेत. कॉंग्रेसला एक राष्ट्रीय संघटना म्हणून जगावयाचें असेल तर तिनें आपली धर्मातीत ध्येयवादी वृत्ति कायम ठेवली पाहिजे.' ( भारतज्योति ७-१२-५२ ) पंडित नेहरूंच्याप्रमाणेंच तंडनजी, विनोबाजी यांनीं कॉंग्रेसच्या अधोगामी प्रवृत्तीवर टीका केली आहे आणि मध्यप्रांतांतील जगन्नाथप्रसाद शास्त्री यांच्यासारख्या निष्ठावंत जुन्या कार्यकर्त्यांना कॉंग्रेसच्या अनीतीचा इतका उबग आला आहे कीं, ते निराशेनें आत्महत्येचा मार्ग अनुसरीत आहेत.

कॉंग्रेसमधील ही अनीति, हें पाप धुवून काढण्याचा प्रयत्न स्वातंत्र्य-प्राप्तीच्या काळापासून गेलीं पांचसहा वर्षें कॉंग्रेसचे पुढारी अखंडपणें करीत आहेत; पण त्याचा काडीइतकाहि उपयोग होत नाहीं, असें दिसतें. प्रत्येक सभेंत, प्रत्येक बैठकींत, प्रत्येक परिषदेंत पटेल, नेहरू, राजेन्द्रबाबू, तंडनजी, पट्टाभि यांच्या भाषणांचा गेलीं पांचसहा वर्षें हा एकच सूर होता. 'ध्येयच्युत होऊं नका, स्वार्थाला बळी पडूं नका, क्षुद्र मोहाला वश होऊन राष्ट्रहिताचा बळी देऊं नका' असा कॉंग्रेसजनांच्या कानीं-कपाळीं सारखा उपदेश ते करीत आहेत. पण त्यांचा हा उपदेश अरण्यरुदनासारखा ठरत आहे. सध्यां कॉंग्रेसच्या अनुयायांचें सत्त्वच ढळल्यासारखें झालें आहे. स्वार्थ, लोभ, मोह यांनीं ते अंध व पिसाट झाले आहेत. नेहरू, राजेन्द्रबाबू हे त्यांच्या लेखी आतां कोणी नाहींत. यामुळे या थोर धुरंधरांच्या तोंडीं अनेक वेळां निराशेचे उद्गार आलेले दिसतात. अहमदाबादच्या भाषणांत नेहरू म्हणाले, 'कॉंग्रेसचा विनिपात होणार हें मला स्पष्ट दिसत आहे. सध्यां आपण केवळ बहुसंख्येच्या जोरावर देशाची विकलता झांकून ठेवीत आहोंत. कसला तरी एक भयंकर रोग कॉंग्रेसच्या काळजाला झाला आहे व त्यामुळें ती आंतून सडत चालली आहे. आज कॉंग्रेसमध्यें चैतन्य उरलेलें नाहीं व इतरांना ती चैतन्य देऊं शकत नाहीं.' ( टाइम्स-३०-१-५१ ) अशा तऱ्हेचे निराशेचे, कठोर, कानउघाडणीचे उद्गार गेली तीनचार वर्षें या थोर पुरुषांच्या तोंडून ऐकत असूनहि कॉंग्रेसजनांच्या पापप्रवृत्ति रतिमात्र कमी पडत नाहींत.

उलट त्या वाढतच आहेत, असें अखिल भारतीय कॉंग्रेसकमिटीच्या निवडणुकांतील प्रकरणांवरून दिसून येतें.

उपदेशाचा सौम्य मार्ग खुंटल्यानंतर दुसरा शिक्षेचा मार्ग उरतो. त्यानें कदाचित् सुधारणा होईल, असें वाटतें; पण कॉंग्रेसच्या नेत्यांनीं त्याचा अजून अवलंब केलेला नाहीं. पंडितजींनीं तसा धाक अनेक वेळां दाखविलेला आहे. जातीयवादी, स्वार्थी, पापभ्रष्ट, अधोगामी सभासदांना मी कॉंग्रेसमध्यें राहूं देणार नाहीं, हाकलून लावीन, असे निकराचे उद्गार त्यांनीं अनेक वेळां काढलेले आहेत. काळा बाजार करणाऱ्यांना तर फांशीं देण्याचीहि धमकी त्यांनीं दिलेली आहे; पण प्रत्यक्षांत तसें त्यांनीं कधींच केलेलें नाहीं. उलट मद्रास, बंगाल येथील कॉंग्रेसच्या मंत्रीगणांचे भयंकर पापमार्ग त्यांच्या निदर्शनास आणून दिल्यावर व त्यांना त्यांतील गुन्हेगारी पटल्यावरहि त्यांच्याकडे त्यांनीं दुर्लक्षच केलेलें आहे. याचें कारण काय तें नेमकें सांगणें कठीण आहे; पण आभाळच फाटल्यानंतर टांका कोठें घालावा अशी बहुधा पंडितजींची स्थिति झाली असावी. कॉंग्रेसजनांच्या अधःपाताची, अनीतीची भ्रष्टतेची ही दुःखद कहाणी एका प्रदेशाची नसून भारतांतील प्रत्येक गांवाची, शहराची, तालुक्याची व जिल्ह्याची आहे. सरकारी खात्यांकडे पाहिलें तरी तोच प्रकार आहे. अशा स्थितींत शिक्षा कोणाकोणाला करावयाची व हाकलून तरी कोणाकोणाला काढावयाचें ! अर्थात मनांत अनेक वेळां असें येतें कीं प्रारंभीं पापप्रवृत्ति दिसूं लागतांच पंडितजींनीं कठोरपणा धारण करून खरोखरच कांहीं मोठमोठ्या पदाधिकाऱ्यांना कडक शिक्षा केल्या असत्या, तर सर्वांनाच दशहत बसून या रोगाची लागण थांबली असती. पण प्रत्यक्ष त्या स्थानीं असलेल्या माणसाला त्याच्या अडचणी माहीत असतात. त्यामुळें या बाबतींत तर्कवितर्क करण्यांत तथ्य नाहीं. वस्तुस्थिति अशी आहे कीं, राष्ट्राच्या आत्म्याच्या ठायीं असलेली, राष्ट्राच्या उन्नतीची, बलसंवर्धनाची, विकासाची सर्व जबाबदारी जिच्या शिरावर आहे, अशी कॉंग्रेस ही एकमेव संस्था कमालीची अधोगामी झाली आहे आणि तिच्यांत सुधारणा होण्याची आशा तिच्या धुरंदर नेत्यांनाहि फारशी वाटत नाहीं. हें ध्यानांत घेऊन या विलक्षण आपत्तीच्या प्रसंगीं आपल्या लोकशाहीच्या रक्षणसंवर्धनाच्या दृष्टीनें भारताच्या नागरिकांनीं कोणची योजना

केली पाहिजे, कोणचे प्रयत्न केले पाहिजेत, हा आपल्यापुढें महत्त्वाचा प्रश्न आहे.

आपल्याला जो लढा लढावयाचा आहे, तो सत्त्व विरुद्ध तमोगुण असा लढा आहे. लोकसत्तेमध्यें हा लढा अटळ असतो. ब्रिटन व अमेरिका या जगांतल्या बलशाली व यशस्वी अशा लोकसत्ता आहेत. त्यांना प्रारंभापासून हा लढा लढावा लागलेला आहे. दोनहि देशांत औद्योगिक क्रांतीनंतर भांडवलशाही अत्यंत प्रबळ होऊन लोकांच्या तमोगुणांना आवाहन करून अनियंत्रित होऊं पहात होती; या वेळीं तेथें या धनशक्तीशीं लोकशक्तीनें कसा संग्राम केला हें पहाणें उद्‌बोधक होईल आणि त्यावरून कदाचित् आपल्याला आपली लोकसत्ता यशस्वी करण्याचा मार्ग सांपडेल.

थॉमस जेफरसन, ॲब्राहम लिंकन, थिओडोर रूझवेल्ट, विड्रो विल्सन, व फ्रँकलिन रूझवेल्ट या पांच अमेरिकन थोर पुरुषांनीं अमेरिकेंतील हीन प्रवृत्तींशीं संग्राम करून तेथील लोकसत्ता यशस्वी केली आहे. त्यांनीं हा संग्राम कशाच्या बळावर केला हें आपण पाहूं लागलों, तर आपणांस एक अगदीं निश्चित, अगदीं निर्णायक असें उत्तर मिळतें. तें बळ म्हणजे चारित्र्य हें होय. एक ध्येयवादी निष्ठावंत पुरुष लोकसेवेचें व्रत घेऊन, त्याच्या आड येणाऱ्या स्वार्थी धनशक्तीशीं प्राणपणानें झुंज घेण्यास सिद्ध झाला, ध्येयवादाच्या आगींत तो सतत जळत राहिला कीं, त्याच्या तेजांतून अनेक स्फुल्लिंग बाहेर पडतात व मग अनेक निष्ठावंत कार्यकर्ते निर्माण होतात. सर्व देशभर धनशक्तीनें चालविलेल्या अन्यायाचा त्यांनीं डांगोरा पिटण्यास प्रारंभ केला कीं, कालांतरानें लोकशक्ति जागृत होते आणि तिच्यापुढें धनशक्तीला—कोणच्याहि पापशक्तीला—नमावें लागतें. लोकसत्तेच्या यशाचा हा एकमेव राजमार्ग आहे.

अमेरिकेचे पहिले अध्यक्ष जार्ज वॉशिंग्टन निवृत्त झाल्यावर तेथील राजकारणांत दोन पक्ष उघड दिसूं लागले. जॉन ॲडम्स व अलेक्झांडर हॅमिल्टन यांचा फेडरॅलिस्ट पक्ष व दुसरा जेफरसन यांचा डेमॉक्रट पक्ष. पहिला धनशक्तीचा व दुसरा लोकशक्तीचा उपासक होता. जेफरसनचा

चारित्रकार म्हणतो, ' जेफरसनला असें दिसून आलें कीं, अमेरिकेनें ब्रिटनचें जूं झुगारून दिलें तरी ती खरी स्वतंत्र झालेली नाहीं. दुसरी एक मदांध व जुलमी सत्ता आपल्या देशाला बेड्या घालणार असें त्याला दिसूं लागलें. ती सत्ता म्हणजे धनसत्ता होय. अमेरिकन क्रांतींत ज्यांनीं आपलें रक्त सांडलें त्यांना आतां असें आढळून आलें कीं, इंग्लिश राजशाही आपण नष्ट केली, पण तिच्या जागीं तितकीच अनियंत्रित व जुलमी अशी धनशाही प्रस्थापित होऊं पहात आहे. धनाचें उत्पादन करणारे कष्टाळू लोक व त्यांची पिळवणूक करणारे धनिक लोक यांचा संग्राम झडणार हें स्पष्ट दिसूं लागलें. या संग्रामांत जेफरसननें कष्टाळू जनतेची बाजू घेतली आणि अखेर धनसत्तेवर मात केली. या वेळीं धनशक्तीनें आपलें सर्व सामर्थ्य पणास लावून जेफरसनविरुद्ध फळी उभी केली होती. असें असूनहि हा लढा जेफरसननें कशाच्या बळावर जिंकला हें समजून घेण्यासाठीं भारतांतील तरुण नागरिकांनीं जेफरसनच्या चारित्राचा जरूर अभ्यास करावा.

ॲब्राहम लिंकन यांच्याजवळहि ध्येयनिष्ठा, चारित्र्य याखेरीज दुसरें कोणचेंहि बळ नव्हतें. चारित्र्य याचा एक विशिष्ट अर्थ येथें अभिप्रेत आहे. सार्वजनिक प्रपंच प्रामाणिकपणें, निःस्वार्थी बुद्धीनें व ध्येयनिष्ठेनें करण्याची प्रवृत्ति हा तो अर्थ आहे. अनंत यातना सोसाव्या लागल्या, तुरुंग, छळ किंवा देहदंडहि सोसावा लागला तरी लोकसेवाव्रतापासून च्युत न होता मृत्यूलाहि भिवविणारें जें धैर्य हे पुरुष प्रगट करतात, त्याचें नांव चारित्र्य. या मार्गांत तुरुंग किंवा मृत्यु यांच्याप्रमाणेंच अनेक प्रकारचे लोभमोहहि आड येतात. त्यांना जिंकून आपलें व्रत अखंडपणें चालविण्याचा जो निर्धार तें चारित्र्य होय. या चारित्र्याला दुर्जय अशी कोणचीहि शक्ति जगांत नाहीं आणि याचें कारण अगदी उघड आहे. माणूस ध्येयनिष्ठेनें झिजत राहिला, कीं त्याला पाहून लोक जागे होऊं लागतात. त्याची ध्येयनिष्ठा जसजशी कसाला लागत जाते, तसतसें त्याचें तेज वाढूं लागतें व लोक त्याच्या नेतृत्वाखालीं संघटित होतात आणि मग देशांत लोकशक्ति निर्माण होते. धनिक लोक पैशाच्या बळावर एरवी लोकांना वश करून ठेवीत असतात; पण चारित्र्याची पुण्याई अशी आहे कीं, तिच्यामुळें लोकांच्या मनांतील धनमोह नष्ट होऊन त्यांच्या ठायीं त्यागबुद्धि,

जनहितबुद्धि, आत्मयज्ञ करण्याची वृत्ति म्हणजेच चारित्र्य निर्माण होतें आणि मग जें सामर्थ्य धनसत्तेचें गुलाम होऊन पडलेलें असतें, तेंच राष्ट्रसेवेच्या कारणीं लागतें. म्हणून सार्वजनिक प्रपंचांत लोकसेवा करतां करतां तनमन झिजवीत स्वतः चारित्र्य ही महाशक्ति संपादन करणें व इतरांच्या ठायीं ती निर्माण करणें हा एकच मार्ग भारतीय तरुणांनीं यापुढें अवलंबिला पाहिजे.

या शतकाच्या आरंभीं आठ वर्षें अमेरिकेचे अध्यक्ष असलेले थिओडोर रूझवेल्ट यांनीं याच बळावर भांडवली सत्तेला नमविलें. रिपब्लिकन पक्षांत प्रवेश करून प्रथम राष्ट्रीय प्रपंचांतील विशुद्ध चारित्र्याची महती ते वर्णूं लागले, तेव्हां त्या पक्षाचे मालक म्हणजे तेथील धनश्रेष्ठी त्यांना हसूं लागले. त्यांना एका बाजूला नेऊन त्यांनीं पोक्तपणें उपदेश केला कीं, 'राजकारणांत नैतिक शुद्धि आणण्याच्या वेड्या कल्पना तूं सोडून दे. स्वतःचें कल्याण साधणें हेंच तुझें उद्दिष्ट ठेव. बहुजनांच्या कल्याणाच्या नादीं लागणें व येथल्या श्रेष्ठींच्या धनाला व सत्तेला मर्यादा घालणें हा तुझा धंदा नव्हे. यांत तूं फुकट मरशील.' थिओडोरनें हा उपदेश मानला नाहीं व आपली शुद्धीची मोहीम सुरू केली. न्यायखात्यांतील लांचखाऊपणा प्रथम त्यानें उघडकीस आणला. नंतर रेल्वेकारभारावर हल्ला चढविला. न्यूयॉर्कची एलिव्हेटेड रेल्वे कंपनी सर्व विधिमंडळाला लांच देण्यास तयार होती. तो डाव त्यानें हाणून पाडला. नंतर त्यानें पोलीसखात्यांत प्रवेश करून घेतला व तें सर्व खातें पोलीसांच्या पितळी बटनाप्रमाणें लखलखीत करून टाकलें. हा दणका पहातांच रिपब्लिकन पक्षांतील जेठी वचकले. त्यांनीं त्याला उपाध्यक्षपद देण्याचें ठरविलें. अमेरिकेंत उपाध्यक्षपद हें कर्त्या पुरुषांचें थडगें आहे असें मानतात. कारण त्या आसनावर गेलेल्या माणसाचा जनतेशीं संबंध रहात नाहीं व मग तो शक्तिहीन होतो. आणि म्हणूनच रिपब्लिकन जेठींनीं थिओडोर रुझवेल्ट यांना तेथें गाडून टाकण्याचा विचार केला. पण त्यांच्या दुर्दैवानें अध्यक्ष मॅकिनले यांचा एक महिन्यांतच खून होऊन रुझवेल्ट अध्यक्षपदीं आले. तेथें येतांच ट्रस्टस्, कंबाइन्स्, कार्पोरेशन्स यांच्या नियंत्रणाचे कायदे करून जनतेचें बळ त्यांच्यामागें उभें करून त्यांनीं धनसत्तेला नामोहरम केलें. एवढें सांगून चरित्रकार म्हणतो

कीं, या सर्व अनुभवावरून रुझवेल्ट यांच्या मनाची खात्री झाली कीं, व्यक्तीचें नैतिक सामर्थ्य हीच समाजाचें भवितव्य ठरविणारी निर्णायक शक्ति होय. प्रारंभीं सांगितलेलें मानवधन तें हेंच होय.

अध्यक्ष विड्रो विल्सन यांनीं हेंच धोरण पुढें चालवून धनशक्तीशीं संग्राम चालू ठेविला. त्यांच्या चारित्र्याची कीर्ति आधींच सर्वत्र पसरली होती. यामुळें डेमोक्रॅटिक पक्षानें आपण होऊन त्यांच्याकडे शिष्टमंडळ पाठवून त्यांना न्यूजर्सीचें गव्हर्नरपद स्वीकारण्याची विनंति केली. ही गोष्ट लक्षांत ठेवण्याजोगी आहे कीं धनाचें स्वामी किंवा भांडवलदार किंवा पक्षाचे पडद्यामागचे जेठी यांना जनतेला प्रिय असलेल्या चारित्र्यसंपन्न माणसांची नेहमींच आवश्यकता असते. आपलीं व्यभिचारकर्में लपविण्यासाठीं त्यांना कुंकवापुरता पति हवा असतो. केव्हांहि पाहिलें तरी राष्ट्रांत जागरूक जनता हीच निर्णायक शक्ति असते. या जागरूक जनतेला आपल्या पाठीशीं घेण्यासाठीं त्यांना असा एखादा पुरुष हवाच असतो. तो पक्षांत आला कीं आपल्या चौकटींत बसवून त्याला निस्तेज करून टाकावयाचें हें त्यांचें धोरण असतें. आणि हा माणूस कच्चा असला तर तेथें त्या सुखासनावर बसून आपल्या नांवाचा त्या जेठींना उपयोग करूं देतो. विड्रो विल्सनवर डेमोक्रॅटिक पक्षांतील जेठींना हाच प्रयोग करावयाचा होता; पण ह्या पुरुषाची ध्येयनिष्ठा अभंग असल्यामुळें त्यांचीच आंतडी फाडून तो बाहेर आला. पक्षाचा चालक जिमस्मिथ याच्याच डोक्यावर त्यानें पहिला घण घातला. तो निवडणुकीस उभा रहाणार होता; पण ‘ तूं चारित्र्यहीन व नालायक आहेस ’ असें सांगून विल्सननीं, त्यांच्याच पक्षांत तो असूनहि, त्याला विरोध केला आणि त्यानें उर्मट उत्तरें करतांच जनतेपुढें त्याच्यावर भडिमार करून त्याचीं हाडें मोडून टाकलीं. दातीं तृण धरून विल्सनपुढें त्याला शरणागति पतकरावी लागली. विल्सन हा एक शिक्षकाचा पेशा असलेला सामान्य माणूस. त्यानें या तमोगुणी धनशक्तीला कशाच्या जोरावर नमविलें ! पैशाच्या जोरावर धनवंतांनीं वश केलेली लोकशक्ति चारित्र्याच्या बळावर त्यानें खेचून आपल्या मागें आणली ! याच सामर्थ्याच्या जोरावर त्यांनीं आपलें श्रेष्ठ ध्येय साध्य करून घेतलें. पूर्वी राजसत्ता ही ईश्वरदत्त असते असें मानीत. आतां भांडवलदारांचा तसाच समज होऊं लागला

होता. भांडवलसत्ता ही ईश्वरदत्त असते हा भ्रम नष्ट करून सर्व सत्ता जनतेकडून मिळत असते हें अमेरिकेंत प्रत्यक्षांत सिद्ध करणें हें अध्यक्ष विल्सन यांचें ध्येय होतें. हें ध्येय सतत डोळ्यापुढें ठेवून आपल्या चारित्र्याच्या पुण्याईनें त्यांनीं तें बव्हंशीं साध्य केलें होतें.

फ्रँकलिन डेलानो रूझवेल्ट यांच्या चरित्राचें हेंच सार आहे. त्यांच्या पत्नी एलिनॉर या ध्येयवादी होत्या. 'दलित जनतेचा दुःखभार हलका करण्यासाठीं कांहीं उपाययोजना झालीच पाहिजे आणि ती करणें हें तुमचें जीवितकार्य आहे' अशी प्रेरणा पतीला त्या नित्य देत असत. त्यांच्याहि चित्तांत या थोर कार्याचें स्फुरण झालें. आणि मग लोकसेवेच्या खडतर मार्गानें रूझल्वेट यांनीं प्रवास सुरू केला व अखेर शिखर गांठलें. प्रारंभापासूनच स्वपक्षांतल्या श्रेष्ठींच्या विरुद्ध त्यांनीं पाय रोवला होता. नवीनच उगवलेल्या या 'उपटसुंभाला' प्रथम कोणी विचारीना. पण पैशाला व अन्य मोहांना तो वश होत नाहीं असें दिसतांच ते दचकले व डोळे चोळून पाहूं लागले. त्याच्या सत्त्वापुढें त्यांना नमावें लागलें. धनशक्तीशीं उभा दावा असूनहि चार वेळां फ्रँकलिन रूझवेल्ट हे अमेरिकेच्या अध्यक्षपदीं येऊं शकले. हा महिमा त्याग, ध्येयनिष्ठा यांचाच आहे. गेल्या शतकाच्या प्रारंभीं धनशक्तीशीं ज्यांनीं संग्राम सुरू केला त्या जेफरसनपासून दीडशें वर्षांनीं तो संग्राम त्याच निष्ठेनें लढविणाऱ्या रूझवेल्टपर्यंत अमेरिकेचे हे सर्व थोर पुरुष लोकशाहीच्या यशाचें रहस्य आपणांस समजावून देत आहेत.

धनशक्ति व लोकशक्ति यांचा अमेरिकेंत झालेला लढा जरा सविस्तर वर्णून त्याचें जें वर विवेचन केलें त्यांत एक हेतु आहे. आपल्यापुढें आपली लोकशाही यशस्वी कशी करावी हा बिकट प्रश्न येऊन पडला आहे. त्यासाठीं मी जो उपाय सुचविणार आहे तो एरवीं विपरीत, विसंगत व असयुक्तिक वाटण्याचा संभव आहे; पण अमेरिकेंतील हा लढा आपण नीट समजावून घेतला तर बहुधा तसें होणार नाहीं असें वाटतें. माझ्या मतें सध्यां तरुण भारतीय नागरिकांनीं बहुसंख्येनें कॉंग्रेसमध्यें शिरणें अवश्य आहे. कॉंग्रेसच्या अधःपाताचें, तिच्या नीतिभ्रष्टतेचें इतकें वर्णन केल्यानंतर त्याच संस्थेंत प्रवेश करावयास सांगणें हें अत्यंत विपरीत असें वाटेल. व्याख्यानांत,

खाजगी चर्चेत असें मीं सांगितल्यावर माझ्या अनेक मित्रांनीं तशी टीकाहि केली. आणि तसें त्यांना वाटूं नये, यांतील सयुक्तिकता वाचकांना दिसावी याच उद्देशानें मीं वर अमेरिकेंतील थोर पुरुषांनीं अवलंबिलेल्या धोरणाचें जरा सविस्तर स्पष्टीकरण केलें आहे. अमेरिकेंत सध्यां रिपब्लिकन व डेमोक्रॅट हे जे दोन मोठे पक्ष आहेत त्यांच्या तत्त्वांत व आचारांत सध्यां महत्त्वाचा कसलाहि फरक नाहीं. सन १८०० च्या सुमारास हे पक्षभेद निर्माण झाले त्यावेळीं त्यांचीं तत्त्वें भिन्न होतीं. पण आतां तसा भेद त्यांच्यांत नाहीं. नीति किंवा अनीति, कर्तृत्व वा नालायकी, भांडवली वा राष्ट्रीय किंवा कांहींसें समाजवादी धोरण या सर्व दृष्टींनीं दोन्ही पक्ष व्यवहारतः सारखेच आहेत. आपला जो भ्रष्टतेचा, अनीतीचा विषय चालू आहे त्या दृष्टीनें दोन्ही पक्ष सारखेच अधोगामी ठरले आहेत. असें असूनहि रूझवेल्ट, विल्सन या धीर पुरुषांनीं त्याच पक्षांच्या संघटनांत शिरून आपल्या चारित्र्यानें त्यांची शुद्धि घडवून आणली. हेंच धोरण भारतीय नागरिकांनीं स्वीकारावें असें मला वाटतें. पंडितजी सध्यां तरुणांनीं कॉंग्रेसमध्यें यावें म्हणून साद घालीत आहेत. कॉंग्रेसच्या अनीतिमुळें, धनवंतांचें तिनें जें दास्य पतकरलें आहे त्यामुळें, तिच्या कार्यकर्त्यांत सध्यां ज्या दुफळ्या होत आहेत, जी विघटना चालू आहे त्यांमुळें या संस्थेंत आपल्याला वाव नाहीं असें तरुणांना वाटतें. आणि तसें वाटणें एकपरीनें साहजिकच आहे. पण तसा वाव आहे म्हणून तरुणांनीं, नव्या दमाच्या पिढीनें कॉंग्रेसमध्यें जावें असें मला म्हणावयाचें नसून रूझवेल्ट विल्सन यांच्याप्रमाणें आंत शिरून तिची शुद्धि करून स्वतःला अवसर प्राप्त करून घेण्यासाठीं त्यांनीं कॉंग्रेसमध्यें प्रवेश करावा असें माझें सांगणें आहे. ही गोष्ट सोपी नाहीं हें खरें. नवे लोक असें कांहीं करूं लागतांच शिस्तीच्या नांवाखालीं कॉंग्रेसश्रेष्ठी व त्यांच्यामागचे सूत्रधार त्यांना हाकलून देतील यांत शंकाच नाहीं. पण याच वेळीं या तरुणांनीं संग्राम केला पाहिजे. तो झालेला अन्याय जनतेपुढें मांडून ती शक्ति आपल्यामागें खेचण्याचा प्रयत्न केला पाहिजे. यांत एक बळी जाईल, दुसरा जाईल, अनेक जातील पण या लढ्यांतूनच लोकशक्ति धनवंतांच्याकडून आपल्याकडे खेचण्याचें सामर्थ्य नव्या कार्यकर्त्यांना प्राप्त होईल. मात्र हें करीत असतांना त्यांनीं लोकसेवेचें

खडतर व्रत चालूं ठेवलें पाहिजे. त्यांतच त्यांचें चारित्र्य प्रखर होत जाईल आणि धनशक्तीवर मात करून काँग्रेसचें पुनरुज्जीवन त्यांना करतां येईल. ब्रिटिश सरकारशीं लढा चालूं असतांना आपल्याला कार्य करण्यास वाव आहे कीं नाहीं या विचारानें त्यावेळचे नेते व कार्यकर्ते अडून बसले नाहींत, तर आत्मबलिदानाचा निश्चय करून त्यांनीं आपल्या पराक्रमाला क्षेत्र निर्माण केलें. एकामागून एक त्यावेळीं मागल्या पिढीचें धुरीण बळी जाऊं लागतांच जनता जागृत झाली व तिच्यांतून एक नवी शक्ति निर्माण झाली. आणि तिच्यापुढें ब्रिटिश सरकारलाहि नमावें लागले. म्हणून तेंच धोरण तेथील तमोगुणी शक्तीशीं संग्राम करण्याच्या कामीं नव्या पिढीनें अवलंबिलें पाहिजे.

काँग्रेसमध्यें प्रवेश करावा असें आग्रहानें सांगण्याचें कारण असें कीं, ती एक फार मोठी पुण्याई आहे. आजचे काँग्रेसचे अनुयायी नीतिभ्रष्ट असले तरी ते म्हणजे काँग्रेस नव्हे. अशा स्थितींतही ते देशाच्या अधिकारपदावर राहूं शकतात तेंहि काँग्रेसच्या पूर्वपुण्याईच्या जोरावरच. हें पुण्याईचें सामर्थ्य त्यांच्यामागून काढून आपल्यामागें खेचण्याचें कार्य नव्या नागरिकांनीं केलें पाहिजे. यामुळें दोन कार्यें साधतील. सध्यांचें भ्रष्ट अधिकारी हतप्रभ होतील व नव्या पिढीला पूर्व संचिताचें बळ प्राप्त होईल. थिओडोर रूझवेल्ट यांनीं रिपब्लिकन पक्षाच्या संघटनेचा असाच उपयोग केला. विड्रो विल्सन व फ्रँकलिन रूझवेल्ट यांनीं डेमाक्रॅटिक पक्षाची पुण्याई अशीच उपयोगांत आणली. १९१४ सालीं लोकमान्य टिळक तुरुंगांतून सुटून आले तेव्हां काँग्रेसचे नेते अगदीं सरकारधार्जिणे व भीरु वृत्तीचे होते. त्यांच्या हातीं सध्यांच्या श्रेष्ठीप्रमाणेंच काँग्रेसचीं सूत्रें होतीं. तरी त्याच काँग्रेसमध्यें टिळक शिरले व त्यावेळच्या नेत्यांना आपल्या चारित्र्याच्या बळावर उधळून देऊन त्यांनीं काँग्रेस आपल्या ताब्यांत घेतली. हेंच धोरण आपण पुढें चालूं ठेविलें पाहिजे. नाहींतर फ्रान्ससारखे येथें अनंत पक्ष निर्माण होतील आणि स्थिर शासन निर्माण करणें आपल्याला अशक्य होऊन बसेल. म्हणून मला नव्या पिढीच्या तरुण नागरिकांना अट्टाहासानें असें सांगावेंसें वाटतें कीं पंडितजींच्या हांकेला प्रतिसाद देऊन त्यांनीं काँग्रेसमध्यें शिरावें व आपल्या चारित्र्यबळानें तिला पूर्वीचें उज्जवल रूप प्राप्त करून द्यावें.

१५ ऑगस्ट १९५२ या दिवशीं स्वातंत्र्यदिनाच्या निमित्तानें अध्यक्ष राजेंद्रबाबू यांनीं जें भाषण केलें त्यांत एकच संदेश होता. 'चारित्र्य संपादन करा.' खरोखर या एकाच संदेशाची भारताला जरूर आहे. आपण माणूस म्हणूनच कमी पडत आहों. सार्वजनिक नीतिमत्ता, कार्यक्षमता, उद्योगशीलता, उत्तरदायित्व, दक्षता, समाजहितबुद्धि या गुणांच्या दृष्टीनें जपानी माणूस, इंग्लिश माणूस, अमेरिकन माणूस हा हिंदी माणसापेक्षां पुष्कळच उंच पदवीवर आहे. ती उंच पदवी हेंच चारित्र्य. जमिनीची मशागत करून तिचा कस वाढविण्याचे या देशांत जसे प्रयत्न चालू आहेत त्याचप्रमाणें माणसाच्या मनाची मशागत करून त्याचा कस आपण वाढविला पाहिजे. तो वाढला तर लोकशाहीला अवश्य ती साधनसामुग्री व समृद्धि आपणांस उपलब्ध होऊन राममोहनरायांच्यापासून टिळक, महात्माजी, सुभाषचंद्र यांच्यापर्यंत अनेक विभूतींनीं ज्या एकाच ध्येयासाठीं आयुष्य वेंचलें तें ध्येय साध्य होईल.

---

## प्रकरण सोळावें

# उपसंहार

आज जग एका क्रान्तिरेषेवर उभें आहे. त्या रेषेच्या कोणच्या बाजूला त्याचें पाऊल पडेल, यावर त्याचें भवितव्य अवलंबून आहे. आणि हें भवितव्य ठरविणें भारतीयांच्या हातीं आहे. आजपर्यंतच्या इतिहासांत जगाचें भवितव्य ठरविण्याचा हा मान कालपुरुषानें असा एकट्या एक देशाच्या हातीं कधीं दिला नसेल. भारताला आज तो प्राप्त झाला आहे. त्या सन्मानाला आपण पात्र आहोंत कीं नाहीं हें मात्र ठरावयाचें आहे. कालपुरुषानें एक असामान्य जबाबदारी आपल्या शिरावर टाकून आपली सत्त्वपरीक्षाच चालविली आहे.

जगांत आज लोकायत्त शासनानें आपलें राजकारण चालविणारीं, लोकशाहीवर खरी श्रद्धा असणारीं दोनच राष्ट्रें आहेत. ब्रिटन व अमेरिका.

स्विट्झरलंड, स्वीडन, नॉर्वे हीं लहान राष्ट्रे फार तर त्या श्रेणींत आणखी बसवितां येतील; पण त्यांच्या अंगीं निर्णायक सामर्थ्य नसल्यामुळें त्यांना गौणत्व आहे. पण एवढे देश सोडले तर बाकी सर्व जग आज दण्डायत्त आहे. एवढेंच नव्हे तर त्याची श्रद्धाहि दण्डायत्त शासनावर आहे. जपान, जर्मनी, इटली यांनीं बोलूनचालून लोकशाहीचा धिःक्कार केला आहे. त्यांच्या शासनाचें बाह्यरूप गेलीं दोनचार वर्षें जरी लोकसत्ताकाचें असलें तरी तेथील नेते व तेथील जनता यांना लोकशासनाबद्दल मुळींच प्रेम नाहीं. रशिया, चीन व त्यांच्या कम्युनिस्ट साम्राज्यांतील पोलंड, झेकोस्लोव्हाकिया, रुमानिया तिबेट, मांचूरिया, मंगोलिया इ. देश यांच्या तोंडीं भाषा लोकशाहीची आहे. पण तेथील लोकसत्ता व्यक्तिस्वातंत्र्यशून्य आहेत. 'जनतेची दण्डायत्त लोकसत्ता,' 'नवी लोकसत्ता,' 'कामगारांची लोकसत्ता' अशीं आपल्या शासनाला अभिधानें देऊन आपल्या अनियंत्रित दण्डसत्तेला जरा साजरें रूप देण्याचा तेथील समाजधुरीण प्रयत्न करीत आहेत. पण गेल्या आठदहा वर्षांत जगाला त्यांचें खरें रूप दिसून आलें आहे. इजिप्त, सिरिया, अरेबिया, इराण येथें अजून उत्पातच चालू आहेत. आपण कोणचें रूप घ्यावयाचें, काय करावयाचें हें त्यांचेंच अजून ठरलेलें नाहीं. मेक्सिको, अर्जेंटिना, ब्राझील, चिली, वेनेजुवेला इ. लॅटिन अमेरिकेंतील देशांत वरच्या प्रमाणेंच नित्य बंडाळ्या चालू आहेत. त्यांनीं बाह्यतः लोकायत्त शासनें स्थापन केलीं आहेत. पण त्याचे कसलेहि संस्कार लोकांच्या मनावर झालेले नसल्यामुळें तेथें लोकशाही एखाद्या रोगाप्रमाणें लोकांच्या अंगावर फुटून निघत आहे. शिवाय युनायटेड् स्टेट्स्च्या आर्थिक पाशांतून स्वतःला मुक्त करून घेण्यांतच त्यांचीं अजून कित्येक वर्षें जातील असें दिसतें. यावरून पहातां आज जगांतल्या शासनांचा सर्व रोख दण्डसत्तेच्याच दिशेला आहे. रशिया व चीन हीं दोन राष्ट्रें दण्डसत्तांकित व साम्यवादी झाल्यामुळें जगाचें भवितव्य आज बदलूं पहात आहे. हे दोन्ही देश लोकसंख्या, क्षेत्रविस्तार आणि सर्व प्रकारचीं भौतिक धनें यांनीं संपन्न आहेत; त्यामुळें त्यांच्या हातीं फार मोठें निर्णायक सामर्थ्य आहे. ब्रिटन व अमेरिका हीं राष्ट्रें अजून पूर्वीप्रमाणेंच बलाढ्य, संपन्न व समर्थ आहेत. म्हणून लोकसत्ता व दंडसत्ता यांच्या रस्सीखेचींत लोकसत्ता अजून पाय रोवून तरी उभी आहे. पण दिवसेंदिवस

ताण वाढत चालल्यामुळें या सामन्यांतील ही रस्सी आतां अगदीं मध्यरेषेवर येऊन तंग होऊन राहिली आहे. या वेळीं आतां हिंदुस्थान आपलें बळ कोणच्या बाजूनें टाकणार यावर या जगांतल्या अभूतपूर्व सामन्याचा निर्णय अवलंबून आहे.

आजपर्यंत मानवानें आपल्या उत्कर्षासाठीं अनेक धर्म प्रस्थापित केले. अनेक संस्कृति निर्माण केल्या. कलांची उपासना केली. आणि ज्ञानविज्ञानांचें संवर्धन केलें. या सर्वांचें सारभूत तात्पर्य ज्या एका महाशब्दांत सांगतां येईल तो शब्द म्हणजे व्यक्तित्व. धर्म, संस्कृति, कला, विज्ञान हे सर्व मानवाच्या व्यक्तित्वाचेच अविष्कार आहेत. आणि लोकसत्ता ही त्या व्यक्तित्वाच्या परिपालनासाठीं, संवर्धनासाठीं व परिणतीसाठीं निर्माण झालेली जीवनपद्धति आहे. म्हणूनच लोकसत्ता हा सर्व धर्मांमध्यें अत्यंत श्रेष्ठ धर्म होय, असें म्हटल्यास त्यांत मुळींच अतिशयोक्ति नाहीं. जुन्या धर्मांत जीं महनीय तत्त्वें सांगितलीं आहेत, तीं सर्व या महाधर्माच्या अभ्यंतरांत सहज समाविष्ट होतात. प्रत्येकाला अन्न, वस्त्र, घर, शिक्षण हक्कानें मिळालें पाहिजे. प्रजेच्या कल्याणासाठींच शासनाचा जन्म झालेला आहे. गरीब-श्रीमंत असा भेद न करितां न्यायदेवतेनें सर्वांवर समदृष्टि ठेवली पाहिजे. सत्य हें सर्वांत श्रेष्ठ बळ होय. पाशवी बळ हें बळ नव्हे. सर्वांनीं सहकार्यानें पराक्रम करावा व त्याचीं फळें सहकार्यानेंच भोगावीं. त्यांत विषमता किंवा भेदभाव असूं नये. अनंत परमात्मा हा कोठें स्वर्लोकांत, ब्रह्मलोकांत, किंवा वैकुंठांत नसून तो प्रत्येक व्यक्तीच्या ठायींच निवास करतो. जनतेच्या हृदय-मंदिरांत रहाणाऱ्या या परमात्म्याची सेवा हीच खरी भक्ति होय. हीच पूजा होय. हीं व या तऱ्हेचीं सर्व धर्मांचीं आधारभूत अशीं जीं तत्त्वें तीं आत्मसात् करूनच लोकसत्ता पुढें चालली आहे. तीनचार हजार वर्षांच्या इतिहासांतून कालाच्या अग्निदिव्यांतून विशुद्ध होऊन निघालेलें धर्म, संस्कृति, कला, विज्ञान यांतलें ऐहिक उत्कर्षाला उपकारक असें एकहि तत्त्व लोकसत्तेनें झिडकारलेलें नाहीं. उलट मोठ्या साक्षेपानें त्यांचा आदर करून त्यांना सांगाती घेऊनच हा नव्या युगाचा धर्म पुढें निघाला आहे; म्हणूनच लोकसत्ता हा सर्व धर्मांचा धर्म होय असें म्हणतात.

अथेन्स या नगरींत प्रथम या धर्मतत्त्वाचा जन्म झाला. रोमन लोकांनीं त्याचा प्रतिपाळ केला. पुढें अर्वाचीन काळांत ब्रिटननें त्याचें खरें संवर्धन केलें आणि आज अमेरिका त्याची जपणूक करीत आहे. आतां यापुढलें कार्य भारताचें आहे. वर सांगितलेल्या सामन्यांत दण्डसत्तेच्या पक्षाला दिवसें-दिवस जी भरती होत आहे, ती पहातां ब्रिटन व अमेरिका आपल्या बळावर ती रस्सी लोकसत्तेच्या दिशेनें खेचून नेऊं शकतील असें वाटत नाहीं; आणि त्यांत भारतानें दण्डसत्तेच्या बाजूनें कौल दिला तर जगाचें भवितव्य ठरलेलेंच आहे. आतांपर्यंत मानवानें आपली बुद्धि, प्रज्ञा, प्रतिभा यांच्या साह्यानें जें जें मिळविलें त्या सर्वांवर विनाशाची घोर आपत्ति कोसळेल.

भारताच्या हातीं जगाचें भवितव्य आहे असें प्रारंभीं म्हटलें आहे तें या अर्थानें. जगाला क्रान्तिरेषेच्या कोणच्या दिशेला न्यावयाचें तें आतां आपण भारतीयांनीं निश्चित करावयाचें आहे. भारतीयांनीं आपला कौल लोकसत्तेच्या बाजूनें दिला आहे असें साधारणपणें म्हणण्यास हरकत नाहीं; पण याचा अर्थ इतकाच कीं, ही शासनपद्धति हितकारक आहे हें त्यांना पटलें आहे. पण या बौद्धिक जाणीवेचें निष्ठेत रूपांतर झालें नाहीं तोपर्यंत याचा कांहीं एक उपयोग नाहीं. मराठेशाहीच्या उत्तर काळांत इंग्रज आपलें राज्य घेरींत चालले होते आणि फितुरीमुळें, आपल्यांतील दुहीमुळें, शेवटीं आपलें राज्य जाणार ही जाणीव प्रत्येक मराठा सरदाराला झाली होती, हें त्या वेळच्या कागदपत्रांवरून दिसतें. पण या जाणीवेमागें जें निष्ठेचें बळ लागतें तें त्या वेळीं आपल्या ठायीं निर्माण झालें नाहीं; म्हणून आपण स्वातंत्र्य गमावून बसलों. आज कालपुरुषानें पुन्हां आपणांस संधि दिली आहे. दण्डायत्त शासनापेक्षां लोकायत्त शासन श्रेष्ठ होय, अशी आपल्या मनाची निश्चिति सुदैवानें झाली आहे; पण त्या निश्चितीमागें जी निष्ठेची पुण्याई लागते, ती आपल्या ठायीं नाहीं. ती कशी निर्माण करतां येईल याचें दिग्दर्शन करण्याचा अल्पसा प्रयत्न या ग्रंथांत केला आहे. त्याच्या अभ्यासानें भारतीय तरुणांमध्यें आपली लोकसत्ता दृढ करण्यासाठीं तनमनधन अर्पण करण्याची इच्छा निर्माण होईल, अशी आशा व्यक्त करून भारतीय लोकसत्तेचें हें विवेचन संपवितों.

---

## सूची

—